## लेखकाची इतर संशोधनपर पुस्तके

### इंग्रजी

१. *Inscriptions of the Kalchuri-Cedi Era* (Corpus Inscriptionum Indicarum, Vol. IV).
२. *Inscriptions of the Vākāṭakas* (Corpus Inscriptionum Indicarum, Vol. V).
३. *Studies in Indology,* Vol. I.
४. *Studies in Indology,* Vol. II.
५. *Studies in Indology,* Vol. III (Ancient Indian Coins).
६. *Studies in Indology,* Vol. IV.
७. *Kālidāsa.*

### मराठी

८. कालिदास.
९. संशोधनमुक्तावलि : सर पहिला.
१०. संशोधनमुक्तावलि सर दुसरा.
११. संशोधनमुक्तावलि : सर तिसरा.
१२. संशोधनमुक्तावलि : सर चवथा.
१३. संशोधनमुक्तावलि : सर पाचवा.
१४. वाकाटक नृपति आणि त्यांचा काल.
१५. कलचुरी नृपति आणि त्यांचा काल.
१६. मेघदूतातील रामगिरी अर्थात् रामटेक.

### हिंदी

१७. कालिदास.
१८. मेघदूत मे रामगिरि अर्थात् रामटेक.
१९. कलचुरि नरेश और उनका काल.
२०. वाकाटक राजवंश का इतिहास तथा अभिलेख.

# भवभूति

महामहोपाध्याय डॉ. वासुदेव विष्णु मिराशी,
एम्. ए., डी. लिट्.



पॉप्युलर प्रकाशन, मुंबई

# प्रस्तावना

चौतीस वर्षांपूर्वी मी कालिदासविषयक ग्रंथ लिहिला. तो सर्वमान्य होऊन त्याचे हिंदी, उत्कल व इंग्रजी भाषांत अनुवादही झाले आहेत.

'कालिदास' ग्रंथाची गुणवत्ता पाहून मी भवभूतीवरही तसाच ग्रंथ लिहावा अशी सूचना मला अनेक मित्रांनी केली. किंबहुना, मी गेली जवळजवळ पन्नास वर्षे विदर्भात राहत असल्यामुळे वैदर्भ कवि भवभूतीवर सर्वव्यापक असा ग्रंथ नसल्याने तसा ग्रंथ लिहिणे हे माझे एकप्रकारे कर्तव्यच होते. पण इतर कार्यात मी व्यग्र असल्याने ते माझ्या हातून पार पडले नव्हते. मध्यंतरी माझे भारताच्या प्राचीन इतिहासाकडे लक्ष आकृष्ट होऊन मला त्या क्षेत्रात बरेच कार्य करता आले. त्याच्या अनुषंगाने भवभूतिविषयक अनेक प्रश्नांचा–त्याचे जन्मस्थान, त्याचे उम्बेकाशी ऐक्य, त्याच्या नाटकात उल्लेखिलेल्या कालप्रियनाथाचा शोध, त्याचे 'कुन्दमाले'च्या कर्त्याशी पौर्वापर्य इत्यादिकांचा–अभ्यास करून मी त्यावर मराठीत व इंग्रजीत लेख लिहिले. मराठीतील बहुतेक लेख माझ्या 'संशोधनमुक्तावली'च्या विविध सरांत पुनर्मुद्रित झाले आहेत. पण मी भवभूतीवर सर्वव्यापक ग्रंथ लिहिला नव्हता. महाविद्यालयांतील विद्यार्थ्यांकरिता अनेक प्राध्यापकांनी त्याच्या ग्रंथांच्या सटीप आवृत्त्या काढल्या असल्या तरी तद्विषयक सर्व प्रश्नांची चर्चा करणारा ग्रंथ अद्यापि मराठीत कोणी लिहिला नाही. ही उणीव प्रस्तुत ग्रंथाने भरून काढण्याचा प्रयत्न केला आहे.

प्रस्तुत ग्रंथ सामान्य वाचकांकरिता तसेच विद्वान् संशोधकांकरिताही आहे. त्यात भवभूतीच्या ग्रंथांविषयी सविस्तर माहिती दिली आहे आणि त्यांतील अनेक उत्कृष्ट श्लोक देऊन त्यांचे भाषांतर दिले आहे. तसेच त्याच्या ग्रंथांच्या गुणदोषांची आणि तद्विषयक इतर प्रश्नांची सविस्तर चर्चा केली आहे. हा भाग सामान्य वाचकांस मनोरंजक वाटेल अशी आशा आहे. भवभूतिविषयक काही प्रश्न अत्यंत वादग्रस्त आहेत. गेल्या पन्नासपाऊणशे वर्षांत अनेक विद्वानांनी त्यांच्यावर लिहिले आहे. त्यांच्या मतांचा अंतर्भाव आणि परीक्षण प्रस्तुत ग्रंथात केले आहे. त्यांमध्ये सर्व ठिकाणी जरूर ते संदर्भ दिले आहेत. यांतील प्रत्येक प्रकरणात बहुश्रुत वाचकांस नवीन संशोधन, माहिती व विचार आढळतील असा मला भरंवसा आहे. काही प्रश्नांची

चर्चा सामान्य वाचकांस कंटाळवाणी पण विद्वानांस महत्त्वाची वाटेल अशी आहे. ती चार परिशिष्टांत दिली आहे.

प्रस्तुत ग्रंथात मराठी महामंडळाने स्वीकारलेल्या शुद्धलेखननियमांप्रमाणे लेखन केले आहे. फक्त संस्कृत तत्सम शब्दांच्या अखेरचे ह्रस्व स्वर दीर्घ केले नाहीत.

प्रस्तुत पुस्तक लिहिताना मला अनेक ग्रंथांचा उपयोग झाला. त्यांचे ऋण ठिकठिकाणी संदर्भ देऊन मान्य केले आहे. भवभूतीच्या नाटकांतून उतारे देताना त्यांच्या उपलब्ध चिकित्सक आवृत्तींचा उपयोग केला आहे. या सर्व ग्रंथकारांचा मी अत्यंत आभारी आहे. भवभूतीच्या जन्मस्थानाचा शोध मी बत्तीस वर्षांपूर्वी भंडारा जिल्ह्यातील आमगावाजवळचे पद्मपुर समक्ष पाहून केला. त्या वेळी प्रा. ल. रा. कुळकर्णी आणि पद्मपुरास शिक्षक असलेले श्री. भय्याजी जोशी हे माझ्याबरोबर होते. प्रस्तुत पुस्तक लिहिण्याचे ठरविल्यावर पद्मपुर पुनः पाहणे आवश्यक वाटले. गतवर्षी डॉ. देव, डॉ. दवळीकर आणि प्रा. ओंप्रकाश वर्मा यांच्याबरोबर मी ते पुनः पाहण्यास गेलो. त्या वेळी तेथील अवशेषांचे पुनः फोटो घेण्यात त्यांचे साहाय्य झाले. या सर्व मित्रांचा मी अत्यंत आभारी आहे.

गतवर्षी हे पुस्तक अर्धे लिहून झाल्यावर मी हृदयविकाराने आजारी पडलो. तेव्हा ते माझ्या हातून पुरे होईल काय याची शंका उत्पन्न झाली. तथापि त्याही स्थितीत लेखन चालू ठेवून मी ते पूर्ण केले. परमेश्वरकृपेने आज ते छापूनही झाले आहे याबद्दल मला अत्यानंद होत आहे.

हे पुस्तक गेल्या चाळीस वर्षांत संसाराची व्यवस्था संभाळून जिने मला संशोधन-कार्याकरिता अवश्य ती फुरसत आणि मनःस्वास्थ्य प्राप्त करून दिले त्या माझ्या सहधर्मचारिणीला प्रेमाने अर्पण करीत आहे.

प्रस्तुत पुस्तक प्रकाशनाकरिता स्वीकारून पॉप्युलर प्रकाशनचे श्री. रामदास भटकळ यांनी मला ऋणी केले आहे. त्याबद्दल त्यांचे मनःपूर्वक आभार मानतो. नागपूरच्या नारायण मुद्रणालयाचे श्री. पा. ना. बनहट्टी यांनी ते सुबक आणि निर्दोष छापून दिले याबद्दल मी त्यांचाही आभारी आहे.

नागपूर
२०-३-१९६८

वा. वि. मिराशी

# अनुक्रमणिका



## चित्रांची व नकाशाची सूची

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २३ | १३ | ' बप्पभट्टचरिता 'त | ' बप्पभट्टिचरिता 'त |
| २७ | २४ | कपालस्थली | कपोलस्थली |
| ८० | २४ | ' सुभाषितरत्नाकर ' | ' सुभाषितरत्नकोष ' |
| ११३ | २ | –इचंतम्यमान्मूलय– | –इचंतम्यमामोलय– |
| ११३ | १६ | –चीराजनानि | चीराजिनानि |
| १४८ | ९ | निष्कंभक | विष्कंभक |
| १८६ | १५ | माधवाशी | नन्दनाशी |
| २७८ | ३२ | वार्षिक १९६८ | वार्षिक १९६७ |
| ३१६ | १७ | यस्यायभितः | यस्यायमभितः |
| ३२२ | ३१ | मा. च. | म. च. |

# ग्रंथांचे संक्षेप

अॅ. भां. इ. — अॅनल्स ऑफ दि भांडारकर इन्स्टिट्यूट.

इ. क. चे. ई. — इन्स्क्रिप्शन्स ऑफ दि कल्चुरि-चेदि ईरा.

इं. अॅ. — इंडियन अॅंटिक्वरा.

उ. च. — उत्तररामचरित (सं. श्री. कृ. बेलवलकर).

ए. इं. — एपिग्राफिया इंडिका.

नि. प्र. — निर्णयसागर प्रत.

म. च. — महावीरचरित (सं. तोडरमल्ल).

मा. मा. — मालतीमाधव (सं. रा. गो. भांडारकर).

रघु. — रघुवंश.

सू. मु. — सूक्तिमुक्तावलि.

A. S. I. R. — Archaeological Survey of India Report.

H. C. I. P. — History and Culture of the Indian People.

J. B. B. R. A. S. — Journal of the Bombay Branch of the Royal Asiatic Society.

## प्रकरण पहिले

# भवभूतीचा काल

कविर्वाक्पतिराजश्रीभवभूत्यादिसेवितः ।
जितो ययौ यशोवर्मा तद्गुणस्तुतिवन्दिताम् ॥
—राजतरंगिणी ४, १४४.

कोणत्याही संस्कृत ग्रंथकाराच्या चरित्राविषयी लिहिताना प्रथम त्याच्या कालाचा प्रश्न सोडवावा लागतो. कारण सामान्यतः संस्कृत ग्रंथकार स्वतःविषयी किंवा स्वतःच्या कालाविषयी काहीही माहिती देत नाहीत. संस्कृत वाङ्मय इतर विषयांत कितीही समृद्ध असले तरी त्यात इतिहासग्रंथांची मोठी उणीव आहे. अत्यंत प्राचीन काळी अशी परिस्थिती नसावी. 'अथर्ववेदा'त (११, ६, ११) इतिहासपुराणांचा उल्लेख आहे. तसाच तो 'बृहदारण्यकोपनिषदा'त (२, ४, १० इत्यादि) व 'छांदोग्योपनिषदा'तहि येतो. 'छांदोग्योपनिषदा'त तर इतिहास-पुराणाला 'पाचवा वेद' किंबहुना 'वेदांचा वेद' असे म्हटले आहे. वेदांचा अर्थ इतिहासाच्या दृष्टीने जे लावत त्यांना ऐतिहासिक म्हणत. त्यांच्या अर्थ-पद्धतीची काही उदाहरणे यास्काच्या 'निरुक्ता'त दिली आहेत. 'महाभारता'ला 'जय' नामक इतिहास म्हणत; कारण त्यात पांडवांनी कौरवांवर मिळविलेल्या जयाचे वर्णन होते. पुढे मात्र इतिहास लिहिण्याची पद्धत प्रचारातून गेली. पुराणांत अत्यंत प्राचीनकाळापासून खिस्तोत्तर तिसऱ्या-चौथ्या शतकापर्यंत होऊन गेलेल्या प्रमुख राजवंशांच्या वंशावळी आहेत. त्यांत इतर माहिती मात्र काहीही नाही. नंतरच्या काळात बाणाचे 'हर्षचरित', बिल्हणाचे 'विक्रमांकदेवचरित',

जोनराजाचें 'पृथ्वीराजविजय' अशी काही राजचरित्रे लिहिली गेली; पण त्यात इतिहासापेक्षा काव्यच जास्त आहे. त्यात कालाचा एकही उल्लेख सापडणार नाही. याला अपवाद एकच. तो म्हणजे कल्हणानें लिहिलेल्या 'राजतरंगिणी' नामक काश्मीरचा इतिहास. त्याकरिता त्याने प्राचीन इतिहासग्रंथ, कोरीव लेख, दानपत्रे, प्रशस्त्या, हस्तलिखित ग्रंथ इत्यादिकातून मोठ्या परिश्रमानें माहिती जमविली होती. तरीहि खिस्तोत्तर आठव्या शतकाच्या पूर्वीचा त्याने लिहिलेला काश्मीरचा इतिहास विश्वसनीय मानला जात नाही. त्यातील विधानामुळे प्राचीन इतिहासाला मदत होण्याऐवजी त्यात घोटाळे मात्र उत्पन्न झाले आहेत. उदाहरणार्थ, विक्रमादित्य आणि मातृगुप्त यांच्याविषयी त्याने दिलेल्या कथा पाहा. त्या दंतकथावर आधारल्या आहेत आणि म्हणून अस्सल तत्कालीन ऐतिहासिक पुराव्यापुढे त्या टिकू शकत नाहीत.[१]

भारतात सार्वभौम सत्ता गाजविलेल्या राजवंशाच्या इतिहासाची ही कथा; मग त्यांच्या आश्रयास राहिलेले कवि, नाटककार, तत्त्वज्ञ, कलाकार इत्यादिकांविषयी विचारावयास नको. त्यांच्या कालाविषयी, चरित्राविषयी, तत्कालीन परिस्थितीविषयी माहिती उपलब्ध साधनावरून कणाकणानें जमवावी लागते आणि ती पारखून घ्यावी लागते.

आपला भवभूति या सामान्य नियमाला अपवाद नाही. त्याने तीन नाटकें लिहिली आहेत. त्यात त्यानें इतर संस्कृत ग्रंथकाराच्या मानानें स्वतःच्या पूर्वजांविषयी, जन्मस्थानाविषयी व विद्वत्तेविषयी थोडी माहिती दिली आहे. तिचा विचार पुढील एका प्रकरणात करू. पण त्यानें स्वतःच्या कालाविषयी आपल्या ग्रंथात चकार शब्द काढला नाही, तसेच स्वतःच्या आश्रयदात्याविषयी किंवा समकालीन ग्रंथकाराविषयीही काहीहि उल्लेख केला नाही. त्यामुळे त्याचा काल उपलब्ध प्रमाणावरून अनुमानानें ठरवावा लागतो.

## भवभूतीच्या कालाची प्रमाणे--

**( १ ) राजतरंगिणीतील उल्लेख**—खिस्तोत्तर बाराव्या शतकात काश्मीरमध्ये होऊन गेलेल्या कल्हणाच्या 'राजतरंगिणी'त कर्कोट अथवा नागवंशातील विख्यात नृपति ललितादित्य मुक्तापीड याच्या विजयाविषयी सविस्तर माहिती आली आहे. त्यामध्ये कल्हण त्या राजाच्या कनोजनृपति यशोवर्म्यावरील विजयाचे पुढील वर्णन देतो—

---

१. मिराशी, 'कालिदास' (द्वितीयावृत्ति), पृ २५-२७

यशोवर्माद्रिवाहिन्याः क्षणात्कुर्वन् विशोषणम् ।
नृपतिर्ललितादित्यः प्रतापादित्यतां ययौ ॥
मतिमान् कन्यकुब्जेन्द्रः प्रत्यभात्कृत्यवेदिनाम् ।
दीप्त यत् ललितादित्यं पृष्ठं दत्वा न्यषेवत ॥
* * *
कविर्वाक्पतिराजश्रीभवभूत्यादिसेवितः ।
जितो ययौ यशोवर्मा तद्गुणस्तुतिवन्दिताम् ॥
(तरंग. ४, श्लो. १३४, १३५, १४४)

(सूर्य जसा आपल्या उष्णतेने नदी शुष्क करतो त्याप्रमाणे ललितादित्याने यशोधर्म्याच्या सेनेचा क्षणात पराभव करुन लोकांत प्रतापादित्य नाव मिळविले. तो कनोजचा राजा राजनीतिज्ञांना शहाणा वाटला; कारण महाप्रतापी ललितादित्याला आपली पाठ दाखवून तो शरण आला. वाक्पतिराज आणि श्रीभवभूति यांनी ज्याची सेवा केली होती आणि स्वतः जो कवि होता असा यशोवर्मा पराजय पावल्यावर ललितादित्याच्या गुणांचा भाट बनला.)

या श्लोकांत भवभूतीचे कनोजनृपति यशोवर्मा याचा राजकवि म्हणून वर्णन आले आहे. तसेच त्याच्या बरोबर वाक्पतिराज हाही त्या राजाच्या सभेत कवि होता हेहि सांगितले आहे. हा वाक्पतिराज 'गउडवहो' ('गौडवध') या प्राकृत काव्याचा कर्ता. त्या काव्यात कनोजच्या यशोवर्म्याच्या दिग्विजयाचे व त्यात त्याने केलेल्या गौडाच्या (पश्चिम बंगालच्या) राजाच्या वधाचे वर्णन आले आहे. त्यावरुन तो यशोवर्म्याच्या राजसभेत होता यात संशय नाही. तो भवभूतीचा समकालीन होता कारण त्याने आपल्या काव्याच्या पुढील गाथेत (क्र. ७९९) भवभूतीचे ऋण मोठ्या विनयाने उल्लेखिले आहे—

भवभूइजलहिनिग्गयकव्वामयरसकणा इव फुरन्ति ।
जस्स विसेसा अज्जवि वियडेसु कहाणिवेसेसु ॥

(संस्कृत छाया—
भवभूतिजलधिनिर्गतकाव्यामृतरसकणा इव स्फुरन्ति ।
यस्य विशेषा अद्यापि विकटेषु कथानिवेशेषु ॥)

(वाक्पतिराज स्वतःविषयी म्हणतो 'भवभूति हा सागरासारखा आहे. सागरातून मन्थनाने अमृत बाहेर आले त्याप्रमाणे माझ्या सुंदर काव्यात भवभूतीच्या काव्यातील विशेष अद्यापि उज्ज्वल रुपाने दिसतात.')

या श्लोकातील वर्णनावरुन भवभूति हा वाक्पतिराजाच्यापेक्षा ज्येष्ठ असा राजकवि होता आणि 'गौडवध' काव्यरचनेच्या काळी तो दिवंगत झाला होता असे

अनुमान करता येतें. 'गौडवध' काव्याचा रचनाकाल त्यातील ८२७ ते ८३१ या गाथातील कंकणाकृति सूर्यग्रहणाच्या[1] वर्णनावरून गणितानें काढता येतो. सुप्रसिद्ध जर्मन संशोधक याकोबी यानें तें ग्रहण १४ ऑक्टोबर सन ७३३ या वर्षी झालें असें दाखविलें आहे.[2] त्यापूर्वी काही काल भवभूतीचें निधन झालें असावें. अर्थात् भवभूति खिस्तोत्तर आठव्या शतकाच्या आरंभी होऊन गेला असावा.

भवभूतीचा आश्रयदाता कनोजनृपति यशोवर्मा याचा शिलालेख नालंदा येथे सापडला आहे, पण त्यात कालाचा उल्लेख नाही. तथापि 'राजतरंगिणी'तील पूर्वोक्त श्लोकांत काश्मीरच्या ललितादित्य–मुक्तापीडानें त्याचा पराभव केल्याचें वर्णन आहे, त्यावरूनही त्याच्या कालाविषयी अनुमान करता येतें.

(२) **ललितादित्याचा काल**—ललितादित्य हा कर्कोट वंशातील राजा. त्याच्या पूर्वी त्या वंशात दुर्लभवर्धन, दुर्लभक, चंद्रापीड व तारापीड हे राजे होऊन गेले. त्यांच्या तसेच इतरही राजांच्या कारकीर्दीची वर्षे कल्हणानें दिली आहेत. त्यावरून ललितादित्याचा काल ठरविता येतो. हा काल ठरविण्याचे दोन प्रकार आहेत. (१) काश्मीरात ललितादित्याच्या पूर्वी होऊन गेलेल्या सर्व राजांच्या कारकीर्दीच्या वर्षांची बेरीज करून, किंवा (२) कल्हणानें राजतरंगिणी इ. स. ११४८–४९ मध्ये लिहिली त्याच्या पूर्वी आणि ललितादित्याच्या नंतर झालेल्या राजांच्या कारकीर्दीची वर्षे सन ११४८ मधून वजा करून, अशा दोन प्रकारांनी ललितादित्याचा काल निश्चितपणे ठरविता येतो. यांपैकी पहिली पद्धत खात्रीची नाही. कारण कल्हणाला सामान्यतः आठव्या–नवव्या शतकापूर्वीच्या कालाविषयी बिनचूक माहिती नव्हती. उदाहरणार्थ, त्यांपैकी रणादित्य नामक राजाला त्यानें तीनशें वर्षांची कारकीर्द दिली आहे ('राजतरंगिणी', ३, ४७०). दुसऱ्या पद्धतीनें काढलेला काल मात्र खरा ठरण्याचा पुष्कळ संभव आहे. कारण त्याविषयी चांगली साधनें कल्हणाला उपलब्ध होती. ललितादित्यापासून कल्हणानें स्वकालीन जयसिंह राजाच्या कारकीर्दीच्या बाविसाव्या वर्षी राजतरंगिणी लिहिली तोपर्यंत ४०५ वर्षे ७ महिने व ११ दिवस झाले होते, हें शकट

---

१. या ग्रहणाचें वर्णन करणारी पुढील गाथा ( क्र. ८२९ ) पाहा

रोसधुयचलणतेल्लोक्कलच्छिविच्छूढणेउरच्छाय ।
विवराहकेउभिण्ण रविबिम्ब वियलइ नहम्मि ।।
( रोषधूतचरणायास्त्रैलोक्यलक्ष्मीविच्छूढनूपुरच्छायम् ।
विवराभकेतुभिन्न रविबिम्ब विगलति नभसि ।। )

२ Gottingen Gelehrte Anzeigen, 1888, Vol II, pp. 67—68.

पांडुरंग पंडित यांनी दाखविले आहे.[१] कल्हणाने राजतरंगिणी इ. स. ११४८–४९ मध्ये लिहिली हे मागे सांगितले आहे. त्यातून हा काल वजा केल्यावर इ. स. ६९३ हे वर्ष ललितादित्याच्या राज्यारोहणाचे ठरते. त्याने ३६ वर्षे, ७ महिने व ११ दिवस राज्य केले असे कल्हण सांगतो. तेव्हा ललितादित्य इ. स. ६९३ ते ७३० या कालात होऊन गेला असे ' राजतरंगिणी 'तील उल्लेखांवरून सिद्ध होते.

ललितादित्याचा हा काल डॉ. याकोबींनी गौडवधकाव्यातील सूर्यग्रहणाच्या वर्णनाशी जुळत नाही. कारण ' गौडवधकाव्यात 'त यशोवर्म्याने आणि ' राजतरंगिणीत 'त ललितादित्याने त्याच देशात ( उदाहरणार्थ, मगध, गौड, वंग, दक्षिणापथ यामध्ये ) विजय प्राप्त केल्याचे वर्णन आहे. दोघांच्याही विजयाचे वर्णन सत्य असल्यास ते एकामागून एक झाले असे मानावे लागते. अर्थातच ललितादित्याचा दिग्विजय मागाहून झाला असावा. पण वर ठरविलेले काळ याच्या उलट दिसतात. तेव्हा कल्हणाने सांगितलेल्या काळात काही चूक असावी.

चिनी इतिहासग्रंथांवरून ही चूक दुरुस्त करता येते. चिनी लोकांना आपणापेक्षा इतिहासाचे महत्त्व जास्त वाटत होते. त्यांनी लिहिलेले इतिहास जास्त विश्वसनीय आहेत. या काळात भारत व चीन या देशात परस्पराच्या राजदूतांची नेमणूक होत होती असे दिसते. भारतीय वाङ्मयात चिनी राजदूतांचे निर्देश नाहीत, पण चिनी इतिहासात भारतीय दूतांचे उल्लेख आढळतात. ताग राजवंशाच्या इतिहासात चेनतोलोपिन्नी (चंद्रापीड) (ललितादित्याच्या पूर्वीचा दुसरा राजा ) याने अरबांच्या हल्ल्यापासून आपले संरक्षण व्हावे म्हणून चीनचे साहाय्य मागण्याकरिता इ. स. ७१३ मध्ये आपला वकील पाठविला होता' असा उल्लेख आहे तो खरा दिसतो. चीनच्या राजाने त्याला सन ७२० मध्ये राजवस्त्रे पाठविल्याचाही उल्लेख आहे. पण कल्हणाच्या वर्णनाप्रमाणे चंद्रापीड हा सन ६८९ मध्येच कालवश झाला होता. तेव्हा कल्हणाच्या कालनिर्देशात सुमारे ३१ वर्षांची चूक असावी. अर्थातच ललितादित्याचा काल इ. स. ७२४ ते ७६१ मानावा लागतो. या कालाशी ' गौडवधा 'तील सन ७३३ च्या सूर्यग्रहणाचा उल्लेख जमतो.'

( ३ ) **चिनी प्रवाशांतील उल्लेख :** या कालाचे समर्थन दुसऱ्याही काही उल्लेखावरून होते. चिनी इतिहासग्रंथावरून असे दिसते की ' मध्य भारता 'चा राजा

---

१. ' गउडवहो ' ( द्वितीयावृत्ति ), प्रस्तावना, पृ. ४२.

२. H. C. I. P., Vol. III, p. 132.

३. स्टाइन्–राजतरंगिणी, प्रस्तावना, पृ. ८९

इचाफानमो याने राज्यारोहणानंतर लौकरच सन ७३१ मध्ये आपला मंत्री सेंगपोत याला चीनच्या सम्राटाची मदत मागण्याकरिता त्या देशाला पाठविले होते. मध्य-भारताचा इचाफानमो म्हणजे कनोज येथे राज्य करणारा यशोवर्मा यात संशय नाही. तेव्हा तो सुमारे सन ७२५ मध्ये गादीवर आला असावा. तो ललितादित्याचा (सुमारे सन ७२४–७६१) समकालीन होता आणि त्याच्या काळी कंकणाकृति सूर्यग्रहण सन ७३३ मध्ये झाले होते, या पूर्वोक्त कालनिर्णयाशी हे अनुमान जुळते.

(४) जैन ग्रंथांतील उल्लेख : काही जैन ग्रंथांतील उल्लेखांवरून यशोवर्म्याच्या कारकीर्दीची अन्त्य मर्यादाही ठरविता येते. त्या उल्लेखांवरून असे दिसते की यशोवर्मा विक्रम संवत् ८०० (इ. स. ७४३) मध्ये गादीवर होता. राजशेखराच्या 'प्रबन्ध-कोशा'त म्हटले आहे की विक्रम संवत् ८०७ (इ. स. ७५०) यशोवर्म्याचा पुत्र आमराज याला जैनमुनि बप्पभट्टि याने जैनधर्माची दीक्षा दिली. पुढे आमराज गादीवर आल्यानंतर विक्रम संवत् ८११ (सन ७५४) मध्ये बप्पभट्टीला सूरिपद प्राप्त झाले. 'प्रबन्धचरिता'तील हे उल्लेख विश्वसनीय वाटतात. तेव्हा यशोवर्मा इ. स. ७५० ते ७५४ या कालात मृत्यु पावला असावा. अर्थातच त्याची कारकीर्द इ. स. ७२५ पासून सुमारे ७५२ पर्यंत असावी असे दिसते. हा काल 'राजतरंगिणी'तील व 'गौडवध' काव्यातील पूर्वोक्त उल्लेखाशी सुसंगत आहे.

वाक्पतिराजाने 'गौडवध' काव्य इ. स. ७३५ च्या सुमारास पूर्ण केले असावे. भवभूति हा त्याचा समकालीन ज्येष्ठ राजकवि. तेव्हा **त्याच्या ग्रंथांचा निर्माणकाल खिस्तोत्तर आठव्या शतकाचा पहिला पाद व दुसऱ्या पादाचा आरंभ (इ. स. ७०० ते ७३०) हा ठरतो.**

## भवभूतीच्या कालाची पूर्वमर्यादा

संस्कृत वाङ्मयातील उपलब्ध ग्रंथांच्या पुराव्याने वरील काळ समर्थित होतो.

**(१) भवभूति आणि कालिदास :** भवभूतीच्या नाटकावर कालिदासाच्या काव्यनाटकांची छाप पडलेली दिसून येते. 'मालतीमाधवा'च्या दुसऱ्या अंकात कामन्दकी दुष्यन्त–शकुन्तला आणि पुरूरवा–उर्वशी यांच्या प्रेमविवाहाची उदाहरणे देते,[१] ही कालिदासाच्या 'शाकुन्तल' व 'विक्रमोर्वशीय' नाटकांवरूनच सुचलेली दिसतात. मालती आणि माधव यांचा विवाह जुळवून आणणाऱ्या कामन्दकीचे पात्र 'मालविकाग्निमित्रा'तील पण्डिता कौशिकीवरून सुचलेले दिसते. 'मालतीमाधवा'त विरही माधव मेघाला आपल्या प्रियेकडे सन्देश नेण्यास सांगतो.[२] तो प्रसंग

१. मा मा., अ २.
२. पूर्वोक्त, अ. ९.

'मेघदूता'वरून सुचला असावा. या श्लोकांचे वृत्त 'मेघदूता'तल्याप्रमाणे मन्दाक्रान्ताच आहे. एवढेच नाही तर, त्यातील काही शब्दप्रयोग 'शाकुन्तल'– 'मेघदूता' वरूनच सुचलेले दिसतात. उदाहरणार्थ, पुढील उतारे पाहा—

(१) 'मेघदूत' (श्लो. १०)—

आशाबन्धः कुसुमसदृशं प्रायशो ह्यङ्गनानाम् ।
सद्यःपाति प्रणयि हृदयं विप्रयोगे रुणद्धि ॥

'मालतीमाधव' (९, २६)—

आशातन्तुर्न च कथयतात्यन्तमुच्छेदनीयः ।
प्राणत्राणं कथमपि करोत्यायताक्ष्याः स एकः ॥

(२) 'मेघदूत' (श्लो. ११०)—

कच्चित्सौम्य व्यवसितमिदं बन्धुकृत्यं त्वया मे ।

'मालतीमाधव'

कच्चित्सौम्य प्रियसहचरी विद्युदालिङ्गति त्वाम् ।

(३) 'शाकुन्तल' व 'मालतीमाधवां'तील पुढील उतारे पाहा—

'शाकुन्तल' (१, २०)—

मलिनमपि हिमांशोर्लक्ष्म लक्ष्मीं तनोति ।

'मालतीमाधव' (९, २५)—

बिभ्रद्बिम्बग्रहगुरुपतिबन्धुर्लक्ष्म लक्ष्मीवदेतत् ॥

(४) 'शाकुन्तल' व 'उत्तररामचरिता'तील लहान बालकाच्या वर्णनांतील साम्य पाहा.

'शाकुन्तल' (७, १७)—

आलक्ष्य दन्तमुकुलाननिमित्तहासै-
रव्यक्तवर्णरमणीयवचःप्रवृत्तीन् ।
अङ्काश्रयप्रणयिनस्तनयान्वहन्तो
धन्यास्तदङ्गरजसा मलिनीभवन्ति ॥

'उत्तररामचरित' (४, ४)—

अनियतरुदितस्मितं विराजत्कतिपयकोमलदन्तकुड्मलाग्रम् ।
वदनकमलकं शिशोः स्मरामि स्खलदसमञ्जसमुग्धजल्पितं ते ॥

याशिवाय 'उत्तररामचरिता'त विविध प्रमाणांवरून रामाला कुश व लव हे सीतेचेच पुत्र असावे असे वाटले, तो प्रसंग 'शाकुन्तला'च्या सातव्या अंकातील सर्वदमनाच्या प्रत्यभिज्ञानप्रसंगावरून सुचला असावा.

ही साम्ये इतकी उघड आहेत की त्यांवरून भवभूति कालिदासानंतर होऊन गेला असावा असे निश्चित अनुमान करता येते. कालिदास इ. स. ४०० च्या सुमारास होऊन गेला असे आम्ही इतरत्र सिद्ध केले आहे.[१]

**(२) बाण व दण्डी यांच्या ग्रंथांतील अनुल्लेख :** बाण हा हर्षाच्या (इ. स. ६०६–६४७) दरबारी होता. त्याने आपल्या 'हर्षचरिता'च्या प्रास्ताविक श्लोकात पूर्वकालीन कवींची किंवा त्यांच्या ग्रंथांची (उदाहरणार्थ, सातवाहन, प्रवरसेन, भास, कालिदास, हरिचन्द्र, 'बृहत्कथा', 'वासवदत्ता' इत्यादिकांची) स्तुति केली आहे पण त्यामध्ये भवभूतीचा किंवा त्याच्या ग्रंथाचा उल्लेख नाही. त्याप्रमाणेच अलीकडे सापडलेल्या दण्डीच्या 'अवन्तिसुन्दरीकथे'तही (इ. स. ६७५–७००) भवभूतीचा निर्देश नाही. ही प्रमाणे अभावात्मक असली तरी इतर प्रमाणांच्या साहाय्याने ती भवभूति इ. स. ७०० नंतर होऊन गेला असावा हे अनुमान समर्थित करतात.

याप्रमाणे इ. स. ७०० च्या पूर्वी भवभूतीचा उल्लेख आढळत नाही. ही झाली त्याच्या काळाची पूर्वमर्यादा. आता त्या कालाची उत्तरमर्यादा पाहू.

### भवभूतीच्या कालाची उत्तरमर्यादा

इ. स. ८०० नंतर भवभूतीचे उल्लेख किंवा त्याच्या ग्रंथांतून घेतलेली उदाहरणे आढळतात.

**(१) भवभूति आणि वामन :** वामनाच्या 'काव्यालंकारसूत्रवृत्ती'त भवभूतीच्या नाटकांतून काही उदाहरणे घेतली आहेत. गौडी रीतीचे 'ओजःकान्तिमती गौडीया' असे लक्षण देऊन वामनाने (अधिकरण १, अध्याय २, सूत्र १२) भवभूतीच्या 'महावीरचरिता'तील (अं. १, श्लो. ५४) खालील श्लोक उदाहरण म्हणून दिला आहे—

> **दोर्दण्डाञ्चितचन्द्रशेखरधनुर्दण्डावभङ्गोद्यत-**
> **ष्टंकारध्वनिरार्यबालचरितप्रस्तावनाडिण्डिमः ।**
> **द्राक्पर्याप्तकपालसम्पुटमिलद्ब्रह्माण्डभाण्डोदर-**
> **भ्राम्यत्पिण्डितचण्डिमा कथमहो नाद्यापि विश्राम्यति ॥**

पुढे चौथ्या अधिकरणात (अध्याय ४, अं. ३, सू. ६) रूपकाचे 'उपमानोपमेयस्य गुणसाम्यात्तत्त्वारोपो रूपकम्' असे लक्षण देऊन उत्तररामचरितातील (अं. १, श्लो. ३८) पुढील उदाहरण दिले आहे—

> **इयं गेहे लक्ष्मीरियममृतवर्तिर्नयनयो-**
> **रसावस्याः स्पर्शो वपुषि बहलश्चन्दनरसः ।**

---

१. 'कालिदास' (द्वितीयावृत्ति), पृ. ३५–४४.

अयं कण्ठे बाहुः शिशिरमसृणो मौक्तिकसरः
किमस्या न प्रेयो यदि परमसह्यस्तु विरहः ।।

'काव्यालङ्कारसूत्रवृत्ति'कार वामन इ. स. ८०० च्या सुमारास होऊन गेला असावा असे विद्वानांनी ठरविले आहे.[१] त्यापूर्वी भवभूति होऊन गेला असावा.

(२) भवभूति आणि राजशेखर : राजशेखराने आपल्या 'बालरामायणा'-च्या प्रस्तावनेत सूत्रधाराच्या तोंडी पुढील श्लोक घातला आहे.

बभूव वल्मीकभवः कविः पुरा
ततः प्रपेदे भुवि भर्तृमेण्ठताम् ।
स्थितः पुनर्यो भवभूतिरेखया
स वर्तते संप्रति राजशेखरः ।।

('बालरामायण', १, १६; 'बालभारत', १, १२)

(पूर्वी वाल्मीकि नामक कवि होऊन गेला; नंतर तो या जगात भर्तृमेंठ या नावाने प्रसिद्ध झाला. नंतर तो भवभूति झाला. तोच आताचा राजशेखर होय.)

यामध्ये राजशेखर स्वतःस भवभूतीचा अवतार म्हणवितो. राजशेखर कनोजनृपति प्रतीहारवंशी महेन्द्रपाल (सन ८८५ ते ९१०) आणि महीपाल (सन ९१० ते ९१७), तसेच त्रिपुरीचा कल्चुरि नृपति पहिला युवराजदेव (सन ९१५ ते ९४५) यांच्या दरबारी राजकवि होता. तेव्हा त्याचा काल सुमारे सन ८९० ते ९५० असा धरावा लागतो.[२] त्याच्या पूर्वी बराच काल भवभूति होऊन गेला होता आणि मान्यताही पावला होता.

(३) भवभूति आणि सोमदेव—सोमदेव यानेही आपल्या 'यशस्तिलक-चम्पू' (रचनाकाल इ. स. ९५९) च्या चौथ्या आश्वासात व्यास, भास, कालिदास, भारवि, भर्तृमेंठ इत्यादिकांबरोबर भवभूतीचा महाकवि म्हणून उल्लेख केला आहे.

(४) भवभूति आणि धनञ्जय व भोज—'दशरूपावलोका'चा कर्ता धनञ्जय (इ. स. ९७४–१०००) आणि 'सरस्वतीकण्ठाभरणा'चा कर्ता भोज (इ. स. १०१०–१०५५) यांनी आपल्या ग्रंथांत भवभूतीच्या नाटकांतून उदाहरणे दिली आहेत.[३]

---

१. Kane, *History of Sanskrit Poetics*, p. 138.

२. Mirashi, *Inscriptions of the Kalachuri-Chedi Era*, Introd. pp. clxxv f.

३. दशरूपावलोक (निर्णयसागर आवृत्ति), पृ. ३८ वर भवभूतीचा उल्लेख आहे. त्यात त्याच्या नाटकातील अनेक उदाहरणे आली आहेत. सरस्वती-कंठाभरण, पृ. ५१९, ५२० इत्यादि.

(५) भवभूति आणि सोड्ढल : उदयसुन्दरीकथेचा कर्ता सोड्ढल हा उत्तर कोंकणचे नृपति छित्तराज, नागार्जुन व मुम्मुणि यांच्या दरबारी राजकवि म्हणून होता. त्यानें ई. स. १०५० च्या पूर्वी रचलेल्या त्या कथेत (पृ. १५४) भवभूतीची स्तुति पुढीलप्रमाणे केली आहे.[1]

मान्यो जगत्यां भवभूतिरार्यः सारस्वते वर्त्मनि सार्थवाहः ।
वाचं पताकामिव यस्य दृष्ट्वा जनः कवीनामनुपृष्ठमेति ।।

(या पृथ्वीतलावर वाङ्मयमार्गावरील साहित्यिकांच्या ताफ्याचा मुख्य आर्य भवभूति हा आदरणीय आहे. त्याची वाणीरूपी पताका पाहून लोक कवींच्या मागोमाग जातात.)

(६) भवभूति आणि कुन्तक : 'वक्रोक्तिजीवित'कार कुन्तकांनें (सु. सन १०००) भवभूतीचा 'सुंदर रचनेनें मनोरम झालेल्या मुक्तकाचा (स्फुट श्लोकाचा) कर्ता' म्हणून उल्लेख केला आहे[2] आणि त्याच्या तीनही नाटकांतून उदाहरणें घेतली आहेत.[3]

(७) भवभूति आणि अभिनवगुप्त : अभिनवगुप्त (सु. ९८० ते १०२०) यानें भरताच्या 'नाट्यशास्त्रा'वरील आपल्या टीकेंत 'महावीरचरित' आणि 'मालतीमाधव' यांतून उदाहरणें घेतली आहेत.[4]

यानंतरच्या मम्मटादिकांच्या अलंकारग्रंथांत उद्धृत केलेली भवभूतीच्या नाटकांतील उदाहरणें सुप्रसिद्ध आहेत.

(८) भवभूति आणि सुभाषितसंग्रहकार : भवभूतीचे अनेक श्लोक प्राचीन सुभाषित-संग्रहांत संगृहीत केलेले आढळतात. त्यांपैकीं सर्वांत प्राचीन अशा विद्याकराच्या 'सुभाषितरत्नकोषा'त ३१ श्लोक नामनिर्देशासह आणि १३ श्लोक तसा निर्देश न करतां घेतले आहेत.[5] विद्याकर इ. स. च्या अकराव्या शतकात होऊन गेला. यानंतर सन १२०५ मध्यें रचलेल्या श्रीधरदासकृत 'सदुक्तिकर्णामृता'त भवभूतीचे अकरा श्लोक नामनिर्देशासह दिले आहेत.[6] त्यांतील बहुतेक मुक्तक

१. सोड्ढल, उदयसुंदरीकथा, प्रस्तावना, पृ. ६७
२. वक्रोक्तिजीवित, (सं. सुशीलकुमार दे), पृ. ७१
३. पूर्वोक्त, पृ. १२, ३९, २११ पाहा.
४. नाट्यशास्त्र-अभिनवभारती, भाग १, पृ. २९८ आणि भाग २ पृ. २२२.
५. सुभाषितरत्नकोश (हार्वर्ड ओरिएंटल सीरीज), प्रस्तावना, पृ. ८७
६. सदुक्तिकर्णामृत (सं. हरदत्त शर्मा), प्रस्तावना, पृ. ८३

स्वरूपाचे आहेत. यापुढील अनेक सुभाषितसंग्रहात भवभूतीचे श्लोक घेतलेले आढळतात. त्याचा उल्लेख करण्याची जरूरी नाही.

वरील विवेचनावरून ख्रिस्तोत्तर ८०० पासून पुढे अनेक आलंकारिकांनी व सुभाषितसंग्रहकारांनी भवभूतीचे श्लोक नामनिर्देशासह किंवा तसा निर्देश न करता उद्धृत केलेले आढळतात आणि त्याची कीर्ति उत्तरोत्तर वृद्धिगत होत गेलेली दिसते. याशिवाय त्याने उत्तरकालीन अनेक नाटककारांवर आपली छाप पाडलेली दिसते. तिचे विवरण पुढे एका प्रकरणात करू.

**वरील विवेचनावरून भवभूतीचा ग्रंथरचनेचा काल ख्रिस्तोत्तर ७०० ते ७३० असा ठरतो.**

## प्रकरण दुसरे

# भवभूतिकालीन परिस्थिति

शास्त्रोपस्कृतशब्दसुन्दरगिरः शिष्यप्रदेयागमा
विख्याताः कवयो वसन्ति विषये यस्य प्रभोर्निर्धनाः ।
तज्जाड्यं वसुधाधिपस्य सुधियस्त्वर्थं विनापीश्वराः
कुत्स्याः स्युः सुपरीक्षकैर्न मणयो यैरर्घतः पातिताः ॥

—भर्तृहरि

मागील प्रकरणात आन्तर व बाह्य प्रमाणावरून भवभूतीच्या ग्रन्थरचनेचा काळ खिस्तोत्तर ७०० ते ७३० असा आपण निश्चित केला आहे. भवभूति विदर्भात जन्मला होता आणि त्याच्या आयुष्याचा उत्तर भाग उत्तर भारतात पद्मावती व कनोज येथे गेला होता, हे पुढील प्रकरणात दाखविले आहे. त्याचा आश्रयदाता कनोजनृपति यशोवर्मा ह्याचा पराजय काश्मीरनृपति ललितादित्य-मुक्तापीड याने केला होता हेहि 'राजतरंगिणी'तील उल्लेखावरून आपण मागील प्रकरणात पाहिले आहे. तेव्हा भवभूतीचा संबंध विदर्भ, उत्तर भारत आणि काश्मीर या प्रदेशाशी आला होता हे सिद्ध झाले आहे. या प्रदेशात त्याच्या काळी कशी परिस्थिति होती हे पाहू. त्यायोगे त्याच्या आयुष्यातील काही घटनांवर प्रकाश पडण्याचा संभव आहे.

**विदर्भ :** विदर्भात खिस्तोत्तर २५० ते ५०० या काळात वाकाटक वंशाची राजवट चालू होती. या काळाला विदर्भाचे सुवर्णयुग म्हटले जाते. कारण त्यामध्ये विदर्भाची राजकीय, धार्मिक आणि आर्थिक बाबतीत, तसेच संस्कृत व प्राकृत वाङ्मयात

आणि स्थापत्य, शिल्प व चित्रकलांत अभूतपूर्व प्रगति झाली.[1] वाकाटक राजवंशाच्या चार शाखा होत्या. त्यांपैकी दोन शाखांचे कोरीव लेख विदर्भात सापडले आहेत. वडील शाखेची राजधानी आरंभी नन्दिवर्धन (नागपूरपासून सुमारे २५ मैलांवरचे नन्दरधन) येथे होती. ती पुढे द्वितीय प्रवरसेनाच्या कारकीर्दीत प्रवरपुर (वर्ध्यापासून ६ मैलांवरचे धाम नदीच्या काठचे पवनार) येथे हलविण्यात आली. तेथूनही ती काही काळानंतर पद्मपुर (भंडारा जिल्ह्यातील आमगावाजवळचे पदमपुर) येथे बदलली. पुढे या शाखेच्या अमलाखालचा प्रदेश दुसऱ्या म्हणजे वत्सगुल्म शाखेच्या राज्यात अन्तर्भूत झाला.

या ज्येष्ठ शाखेचे राज्य प्रथम प्रवरसेनाच्या मृत्यूनंतर सन ३३० मध्ये स्थापले गेले. ते सन ४९० पर्यंत (म्हणजे सुमारे १६० वर्षे) टिकले. या कालात विदर्भात हिंदुधर्माला राजाश्रय मिळून त्याची भरभराट झाली. वैदिक यज्ञयाग झाले. अनेक देवालये बांधण्यात येऊन स्थापत्य व शिल्पकलांना उत्तेजन मिळाले आणि संस्कृत व प्राकृत भाषांत उत्कृष्ट काव्ये निर्माण झाली. त्यांपैकी 'मेघदूत' व 'सेतुबन्ध' (किंवा रावणवहो) ही अद्यापि उपलब्ध आहेत. या व इतर उत्कृष्ट काव्यनिर्मितीमुळे वैदर्भी नामक विशिष्ट रीति किंवा काव्यरचनापद्धति प्रचलित झाली. लोकांचे जीवन सुखी व समृद्ध झाले. त्याचे प्रतिबिंब कालिदासाच्या काव्यातील काही उल्लेखांत आढळते.[2] या शाखेच्या अमलाखाली विदर्भाचा पूर्व भाग होता.

विदर्भाच्या पश्चिम भागात वाकाटक वंशाची दुसरी शाखा राज्य करीत होती. या शाखेतही अनेक प्रतापी राजे होऊन गेले. त्यांची राजधानी वत्सगुल्म (सध्याचे अकोला जिल्ह्यातील वाशीम) येथे होती. या शाखेचा संस्थापक सर्वसेन हा वाकाटकनृपति प्रथम प्रवरसेन याचा पुत्र. हा प्राकृत वाङ्मयात 'हरिविजय' काव्याचा कर्ता म्हणून प्रसिद्ध आहे. हे काव्य आता उपलब्ध नाही, पण त्याची स्तुति आनन्दवर्धन, कुन्तक, हेमचन्द्र अशा अनेक आलंकारिकांनी केली आहे आणि त्यातील उतारे दिले आहेत त्यावरून त्याची उत्कृष्टता प्रत्ययास येते.

या शाखेचा शेवटचा राजा हरिषेण याचे साम्राज्य उत्तरेत माळवा व गुजराथ, दक्षिणेत तुंगभद्रा, पश्चिमेस अरबी समुद्र आणि पूर्वेस बंगालचा उपसागर या अति विस्तृत प्रदेशावर पसरले होते.

या शाखेतील राजांचा प्राकृत भाषेस व बौद्धधर्मास विशेष आश्रय होता असे दिसते. मागे सर्वसेनाच्या 'हरिविजय' या काव्याचा उल्लेख आला आहे. त्याने

---

१. मिराशी, वाकाटकनृपति आणि त्यांचा काल, पृ. १११–१७०

२. पूर्वोक्त, पृ. ७९.

रचलेल्या काही प्राकृत गाथाही 'गाथासप्तशती'त ('सत्तसई'त) पुढे घातल्या गेलेल्या आढळतात. याशिवाय त्या काळी अनेक प्राकृत काव्ये रचली असावी; पण ती आता उपलब्ध नाहीत. तथापि त्यांच्या निर्मितीमुळे वच्छोमी नामक प्राकृत काव्य-रीति प्रचलित झाली असे दिसते. राजशेखराने 'कर्पूरमंजरी' या प्राकृत नाटकाच्या नान्दीश्लोकात वच्छोमी रीतीचा निर्देश केला आहे. वच्छोमी (संस्कृत, वात्सगुल्मी) हे नाव वत्सगुल्म या राजधानीच्या नावावरून पडले होते, हे उघड आहे. या शाखेचा बौद्धधर्मालाही आश्रय असावा. शेवटचा राजा हरिषेण याच्या वराहदेव नामक मंत्र्याने अजंठा येथील क्रमांक १६ चे लेणे आणि अजंठ्यापासून पश्चिमेस ११ मैलांवर असलेली घटोत्कच लेणी कोरविली होती. अजंठ्याच्या या लेण्यांतील सुंदर चित्रे अद्यापि शाबूत आहेत. खानदेशातील हरिषेणाच्या सामन्ताने अजंठ्याची दोन लेणी-क्रमांक १७ चे विहारलेणे आणि क्रमांक १९ चे चैत्यलेणे अशी-कोरवून त्यास सुंदर शिल्पे व चित्रे यांनी अलंकृत केले होते. अजंठ्याच्या व घटोत्कचाच्या लेण्यांत या शाखेच्या पूर्वोक्त मंत्र्याचे व सामन्ताचे कोरीव लेख अद्यापि त्रुटित अवस्थेत विद्यमान आहेत. त्यावरून या शाखेचे नृपति व त्यांचे सामन्त यांच्याविषयी बरीच माहिती मिळाली आहे.[१]

वाकाटकांचा अस्त सन ५३५ च्या सुमारास झाला असावा. अन्तिम कालखंडातील परिस्थितीचे चित्र 'दशकुमारचरिता'च्या विश्रुतचरित नामक आठव्या उच्छ्वासात रेखाटले आहे.[२] त्यावरून हरिषेणाचा पुत्र नादान निघाल्यामुळे त्याच्या कविवाज अश्मकदेशाधिपति सामन्ताने वनवासी (उत्तर कानडा) प्रदेशाच्या राजास चिथावणी देऊन विदर्भावर स्वारी करविली आणि त्या युद्धात इतर सामन्तांना फितवून विदर्भाधिपतीच्या पिछाडीवर हल्ला केला असे दिसते. त्या युद्धात विदर्भसम्राट् मारला गेला. पण विश्वासघातकी अश्मकाधिपतीला विदर्भाचे राज्य फार काळ लाभले नसावे. कारण हरिषेणाचा नातेवाईक (बहुधा त्याचा जामात) आन्ध्रनृपति विष्णुकुंडीवंशी प्रथम माधववर्म्याने त्याचा पाडाव करून काही काळ विदर्भात आपला अंमल बसविलेला दिसतो. त्याची नाणी विदर्भात पवनार व इतर काही ठिकाणी सापडली आहेत.

सन ५५० च्या सुमारास माहिष्मती (सध्याचे नर्मदाकाठचे महेश्वर) येथील कलचुरि नृपति कृष्णराज याचे राज्य महाराष्ट्रात पसरले. त्याची काही नाणी अमरावती जिल्ह्यातील धामोरी, बैतुल जिल्ह्यातील पट्टण वगैरे ठिकाणी सापडली आहेत. त्याने

---

१ मिराशी, वाकाटक नृपति आणि त्यांचा काल, पृ ३४१–३८८

२. मिराशी, संशोधनमुक्तावलि, सर दुसरा, पृ ८५-१००.

विदर्भ देश आपला सामन्त स्वामिराज याच्या ताब्यात दिलेला दिसतो. याचा ताम्रपट काही वर्षांपूर्वी रामटेकजवळ नन्दिवर्धन (नन्दर्धन) गावी सापडला होता. त्यात कलचुरींच्या लेखातल्याप्रमाणे आभीर संवताच्या वर्षाचा निर्देश केला आहे. त्या ताम्रपटाचे वर्ष इ. स. ५७३ हे आहे.[1]

या ताम्रपटात स्वामिराजाच्या वंशाचा नामनिर्देश नाही, पण त्या काळात विदर्भात सापडलेल्या इतर ताम्रपटावरुन तो राजवंश राष्ट्रकूट असावा असे दिसते.

या मांडलिक राष्ट्रकूट वंशाचे नंतरचे दोन ताम्रपट विदर्भात अकोला[2] व मुल्ताई[3] येथे सापडले आहेत. ते दोन्ही राष्ट्रकूट वंशी नन्नराजाचे असून त्यात अनुक्रमे शक संवत् ६१५ (सन ६९३-९४) आणि ६३१ (सन ७०९-१०) याचा निर्देश आहे.[4] त्यात खालील राजांचा उल्लेख आहे. (कंसातील त्यांच्या शासनाची वर्षे अदमासाने दिली आहेत.)

दुर्गराज
(सन ६३०-६५०)
|
गोविन्दराज
(सन ६५०-६७०)
|
स्वामिकराज
(सन ६७०-६९०)
|
नन्नराज
(सन ६९०-७१५)
(ज्ञात वर्षे सन ६९३ आणि ७०९)

मागील प्रकरणात भवभूतीचा ग्रथरचनाकाल सन ७०० ते ७३० हा ठरविला आहे. त्याचे पूर्वज विदर्भातील पद्मपुर येथे राहत होते. भवभूतीचे बालपण तेथेच गेले. त्याच्या काळी विदर्भात राष्ट्रकूटवंशी नन्न राजाचे राज्य होते हे वरील वंशावळी-वरुन दिसून येईल.

---

१. मिराशी, इ. क. चे. ई., भाग २, पृ. ६११–६१७.
२. ए. इ., पु. २९, पृ. १०९–१५
३. इ. अँ, पु १८, पृ. २३० इ.
४. नन्नराजाचा तीवरखेड ताम्रपट (शक संवत् ५५३) बनावट आहे. मिराशी, स्टडीज् इन इंडॉलॉजी, भा. २, पृ. २५–३० पाहा.

हे राजघराणे माडलिक होते. प्रथम त्यानी जरी माहिष्मतीच्या कलचुरींचे स्वामित्व मान्य केले असले तरी सन ६२० च्या सुमारास बदामीच्या चालुक्यवंशी द्वितीय पुलकेशीने कलचुरींचे उच्छेदन करून महाराष्ट्र आपल्या साम्राज्यास जोडला त्या काळी त्यानी त्याचे आधिपत्य स्वीकारले असावे. सन ६३४ च्या ऐहोळे ताम्रपटात यासंबंधी खालील श्लोक आला आहे.[१]—

विधिवदुपचिताभिः शक्तिभिः शक्रकल्प-
स्तिसृभिरपि गुणौघैः स्वैश्च माहाकुलाद्यैः ।
अगमदधिपतित्वं यो महाराष्ट्रकाणां
नवनवतिसहस्रग्रामभाजां त्रयाणाम् ।।

( इंद्रासारखा तो द्वितीय पुलकेशी मन्त्रशक्ति, उत्साहशक्ति आणि प्रभुशक्ति या तिन्ही शक्ति योग्य प्रकारे वाढवून त्यायोगे आणि आपल्या श्रेष्ठ कुलीनत्वादिकांच्या योगे नव्याण्णव हजार गांव असलेल्या तीन महाराष्ट्रांचा स्वामी झाला. )

या तीन महाराष्ट्रात विदर्भ, उत्तर महाराष्ट्र आणि कुन्तल ( दक्षिण महाराष्ट्र ) याचा अन्तर्भाव होत असे. तेव्हा विदर्भावर बदामीच्या चालुक्याची साम्राज्यसत्ता पसरली होती यात संशय नाही. विदर्भाच्या राष्ट्रकूट सामन्तांनी पुलकेशीचे स्वामित्व कबूल केले, याचे एक गमक त्याच्या ताम्रपटातील कालनिर्णयार्थ त्यानी केलेल्या शक सवताच्या उपयोगात आहे. हे राष्ट्रकूट वाकाटकाच्या अस्तानतर विदर्भात उदयास आले ते कलचुरींचे माडलिक म्हणून. तेव्हा ते आपल्या सम्राटाप्रमाणे आभीर सवताचा उपयोग करीत, हे मागे स्वामिराजाच्या नन्दिवर्धन ताम्रपटावरून दाखविले आहे. चालुक्यांचे स्वामित्व स्वीकारल्यावर ते त्याच्याप्रमाणे शकसवताचा उपयोग करू लागलेले दिसतात. तेव्हापासून आतापर्यंत विदर्भात तोच शकसवत् चालू आहे.

या माडलिक राष्ट्रकूट राजवंशाची राजधानी कोठे होती हे निश्चितपणे माहीत नाही. कलचुरि कृष्णराजाचा सामंत स्वामिकराज याच्या काळी ती नन्दिवर्धन येथे असावी. पण पुढे ती बदलली असे दिसते. मुल्ताई ताम्रपटात राजधानीचा किंवा जेथून तो दिला त्या स्थानाचा उल्लेख नाही. पण अकोला ताम्रपटात पद्मनगराचा तसा निर्देश आहे.[२] त्या ताम्रपटाने दिलेले गाव उम्बरिका आकोल्याजवळचे उम्बरी असावे. तेव्हा पद्मनगर हे त्याच्यापासून फार दूर नसलेले पद्मीन असावे असा तर्क त्या ताम्रपटाच्या संपादकानी केला आहे. त्या ताम्रपटात उल्लेखिलेली उम्बरिकेच्या

---

१ ए इ, पु ६, पृ १ इ

२. पूर्वोक्त, पु २९, पृ ११३. पदमीन हे आता ओसाड झाले आहे. ' महाराष्ट्रातील खेड्यांची आणि शहराची वर्णक्रमी ', पृ. १३५, पाहा.

चतुःसीमेची गांव उम्बरीच्या आसमन्तात् अद्यापि सापडली नसल्याने हे स्थलनिश्चय पक्के मानता येत नाहीत. शिवाय दान दिलेल्या गावांजवळच राजाचे तत्कालीन निवासस्थान असते असाही नियम नाही. पद्मनगर आणि पद्मपुर यातील साम्य उघड आहे.[1] तेव्हा अकोल्या ताम्रपटात उल्लेखिलेले पद्मनगर हे पूर्वी वाकाटकांची राजधानी असलेले पद्मपुर असण्याचा संभव आहे. हेच पद्मपुर भवभूतीचे जन्मस्थान होय हे पुढील प्रकरणात दाखविले आहे.

पद्मनगर किंवा पद्मपुर ही सामन्त राष्ट्रकूट वंशाची राजधानी असली तरी ती फारशी भरभराटीत नसावी. अर्थातच तेथील राजाश्रय समाधानकारक असण्याचा संभव नाही. भवभूतीच्या काळी विदर्भात कोणा सम्राटाची राजधानी नव्हती. तत्कालीन चालुक्य सम्राट् विजयादित्य याची राजधानी वातापि (विजापुर जिल्ह्यातील बदामी) येथे होती. तेव्हा विदर्भातील कवींस त्याचा उदार आश्रय मिळणे शक्य नव्हते. पुढेही कोणत्याही प्राचीन कालखंडात विदर्भात साम्राज्यसत्तेची राजधानी नव्हती. म्हणून नवव्या व दहाव्या शतकात वत्सगुल्म (वाशीम) येथील राजशेखर व त्याचे पूर्वज यांना त्रिपुरीचे कलचुरि व कनोजचे प्रतिहारी सम्राट् यांच्या दरबारी राजाश्रयाकरिता जावे लागले.[2] तोच प्रसंग भवभूतीवर आलेला दिसतो. त्यांनेही विदर्भातील आपले जन्मस्थान पद्मपुर सोडून उत्तरेत आपले नशीब काढण्याकरिता प्रयाण केले.

**पद्मावती** — भवभूति विदर्भातून उत्तरेत गेला तो प्रथम पद्मावतीस काही वर्षे राहिला असे दिसते. पद्मावतीचे हल्लीचे नाव पवाया किंवा पदमपवाया असे आहे. हे गाव मध्य भारतात ग्वाल्हेरच्या नैर्ऋत्येस ४२ मैलावर आहे. येथे ख्रिस्तोत्तर तिसऱ्या चौथ्या शतकात नाग राजे राज्य करीत होते. त्यांच्या वंशास भारशिव अशी संज्ञा होती. कारण ते त्यांच्या रिवाजाप्रमाणे आपल्या खांद्यावर शिवलिंग धारण करीत असत. आपल्या भक्तीमुळे संतुष्ट होऊन भगवान् शंकरानी आपला राजवंश उत्पन्न केला अशी त्यांची श्रद्धा होती. या वंशातील राजांनी आपल्या पराक्रमाने गंगापर्यंतचा प्रदेश काबीज करून स्वतःस राज्याभिषेक करून घेतला होता आणि दहा अश्वमेध यज्ञ करून आपली सत्ता दूरवर पसरविली होती. तिसऱ्या शतकात परकी

१. एकाच स्थलाची किंचित् भिन्न असलेल्या नावाची इतरही उदाहरणे आहेत. प्रवरपुर ही वाकाटकांची राजधानी सध्या पवनार (प्रवरनगर) नावाने अस्तित्वात आहे.

२. मिराशी, कलचुरि नृपति आणि त्यांचा काल, पृ. ९३–१००.

कुशाण राजाच्या सत्तेला पायबंद पडून त्याचे मध्य भारतातून उच्चाटण झाले, याचे श्रेय पूर्व पंजाबच्या यौधेयाप्रमाणे मध्य भारतातील नाग नृपतींनाही दिले पाहिजे. खिस्तोत्तर चौथ्या शतकाच्या आरंभी पद्मावती येथे भारशिववंशी भवनाग राज्य करीत होता. त्याने स्वकालीन वाकाटक वैदर्भसम्राट् प्रथम प्रवरसेन याच्या गौतमीपुत्र नामक पुत्राला आपली कन्या देऊन आपली सत्ता जास्तच दृढ केली होती. पुढे या दोघा संबंधी नृपतींच्या निधनानंतर समुद्रगुप्ताने स्वकालीन गणपतिनाग नामक पद्मावतीच्या नाग राजाचा उच्छेद करून नागांचे राज्य गुप्तसाम्राज्यास जोडले होते.[1]

पद्मावतीचा पुढील इतिहास मात्र उपलब्ध नाही. गुप्तांच्या अस्तानंतर तेथे स्वतंत्र राज्य स्थापित झाले असावे. इ. स. च्या आठव्या शतकात तेथे समृद्ध नगर होते असे भवभूतीच्या 'मालतीमाधवा'त पद्मावतीचे व तिच्या परिसराचे जे वर्णन आले आहे, त्यावरून स्पष्ट आहे. त्याची विस्तृत माहिती पुढील प्रकरणात दिली आहे. पद्मावती खिस्तोत्तर अकराव्या शतकापर्यंत अत्यंत भरभराटीत होती हे खजुराहो येथील विक्रम संवत् १०५८ (इ. स. १०००–१००१) च्या शिलालेखात[2] तसेच धाराधीश भोज (सुमारे १०१५ ते १०५५) याच्या 'सरस्वतीकंठाभरणा'त[3] तिचे जे वर्णन आले आहे त्यावरून सिद्ध होते.

**कनोजः**— पद्मावतीमध्येही भवभूतीला राजाश्रय मिळालेला दिसत नाही, कारण त्याची तिन्ही नाटके काल्प्रियनाथ (सध्याचे काल्पी) येथील भगवान् सूर्याच्या तत्काली भारतात सर्वत्र प्रसिद्ध असलेल्या देवालयाच्या यात्रेच्या प्रसंगी प्रथम रंगभूमीवर आली होती हे पुढील एका प्रकरणात दाखविले आहे.

भवभूति पद्मावती येथे कित्येक वर्षे राहिला असावा. काल्प्रियनाथाच्या यात्रेच्या प्रसंगी झालेल्या त्याच्या नाटकाच्या प्रयोगांनी त्याची कीर्ति भारतात दूरवर पसरली असावी. त्याकाळी कनोज येथे यशोवर्मा नामक बलाढ्य नृपति राज्य करीत होता. त्याच्या कानी ती गेल्यावर त्याने भवभूतीला सन्मानाने बोलावून आपल्या राजसभेत मानाची जागा दिली असे पहिल्या प्रकरणात उद्धृत केलेल्या 'राजतरंगिणी'तील श्लोकावरून दिसते. तेव्हा आता आपण यशोवर्म्याच्या इतिहासाकडे वळू.

खिस्तपूर्व चौथ्या शतकापासून खिस्तोत्तर सहाव्या शतकापर्यंत जशी पाटलिपुत्र ही नंद, मौर्य, शुंग, काण्व आणि गुप्त सम्राटांच्या काळात त्यांच्या उत्तरभारतीय साम्राज्याची राजधानी होती तशी कान्यकुब्ज (कनोज) ही खिस्तोत्तर सातव्या

१. फ्लीट, गुप्त इन्स्क्रिप्शन्स्, पृ. ७.
२. ए इ, पु १, पृ १४८ इ.
३. सरस्वतीकण्ठाभरण, २, २२४.

शतकापासून पुढे वर्धन, प्रतीहार व गाहडवाल वंशांच्या उत्तरभारतीय साम्राज्याची राजधानी झाली. सन ६४७ मध्ये आलेल्या हर्षाच्या निधनानंतर सुमारे पत्तर-ऐशी वर्षांचा काल हे उत्तरभारतीय इतिहासाचे अंधकार युग समजले जाते. या काळात कनोज येथे कोण राज्य करीत होता याची माहिती नाही. मागे सांगितल्याप्रमाणे यशोवर्मा हा सन ७२५ च्या सुमारास गादीवर आला. त्याच्या पूर्वजांविषयी आपणास काहीच माहिती नसल्याने त्याचा उदय उल्केप्रमाणे आकस्मिक झाला असे मानण्यात येते. 'गौडवध' काव्यात (गाथा क्र. १०६४-६५) तो चंद्रवंशात जन्मला होता असे म्हटले आहे. 'बप्पभट्टिसूरिचरित' त तो मौर्यवंशी होता असा उल्लेख आहे.[1] या जैन ग्रंथातील कालोल्लेख संभवनीय वाटतात हे मागे दाखविले आहे, तेव्हा त्यातील हे विधानही सत्य असेल. 'प्रभावकचरित' नामक दुसऱ्या एका चरित्रग्रंथात (११५६-४७) कनोजनृपति यशोवर्मा हा चन्द्रगुप्ताच्या वंशाचा चूडामणि होता आणि त्याने सुप्रसिद्ध मौर्यवंशाला कीर्तिमान् केले होते असे म्हटले आहे. चंद्रगुप्ताच्या वंशजांची नावे वर्मपदान्त नव्हती असा आक्षेप काही विद्वान् घेतात, पण त्यात फारसे तथ्य नाही. मौर्य वंशाच्या शाखा भारतात दूरवर पसरल्या होत्या. त्यातील काही नृपतींची नावे वर्मपदान्त आहेत. उदाहरणार्थ, ख्रिस्तोत्तर सातव्या शतकात उत्तर कोंकणात पुरी येथे राज्य करणाऱ्या मौर्य नृपतीचे सुकेतुवर्मन् हे नाव पाहा. तेव्हा यशोवर्मा हा मौर्यवंशी होता असे दिसते.

त्याचा कनोज येथे राज्य करणारा पूर्वजही प्रतापी असावा. बदामीच्या चालुक्यांच्या इतिहासावरून असे दिसते की द्वितीय पुलकेशीचा नातू विनयादित्य (इ. स. ६८१ ते ६९६) याने आपल्या कारकीर्दीच्या अखेरीस उत्तरापथावर (उत्तर भारतावर) स्वारी केली. त्या वेळी त्याच्या विजयादित्य नामक शूर पुत्राने त्याच्या समक्ष आपल्या शौर्याची शर्थ करून गंगा-यमुना यांच्या दुआबात 'सकलोत्तरापथनाथा'चा (संपूर्ण उत्तर भारताच्या सम्राटाचा) पराभव करून त्याचा पालिध्वज, गंगा व यमुना यांची चिन्हे आणि इतरही राजचिन्हे हस्तगत केली. पण पराभव पावलेल्या शत्रूंनी शेवटी त्याला पकडले व कैदेत टाकले. पुढे तो कैदेतून निसटून स्वदेशी आला आणि गादीवर बसला. हे युद्ध गंगा-यमुनाच्या दुआबात झाले असल्याने विजयादित्याचा शत्रु कनोज नृपति असावा. कोणी तो यशोवर्माच असावा असे म्हणतात. पण हे युद्ध विनयादित्याच्या कारकीर्दीच्या अखेरीस सुमारे सन ६९५ मध्ये झाले असल्यामुळे त्या वेळी यशोवर्मा गादीवर आला नसून त्याचा पूर्वाधिकारी राज्य करीत होता असे दिसते, दुर्दैवाने त्याचे नाव कोठेही दिले नाही.

---

१. *J. B. B. R. A. S.*, Vol. III, pp. 103, 314.

मागे सांगितल्याप्रमाणे वाक्पति राजाने 'गौडवध' काव्यात यशोवर्म्याच्या दिग्विजयाचे सविस्तर वर्णन केले आहे. वर्षाकाल संपल्यावर यशोवर्मा विजययात्रेकरिता निघाला. त्याने प्रथम शोण नद पार करून आणि विन्ध्यवासिनी देवीचे दर्शन घेऊन तिची स्तुति केली. नंतर त्याने मगधनाथावर चाल केली, पण तो भयाने पळून गेला. पण त्याच्या सामन्तांना त्याची लाज वाटून ते परत फिरले आणि त्यांनी यशोवर्म्याशी घनघोर युद्ध केले. रणभूमीवर रक्ताचे पाट वाहू लागले. यशोवर्म्याने त्यांचा पराजय करून मगधाधिपाचा पाठलाग केला आणि त्याला ठार मारले. नंतर त्याने पूर्व समुद्रापर्यंत चाल करून वंगनृपतीचा पराभव केला. पुढे त्याने दक्षिणेत स्वारी केली. दक्षिणदिशाधिप त्याला शरण आल्यावर तो मलयपर्वताच्या दिशेने गेला. नंतर पारसीकांचा पराभव करून आणि कोकण प्रदेशाकडून करभार घेऊन तो नर्मदा नदीस पोचला. पुढे समुद्राच्या काठाने चाल करीत त्याने मरुदेश ( मारवाड ) आणि नंतर स्थानेश्वरजवळचा श्रीकंठ देश पादाक्रान्त करून तो कुरुक्षेत्रास व नंतर अयोध्येस पोचला. अयोध्या येथे एका दिव्यातन्त्र देवालय बांधून आणि त्यात देवाची प्रतिष्ठापना करून त्याने लोकांकडून नजराणा स्वीकारला आणि तो हिमालयाकडे वळला. तो प्रदेश जिंकून त्याने आपला दिग्विजय पूर्ण केला. नंतर त्याने स्वतःबरोबर आलेल्या पराजित राजांना स्वदेशी जाण्यास अनुज्ञा दिली.

यशोवर्म्याचा हा दिग्विजय बहुतांशी कविकल्पित दिसतो. कवीने यात कालिदासाच्या 'रघुवंशा'तील रघुदिग्विजयाचे अनुकरण केले आहे. त्यात पराजित केलेल्या एकाही राजाचे नाव आले नाही, मग कालोल्लेख कोठला ? या काव्याचे नाव 'गौडवध' असले तरी त्यात यशोवर्म्याने गौड राजाशी युद्ध करून त्यास रणांगणात ठार केल्याचा उल्लेख नाही. कदाचित त्यातील 'मगधनाथ' हाच गौडराज असावा. यशोवर्म्याने मगध देश जिंकला होता यात संशय नाही. तत्कालीन मगधनृपति उत्तरकालीन गुप्त वंशातील द्वितीय जीवितगुप्त असावा असा तर्क आहे. या जीवितगुप्ताने वारुणिका ( सध्याचे बिहार प्रदेशातील देववरुणार्क ) गाव सूर्याच्या मंदिराला दिल्याचा उल्लेख एका त्रुटित स्तम्भलेखात आला आहे.[1] त्या लेखात कालाचा निर्देश नाही. तथापि त्यात जीवितगुप्ताची वंशावळ खालीलप्रमाणे दिली आहे:— माधवगुप्त, आदित्यसेन, देवगुप्त, विष्णुगुप्त आणि जीवितगुप्त. यांपैकी पहिला राजा माधवगुप्त हा हर्षाचा ( सन ६०६ ते ६४७ ) समकालीन होता हे 'हर्षचरिता'वरून समजते. त्याच्यानंतर चौथ्या पिढीतील द्वितीय जीवितगुप्त इ. स. च्या सातव्या शतकाच्या द्वितीय पादात ( सन ७२५–७५० ) राज्य करीत असणे संभवनीय आहे. तेव्हा

१. फ्लीट, गुप्त इन्स्क्रिप्शन्स्, पृ. २१६.

तोच यशोवर्म्याचा प्रतिस्पर्धी मगध-गौड देशाचा अधिपति असावा.

यशोवर्म्याने मगध जिंकला होता यात संशय नाही. त्याच्या 'मार्गपति' आणि 'उदीचिपति' मंत्र्याच्या मालाद नामक पुत्राने मगधातील बालादित्य राजाने नालंदा येथे बांधलेल्या बौद्ध देवालयाला आणि तेथील भिक्षूंना दिलेल्या दानांचा निर्देश करणारा शिलालेख नालन्दा येथे सुमारे ४० वर्षांपूर्वी सापडला होता[1] त्यात यशोवर्म्याचे पुढील वर्णन आले आहे.

> सर्वेषां मूर्ध्नि दत्वा पदमवनिभृतामुद्गतो भूरिधामा
> निर्दिग्रशाशुप्रतानप्रदलितनिखिलारातिघोरान्धकारः ।
> ख्यातो यो लोकपालः सकलवसुमतीपद्मिनीबोधहेतुः
> श्रीमान् भास्वानिवोच्चैस्तपति दिशि दिशि श्रीयशोवर्मदेवः ॥

[ ज्याप्रमाणे तेजस्वी लोकपाल सूर्य सर्व पर्वताच्या शिखरांवर आपले किरण फेकून त्यायोगे घोर अंधकाराचा समूळ नाश करतो आणि सर्व कमलिनींना विकसित करून अखिल दिशांत उच्च ठिकाणाहून तळपत राहतो त्याप्रमाणे ज्याने सर्व राजांच्या मस्तकावर पाय रोवून आपल्या तरवारीने सर्व शत्रूंचा निःपात केला आहे आणि सर्व पृथ्वीला सज्ञान केले आहे असा हा प्रतापी यशोवर्मा नृपति प्रत्येक दिशेत आपल्या तेजाने तळपत आहे. ]

नालंदा येथील बौद्ध विद्यापीठाला व विहाराला अनेक देशांचे लोक उदार दानें देत. म्हणून केवळ या शिलालेखावरून यशोवर्म्याने मगध देश जिंकून आपल्या राज्याला जोडला होता असे सिद्ध होत नाही खरे, पण त्याचे गमक असे दुसरेही एक प्रमाण आहे. यशोवर्म्याने मगधातील आपल्या विजयाचे स्मारक म्हणून 'यशोवर्मपुर' स्थापल्याचा उल्लेख सापडतो. बिहार प्रदेशात बिहारशरीफ शहरापासून काही मैलांवर घोसरावा नामक गाव आहे. तेथे सापडलेल्या एका शिलालेखात त्याचे नाव यशोवर्मपुर असे आले आहे. हे नगर पुढे सुमारे शंभर-दीडशे वर्षे तरी अस्तित्वात असावे. कारण पूर्वोक्त शिलालेखात नगरहार (सध्याचे पंजाबातील जलालाबाद) येथील वीरदेव नामक बौद्ध भिक्षूने तेथे वज्रासनाकरिता देवालय बांधल्याचा उल्लेख आहे.[2] या वीरदेवाला पालनृपति देवपालाचा (सन ८१०-८५०) आश्रय होता आणि तो पुढे नालन्दा येथील विहाराचा प्रमुख झाला असेही त्या शिलालेखावरून कळते. त्यावरून निदान नवव्या शतकाच्या अखेरपर्यंत यशोवर्मपुर मरमराटीत असावे.

---

१. ए. इं., पु. २०, पृ. ३७-४६.

२. इं. अँ., पु. १७, पृ. ३०९-३११.

**काश्मीर** – राजतरंगिणीतील पूर्वोक्त गाथेत काश्मीरच्या ललितादित्याने यशोवर्म्याचा पराजय केल्याचा उल्लेख आहे. तेव्हा आता ललितादित्याविषयी काय माहिती मिळते ते पाहू.

ललितादित्य हा काश्मीरचा सर्वश्रेष्ठ राजा होय. तो सन ७२४ मध्ये गादीवर आला हे मागे दाखविले आहे. त्यानेही दिग्विजय केला होता. त्याने अन्तर्वेदीवर स्वारी करून यशोवर्म्याचा पराभव केला. यशोवर्म्याने त्याचे स्वामित्व मान्य करून सन्धीची प्रार्थना केली नंतर त्याच्या साधिविग्रहिकाने (परराष्ट्रमन्त्र्याने) जो तहाचा मसुदा पुढे मांडला त्यात यशोवर्म्याचे नाव पहिले घातले. पण ललितादित्याच्या सेनापतींना हे न खपून त्यांनी ही गोष्ट आपल्या राजाच्या ध्यानात आणून दिली. तेव्हा ललितादित्याने यशोवर्म्याचा समूळ उच्छेद केला, अशी आख्यायिका कल्हणाने दिली आहे. नंतर ललितादित्याने पूर्वसमुद्रापर्यंत चाल केली. त्याने गौडाधिपाचा पराभव केला आणि दक्षिणेत स्वारी करून कर्णाटांना जिंकले. त्या काळी दक्षिणेत रट्टा नावाची कर्णाटराणी राज्य करीत होती. ती ललितादित्याला शरण आली. पुढे त्याने कावेरी ओलाडून दक्षिण समुद्रापर्यंत आक्रमण केले. नंतर तो पश्चिमेस वळला आणि सप्त कोंकणांना पादाक्रान्त करून तो द्वारकेला पोचला. पुढे अवन्ति देश जिंकून तो उत्तरापथाकडे वळला. नंतर काबोज, तुखार, मुम्मुणि, भौट्ट (तिबेट), दरद यांचा पराभव करून प्राग्ज्योतिषपुराला (गौहत्तीला) पोचला. तो स्त्रीराज्यात पोचला तेव्हा तेथील राणी कापू लागली. पण तिचा कंप भीतीने किंवा अभिलाषाने होता हे कोणास समजेना, असे कल्हणाने म्हटले आहे. पुढे उत्तरकुरूला जिंकून तो स्वराज्यात परत आला.

ललितादित्याच्या दिग्विजयाचे हे वर्णन सुद्धा काल्पनिक दिसते. त्याने पूर्वेस बंगालपर्यंत आक्रमण केले असावे कारण त्याने तेथून बुद्धाची मूर्ति आणली असे पुढे कल्हण सांगतो. उत्तरेतील त्याचे कांबोज, तुर्क, दरद व तिबेटी शत्रूंचे विजयही संभवनीय आहेत. कारण त्यांचे प्रदेश काश्मीरला लागून आहेत. त्याने पराजित केलेला मुम्मुणि अरबांचा सेनाप्रमुख असावा. अरबांनी सिंध जिंकल्यावर काठेवाड, माळवा व राजस्थान यातील सैंधव, कच्छेल, सौराष्ट्र, चावोटक, मौर्य, गुर्जर इत्यादि राजांचा पराजय करून दक्षिणापथाला जिंकण्याकरिता गुजराथेतील नवसारीपर्यंत धडक मारली होती, पण तेथे त्यांना अवनिजनाश्रय पुल्केशी याने सडे चारले त्याचे हृदयस्पर्शी वर्णन त्याच्या सन ७३९च्या ताम्रपटात आले आहे [1] तसेच अरबांनी काश्मीरच्या सीमेपर्यंत आक्रमण करून कांगडा प्रदेश व्यापला होता. पण ललितादित्याने त्यांचा पुरा मोड करून त्याकाळी त्यांच्यापासून पंजाबचे रक्षण केले. ही त्याची कामगिरी संस्मरणीय आहे.

---

१ मिराशी, इ. क. चे. ई, भाग १, पृ. १३७–१४५.

वटीच्या वर्णनास २४१ श्लोक दिले आहेत. त्यावरून त्याचा त्या राजाविषयी आदर व्यक्त होतो. ललितादित्याने अनेक देवालये बांधून त्यांना विविध नांवे दिली होती. कल्हण म्हणतो:—

न तत्पुर न स ग्रामो न सा सिन्धुर्न सोऽर्णवः।
न स द्वीपोऽस्ति यत्रासौ प्रतिष्ठां न विनिर्ममे ॥

(राजतरंगिणी, ४,१८१)

[ असे कोणतेही नगर, गाव, नदी, समुद्र किंवा द्वीप नव्हते जेथे ललितादित्याने देवालय बांधले नाही. ]

काश्मीरात त्याने सुनिश्चितपुर, दर्पितपुर, फलपुर, परिहासपुर, इत्यादि नगरे स्थापिली. स्वतःच्या नावाने नगर स्थापण्यास मात्र त्याचा विरोध होता. तो स्वारीवर असताना त्याच्या स्थपतीने त्याच्या नावाने ललितपुर नगर वसविले तेव्हा त्याला राजाचा कोप सहन करावा लागला. स्वतःचे नाव अजरामर करण्याकरिता 'नगरे' स्थापणाऱ्या आधुनिक राजकीय पुढाऱ्यांनी यापासून बोध घेण्यासारखा आहे.

ललितादित्याने मुक्तस्वामी, ज्येष्ठरुद्र, चक्रधर, परिहासकेशव, मुक्ताकेशव, महावराह, गोवर्धनधर, रामस्वामी, लक्ष्मणस्वामी इत्यादि हिंदू देवांची देवालये बांधली आणि त्यामध्ये चांदीच्या, सोन्याच्या व रत्नांच्या मूर्ति स्थापन केल्या; तसेच त्याने विशाल विहार व चैत्य स्थापून त्यात भव्य बुद्धमूर्तींची स्थापना केली. त्याची राणी, अमात्य, तुर्की अधिकारी, आचार्य वगैरेंनीही त्याचे अनुकरण करून अनेक देवालये व विहार बांधले असे कल्हण सांगतो. त्यापैकी राजाने बांधलेल्या मार्तंड नामक सूर्याच्या देवालयाचे भव्य अवशेष श्रीनगरपासून काही अंतरावरच्या टेकडीवर अद्यापि दृष्टीस पडतात. ललितादित्याने अनेक अन्नसत्रे व पाणपोया स्थापन केल्या. त्यांपैकी एका अन्नसत्राचे नाव सहस्रभक्त असे होते. त्यात एक लक्ष एक लोकांना दक्षिणेसह भोजन देण्याची व्यवस्था केली होती.[1]

कल्हणाने ललितादित्याविषयी अनेक आख्यायिका दिल्या आहेत. त्या येथे देण्याची जरूरी नाही. तथापि त्यावरून त्या राजाचे लोकोत्तर धैर्य, शौर्य, दातृत्व, धार्मिक वृत्ति वगैरे गुण स्पष्ट होतात. त्याने क्वचित् केलेली अविचारी कृत्येही कल्हणाने वर्णिली आहेत. एकदा परिहासपुर नगरात ललितादित्य मदिरामत्त अवस्थेत असता कोणी त्याने स्थापलेल्या त्या नगरापेक्षा प्रवरपुर जास्त सुंदर आहे असे म्हटले. तेव्हा ते नगर जाळून टाकण्याची त्याने आपल्या सचिवांना आज्ञा केली. पण पुढे नशा उतरल्यावर त्याला आपल्या दुष्कृत्याचा पश्चात्ताप झाला. मंत्र्यांनी जेव्हा त्याला

---

१. राजतरंगिणी, ४, २४३.

तो सुचविणारही नाही. तेव्हा ते वर्णन यशोवर्म्याने केलेल्या इतर राजाच्या पराभवाचे सूचक मानले पाहिजे आणि 'गउडवहो' ग्रंथाच्या टीकाकाराने ते तसेच मानलेही आहे. अर्थात् सन ७३३ हे ललितादित्याने केलेल्या मुक्तापीडाच्या पराजयाचे वर्ष नव्हे, तो पराजय सन ७४० च्या सुमारास झाला असावा.

## धार्मिक व सामाजिक परिस्थिति

आतापर्यंत आपण भवभूतिकालीन राजकीय परिस्थितीचे विहंगमावलोकन केले. तत्कालीन धार्मिक व सामाजिक परिस्थितीचे सविस्तर वर्णन करण्यास पुरेशी साधने नाहीत. विदर्भात सापडलेल्या तत्कालीन दोन्ही ताम्रपटात नन्नराजाने ब्राह्मणांना भूमिदाने धार्मिक हेतूने दिलेली दिसतात. त्या काळी विदर्भात बौद्ध व जैन धर्मांचा प्रसार असल्याचे दिसत नाही. उत्तर भारतात मात्र यशोवर्म्याच्या काळी अनेक धर्मांचा व पंथपंथाचा प्रचार होता असे दिसते. त्याच्या दरबारच्या वाक्पतिराजाने रचलेल्या 'गौडवध' काव्याच्या आरंभी ६२ ते ९८ या गाथामध्ये विष्णूचे विविध अवतार, गणेश, गौरी, सरस्वती, चन्द्र, सूर्य व लक्ष्मी यांची स्तुति आहे. पुढे दिग्विजयाच्या आरंभी यशोवर्मा विन्ध्यवासिनी देवीच्या दर्शनास गेला त्या प्रसंगी तिच्या देवालयाचे सविस्तर वर्णन कवीने केले आहे. मन्दिरात दिवे प्रज्वलित होते, द्वारावर तोरणे व घंटा लावल्या होत्या. देवीने महिषासुराच्या मस्तकावर आपला पाय रोवला होता. पुष्प-धूपादिकांचे सुगंध दरवळत होते. ठिकठिकाणी रक्ताचे ठिपके लागले होते. देवीला अर्पण केलेले नरकपाल पसरलेले दिसत होते. साधक लोक अक्षता, फुले व नरकपाल अर्पण करून देवीची आराधना करीत होते. सभोवार लाल पताका लावल्या होत्या भूत व पिशाच्च रुधिरपान करून आपला आनंद व्यक्त करीत होते. जवळच्या स्मशानात साधक लोक नरमांस विक्रय करून सिद्धि प्राप्त करून घेण्याच्या प्रयत्नात होते. भवभूतीच्या मालतीमाधवातही अशा प्रकारचा प्रदेश वर्णिला आहे. त्यावरूनही त्या कालच्या कापालिक पंथाच्या प्रसार ध्यानात येतो.

मध्यभारतात त्या काळी बौद्ध व जैन धर्मांचाही प्रसार होता. यशोवर्म्याच्या मंत्र्याच्या मालाद नामक पुत्राने नालंदा विद्यापीठातील देवालयाला व भिक्षूंना दिलेल्या दानाचा उल्लेख मागे केला आहे. पहाडपूर येथे बौद्ध स्तूपाचे अवशेष सापडले आहेत. बप्पभट्टिचरित आणि प्रभावकचरित या जैन ग्रंथात त्या कालातील जैन धर्माची माहिती मिळते. यशोवर्म्याचा पुत्र व उत्तराधिकारी आम याने जैन धर्म स्वीकारल्याचे त्यात सांगितले आहे.

काश्मीरात ललितादित्याच्या काळी पौराणिक हिंदुधर्म व बौद्धधर्म अत्यन्त भरभराटीत होते असे 'राजतरंगिणी' वरून दिसते. कल्हणाने ललितादित्याच्या राज-

वर्णनास २४१ श्लोक दिले आहेत. त्यावरून त्याचा त्या राजाविषयी आदर व्यक्त होतो. ललितादित्याने अनेक देवालये बांधून त्याना विविध नांवे दिली होती. कल्हण म्हणतोः—

न तत्पुरं न स ग्रामो न सा सिन्धुर्न सोऽर्णवः ।
न स द्वीपोऽस्ति यत्रासौ प्रतिष्ठां न विनिर्ममे ॥

(राजतरंगिणी, ४,१८१)

[ असे कोणतेही नगर, गाव, नदी, समुद्र किंवा द्वीप नव्हते जेथे ललितादित्याने देवालय बांधले नाही. ]

काश्मीरात त्याने सुनिश्चितपुर, दर्पितपुर, फलपुर, परिहासपुर, इत्यादि नगरें स्थापिली. स्वतःच्या नावाने नगर स्थापण्यास मात्र त्याचा विरोध होता. तो स्वारीवर असताना त्याच्या स्थपतीने त्याच्या नावाने ललितपुर नगर वसविले तेव्हा त्याला राजाचा कोप सहन करावा लागला. स्वतःचे नाव अजरामर करण्याकरिता 'नगरे' स्थापणाऱ्या आधुनिक राजकीय पुढाऱ्यांनी यापासून बोध घेण्यासारखा आहे.

ललितादित्याने मुक्तस्वामी, ज्येष्ठरुद्र, चक्रधर, परिहासकेशव, मुक्ताकेशव, महावराह, गोवर्धनधर, रामस्वामी, लक्ष्मणस्वामी इत्यादि हिंदू देवांची देवालयें बांधली आणि त्यामध्ये चांदीच्या, सोन्याच्या व रत्नांच्या मूर्ति स्थापन केल्या; तसेच त्याने विशाल विहार व चैत्य स्थापून त्यात भव्य बुद्धमूर्तींची स्थापना केली. त्याची राणी, अमात्य, तुर्की अधिकारी, आचार्य वगैरेंनीही त्याचे अनुकरण करून अनेक देवालयें व विहार बांधले असे कल्हण सांगतो. त्यांपैकी राजाने बांधलेल्या मार्तंड नामक सूर्याच्या देवालयाचे भव्य अवशेष श्रीनगरपासून काही अंतरावरच्या टेकडीवर अद्यापि दृष्टीस पडतात. ललितादित्याने अनेक अन्नसत्रे व पाणपोया स्थापन केल्या. त्यांपैकी एका अन्नसत्राचे नाव सहस्रभक्त असे होते. त्यात एक लक्ष एक लोकांना दक्षिणेसह भोजन देण्याची व्यवस्था केली होती.[1]

कल्हणाने ललितादित्याविषयी अनेक आख्यायिका दिल्या आहेत. त्या येथे देण्याची जरुरी नाही. तथापि त्यावरून त्या राजाचे लोकोत्तर धैर्य, शौर्य, दातृत्व, धार्मिक वृत्ति वगैरे गुण स्पष्ट होतात. त्याने क्वचित् केलेली अविचारी कृत्येही कल्हणाने वर्णिली आहेत. एकदा परिहासपुर नगरात ललितादित्य मदिरामत्त अवस्थेत असता कोणी त्याने स्थापलेल्या त्या नगरापेक्षा प्रवरपुर जास्त सुंदर आहे असे म्हटले. तेव्हा ते नगर जाळून टाकण्याची त्याने आपल्या सचिवांना आज्ञा केली. पण पुढे नशा उतरल्यावर त्याला आपल्या दुष्कृत्याचा पश्चात्ताप झाला. मंत्र्यांनी जेव्हा त्याला

१. राजतरंगिणी, ४, २४३.

सांगितले की आपण फक्त ते नगर जाळण्याचा देखावा केला होता तेव्हा त्याला हायसे वाटून त्याने त्याची प्रशंसा केली. दुसऱ्या एका प्रसंगी त्याने गौडाधिपाला परिहासकेशव देवाची शपथ घेऊन त्याच्या सुरक्षिततेविषयी हमी दिली आणि काश्मीरात बोलावले. पुढे त्याने त्याचा विश्वासघाताने अंत केला. गौडाधिपाच्या स्वामिभक्त सेवकांना ह्याची चीड येऊन ते शारदादेवीच्या दर्शनाच्या मिषाने काश्मीरात आले. ललितादित्य त्या वेळी परदेशी गेला होता म्हणून तो त्यांच्या तावडीत सापडला नाही. पण त्यांनी त्यांचा राग ज्या देवाची शपथ घेऊन ललितादित्याने त्यांच्या राजाला सुरक्षिततेचं वचन दिले होते त्या देवाचे तुकडे करण्याचा निश्चय केला. पण अज्ञानामुळे त्यांनी परिहासकेशवाऐवजी रामस्वामी देवाच्या मूर्तीचे तुकडे तुकडे केले. इतक्यात ललितादित्याच्या सैनिकांना ही बातमी पोचून ते धावून आले आणि त्यांनी त्या स्वामिभक्त गौडांची खांडोळी केली. ही कथा सांगून कल्हण म्हणतो—

तदीयरुधिरासारैः समभूदुज्ज्वलीकृता ।
स्वामिभक्तिरसामान्या धन्या चेयं वसुन्धरा ।।

राजतरंगिणी, ४, ३३०

(त्या सेवकांच्या रक्ताने त्यांची असामान्य स्वामिभक्ति उज्ज्वल केली आणि पृथ्वीलाही धन्य केले.)

ललितादित्याला नवीन नवीन देश आक्रमण करण्याची हौस असे. एकदा तो उत्तरापथात गेल्यावर बरेच काळ परत आला नाही. तेव्हा त्याच्या मंत्र्यांनी त्याच्या शोधार्थ दूत पाठवला. तो ललितादित्यांचा खालील संदेश घेऊन परत आला—

"मी दूरदूरचे प्रदेश आक्रमीत आहे. मी स्वदेशी येऊन काय करणार? पण मी तुमच्यासाठी आचारसंहिता घालून देत आहे. तदनुसार तुम्ही राज्यकारभार चालवावा.

मदाद्दुर्गाण्युपेक्ष्यन्ते सरक्ष्याणि यदा नृपैः ।
यदा चानन्तरज्ञत्वं तेषां भृत्येषु दृश्यते ।।
प्रदेशादेकतो दृष्टा यदा वृत्तिश्च शस्त्रिणाम् ।
अन्योन्योद्वाहसम्बन्धैः कायस्थाः संहता यदि ।।
कर्मस्थानानि वीक्षन्ते यथा कायस्थवद्यदा ।
तदा निःसंशयं ज्ञेयः प्रजाभाग्यविपर्ययः ।।

राजतरंगिणी, ४,३५०–३५२

(जेव्हा राजे लोक रक्षण करण्यासारख्या दुर्गांची अहम्मन्यतेने उपेक्षा करतात, जेव्हा त्यांच्या भृत्यांची त्यांना पारख होत नाही, जेव्हा सैनिकांची भरती एकाच प्रदेशातून होते, जेव्हा अधिकारी लोक आपापसात विवाह करून गट बनवतात, जेव्हा राजे लोक अधिकाऱ्यांसारखीच गायांना (?) पाहणी करितात तेव्हा प्रजेवर दुर्भाग्य

ओढवले असे समजावे. ) ललितादित्याचे वरील विचार आधुनिक कालालाही तितकेच लागू पडतील.

ललितादित्याच्या काळी बांधलेल्या अनेक देवळांनी, चैत्यांनी, स्तूपांनी आणि विहारांनी स्थापत्य व शिल्पकलेला उत्तेजन दिले. त्याने स्थापिलेल्या परिहासपुरात ( श्रीनगरपासून १२ मैलांवर असलेल्या परसपोरात ) बांधलेल्या इमारती इतक्या सुंदर होत्या की त्या आज अस्तित्वात असत्या तर त्यांनी काश्मीरातील इतर सर्व प्राचीन इमारतींना मागे टाकले असते असे एका तज्ज्ञाने म्हटले आहे. परसपोरात केलेल्या उत्खननात एका स्तूपाचे, चैत्याचे व विहाराचे अवशेष सापडले आहेत. त्यामध्ये बुद्ध व बोधिसत्त्व यांच्या सुंदर मूर्ती आहेत.[१]

## साहित्यनिर्मिति

भवभूतीच्या काळी अनेक काव्य–नाटके निर्माण झाली असावी, पण ती आता उपलब्ध नाहीत. पुढील प्रकरणात दाखविल्याप्रमाणे त्याची दोन्ही नाटके कालप्रियनाथाच्या ( काल्पी येथील सूर्यदेवाच्या ) यात्रेच्या प्रसंगी प्रथम रंगभूमीवर आली. त्यावेळी त्याला राजाश्रय नव्हता पण नटवर्गाशी मैत्री होती. म्हणून त्याला आपल्या नाटकाचे प्रयोग करविणे शक्य झाले. पुढे त्याची कीर्ति सर्वत्र पसरल्यावर ती कनोजनृपति यशोवर्म्याच्या कानी जाऊन त्याने त्याला आपल्या राजधानीस बोलावले आणि त्याला राजकवीची जागा दिली. यशोवर्म्याला स्वतः काव्य–नाटक निर्मितीची हौस होती. त्याने काही मुक्तक स्वरूपाचे श्लोक सुभाषितरत्नकोष, सदुक्तिकर्णामृत वगैरे श्लोकसंग्रहात घेतले आहेत. काहींत त्याच्या नावाचा स्पष्ट निर्देश आहे. उदाहरणार्थ, खालील श्लोक ( सुभाषितरत्नकोश, क्र. ७४२ ) पाहा—

उच्छूनारुणमश्रुनिर्गमवशाच्चक्षुर्मनाङ्मन्थर
सोष्मश्वासकदर्थिताधरदलच्छायस्तालका भ्रूभुवः ।
आपाण्डुः करपल्लवे च निभृतं शेते कपालस्थली
मुग्धे कस्य तवःफल परिणतं यस्यै तवेयं दशा ।।

या श्लोकाच्या कर्त्याचे नाव 'यशोवर्मणः' असे दिले आहे. त्यात विरहिणीचे मनोरम चित्र रेखाटले आहे. कवि म्हणतो, "सारखे अश्रु ढाळल्यामुळे तुझे डोळे सुजून लाल झाले आहेत आणि किंचित् जड दिसतात. उष्ण श्वासोच्छ्वासामुळे अधरोष्ठाचा रंग फिका झाला आहे. भ्रुकुटीवर केश लोंबत आहेत. तुझ्या सुकुमार हाताच्या तळव्यावर फिकट झालेला गाल टेकला आहे. हे भोळ्या स्त्रिये ! अशा कोणाची

---

१. R. C. Kak, *Handbook of the Archœological and Numismatic Sections*, Srinagar Museum.

तपश्चर्या सफल झाली आहे बरे, ज्याच्याकरिता तुझी अशी दशा झाली आहे ! ”

याशिवाय यशोवर्म्याने ‘ रामाभ्युदय ’ नामक नाटक रचले होते. ते आता उपलब्ध नाही. पण त्याचे अनेक उतारे प्राचीन ग्रंथात घेतलेले दिसतात. त्यावरून त्याचे संविधानक स्पष्ट होते. त्याच्याविषयी विवेचन पुढील एका प्रकरणात करू.

यशोवर्म्याच्या राजसभेत वाक्पतिराज नामक दुसरा एक कवि होता. तो भवभूतीला गुरुप्रमाणे मान देत असे. ‘ बप्पभट्टिचरिता ’वरून असे कळते की तो क्षत्रिय असून परमार वंशात जन्मला होता. सोड्ढल कवीने आपल्या ‘ उदयसुन्दरीकथे ’त तो माडलिक घराण्यात जन्मला होता अशी माहिती दिली आहे.[1] त्याच्या ‘ गउडवहो ’ (गौडवध) काव्याचा उल्लेख मागे अनेकवार आला आहे. आपणावर यशोवर्मराजाची मर्जी आहे आणि त्याने आपणास कविराज पदवी दिली आहे असे तो सांगतो.

‘ गौडवध ’ काव्य प्राकृत भाषेत लिहिले असून त्याच्या १२०९ गाथा आहेत. त्यामध्ये त्याच्या नावानुसार यशोवर्म्याने केलेल्या गौडराजाच्या वधाचे सविस्तर वर्णन वाचयास पाहिजे होते, पण ते अत्यंत त्रोटक असून संस्कृत महाकाव्यातल्याप्रमाणे वनश्री, ऋतु, सूर्याचा उदय व अस्त, पर्वत, नद्या, देवालये यांचेच वर्णन विपुल आहे त्याचप्रमाणे गौड ( किंवा मगध ) राजाच्या वधाबरोबर हे काव्य संपत नसून पुढे त्यात यशोवर्म्याच्या भारतातील पूर्ण दिग्विजयाचे वर्णन आले आहे. यामुळे या काव्याविषयी विविध प्रकारचे तर्क विद्वानांनी केले आहेत. कोणी म्हणतात ललितादित्याने यशोवर्म्याचा पराभव केल्यामुळे हे काव्य अपूर्ण राहिले, तर दुसरे सांगतात की सध्याचे ‘ गौडवध ’ हे मूळ स्वरूपात नसून त्या काव्यातील पंडितांना नीरस वाटणारा ऐतिहासिक भाग गाळून राहिलेले असे आहे. ‘ गौडवध ’ काव्याची रचना अकृत्रिम–रमणीय असून त्यात श्लेषाचा अतिरेक नाही. क्वचित् दीर्घ समास आढळतात कवीने उपमा, रूपक, उत्प्रेक्षा, दृष्टान्त, अर्थान्तरन्यास इत्यादि अर्थालंकारांचा यथोचित उपयोग करून आपल्या काव्याला रमणीय केले आहे विशेषतः संस्कृत व प्राकृत काव्यात सामान्यतः न आढळणारी ग्रामीण जीवनाची चित्रे यात इतस्ततः विखुरली आहेत, ती अत्यंत मनोवेधक आहेत त्यातले एक उदाहरण घेऊ—

फललम्भमुइयडिम्भा सुवाउघरसणिवेसरमणिज्जा ।
एए हरन्ति हिययं अजणाइण्णा वणग्गामा ।। ( गाथा क्र. ६०७. )

( ज्यामध्ये फळ यथेच्छ खाण्यास मिळाल्यामुळे बालक आनंदित होतात, जेथील घरे

---

१. मामन्तजन्मापि कवीश्वराणां महत्तमो वाक्पतिराजसूरिः ।
यच्छायया प्यन्यमपीडयन्मद्भुतादयत्यर्थमनन्यदृष्टम् ।।
उदयसुन्दरीकथा, पृ. १५४.

सुंदर लाकडाची बनविलेली असल्यामुळे रमणीय वाटतात आणि जेथे लोकांची गर्दी नसते असे वनग्राम मनोहर भासतात. )

वाक्पतिराजाने 'मधुमथनविजय' नामक दुसरे एक प्राकृत काव्य रचले होते. ते आता उपलब्ध नाही, पण त्याचा उल्लेख 'गौडवध' काव्यात (गाथा ६९) कवीने केला आहे. आनन्दवर्धनाने त्यातील पाञ्चजन्याच्या उक्तींमध्ये ध्वनीच्या 'अनुरणनरूपव्यङ्ग्य' प्रकाराची सुंदर उदाहरणे आढळतात म्हणून त्याची प्रशंसा केली आहे.[1] अभिनवगुप्ताने आपल्या 'ध्वन्यालोकलोचना'त आणि हेमचन्द्राने 'अलंकारचूडामणि' टीकेत त्यातील गाथा उद्धृत केल्या आहेत. तेव्हा ते काव्य वाक्पतिराजाने 'गौडवधा'च्या अगोदर रचले होते आणि ते त्या काव्यासारखेच मोठे होते असे दिसते. त्याच्या नावावरून त्याचे कथानक भगवान् विष्णूच्या मधु नामक असुराच्या उच्छेदाविषयी होते हे उघड आहे.

याशिवाय वाक्पतिराजाने काही मुक्तक स्वरूपाच्याही गाथा रचल्या होत्या असे अनुमान करता येते. आम्ही इतरत्र[2] सिद्ध केले आहे की 'गाथासप्तशती' ख्रिस्तोत्तर पहिल्या शतकातील सातवाहन नृपति हाल याच्या नावावर मोडत असली तरी तिच्यात पुढील कित्येक शतकात काही गाथा काढून त्यांच्या जागी दुसऱ्या घातलेल्या दिसतात. तीत ख्रिस्तोत्तर चौथ्या आणि पाचव्या शतकात होऊन गेलेल्या वाकाटक नृपति सर्वसेन व प्रवरसेन यांच्या गाथाही घातलेल्या आढळतात. तशाच काही गाथा बप्पइराआच्या (वाक्पतिराजाच्या) नावावरही टीकाकारांनी दिल्या आहेत. 'गाथासप्तशती'च्या निर्णयसागरी आवृत्तीत बप्पइराआच्या नावावर एकच (क्र. ९५) गाथा दिली आहे, पण काही वर्षांपूर्वी प्रकाशिलेल्या पीतांबराच्या टीकेत आणखी तीन गाथा (क्र. ६१६, ६१७ व ६१८) त्याच्या नावावर दिलेल्या आढळतात. या गाथा 'मधुमथनविजय' काव्यातून घेतल्या असाव्या असे जर्मन विद्वान् पिशेलचे अनुमान होते, पण त्या मुक्तक स्वरूपाच्या असून संस्कृतातील सुभाषितांप्रमाणे प्रासंगिक स्वरूपाच्या दिसतात.

याप्रमाणे आपण भवभूतीच्या काळातील राजकीय, धार्मिक, सामाजिक आणि वाङ्मयीन परिस्थितीचे सिंहावलोकन केले. आता पुढील प्रकरणापासून भवभूतिविषयक प्रश्नांची चर्चा करू.

---

१. 'ध्वन्यालोक' (चौखम्बा स. सी.), पृ. २४५.

२. 'संशोधनमुक्तावलि' सर १, पृ. ११९–१२०.

## प्रकरण तिसरे

# जन्मस्थानाची समस्या

सा रम्या नगरी महान् स नृपतिः सामन्तचक्रं च तत्
पार्श्वे तस्य च सा विदग्धपरिषत्ताश्चन्द्रबिम्बाङ्गना ।
उद्वृत्तः स च राजपुत्रनिवहस्ते बन्दिनस्ताः कथाः
सर्वं यस्य वशादगात्स्मृतिपथं कालाय तस्मै नमः ॥

भर्तृहरि, वैराग्यशतक, ४१.

भवभूतीने आपल्या नाटकात कालिदासाप्रमाणे स्वतःविषयी सर्वस्वी मुग्धता न स्वीकारता आपल्या कालाविषयी नाही, तरी जन्मस्थान, कुल व विद्वत्ता याविषयी स्पष्ट विधाने केली आहेत उदाहरणार्थ, 'महावीरचरित' नाटकाच्या प्रस्तावनेत नाटककाराविषयी माहिती देताना सूत्रधार म्हणतो, 'अस्ति दक्षिणापथे पद्मपुरं नाम नगरम् । तत्र केचित्तैत्तिरीयिणः काश्यपाश्चरणगुरवः पङ्क्तिपावनाः पञ्चाग्नयो धृतव्रताः सोमपीथिन उदुम्बरनामानो ब्रह्मवादिनः प्रतिवसन्ति । तदामुष्यायणस्य तत्रभवतो वाजपेययाजिनो महाकवेः पञ्चमः सुगृहीतनाम्नो भट्टगोपालस्य पौत्रः पवित्रकीर्तेर्नीलकण्ठस्यात्मसंभवः श्रीकण्ठपदलाञ्छनो भवभूतिर्नाम जातूकर्णीपुत्रः कविर्मित्रधेयमस्माकमित्यत्रभवन्तो विदांकुर्वन्तु ।' या उताऱ्यावरून भवभूतीच्या पूर्वजांचे कुलनाम उदुंबर होते; ते तैत्तिरीय शाखेचे, काश्यपगोत्री, पंचाग्नि ठेवणारे, सोमयाग करणारे ब्रह्मवेत्ते असे विद्वान् व सत्त्वशील ब्राह्मण होते; भवभूतीच्या महाकवि नामक पाचव्या पूर्वजाने वाजपेय नावाचा श्रौतयाग केला होता; हे ब्राह्मण दक्षिणापथात पद्मपुर नामक नगरात

राहत असत, इत्यादि निश्चित माहिती आपणास मिळते. दक्षिणापथ या शब्दाने सामान्यतः नर्मदेच्या दक्षिणेचा प्रदेश समजण्यात येतो. 'नर्मदाया दक्षिणेन देशो दक्षिणापथः' असे 'वात्स्यायनकामसूत्रा'चा टीकाकार यशोधर म्हणतो.[1] राजशेखराच्या 'काव्यमीमांसे'त (पृ. ९३) 'माहिष्मत्याः परतो दक्षिणापथः' माहिष्मतीच्या (नर्मदेच्या तीरावरील सध्याच्या महेश्वराच्या) पलीकडचा (म्हणजे दक्षिणेचा) प्रदेश हा दक्षिणापथ असे स्पष्ट म्हटले आहे. तेव्हा भवभूति हा दक्षिण भारतातील कवि होता यात संशय नाही. 'मालतीमाधवा'च्या प्रस्तावनेत तर यापेक्षाही निश्चित निशान सापडते. त्या नाटकात सूत्रधाराच्या तोंडी 'अस्ति दक्षिणापथे विदर्भेषु पद्मपुरं नाम नगरम्' असे शब्द घातले आहेत. त्यावरून भवभूतीचे जन्मस्थान जे पद्मपुर ते प्राचीन विदर्भातच होते असे म्हणता येते.

## पद्मपुर विदर्भातच

वास्तविक इतका स्पष्ट निर्देश असल्यावर या बाबतीत तरी संशय राहू नये. पण काही विद्वानांनी ही गोष्टही संशयास्पद मानली आहे. 'मालतीमाधवा'चा प्राचीन टीकाकार हा पद्मपुर म्हणजे पद्मावती असे म्हणतो. भवभूतीने आपल्या 'मालतीमाधव' नाटकाचे संविधानक पद्मावती नगरीत घडले असे दाखविले आहे. विदर्भनृपतीचा मंत्री आपल्या माधव नामक मुलास पद्मावती नगरीच्या प्रधानाच्या मुलीशी त्याचा विवाह व्हावा म्हणून पद्मावतीस पाठवतो, असा कथाभाग त्या नाटकात आला आहे, त्यावरून ही पद्मावती नगरी विदर्भात नव्हती, हे उघड आहे. पद्मावती नगरीच्या आसमंतात्भागाचे, तेथील पारा, सिंधु, मधुमती व लवणा या नद्यांचे, मधुमती व सिंधु यांच्या संगमावरच्या सुवर्णबिन्दु-नामक शिवालयाचे जे वर्णन 'मालतीमाधवा'त आले आहे ते ग्वाल्हेरपासून नैऋत्येस ५० मैलांवर असलेल्या नरवार नगरास लागू पडते असे जनरल कनिंग्हाम या प्रसिद्ध पुराणवस्तु संशोधकाने प्रथम दाखविले. नरवार ज्या नदीवर वसले आहे तिचे नाव सिंधु आहे. पारा नदीला सध्या पार्वती म्हणतात. मधुमती व लवणा या नद्यांची सध्या महुवार व नोन अशी नावे प्रचलित आहेत. मधुमती व सिंधु या नद्यांच्या संगमावर सध्याही सोनबिंदु नामक शिवालय दृष्टीस पडते. नरवारचा पुरातन व प्रेक्षणीय किल्ला इतिहासप्रसिद्ध आहे. नऊ नागराजे पद्मावतीस राज्य करीत होते, असे पुराणात म्हटले आहे.[2] तेथे नागराजांची तांब्याची नाणी सापडली आहेत.[3]

---

१. 'कामसूत्र' (चौ. सं. सी.), पृ. ११२.

२. नव नागास्तु भोक्ष्यन्ति पुरीं पद्मावतीं नृपाः। पार्जीटर, पृ. ५३, टीप २.

३. Trivedi, *Coins of the Nāga kings of Padmāvati.*

तेव्हा भवभूतीचे पद्मावती नगर म्हणजे हल्लीचे नरवार होय, असा जनरल कनिंग्हाम्ने तर्क केला. त्यानंतर ग्वाल्हेर संस्थानच्या पुराणवस्तुसंशोधनखात्याचे अधिकारी श्री. मो. ब. गर्दे यांनी उत्खनन करून पद्मावती म्हणजे खुद्द नरवार नसून त्याच्या जवळचे पवाया (ज्याला पदमपवाया असेही नाव आहे ते) खेडे होय असे निश्चित ठरविले[१] आहे.

के. माधव व्यंकटेश लेले यांनी आपल्या 'मालतीमाधव-सार व विचार' या निबंधात (पृ. ५) पद्मावती हेच भवभूतीचे जन्मस्थान पद्मपुर असे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. भवभूति पद्मावतीचे फार बारकाईने वर्णन करतो तेव्हा ते स्थान त्याला बालपणापासून परिचित असावे अशी त्यांची विचारसरणी होती; तेव्हा त्यांनी 'अस्ति दक्षिणापथे पद्मपुरं नाम नगरम्' असा 'विदर्भेषु' हे पद नसलेला 'महावीर-चरिता'तील पाठच प्रमाण मानला. शिवाय 'मालतीमाधवा'च्या अत्यंत प्राचीन प्रतीत 'विदर्भेषु' हे पद आढळत नाही व त्या नाटकाचा प्राचीन टीकाकार जगद्धर पद्मावती म्हणजे पद्मपुर असे म्हणतो या गोष्टीही त्यांच्या तर्काला पोषक होत्या. पण पदमपवाया हे गाव दक्षिणेत नाही ही अडचण येत होती. त्यावर त्यांनी ग्वाल्हेर येथील दोड मुद्रवित्ती-'पद्मपुर नगर दक्षिणापथात आहे, हा उल्लेख सूत्रधाराच्या भाषणात आला आहे. भवभूतीची नाटके काल्प्रियनाथाच्या उत्सवप्रसंगी प्रथम रंगभूमीवर आली असे त्याच्या प्रस्तावनांतील उल्लेखावरून दिसते. हा कालप्रियनाथ म्हणजे उज्जयिनीचा महाकालेश्वर नसून काल्पीचा असावा. पदमपवाया हे गाव काल्पीच्या दक्षिणेस असल्याने 'दक्षिणापथात पद्मपुर आहे' या सूत्रधारोक्तीची उपपत्ति लावता येते. येथे 'दक्षिणापथ' या शब्दाचा रूढार्थ न घेता 'दक्षिण दिशेचा मार्ग' असा यौगिक अर्थ घेतला पाहिजे.' के. लेले यांच्या वरील अनुमानात अनेक गोष्टी गृहीत धरल्या आहेत. पद्मावती नगराचे सूक्ष्म वर्णन करता येण्यास ते भवभूतीचे जन्मस्थानच असले पाहिजे असे नाही. त्यांनी केलेला दक्षिणापथाचा अर्थही ग्राह्य वाटत नाही. म्हणून भवभूतीचे पद्मपुर पूर्वीच्या ग्वाल्हेर संस्थानात नसून वऱ्हाडात असावे असा तर्क 'उत्तररामचरिता'चे विद्वान् संपादक कै. डा. श्री. कृ. बेलवलकर यांनी केला होता. तथापि वऱ्हाडात पद्मपुर नामक एखादे प्राचीन नगर होते असा स्पष्ट पुरावा त्यास उपलब्ध न झाल्यामुळे 'नवीन पुरावा सापडेपर्यंत भवभूतीच्या पूर्वजांचे राहण्याचे ठिकाण ग्वाल्हेर संस्थानात नरवारनजीक नसून वऱ्हाडात होते असे आपण गृहीत धरू' असे उद्गार त्यांनी उत्तररामचरिताच्या हार्वर्ड ओरिएंटल सीरीज मधील आवृत्तीच्या प्रस्तावनेत काढले होते.[२]

१ *A. S. I. R.* for 1915-16, pp 101-103.

२ Belvalkar, *Rāma's Later History*, (H.O.S), Introd., p. xxxvii.

## नवीन पुरावा

या बाबतीत अवश्य असलेला पुरावा सुमारे बत्तीस वर्षांपूर्वी आम्हास उपलब्ध झालेला आम्ही या पूर्वीच प्रसिद्ध केला आहे.[1] सन १९२० च्या सुमारास मध्यप्रदेशाच्या दुर्ग जिल्ह्यातील पानाबारस जमीनदारीत मोहल्ला या गावी एका घराचा पाया खणत असता ताम्रपटाचा एकच पत्रा सापडला होता. त्यावेळी त्याचे ठसे घेऊन ते त्यावेळच्या मध्यप्रांतातील प्रसिद्ध संशोधक रायबहादूर हीरालाल यांच्याकडे पाठवले होते. ताम्रपटाचा एकच पत्रा उपलब्ध झाला होता व त्यात ज्याने तो कोरविला त्या राजाची समग्र वंशावळ किंवा नावही आले नसल्यामुळे त्यात काही विशेष महत्त्वाचा उल्लेख नसेल असे वाटून त्याकडे त्यांचे साहजिकच दुर्लक्ष झाले. सन १९३४ मध्ये जानेवारी महिन्याचे अखेरीस डॉ. हीरालाल यांनी त्या ताम्रपटाची माहिती आम्हास दिली. तथापि त्याच्या मालकाचे नाव त्यांना आठवत नव्हते व स्वतःच्या जवळचा त्याचा ठसाही त्यांस सापडत नव्हता. म्हणून त्या ताम्रपटाचा शोध लागता येईना. पुढे काही दिवसांनी घरचे जुने कागदपत्र चाळीत असता त्यांना तो ठसा सापडला. सुदैवाने त्यांनी त्या ठशावर त्यावेळी त्या ताम्रपटाच्या मालकाचे नाव लिहून ठेवले होते. त्यावरून दुर्ग जिल्ह्याचे डेप्युटी कमिश्नर श्रीयुत बा. अ. बंबावाले यांनी आमच्या विनंतीवरून चौकशी केली. तेव्हा तो दुर्ग येथील मुनशी अकबरखान नामक मुसलमान गृहस्थाजवळ सापडला. तो आता नागपूरच्या मध्यवर्ती संग्रहालयात सुरक्षित ठेवला आहे.[2]

या ताम्रपटावरील लेख काही कारणाने अपूर्ण राहिलेला दिसतो. हा इ. स. च्या तिसऱ्यापासून सहाव्या शतकापर्यंत विदर्भात प्रचलित असलेल्या पेटिकाशीर्षक लिपीत ( box-headed characters मध्ये ) कोरला आहे. त्यात वाकाटक वंशातील प्रथमच्या दोन राजांचे वर्णन आले आहे. ते वाकाटकांच्या ज्येष्ठ शाखेच्या इतर ताम्रपटातल्याप्रमाणेच असल्याने त्यात काही नवीन माहिती नाही. तथापि त्यातील एक निर्देश अत्यंत महत्त्वाचा आहे. बहुतेक प्राचीन ताम्रपटात ते जेथून दिले होते त्या स्थानाचा उल्लेख असतो. प्रस्तुत ताम्रपटातही 'पद्मपुरात्' (पद्मपुराहून) असा स्पष्ट निर्देश लेखारंभीच आला आहे. त्यावरून तो ताम्रपट पद्मपुराहून दिला असावा किंवा देण्याचे योजिले असावे, हे उघड आहे. पद्मपुर या शब्दानंतर 'वासकात्'

---

१. आमचा लेख 'संशोधनमुक्तावलि', सर १, पृ. ७६–९४ वर पुनर्मुद्रित केला आहे.

२. मिराशी, 'वाकाटक नृपति आणि त्यांचा काल', पृ. २९५–३०१.

( शिबिराहून ), 'स्थानात्' ( ठिकाणाहून ), 'विजयस्कन्धावारात्' ( विजयी शिबिरातून ) या सारखा एखादा शब्द नसल्याने हा ताम्रपट देणाऱ्या राजाचा त्यावेळी पद्मपुरी तात्पुरता मुक्काम होता असे म्हणवत येत नाही. पद्मपुर हे तीर्थ म्हणूनही प्रसिद्ध नाही. तेव्हा तो ताम्रपट तीर्थक्षेत्री ब्राह्मणास दिला होता असेही वाटत नाही. म्हणून पद्मपुर ही प्रस्तुत ताम्रपट देणाऱ्या राजाची राजधानी असावी असे अनुमान करता येते.

## वाकाटकांचे साम्राज्य

विदर्भात वाकाटकानी इ. स. च्या तिसऱ्या शतकापासून सहाव्या शतकाच्या प्रथम पादाच्या अखेरपर्यंत राज्य केले. उत्तर भारतात ज्याप्रमाणे गुप्तांचे त्याप्रमाणे दक्षिण भारतात वाकाटकाचे काही काळ विस्तृत व समृद्ध असे साम्राज्य होते हे कोरीव लेखावरून सिद्ध झाले आहे. पुराणात म्हटले आहे की या वंशाचा महाप्रतापी सम्राट् प्रथम प्रवरसेन त्याला चार पुत्र होते व ते चारही राजे झाले[१] अर्थात् त्याच्या साम्राज्याचे चार भाग होऊन त्यावर वाकाटकाच्या चार शाखा राज्य करू लागल्या. त्यापैकी दोन शाखांचे कोरीव लेख आतापर्यंत सापडले आहेत. ज्येष्ठ शाखेची राजधानी आरंभी नन्दिवर्धन ( रामटेक जवळचे नन्दरधन ) येथे होती. दुसऱ्या एका शाखेची राजधानी वत्सगुल्म ( अकोला जिल्ह्यातील वाशीम ) ही होती. गुप्तवंशी विख्यात नृपति द्वितीय चन्द्रगुप्त-विक्रमादित्य याची कन्या प्रभावतीगुप्ता वाकाटक नृपति द्वितीय रुद्रसेन यास दिली होती. ज्येष्ठ शाखेच्या सध्या उपलब्ध झालेल्या सर्व ताम्रपटात प्रभावतीगुप्तेचा पुणे येथे सापडलेला ताम्रपट प्राचीन आहे. त्यात दान दिलेले गाव व त्याच्या चतुःसीमेची गावं वर्धा जिल्ह्याच्या हिंगणघाट तहसिलीत सापडली आहेत.[२] तो ताम्रपट 'नन्दिवर्धनात्' म्हणजे नन्दिवर्धनाहून दिला होता. नन्दिवर्धन या स्थलनामानंतर 'वासकात्' सारखे शब्द नसल्याने ते वाकाटकाचे त्या काळचे राजधानीचे शहर होते, असे अनुमान करता येते. त्यानंतरचे प्रभावतीगुप्तेच्या द्वितीय प्रवरसेन नामक मुलाचेही काही ताम्रपट नन्दिवर्धनाहून दिलेले सापडले आहेत. त्यावरून वरील अनुमानाने समर्थन होते.

द्वितीय प्रवरसेनाने आपल्या कारकीर्दीच्या अकराव्या वर्षानंतर दिलेले कित्येक ताम्रपट प्रवरपुराहून दिले आहेत. त्यावरून त्या राजाने आपल्या नावे प्रवरपुर नामक नगर स्थापून तेथे राजधानी नेली होती, असे दिसते. हे प्रवरपुर वर्धा जिल्ह्यातील

---

१. तस्य पुत्रास्तु चत्वारो भविष्यन्ति नराधिपाः ।। पार्जिटर, पृ. ५०.

२. मिराशी, 'वाकाटक नृपति आणि त्यांचा काल,' पृ. १८९–१९०.

सध्यांचे पवनार होय हे आम्ही तेथे सापडलेल्या शिलादिकांवरून इतरत्र सिद्ध केले आहे.[1]

द्वितीय प्रवरसेनानंतर नलवंशी भवदत्तवर्म्याने विदर्भावर स्वारी करून त्याचा काही प्रदेश काबीज केला आणि नन्दिवर्धन हीच आपली राजधानी केली हे आम्ही सन १९३३ मध्ये नागपूरच्या 'वागीश्वरी' मासिकातील आपल्या लेखात प्रथम दाखविले होते. भवदत्तवर्म्यानंतर द्वितीय प्रवरसेनाचा नातू द्वितीय पृथिवीषेण याने पराक्रमाने आपले राज्य परत मिळविले एवढेच नाही तर नळाच्या बस्तर संस्थानातील पुष्करी राजधानीवर चाल करून ती उद्ध्वस्त केली असे दिसते.[2] द्वितीय पृथिवीषेणाचा एकच व तोही अपूर्ण असा ताम्रपट मध्यप्रदेशाच्या बालाघाट जिल्ह्यात सापडला आहे तो त्याने वेण्वारगावी आपला मुक्काम असताना (वेम्बारवासकात्) देण्याचे योजिले होते असे दिसते. त्यावेळी त्याची राजधानी कोठे होती याचा निर्देश सापडला नाही. बहुधा ती पद्मपुर येथे असावी. त्याच्या पित्याच्या—नरेन्द्रसेनाच्या- काळीच ती प्रवरपुराहून हलविली होती असे दिसते.

### भवभूतीच्या पूर्वजांस राजाश्रय

वाकाटक राजे स्वतः ब्राह्मण असून श्रौत विधींचे अभिमानी होते. प्रथम प्रवरसेनाने अग्निष्टोम, आप्तोर्याम, उक्थ्य, षोडशिन्, अतिरात्र, वाजपेय, बृहस्पतिसव, साद्यस्क्र आणि चार अश्वमेध यज्ञ केल्याचा उल्लेख ज्येष्ठ शाखेच्या बहुधा सर्व ताम्रपटात सापडतो. तेव्हा त्याचा विद्वान् व यज्ञयाग करणाऱ्या ब्राह्मणास आश्रय असावा. त्याच्या ताम्रपटावरून हीच गोष्ट सिद्ध होते. द्वितीय प्रवरसेनाने अनेक गावे ब्राह्मणाना दान दिल्याचे त्याच्या ताम्रपटावरून दिसते. भवभूति आपल्या नाटकात पद्मपुरच्या आपल्या पाच पिढ्यांचा निर्देश करतो. तो सातव्या शतकाच्या अखेरीस आणि आठव्या शतकाच्या प्रथम पादात होऊन गेला असे आपण मागे ठरविले आहे. प्रत्येक पिढी तीस वर्षांची धरल्यास त्याचा पाचवा पूर्वज इ. स. ५५० च्या सुमारास होऊन गेला असावा. वाकाटक नृपति द्वितीय पृथिवीषेणाचा काळ इ. स. ४७० ते ४९० असा आम्ही इतरत्र निश्चित केला आहे.[3] पद्मपुरास भवभूतीच्या पूर्वी पाचच पिढ्या होऊन गेल्या असे म्हणता येत नाही. एकंदरीत भवभूतीचा पाचवा पूर्वज आणि हा वाकाटक नृपति यांचे काळ जवळजवळ येतात यात संशय नाही. भवभूतीच्या नाटकाच्या प्रस्तावना-

---

१. 'संशोधनमुक्तावलि', सर १, पृ. १७७–१८७.

२. ए. इं., पु. २१, पृ. १५६.

३. वाकाटक नृपति आणि त्यांचा काल, पृ. ५२–५५.

वरून त्याचे पूर्वज मूळचे उदुंबर गावचे हे आम्ही पुढील प्रकरणात दाखविले आहे. हे उदुंबर गाव सध्याचे यवतमाळ जिल्ह्यातील पैनगंगेच्या काठचे उमरखेड असावे. उमरखेडमध्ये भवभूतीसंबंधी तशी समजूत अद्यापि प्रचलित आहे असे समजते. भवभूतीचे पूर्वज तैत्तिरीय शाखेचे, पंचाग्नि राखणारे, वाजपेय यागासारखे यज्ञ करणारे, मीमांसक व ब्रह्मवादी ब्राह्मण होते. वाकाटक राजांनी अशा विद्वान् व सच्छील ब्राह्मणाना आपल्या राजधानीत बोलावून त्यांच्या करवी यज्ञ करविले असावे असे अनुमान केले तर ते बहुधा चूक होणार नाही. वाकाटकांच्या नंतर विदर्भात प्रथम कलचुरींची आणि नंतर चालुक्यांची सत्ता झाली, त्या काली तो प्रदेश त्यांनी मांडलिक राष्ट्रकूट घराण्याच्या ताब्यात दिला होता हे मागे दाखविले आहे. त्या राजांचा विद्वानास व कवीस तितकासा आश्रय नसल्याने भवभूतीस राजाश्रयार्थ किंवा लोकाश्रयार्थ उत्तर भारतात पद्मावती, कनोज इत्यादि ठिकाणी हिंडावे लागले असे दिसते शेवटी त्याला कनोजच्या यशोवर्म्याचा आश्रय मिळाला हे मागे दाखविले आहे.

## पद्मपुराचा शोध

येथवर भवभूतीचे जन्मस्थान हे उत्तरभारतात नसून प्राचीन विदर्भातच होते व ते एककाळी वाकाटकांच्या राजधानीचे शहर होते याविषयी अलीकडे उपलब्ध झालेला पुरावा आपण पाहिला. आता हे पद्मपुर कोठे होते याचा विचार करू. प्राचीन विदर्भ म्हणजे स्वातंत्र्यप्राप्तीपूर्वीचा 'वऱ्हाड' अशी सामान्यतः समजूत असल्याने हे पद्मपुर वऱ्हाडातच कोठे तरी असावे असे अनेक संशोधकानी म्हटले आहे. पण त्याना त्याचा पत्ता लागला नव्हता. सुमारे पस्तीस वर्षांपूर्वी पद्मपुराचा शोध करताना वऱ्हाड प्रांताच्या चारही जिल्ह्यातील नगर-खेडेगावांच्या सरकारी याद्या आम्ही चाळून पाहिल्या होत्या; पण त्यामध्ये पद्मपुर किंवा त्याला जुळेल अशा नावाचे एकाही खेडेगाव किंवा नगर आम्हास आढळले नाही.[1] वास्तविक विदर्भ म्हणजे पूर्वीचा वर्धा नदीच्या पश्चिमेचा वऱ्हाड ही समजूत चुकीची आहे. कालिदासाच्या 'मालविकाग्निमित्रा'त वर्धा नदीने प्राचीन विदर्भाचे दोन भाग झाले होते आणि राज्यविषयक कलह मिटविण्याकरिता ते दोघा चुलतभावाना दिले होते, असे दाखविले आहे. त्यावरून वर्धा नदी विदर्भाची पूर्व मर्यादा नसून त्या नदीच्या पूर्वेस जवळजवळ अर्धा विदर्भ पसरला होता यात संशय नाही. विदर्भाच्या वाकाटक वंशाच्या ज्येष्ठ शाखेची राजधानी नन्दिवर्धन ही 'वऱ्हाडा'त

---

१. आता महाराष्ट्र शासनाने 'महाराष्ट्रातील खेड्यांची व शहरांची वर्णक्रमी' तयार करून छापली आहे. तीतही असे ठिकाण वऱ्हाडच्या चार जिल्ह्यात दिसत नाही.

नसून नागपूर जिल्ह्यात रामटेकजवळ आहे. वाकाटक नृपति द्वितीय प्रवरसेन याचे ताम्रपट छिंदवाडा, बैतुल, नागपूर, भंडारा इत्यादि 'वऱ्हाड'च्या पूर्वेच्या जिल्ह्यात सापडले आहेत आणि त्यात उल्लेखिलेली गावेही त्या जिल्ह्यात सापडतात. तेव्हा विदर्भाची पूर्व मर्यादा वर्धा नदी ही नसून तो पूर्वेस छत्तीसगडपर्यंत पसरला होता यात संशय नाही. भोजकट (वऱ्हाडातील अमरावती जिल्हा) याप्रमाणे बेणाकट (वैनगंगेच्या तीराचा भंडारा जिल्हा) हाही विदर्भाचा एक भाग होता.

## आमगावाजवळचे पद्मपुर

भंडारा व चांदा या प्राचीन विदर्भाच्या पूर्वेकडील जिल्ह्यात पद्मपुर, पद्मापुर किंवा पदम्पुर या नावाची सहा गावे आम्हास सापडली. त्यापैकी चांदा जिल्ह्याच्या चांदा, सिरोंचा व ब्रह्मपुरी तहसिलीत प्रत्येकी एक, भंडारा जिल्ह्याच्या साकोली तहसिलीत दोन आणि पूर्वीच्या आमगाव जमिनदारीत एक अशी त्यांनी वर्गवारी आहे.[1] भवभूतीचे जन्मस्थान पद्मपुर हे एक नगर होते असे तो स्वतःच सांगतो. वात्स्यायनाच्या 'कामसूत्रा'चा टीकाकार यशोधर 'नगरं अष्टशतग्राममध्ये तद्व्यवहारस्थानम्' (*आठशे गावांचा व्यवहार जेथे चालतो ते नगर*) *अशी नगराची व्याख्या* करतो. तेव्हा प्राचीन पद्मपुर बरेच मोठे असावे. शिवाय मागे उल्लेखिलेल्या ताम्रपटावरून ते एककाळी वाकाटकाच्या राजधानीचे शहर होते असे दिसते. तेव्हा तेथे बरेच अवशेष असावे अशी सहजच आपली कल्पना होते. या दृष्टीने चौकशी करता भंडारा जिल्ह्यातील आमगाव स्टेशनजवळच्या पदम्पुर गावी काही अवशेष आहेत अशी माहिती आम्हास मिळाली. शिवाय द्वितीय प्रवरसेनाच्या शिवनी येथे सापडलेल्या ताम्रपटाने दान दिलेले गाव व त्याच्या चतुःसीमेच्या गावांपैकी बहुतेक गावे पदम्पुराहून पाचसहा मैलांच्या टापूत सापडतात हे आम्ही अन्यत्र दाखविले आहे.[2] त्यावरून त्या गावाभोवतालचा प्रदेश वाकाटकाच्या अमलाखाली होता यात संशय नाही. तेव्हा आमगावाजवळचे पदम्पुर हेच भवभूतीचे पद्मपुर असण्याचा संभव वाटून सन १९३४ च्या नाताळात आम्ही आपल्या काही स्नेह्यांसह पदम्पुरला गेलो होतो. तेथील अवशेष पाहून ते पदम्पुरच भवभूतीचे पद्मपुर असे आम्ही साधार दाखविले होते. पुनः या वर्षी (१९६७ च्या) एप्रील महिन्यात इतर काही मित्रांसह जाऊन तेथील अवशेष पाहिले आणि त्यांचे पुनः फोटो घेतले. त्या अवशेषांचे वर्णन खाली थोडक्यात दिले आहे.

---

१. 'महाराष्ट्रातील खेड्यांची व शहरांची वर्णक्रमी,' पृ. १३८.

२. 'वाकाटक नृपति आणि त्यांचा काळ', पृ. २२७.

पद्मपूरचे अवशेष

पद्मपुर हे गाव पूर्वी भंडारा जिल्ह्याच्या आमगाव जमिनदारीत होते. ते साउथ ईस्टर्न रेल्वेच्या आमगाव स्टेशनच्या पूर्वेस अदीच मैलांवर आहे. शेतासह त्या गावाचे क्षेत्रफळ १४१४ एकर असून लोकसंख्या सन १९६१ च्या खानेसुमारीत १५३९ होती. गावाच्या पश्चिमेस एक लहानशी टेकडी आहे. तिला नाथमहाराजांची टेकडी म्हणतात. तिजवर काही जुन्या मूर्ति आहेत, असे समजल्यावरून आम्ही प्रथम तिजवर चढलो व तेथे आम्हास प्राचीन वाटलेल्या दोन शिलांचे फोटो घेतले. या दोन्ही शिला भुरक्या रंगाच्या असून प्रत्येकीवर एक चतुर्भुज देव आणि द्विभुज देवी यांच्या आकृति कोरल्या आहेत. त्यांची उंची २ फूट १० इंच आहे. देवाच्या वरच्या दोन्ही हातात शूलाकारचे आयुध असून खालच्या उजव्या हातात गदा व डाव्या हातात कलश आहे. देवीच्या डोक्यावर छत्र असून उंच केलेल्या डाव्या हातात कलश आहे आणि उजवा हात खाली मोकळा सोडला आहे. या मूर्ति मध्ययुगीन कालातील दिसतात.

टेकडीवरून पूर्वेला झाडीत लपलेले पद्मपुर, त्याच्या पश्चिमेचे लहानसे तळे, सभोवार इतस्ततः पसरलेले उंच खडक याचे मनोहर दृश्य दिसते. या टेकडीवर माघ महिन्यात शिवरात्रीस यात्रा भरते असे आम्हास समजले.

नंतर टेकडीवरून खाली उतरून आम्ही पद्मपुर गावाच्या वायव्य दिशेस सुमारे २५० यार्डांवर जमिनीपासून १८ फूट उंच असलेल्या खडकावर एक मूर्ति ठेवली आहे असे समजल्यावरून तिकडे गेलो. या खडकावर जाण्यास वाट नसल्याने आमचे आमगावचे स्नेही श्री. मल्याजी जोशी यांनी गावातून शिडी आणवून आमची वर चढण्याची सोय केली. त्या खडकावर चढल्यावर दुसऱ्या एका खडकाला टेकून ठेवलेली एक मोठी शिळा दिसली. तिजवर मध्यभागी चतुर्भुज विष्णूची मूर्ति कोरली असून दोन्ही बाजूंनी खांब व त्यावर कमान दाखविली आहे. विष्णूची मूर्ति सन्मुख आहे. त्याच्या हातात शंख, चक्र, गदा व पद्म दाखविली आहेत. त्यांच्या बाहेर उजव्या बाजूस सेवक आणि डाव्या बाजूस सेविका असून त्यांच्या हातात चवऱ्या आहेत. मूर्तीच्या शिल्पकामावरून ती मध्ययुगीन कालाच्या शेवटी म्हणजे दहावे ते बारावे शतक या कालातील असावी असा अंदाज आहे.

नतर आम्ही पद्मपूर जवळच्या शेतात गेलो तेथे बांधावर तीन छिन्न विच्छिन्न मूर्तींचे अवशेष इतस्ततः पडलेले दिसले. ते एके ठिकाणी करवून आम्ही फोटो घेतले त्यांतली एक मूर्ति मूळची दोन फूट उंचीची असून तिचे पॉलिश व शिल्पकाम प्रेक्षणीय आहे. या मूर्तीचा गळ्याखालचा बराच भाग तुटलेला दिसला तो जवळच सापडल्यामुळे आम्ही तो धडावर ठेवून फोटो घेतला. ही मूर्ति जैन तीर्थंकर पार्श्वनाथ याची आहे.

तो कमलावर पर्यंकासन घालून ध्यानस्थ बसला आहे. त्याच्या वक्षःस्थलावर श्रीवत्स आहे. त्याच्या कानाचे चाप लांब दाखविले आहेत. त्याच्या डोक्यावर सात फणाचा नाग असून त्यावर एकावर एक अशी तीन छत्रे दिसतात. नागाच्या दोन्ही बाजूस हातात माला घेऊन उभे राहिलेले पूजक दाखविले आहेत. त्याच्या पलीकडे दोन्ही बाजूस एक लहान देऊळ कोरले असून त्यात पार्श्वनाथाच्या मूर्तीसारखीच पण लहान मूर्ति कोरली आहे छत्राच्या दोन्ही बाजूस एक हत्ती आपली सोंड वर उचलून अभिषेक करीत आहे असे दाखविले आहे. मूर्तीचे हात, गळ्याजवळचा काही भाग व सापाच्या फण्या भग्न झाल्या आहेत. ही मूर्तिही वरील विष्णूच्या मूर्तीप्रमाणेच मध्य-युगीन कालातील दिसते. याशिवाय जवळच शेतात पडलेली ऋषभदेव किंवा आदिनाथ या जैन तीर्थंकराचीही एक मूर्ति वर वर्णिलेल्या पार्श्वनाथासारखीच ध्यानमग्न अशी कोरली आहे मात्र हिच्या डोक्यावर नाग व दोन्ही बाजूस हत्ती नाहीत. पायाच्या खाली याचे चिन्ह वृषभ कोरले आहे. या वर्षी आम्ही पदमपुरास गेलो त्यावेळी शोध करूनही या जैन तीर्थंकराच्या भग्न मूर्ति आम्हास सापडल्या नाहीत.

### नागपूर म्यूझियम मधील शिवमूर्ति

या शिवाय पदमपुर गावाजवळ दोन मोठ्या देवळाचे अवशेष आम्हास दिसले. यापैकी एक देऊळ गावाच्या उत्तरेस सुमारे २०० यार्डांवर असावे. या देवळाच्या अवशेषात दरवाजाच्या चौकटीची गणेशपट्टी ८ फूट लांब, १ फूट सात इंच रुंद व १ फूट ६ इंच जाड भरली, त्यावरुन त्या दरवाजाच्या रुंदीची कल्पना येईल. बाकीचे अवशेषही याला शोभणारे असे विशाल आकाराचे दिसले. वरील गणेशपट्टीतील गणपतीच्या मूर्तीवरुन हे देवालय हिंदु देवाचे बहुधा भगवान् शिवाचे असावे. दुसरे देऊळ गावाला लागूनच उत्तर दिशेला होते असे दिसते याचे काही दगडी खांब व देवाच्या मूर्तिमागची दगडी प्रभावळ एवढी मात्र अद्यापि उभी आहेत. काही खांबाचे तुकडे मातीत दबून गेलेले दिसले. वाटेवरच पडलेला एक तुकडा आम्ही मोजला. तो आरंभी चौकोनी, नंतर अष्टकोनी, पुढे षोडशकोनी व शेवटी वाटोळा असा घडविलेला दिसला. तळभागाची लांबी २१ इंच व रुंदी १९ इंच आणि एकंदर तुकड्याची उंची ४ फूट ४ इंच भरली. प्रभावळीच्या आकारावरुन विच्यापुढील मूर्ति सुमारे पाच फूट उंचीची असावी असे वाटले. सुमारे चाळीस वर्षांपूर्वी तेथील एक मोठी मूर्ति एका साहेबाने नागपूरच्या म्यूझियमकरिता नेली असे तेथील एका शेतकऱ्याने आम्हास सांगितले. नागपुरास परत आल्यावर आम्ही तिचा शोध केला. पण नागपूर म्यूझियममध्ये पदमपुराहून आलेली एकही मूर्ति आम्हास दिसली नाही. म्यूझियममध्ये आरंभी आरंभी मूर्ति व कोरीव लेख यांच्या मूळ ठिकाणाचे निर्देश व्यवस्थितपणे लिहून ठेवण्याची काळजी घेतली नव्हती. म्हणून कित्येक मूर्तींची मूळ ठिकाणे

( provenance ) माहीत नाहीत असे शेरे म्यूझियमच्या यादीत मारले आहेत. म्यूझियममध्ये भंडाऱ्यास सापडलेली ५८ इंच उंचीची व उत्कृष्ट रीतीने कोरलेली शिवाची उभी मूर्ति दृष्टीस पडते. ती खुद्द भंडाऱ्याहून आणली असेल काय याविषयी आम्हास संशय आला. कारण खुद्द भंडाऱ्यास प्राचीन देवळाचे अवशेष दिसत नाहीत. ही मूर्ति साधारणपणे पद्मपूरच्या प्रभावळीइतकीच दिसल्यामुळे आम्ही आमच्या स्नेह्याकडून पद्मपूरच्या प्रभावळीच्या लांबी-रुंदीची मापे मागविली. आश्चर्याची गोष्ट ही की लांबी, रुंदी व आकृति या बाबतीत ती प्रभावळ व नागपूर म्यूझियममधील मूर्ति ह्या अगदी एकसारख्या भरल्या. तेव्हा ती मूर्ति भंडारा शहरातून आणली नसून भंडारा जिल्ह्यातून—अर्थात् पद्मपुराहून—आणली होती हे सिद्ध झाले.

या मूर्तीची पादपीठासहित उंची ४ फूट १० इंच असून ती तांबूस रंगाच्या प्रस्तराची ( red sandstone ) बनविलेली आहे. तिचे शिल्पकाम अत्युत्कृष्ट असून प्राचीन पद्धतीचे आहे. मूर्तीच्या डोक्यावरची कमान सर्पांची केली असून मध्ये कीर्तिमुख आहे. भगवान् शंकराच्या शिरावर जटामुकुट आहे. कीर्तिमुखाकार रत्न व त्यावर चंद्रकला समोरच दिसते. त्याच्या गळ्यात घातलेली पुष्पमाला जवळ जवळ घोट्यापर्यंत खाली लोंबत असलेली दिसते. त्याच्या उजवीकडच्या वरच्या हातात त्रिशूल व खालच्या हातात रुद्राक्षमाला आहे. डावीकडच्या वरच्या हातात फणा पसरलेला सर्प व खालच्या हातात कलश दिसतो. खालच्या उजव्या व डाव्या हाता-जवळ उजव्या बाजूस त्रिशूलधारी व डाव्या बाजूस खड्ग धारण करणारा सेवक कोरला आहे. त्याच्या पलीकडे दोन्ही बाजूस चवरी घेऊन एक एक सेविका उभी आहे. पादपीठावर एका बाजूस पार्वती व समोरच नंदी कोरला आहे.

सुदैवाने या मूर्तीचा बहुतेक भाग उत्तम स्थितीत आहे. म्हणून शिल्पकाराचे कसब तीव्र उत्कृष्ट रीतीने व्यक्त झाले आहे. भगवान् शंकराची मुद्रा प्रसन्न व गंभीर आहे. नागपूरच्या म्यूझियममध्ये हिच्या इतकी उत्कृष्ट दुसरी मूर्ति नाही असे उद्गार माँगे लखनौ म्यूझियमचे क्यूरेटर श्री. प्रयाग दयाळ म्यूझियममधील मूर्तींचा अभ्यास करण्यास आले होते तेव्हा त्यांनी आमच्याजवळ काढले होते. मूर्तीच्या शिल्पकामा-वरून ती दहाव्या-अकराव्या शतकातील असावी असे वाटते

**प्राचीन पद्मपुर**

अशा प्रकारच्या अनेक उत्कृष्ट प्राचीन मूर्ति जेथे अद्यापि सापडतात ते हे पद्मपूर एके काळी अत्यंत भरभराटीस पोचलेले शहर असावे यांविषयी संशय राहत नाही. पद्मपूरच्या सभोवतालची वनश्रीही प्रेक्षणीय आहे. गावाच्या सभोवार इतस्ततः पसरले-ल्या टेकड्या आणि त्यावरचे विविधाकृति विशाल दगड यांची दृश्ये मनोहर आहेत. अलीकडे झाडी बरीच कमी झाली आहे. पण काही वर्षांपूर्वीपर्यंत या बाजूचा भाग

पद्मपूर येथील प्राचीन मूर्ति



शिव



पार्श्वनाथ

जंगलात मोडत होता व त्यात व्याघ्रादि हिंस्र पशूंची व सर्पासारख्या विषारी प्राण्यांची वसती होती असे गॅझेटीयरमध्ये म्हटले आहे. अशा परिसरात भवभूतींचे बाल्यपण गेले असल्याने त्यास सृष्टीचे भव्य व उदात्त स्वरूप निरीक्षण करण्याची गोडी लागावी यात आश्चर्य नाही. उत्तररामचरितातील (अंक २, श्लोक १४) दंडकारण्यातील स्थलाचे खालील वर्णन पाहा—

स्निग्धश्यामाः क्वचिदपरतो भीषणाभोगरूक्षाः
स्थाने स्थाने मुखरककुभो झाङ्कृतैर्निर्झराणाम् ।
एते तीर्थाश्रमगिरिसरिद्‌गर्तकान्तारमिश्राः
संदृश्यन्ते परिचितभुवो दण्डकारण्यभागाः ॥

[ कोठे काळेभोर तर कोठे (अरण्याच्या) भयंकर विशालत्वेमुळे रुक्ष दिसणारे, ठिकठिकाणी निर्झराच्या झंकाररवाने ज्यांनी दिग्भाग निनादित केले आहेत असे, आणि तीर्थे, आश्रम, पर्वत, नद्या, दऱ्या व अरण्ये यांनी युक्त असे हे मला परिचित असलेले दण्डकारण्याचे भाग दृग्गोचर होत आहेत. ]

दण्डकारण्यातील रोमहर्षण करणारी अरण्याची वर्णने पाहा—

निष्कूजस्तिमिताः क्वचित्क्वचिदपि प्रोच्चण्डसत्त्वस्वनाः
स्वेच्छासुप्तगभीरघोरभुजगश्वासप्रदीप्ताग्नयः ।
सीमानः प्रदरोदरेषु विलसत्स्वल्पाम्भसो यास्वयं
तृष्यद्भिः प्रतिसूर्यकैरजगरस्वेदद्रवः पीयते ॥

(उत्तररामचरित, २, १६)

[ या दण्डकारण्याच्या प्रान्तभागात कोठे पक्ष्यांचेही कूजन ऐकू येत नसल्याने शांतता आहे तर कोठे श्वापदांच्या भयंकर गर्जना ऐकू येत आहेत. यथेच्छ झोप घेणाऱ्या, प्रचण्ड आणि भयकर सर्पांच्या श्वासोच्छ्वासाने येथील वणवे पेटले आहेत; क्वचित् दऱ्याखोऱ्यात थोडेसे पाणी चमकत आहे (आणि म्हणून) तहानलेल्या सरड्यांना अजगराचा गळलेला घाम प्यावा लागत आहे. ]

या तऱ्हेची अरण्याची वर्णने भवभूतीला पद्मपुरच्या आसमंतात् भागातील निसर्गाच्या दृश्यांवरून सुचली असली पाहिजेत, अशी कल्पना सहजच रसिक प्रेक्षकाच्या मनात येते. सध्या प्राचीन पद्मपुर नगराचे अगदी लहान अशा खेड्यात रुपांतर झाले आहे. पूर्वी जेथे नगर होते तेथे आता शेते झाली आहेत. या शेतांतच मागे वर्णिलेल्या जैन तीर्थंकरांच्या भग्न मूर्ति इतस्ततः पडलेल्या आम्हास दिसल्या. अजूनही शेते नांगरताना क्वचित् मातीची भांडी व देवतांच्या लहानसहान मूर्ति नांगराच्या फाळाने वरती येतात. तेथील लोकांनी तशी काही प्राचीन मातीची भांडी व गणपतीची $1\frac{3}{4}$ इंच उंचीची तांबूस रंगाच्या प्रस्तराची छोटी मूर्ति आम्हास दिली. एके काळी भरभराटीस

आलेल्या विस्तृत व समृद्ध नगराचे हे आजचे दृश्य भवभूतीच्या दृष्टीस पडल्यास अनेक वर्षांनी दण्डकारण्याला भेट देणाऱ्या रामाप्रमाणेच त्याच्याही तोंडून खालील उद्गार बाहेर पडतील यात संशय नाही—

पुरा यत्र स्रोतः पुलिनमधुना तत्र सरितां
विपर्यासं यातो घनविरलभावः क्षितिरुहाम् ।
बहोर्दृष्टं कालादपरमिव मन्ये वनमिदं
निवेशः शैलानां तदिदमिति बुद्धिं द्रढयति ।।

(उत्तररामचरित, २, २७,)

[पूर्वी जेथे नद्यांचे पात्रे होती तेथे आता वाळवंटे झाली आहेत. झाडी दाट होती तेथे विरळ झाली आहे आणि विरळ होती तेथे दाट झाली आहे. पुष्कळ काळाने हे अरण्य दृष्टीस पडल्यामुळे ते जणू काय अगदीच निराळे असा भास होत आहे. पर्वतांच्या स्थानावरून मात्र तेच हे स्थान अशी ओळख मनाला पटत आहे.]

पद्मपुराच्या पूर्वेला सुमारे दीड मैल अंतरावर एक विशाल व सुंदर तलाव दृष्टीस पडतो. त्याच्या तीनही बाजूंस उंच टेकड्या असून चौथ्या बाजूस बराच उंच व लांब बांध घालून पाणी अडविले आहे. हा तलावही प्राचीन असावा. सुमारे पासष्ट वर्षांपूर्वी सरकारने पंधरा हजार रुपये खर्च करून या बांधाची दुरुस्ती केली. सध्या या तलावाचे पाणी आमगावच्या बागांकरिता पाटाने नेले आहे. प्राचीनकाळी पद्मपुराला या तलावातून पाण्याचा पुरवठा होत असावा.

**आणखी एक प्रमाण**

आमगावाजवळचे सध्याचे पद्मपुर हेच भवभूतीचे जन्मस्थान व एकेकाळी वाकाटकांची राजधानी झालेले पद्मपुर होय हे सिद्ध करण्यास आणखीही एक प्रमाण देता येईल. भवभूति हा तैत्तिरीय शाखेचा ब्राह्मण होता. वाकाटकांच्या तिरोडी येथे सापडलेल्या ताम्रपटाने ब्रह्मपूरक गाव ज्याला दान दिले होते तो ब्राह्मणही तैत्तिरीय शाखेचाच होता व तो गाव ब्राह्मणी या नावाने पद्मपूरच्या ईशान्येस सुमारे सात मैलांवर अद्यापि विद्यमान आहे.[1] तेव्हा प्राचीनकाळी या भागात त्या शाखेच्या ब्राह्मणांची वस्ती होती यात संशय नाही. सध्या पद्मपुरास ब्राह्मणवस्ती मुळीच नाही; तथापि पद्मपुरच्या आसपास कारंजा, लांजी वगैरे ठिकाणी अद्यापि तैत्तिरीय शाखेचे तैलंगी ब्राह्मण दृष्टीस पडतात.

विदर्भावर राज्य करणाऱ्या वाकाटकांची राजधानी त्यांच्या राज्याच्या मध्यभागी नसून पूर्व सरहद्दीजवळ पद्मपूर सारख्या ठिकाणी असावी याचे कदाचित् कोणास आश्चर्य वाटेल. पण वाकाटकांनी प्रवरपुराहून आपली राजधानी हलविली,

१. 'वाकाटक नृपति आणि त्यांचा काल', पृ. २६६.

त्या वेळची राजकीय परिस्थिति लक्षात घेतल्यास तसे आश्चर्य वाटणार नाही. वाकाटकाचा समकालीन नळवंशी भवदत्तवर्मा याचा एक ताम्रपट वऱ्हाडच्या अमरावती जिल्ह्यात ऋद्धपुर येथे सापडला आहे.[1] त्यात दान दिलेले कदंबगिरिग्राम हे वऱ्हाडच्या यवतमाळ जिल्ह्यातील कळंब असावे. हे गाव टेकडीच्या पायथ्याशी वसले आहे तेव्हा गिरिग्राम हे वर्णन त्यास ठीक लागू पडते. हा ताम्रपट भवदत्तवर्म्याने नन्दिवर्धनाहून दिला होता. नन्दिवर्धन एके काळी वाकाटकाच्या राजधानीचे शहर होते हे मागे दाखविले आहे. तेव्हा भवदत्तवर्म्याने वाकाटक राज्याचा पश्चिमेकडचा बराचसा भाग गिळंकृत केला होता यात संशय नाही. या अनुमानाला वाकाटकांच्या कोरीव लेखांचाही आधार आहे द्वितीय पृथिवीषेणाच्या बालाघाट येथे सापडलेल्या अपूर्ण ताम्रपटात त्या राजाचे (पृथिवीषेणाचे) 'निमग्नवंशस्योद्धर्ता' (विपत्तीत सापडलेल्या आपल्या वंशाचा उद्धार करणारा) असे वर्णन केले आहे.[2] त्यावरून वाकाटकवंशाला पृथिवीषेणाचा पिता नरेन्द्रसेन याच्या काळी फारच अवनत दशा प्राप्त झाली होती असे दिसते व तिचे कारण वर उल्लेखिलेली भवदत्तवर्म्याची स्वारी हेच असले पाहिजे. या प्रसंगी वाकाटकांचे मांडलिकही त्यास जुमानीतनासे झाले होते. फक्त पूर्वेकडचे कोसल (छत्तीसगड), मेकल (नर्मदा नदीच्या उगमाजवळचा प्रदेश) आणि मालव (माळवा) या देशांचे राजे नरेन्द्रसेनाशी एकनिष्ठ राहिले होते. म्हणून बालाघाट ताम्रपटात नरेन्द्रसेनाचे वर्णन 'कोसला-मेकला-मालवाधिपतिभिरभ्यर्चितशासनः'[3] (कोसल, मेकल व मालव देशांचे अधिपति ज्याच्या आज्ञा मानीत) असे केले आहे. विपत्प्रसंगी पूर्वेकडच्या या राजांचे साहाय्य झाल्यामुळे नरेन्द्रसेनाने कोसल देशालगतच आपली राजधानी नेली असली तर त्यात आश्चर्य नाही. पुढे पृथिवीषेणाने नळवंशीयास विदर्भांतून हाकून लावले आणि त्यांची राजधानी पुष्करी ही उध्वस्त केली हे अलीकडे प्रसिद्ध झालेल्या भवदत्तवर्म्याच्या मुलाच्या शिलालेखावरून दिसते. पण त्या इतिहासाशी येथे आपणास काही कर्तव्य नाही. सातव्या शतकात विदर्भात जे मांडलिक राष्ट्रकूट राज्य करीत होते त्यांचीही राजधानी काही काळ तरी पद्मपुरास होती हे त्यांच्या अकोल्याजवळ सापडलेल्या ताम्रपटावरून मागे दाखविले आहे. त्या काळातच भवभूतीचा जन्म झाला.

### उत्खननाची आवश्यकता

येथवर आमगावाजवळचे पद्मपुर हेच वाकाटकांची व राष्ट्रकूटांची राजधानी असलेले व भवभूतीचे जन्मस्थान पद्मपुर होय हे सिद्ध करणारा पुरावा साधार व सविस्तर

१. ए. इं., पु. १९, पृ. १००–१०४.
२. 'वाकाटक नृपति आणि त्यांचा काळ' पृ. ३०६.
३. पूर्वोक्त, पृ. ३०५.

माडला आहे. तेथे प्राचीन मोठाल्या प्राचीन इमारतींचे अवशेष आहेत, याची माहिती सरकारास जवळ जवळ शंभर वर्षे आहे. पण या इमारती त्या खेडेगावात कशा आल्या हे सरकारास कोडे पडले होते ते वरील विवेचनाने उलगडेल आणि स्वतंत्र कालातील महाराष्ट्र सरकार तेथे उत्खननाचे कार्य हाती घेईल अशी आशा आहे.

पण उत्खनन झाले तरी भवभूतीच्या जन्मस्थानाविषयी वर माडला आहे त्यापेक्षा जास्त सबळ पुरावा कधीकाळी उपलब्ध होईल काय याची शंका आहे. कारण भवभूतीने आपल्या 'मालतीमाधवा'त पद्मावतीच्या आसमंतप्रदेशाचे जसे सविस्तर वर्णन केले आहे तसे पद्मपुरचे कोठेही केले नाही आणि इतरत्रही कोठे पद्मपुरचे तसे वर्णन येत नाही. सध्या तरी या पद्मपुराखेरीज विदर्भातील अन्य पद्मपुरात अशा तऱ्हेचे प्राचीन अवशेष मिळत नाहीत हे खरे. तेव्हा येथे माडलेल्या पुराव्यावरून भंडारा जिल्ह्यातील आमगावाजवळचे पद्मपुर हेच भवभूतीचे जन्मस्थान पद्मपुर याविषयी वाचकाची खात्री पटेल अशी आशा आहे.

* * *

आम्ही आमगावाजवळचे पद्मपुर बत्तीस वर्षांपूर्वी प्रथम पाहिले आणि तेथील अवशेषावरून तेच भवभूतीचे जन्मस्थान हे निश्चित केले. त्यानंतर ह्या ( १९६७ ) वर्षी काही मित्रांसह ते पुनः पाहण्यास गेलो, तेव्हा मध्यंतरीच्या काळात तेथे आणखी कित्येक मूर्ति सापडल्याचे आढळून आले. त्या सर्वांचे वर्णन येथे देणे शक्य नाही. पण त्यापैकी देवी सरस्वतीची मूर्ति विशेष उल्लेखनीय असल्याने तिचे संक्षिप्त वर्णन देतो.

ही मूर्ति काळसर पाषाणाची आहे. ती जवळच्या नदीत सापडली असे तेथील लोकांनी आम्हास सांगितले. या मूर्तीचे वरील दोन हात भग्न झाले असून तिच्या मुखालाही इजा पोचली आहे. सरस्वती देवी त्रिभंग पद्धतीत उभी असून तिच्या शिरावर करड मुकुट आहे. तिच्या मुखामोवती सुंदर प्रभावलय दाखविले आहे. ती चतुर्भुज आहे, पण वरील दोन्ही हात आता भग्न झाले आहेत. दुसऱ्या दोन हातांनी तिने वीणा धरली आहे. देवीच्या गळ्यात रत्नहार असून त्यातील एक तिच्या पुष्ट स्तनामध्ये लोंबत आहे. शिवाय तिने रत्नकुंडले, बाहुभूषणे, कंकण व नूपुर ही धारण केली आहेत. अधोवस्त्रावर तिने सुंदर रशना धारण केल्या असून त्यांचे शेवट तिच्या मांड्यावर लोंबत आहेत. तिचे उत्तरीय दोन्ही बाजूस फडफडत असलेले दाखविले आहे. तिच्या उजव्या बाजूस एक भक्त आणि डाव्या बाजूस तिचे वाहन हंस दिसत आहे. ही मूर्ति मध्ययुगीन दिसते.

देवीच्या पादपीठावर एक लेख कोरला आहे. त्याचे वाचन अद्यापि झाले नाही. तथापि त्यातील काही अक्षरावरून तो दहाव्या अकराव्या शतकातील असावा असे वाटते.

---

## परिशिष्ट पहिले

# पद्मपुरच्या स्थानाविषयी आमच्या सिद्धान्तावर डॉ. काणे यांचे आक्षेप आणि त्यांचे परीक्षण

भवभूतीच्या जन्मस्थानाविषयी आमचा लेख बत्तीस वर्षांपूर्वी प्रसिद्ध झाला होता. त्यात मांडलेला सिद्धान्त अनेकांनी स्वीकारला होता. पण सन १९६२ मध्ये डॉ. काणे यांनी प्रसिद्ध केलेल्या 'उत्तररामचरिता'च्या चौथ्या आवृत्तीत त्या सिद्धान्तावर काही आक्षेप घेतले आहेत. प्रस्तुत प्रकरण संपविण्यापूर्वी त्यांचेही परीक्षण केले पाहिजे.

## डॉ. काणे यांचे आक्षेप

आमच्या सिद्धान्तावर डॉ. काणे यांनी पुढील आक्षेप घेतले आहेत: —

( १ ) प्रा. मिराशी यांनी चांदा व भंडारा जिल्ह्यात पद्मपुर या नावाची वहा खेडी आहेत असे म्हटले आहे. त्यांपैकी कोठेही उत्खनन झाले नसल्यामुळे त्यांपैकी एखादे भवभूतीचे पद्मपुर नसेल कशावरून ?

( २ ) एका अपूर्ण ताम्रपटात 'पद्मपुर' या स्थलनामाबरोबर 'स्थानात्', 'वासकात्', 'स्कन्धावारात्' या सारखा शब्द नसल्यामुळे ते पद्मपुर वाकाटकांच्या राजधानीचे शहर होते हे अनुमान फार दूर उडी मारण्यासारखे आहे. वाकाटकांच्या नन्दिवर्धन, प्रवरपुर अशा इतरही राजधान्या होत्या. प्रस्तुत ताम्रपट भंडारा जिल्ह्यातील पद्मपुराहून शंभर मैलावर किंवा कदाचित् त्यापेक्षाही दूर अंतरावर दुर्ग जिल्ह्यात सापडला होता आणि त्यात पद्मपुर या नावाखेरीज अधिक माहिती नाही. केवळ एखाद्या शब्दाच्या प्रयोगामुळे किंवा अभावामुळे काढलेली अनुमाने कशी चूक असण्याचा संभव असतो हे एका उदाहरणाने दाखविता येईल. प्रा. मिराशी यांनी राष्ट्रकूट नृपति तृतीय इंद्र याने जे महोदयनगर उद्ध्वस्त केले ते प्रतीहार राजाची राजधानी कनोज होय असे म्हटले आहे. पण गुर्जर-प्रतीहार नृपति भोज याच्या बरा येथील ताम्रपटात महोदयाचा स्कन्धावार (शिबिर) म्हणून उल्लेख आला आहे. आणि त्याच ताम्रपटात इतरत्र कान्यकुब्जाचा निर्देश आहे. त्यावरून ही दोन स्थळे भिन्न आहेत असे दिसते. या उदाहरणावरून पद्मपुराबरोबर 'वासकात्', 'स्कन्धावारात्' असे पद नसल्यामुळे ते नगर राजधानी असावे या प्रा. मिराशी यांच्या मताविषयी बळकट संशय उत्पन्न होतो.

( ३ ) प्रस्तुत अपूर्ण ताम्रपट बनावट असावा याच्या विरुद्ध काही कारणे आहेत काय ? फ्लीटने अशा ४९ बनावट कोरीव लेखांची यादी प्रसिद्ध केली आहे. तीत ४४ ताम्रपट आहेत.

वरील आक्षेपांमुळे डॉ. काणे यांनी एकेठिकाणी भवभूतीचे जन्मस्थान पद्मपुर हे मत तात्पुरते ( as a tentative proposition ) मान्य करण्यास आपण तयार आहो असे म्हटले असले तरी इतरत्र प्रा. मिराशींचे अनुमान फार थोड्या पुराव्यावर आधारलेले असल्यामुळे ते सध्याच्या परिस्थितीत मुळीच स्वीकारू नये असे ठासून सांगितले आहे. तेव्हा या आक्षेपांचा विचार केला पाहिजे.

## आक्षेपांस उत्तरे

**आक्षेप पहिला—'भंडारा जिल्ह्यातील पद्मपुराच्या प्राचीनत्वाचा पुरावा नाही.'** विदर्भातील कोणत्याही पद्मपुर गावात उत्खनन झाले नाही हे खरे आहे. पण उत्खननाने तरी निर्णायक पुरावा हाती येतो असे थोडेच आहे. उज्जयिनी, हस्तिनापुर, पाटलिपुत्र येथे उत्खनन झाले आहे. पण तेथे त्या शहराचे नाव असलेला एक तरी लेख किंवा नाणे सापडले आहे काय ! असा पुरावा सापडेपर्यंत उपलब्ध प्रमाणांवरून अनुमाने काढली पाहिजेत. भंडारा जिल्ह्यातील आमगावाजवळच्या पद्मपुरात विष्णु, शिव, सरस्वती इत्यादि हिंदु देवतांच्या व जैन तीर्थंकरांच्या प्राचीन मूर्ति, देवळांचे अद्यापि उभे असलेले खांब, विशाल गणेशाची पाषाणमूर्ति अनेक अवशेष दृष्टीस पडतात. त्यांचे विस्तृत वर्णन मागे केले आहे. हा प्रदेश भवभूतीच्या पूर्वी वाकाटकांच्या अमलाखाली होता व त्यांच्या काळीही मांडलिक राष्ट्रकूटांची तीन राजधानी असावी हे दाखविले आहे. पद्मपुरच्या समोवारची वनश्री भवभूतीच्या उत्तररामचरितातील दण्डकारण्याच्या वर्णनास तुळेल अशी आहे हेही दाखविले आहे. इतका पुरावा असता हे अनुमान का ग्राह्य होऊ नये ? यांच्या निराळे ठिकाण भवभूतीचे जन्मस्थान आहे असे आक्षेपकांना म्हणावयाचे असल्यास तेथे याहून बळकट पुरावा आहे असे दाखवावयास पाहिजे होते. प्राचीन भारतीय इतिहासाची साधने इतकी अत्यल्प आहेत की जी उपलब्ध आहेत त्यावरूनच अनुमाने काढावी लागतात.

**आक्षेप दुसरा—'पद्मपुर ही वाकाटकांची राजधानी होती याला पुरावा नाही.'** वाकाटककालीन दुर्ग ताम्रपटात पद्मपुराशेजार 'स्थानात्', 'वासकात्', 'स्कन्धावारात्' असा एखादा शब्द नसल्यामुळे पद्मपुर हे वाकाटकांची राजधानी असावे या आमच्या अनुमानावरील डॉ. काणे यांचा आक्षेपही असाच पोकळ आहे.

आतापर्यंत वाकाटकांचे २८ लेख सापडले आहेत. त्यांतील एक शिलालेख अप्रकाशित असून बाकीचे २७ लेख आम्ही वाकाटक राजवंशावरील आमच्या इंग्रजी,

मराठी व हिंदी ग्रंथांत प्रकाशित केले आहेत. त्यांपैकी सात शिलालेख किंवा गुहालेख आहेत. त्यात आरंभी स्थानाचा उल्लेख नसतो. राहिलेल्या ताम्रपटांपैकी काही अपूर्ण सापडले आहेत आणि काही माडलिकांचे आहेत. त्यात राजनिवासस्थलाचा निर्देश उपलब्ध नाही, किंवा प्रस्तुत विवेचनास उपयुक्त नाही. वाकाटकांच्या कांही ताम्रपटात जो आला आहे तो खाली दिल्याप्रमाणे आहे. ( लेखांचे क्रमांक आमच्या इंग्रजी पुस्तकातल्याप्रमाणे आहेत. )[1]

### वाकाटकांचे ताम्रपट

| क्रमांक | ताम्रपटाचे नाव | | स्थलनिर्देश |
|---|---|---|---|
| १. | प्रभावतीगुप्तेचा पुणे ताम्रपट | — | नान्दिवर्धनात् । |
| ३. | द्वितीय प्रवरसेनाचा जांब ताम्रपट | — | नन्दिवर्धनात् । |
| ४. | द्वितीय प्रवरसेनाचा बेलोरा ताम्रपट | — | नान्दिवर्धनात् । |
| ६. | द्वितीय प्रवरसेनाचा चम्मक ताम्रपट | — | प्रवरपुरात् । |
| ८. | प्रभावतीगुप्तेचा ऋद्धपुर ताम्रपट | — | रामगिरिस्वामिनः पादमूलात् । |
| १०. | द्वितीय प्रवरसेनाचा दुदिया ताम्रपट | — | प्रवरपुरात् । |
| ११. | द्वितीय प्रवरसेनाचा तिरोडी ताम्रपट | — | नरत्तङ्गवारिस्थानात् । |
| १२. | द्वितीय प्रवरसेनाचा वडगाव ताम्रपट | — | हिरण्यानदीवासकात् । |
| १३ | द्वितीय प्रवरसेनाचा पट्टण ताम्रपट | — | प्रवरपुरात् । |
| १४. | द्वितीय प्रवरसेनाचा पाढुर्णा ताम्रपट | — | प्रवरेश्वरदेवकुलस्थानात् । |
| १७. | दुर्ग येथील अपूर्ण ताम्रपट | — | पद्मपुरात् । |
| १८. | द्वितीय पृथिवीषेणाचा बालाघाट येथील अपूर्ण ताम्रपट | — | वेम्बारवासकात् । |
| २३. | द्वितीय विन्ध्यशक्तीचा वाशीम ताम्रपट | — | वत्सगुल्मात् । |
| २४. | देवसेनाचा इंडिया ऑफीस ताम्रपट | — | वत्सगुल्मात् । |

असा 'वाकाटकांच्या सिंहलदरिहित केला असल्यानुळे तो पद्मपुर वाकाटकांच्या एकेकाळच्या राजधानीचे शहर होते हे अनुमान त्यावे उडी मारल्यासारखे होते काय हे वाचकांनी ठरवावे. पूर्वीची राजधानी बदलल्याचे कारण नळवंशी भवदत्तवर्म्याचे विदर्भावरील आक्रमण आणि नन्दिवर्धनावर ताबा, हे असावे हेही आम्ही मागे दाखविले आहे.

भंडारा जिल्ह्यातील पद्मपुराहून १००[1] मैल दूर अंतरावर दुर्ग जिल्ह्यात त्या स्थलाचा उल्लेख असलेला प्रस्तुत अपूर्ण ताम्रपट सापडला होता आणि त्यात पद्मपुर या नावाखेरीज काही माहिती नाही असा आक्षेप डॉ. काणे यांनी घेतला आहे. ताम्रपट ही वस्तु आणण्याबरोबर सहज नेण्याजोगी असल्याने ती मूळच्या ठिकाणाहून दूर अंतरावर सापडल्यास आश्चर्य नाही. यापेक्षाही जास्त दूर अंतरावर सापडलेल्या एक दोन ताम्रपटांची येथे माहिती देतो, म्हणजे या आक्षेपात काही तथ्य नाही हे वाचकांच्या लक्षात येईल. प्रभावतीगुप्तेचा पुणे ताम्रपट त्या शहरात त्याच्याबद्दल सापडला तो कायार नूळचा अहमदनगरचा होता. पण तो ताम्रपट मूळचा पुणे किंवा अहमदनगर येथील नसून विदर्भाच्या वर्धा जिल्ह्यातील होता हे त्यातील नुसत्याच आहाराचा आणि त्यातील निर्दिष्ट ग्रामनामांचा शोध वर्धा जिल्ह्याच्या हिंगणघाट तहसिलीत लावून आम्ही दाखविले आहे.[2] पुण्याहून हिंगणघाटचे अंतर ५०० मैलांपेक्षा जास्त भरेल. दुसरे यापेक्षाही विलक्षण उदाहरण पूर्वकालीन चालुक्य नृपति विनयादित्य याच्या कोकणातील चेनुल्य (चौल) प्रदेशातील गावाचे दान करणारा ताम्रपट पंजाबात पठोडा येथे सापडला होता त्याचे.[3] या दोन स्थलांतील अंतर किती आहे, हे डॉ. काणे यांनी पाहावे.

प्रस्तुत दुर्ग ताम्रपटात 'पद्मपुर' या नावाशिवाय आपली काही माहिती येत नाही खरे, पण कोणत्या ताम्रपटात ती तशी येते ? प्रवरपुर या वाकाटकांच्या राजधानीचा केवळ निर्देश ताम्रपटात येतो. पवनार जवळ सापडलेल्या शिलालेखांमुळे व देवळाच्या अवशेषांमुळे तेच पूर्वीचे प्रवरपुर असे आता निश्चित झाले आहे.' आमगावजवळच्या पद्मपुरात अशी शिल्पे व अवशेष आहेत हे आम्ही मागे दाखविले आहे.

### महोदय व कनोज ही भिन्न नव्हत

केवळ एखाद्या शब्दाच्या प्रयोगावरून किंवा अभावावरून अनुमान काढले असता ते कसे चूक ठरते ते राष्ट्रकूटनृपति तृतीय इंद्र याच्या विषयी खंबायतच्या

---

१. Mirashi, *Inscriptions of the Vakatakas* (C. I. I. Vol. IV), p. 7.

२. इ. अँ. ( सन १९११ ), पृ. २४०.

३. 'संशोधनमुक्तावलि' सर १, पृ. १७७–१८७.



पदमपूर येथील देवालयाचे अवशेष

ताम्रपटात आलेल्या खालील श्लोकाच्या आमच्या स्पष्टीकरणावरून दाखविण्याचा प्रयत्न डॉ. काणे यांनी केला आहे. तो श्लोक असा—[1]

> यन्मायद्द्विपदन्तघातविषमं कालप्रियप्राङ्गणं
> तीर्णा यत्तुरगैरगाधयमुना सिन्धुप्रतिस्पर्धिनी ।
> येनेदं हि महोदयारिनगरं निर्मूलमुन्मूलितं
> नाम्नाद्यापि जनैः कुशस्थलमिति ख्यातिं परां नीयते ।।

तृतीय इन्द्राने गुर्जर-प्रतीहार राजांची राजधानी कनोज यावर स्वारी करून ते उद्ध्वस्त केले त्याचे हे वर्णन आहे. त्याचा अर्थ असा—

"तृतीय इंद्राच्या मदोन्मत्त हत्तींच्या दंतांच्या आघातांनी कालप्रियाचे प्रांगण उंचसखल झाले; त्याच्या घोड्यांनी सागराशी विशालत्वात स्पर्धा करणारी यमुना पार केली. त्याने समूल उद्ध्वस्त केल्यामुळे ही महोदय ( कनोज ) नामक शत्रूची ( समृद्ध ) राजधानी अद्यापि कुशस्थल या नावाने लोकांत प्रसिद्ध आहे. ( पूर्वीच्या सुसमृद्ध शहरात अद्यापि गवत वाढले आहे, असा भावार्थ. ) "

वरील श्लोकाच्या आमच्या अर्थावर डॉ. काणे यांचा आक्षेप असा—वरील श्लोकावरून प्रा. मिराशी यांनी महोदय हे प्रतीहाराच्या राजधानीचे शहर होते व तेच कनोज असे म्हटले आहे. पण प्रतीहार नृपति भोजदेव यांच्या बरा ताम्रपटात महोदयाला स्कन्धावार ( शिबिर ) असे म्हटले आहे आणि त्याच ताम्रपटात कान्यकुब्जाचा निराळा उल्लेख आला आहे.[2] त्यावरून महोदय आणि कान्यकुब्ज ही एक नव्हत.

या आक्षेपात मुळीच तथ्य नाही. बरा ताम्रपटात 'श्रीमहोदयसमावासितानेकनौहस्त्यश्वरथपत्तिसम्भारस्कन्धावारात्' असा महोदयाचा 'स्कन्धावार' म्हणून उल्लेख आला आहे खरा, पण संस्कृतामध्ये 'स्कन्धावार' याचा 'शिबिर' एवढाच अर्थ होत नाही. त्याचा 'राजधानी' असाही अर्थ होतो. 'स्कन्धावार इति प्राज्ञे राजधानी

१. ए. इं., पु. ७, पृ. ३६ इ.

२. डॉ. काणे यांचा आक्षेप, त्यांनी 'तसे' म्हटले नसले तरी बरा ताम्रपटाचे संपादक कै. हीरानन्द शास्त्री यांच्या विधानावर आधारला आहे. ए. इ. पु. १९, पृ. १७ पाहा. भोजानंतरचे राजे महेंद्रपाल आणि विनायकपाल यांचेही ताम्रपट महोदय येथील स्कन्धावारातूनच दिले होते ( इ. अँ., पु. १५, पृ. ११२ व १४० पाहा ). त्यावरूनही महोदय ही गुर्जर प्रतीहाराची राजधानी होती हे सिद्ध होते.

निगद्यते ।' ( हलायुध, अभिधानरत्नमाला, २, १३१ ) पाहा. याच अर्थी तो शब्द 'हर्षचरिता'च्या पाचव्या उच्छ्वासात हर्ष आपल्या पिता प्रभाकरवर्धन हा अतिशय आजारी पडल्याचे समजताच हिमालयातून गडबडीने ठाणेश्वरास परत येतो त्याच्या वर्णनात बाणाने 'स्कन्धावारं समासाद' असा योजला आहे. स्वतः डॉ. काणे यांनी त्या उताऱ्यावरील आपल्या टिप्पणात तोच अर्थ 'a capital' असा दिला आहे. ( हर्षचरित, उच्छ्वास ४ ते ८ [ १९१७ ], नोट्स्, पृ. ७१ पाहा. ) तेव्हा वरा ताम्रपटात 'स्कन्धावार' म्हणून वर्णिलेले महोदय हे शिबिर नसून राजधानीचे शहर ( कनोज ) होते यात संशय नाही. आता त्या ताम्रपटात श्रीकान्यकुब्जभुक्तीचाही उल्लेख आला आहे खरा, पण त्यावरून कान्यकुब्ज महोदयापासून भिन्न होते असे अनुमान काढता येत नाही. अवन्ति आणि उज्जयिनी यांचा जसा संबंध होता तसाच कान्यकुब्ज आणि महोदय यांचा होता. 'अवन्ति' हे देशाचे तसेच नगराचेही नाव होते. तसे 'कान्यकुब्ज' हे भुक्तीचे आणि नगराचे नाव होते. 'महोदय' नाव उज्जयिनीप्रमाणे नगराचेच नाव होते. कनोजला अनेक नावे होती. स्वतः काणे यांनीच म्हटले आहे की हेमचन्द्राच्या 'अभिधानचिन्तामणि' कोशात कान्यकुब्ज, कन्या-कुब्ज, महोदय आणि गाधिपुर हे शब्द समानार्थक म्हणून दिले आहेत. त्यांनीच महोदय आणि कनोज ही एक होत या माझ्या मताबर आक्षेप घ्यावा, यातील 'वदतोव्याघात' पाहून आश्चर्य वाटते.

**आक्षेप तिसरा—' दुर्ग ताम्रपट बनावट आहे.'** 'पद्मपुरात्' असा उल्लेख असलेला दुर्ग ताम्रपट बनावट असावा असे डॉ. काणे सुचवितात आणि त्याला प्रमाण म्हणून प्राचीन काळी अनेक ताम्रपट बनावट असत असे सांगतात. याप्रकारचे विधान एखाद्या वकीलाच्या तोंडी शोभेल. एखाद्या सभ्य गृहस्थाला 'तुला चोर का म्हणू नये ? कारण येथे अनेक चोर सापडले आहेत' असे म्हणण्याप्रमाणेच हे आहे. शेकडो ताम्रपट बनावट ठरले असतील; पण जोपर्यंत दुर्ग ताम्रपट बनावट म्हणण्यास काही कारणे सापडत नाहीत तोपर्यंत तो तसा मानणे योग्य होणार नाही. बनावट पत्राच्या काही खुणा असतात. दुर्ग ताम्रपटात आलेली वाकाटक वंशावळ अपूर्ण असली तरी बरोबर आहे. त्याची लिपीही त्याच काळातील आहे. तो अपूर्ण आहे हे त्याच्या आरंभी 'दृष्टम्' शब्द कोरला नाही, पण त्याकरिता जागा ठेवली आहे त्यावरून स्पष्ट आहे.[१] त्याच्या शेवटच्या ओळीत एका अक्षराच्या डोक्यावरच्या

---

१. वाकाटकाच्या पूर्ण ताम्रपटात आरंभी 'दृष्टम्' असा शब्द आढळतो. द्वितीय पृथिवीषेणाचा बालाघाट ताम्रपटही अपूर्ण असल्याने त्याच्या आरंभी 'दृष्टम्' शब्द नाही.

मात्राच तेवढ्या कोरल्या असून पुढे तीन अक्षराची जागा राहिली आहे. त्यावरून तो पत्रा पूर्णपणे कोरला जाण्यापूर्वीच कोरणाऱ्याला काही कारणाने थांबण्यास सांगितलेले दिसते. हा ताम्रपट बनावट असता तर इतर ताम्रपटावल्याप्रमाणे त्याच्या आरंभी 'दृष्टम्' शब्द कोरला असता. शेवटी काही अक्षराची जागा सोडण्याचेही कारण नव्हते. तेव्हा हा ताम्रपट बनावट मानण्यास यत्किंचितही कारण नाही.

पद्मपुर हे वाकाटकाच्या राजधानीचे शहर असो वा नसो, त्या नावाचे शहर वाकाटकाच्या काळी--भवभूतीच्या काळापूर्वी निदान २०० वर्षे--विदर्भात अस्तित्वात होते, याविषयी प्रस्तुत दुर्ग ताम्रपटावरुन मुळीच संशय राहत नाही. तसेच अकोला ताम्रपटावरून बहुधा तेच शहर भवभूतीच्या काळीही मांडलिक राष्ट्रकूट राजाची राजधानी झाले होते असे दिसते. भवभूतीच्या नाटकावरून त्याच्या पूर्वजांचे निवासस्थान पद्मपुर हे दक्षिणापथाच्या विदर्भात होते हे स्पष्ट आहे. भंडारा जिल्ह्यातील आमगावजवळच्या पद्मपुरात प्राचीन अवशेष आहेत आणि दुर्ग ताम्रपट तेथूनच दिला जाणार होता असे मानण्यास सबळ कारणे आहेत. तेव्हा दुसरे एखादे पद्मपुर बळकटतर पुराव्यावरून भवभूतीचे जन्मस्थान म्हणून सिद्ध होईपर्यंत आमगावाजवळच्या पद्मपुराला तो मान देण्यास प्रत्यवाय नसावा.

---

प्रकरण चौथे

# भवभूतीचे जीवनचरित

**कथमपि भुवनेऽस्मिंस्तादृशाः सम्भवन्ति ॥**

( मालतीमाधव, २, ९ )

मागील प्रकरणात 'महावीरचरिता'च्या प्रस्तावनेतील उतारा दिला आहे, त्यावरून भवभूतीच्या कुलाविषयी बरीच माहिती मिळते. भवभूतीचे पूर्वज उदुम्बर या नावाने प्रसिद्ध होते आणि ते दक्षिणापथाच्या विदर्भ देशातील पद्मपुर नामक नगरीत राहत होते. हे पद्मपुर विदर्भाच्या भंडारा जिल्ह्यातील आमगावाजवळचे पदमपुर होय हे आपण मागील प्रकरणात निश्चित केले आहे. पण त्यांच्या कुलाला उदुंबर हे नाव कसे पडले याचा विचार करणे जरूर आहे.

**डॉ. केतकरांचा तर्क**

काही वर्षांपूर्वी डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांनी 'भवभूतीचे उपनाम डंबर की उदुंबर' असा वाद उपस्थित केला होता, आणि ते डंबर असावे असा निर्णय दिला होता.[१] त्यांची प्रमाणे खालीलप्रमाणे —

( १ ) कलकत्ता येथील 'मालतीमाधवा'ची छापील आवृत्ति आणि डॉ. रामकृष्णपंत भांडारकरास मिळालेली नाशिकची हस्तलिखित प्रत यात 'डम्बरनामानः' असा पाठ भवभूतीच्या पूर्वजांचे वर्णन करताना दिला आहे. या दोन्हीत साम्य फार

१. केतकर, 'भवभूतीचे उपनाम डंबर की उदुंबर?' महाराष्ट्र, नागपूर, २७ जानेवारी १९२९.

आहे. त्यावरून त्या ज्या प्रतींवरून झाल्या त्याचे अधिकक्षेत्रव्यापित्व आणि प्राचीनत्व दृष्टीस पडते.

( २ ) 'मालतीमाधवा'च्या जगद्धर नामक टीकाकाराने 'डम्बरनामानः' असाच पाठ स्वीकारून 'डम्बरं उत्कर्षसूचकं नाम येषाम्' ( ज्यांचे नाव उत्कर्षद्योतक आहे ) किंवा 'डम्बरं प्रसिद्धं नाम येषाम्' ( ज्याचे नाव प्रसिद्ध आहे ) असे दोन पर्यायी अर्थ सुचविले आहेत. आणि दुसऱ्या अर्थाचे समर्थक असे 'प्रसिद्धौ डम्बरं विदुः' असे 'विश्व' नामक कोशातील वचन उद्धृत केले आहे. हे अर्थ घेतले तरी भवभूतीचे उपनाव कोणते हा प्रश्न उरतोच. तेव्हा ते डम्बर ( सध्याच्या डावरे सारखे ) असावे असा डॉ. केळकर यांचा तर्क होता.

## त्या तर्काचे परीक्षण

डॉ. केळकरांच्या इतर अनेक तर्कांप्रमाणे भवभूतीच्या उपनामासंबंधी हा तर्कही विश्विप्त आहे. वरील दोन्ही प्रमाणात काही अर्थ नाही. डॉ. भांडारकरांनी 'डम्बर-नामानः' हा पाठ न स्वीकारता 'उदुम्बरनामानः' असाच पाठ 'मालतीमाधवा'च्या आपल्या आवृत्तीत दिला आहे. त्याचे कारण तो पाठ अनेक हस्तलिखितांत आढळतो हेच असले पाहिजे. या हस्तलिखितांपैकी एक प्राचीन हस्तलिखित नाशिक येथीलच आहे. याच्या उलट ज्यात 'डम्बरनामानः' असा पाठ आढळतो ते नाशिकचे हस्तलिखित त्या नाटकाची अलीकडे केलेली प्रत आहे असे डॉ. भांडारकरांनी आपल्या प्रास्ताविकात म्हटले आहे. दुसरे असे की भवभूतीने आपल्या 'महावीर-चरित' नामक दुसऱ्या नाटकात आपल्या पूर्वजांचे 'मालतीमाधवा'तल्या प्रमाणेच वर्णन केले आहे. त्यात 'उदुम्बरनामानः' असाच पाठ आहे. 'महावीरचरिता'ची चिकित्सक आवृत्ति कै. तोडरमल्ल यांनी काश्मीर, कलकत्ता, मुंबई, म्हैसूर, तंजावर इत्यादि ठिकाणी हिंदुस्थानात असलेली आणि केंब्रिज, इंडिया ऑफिस वगैरे जागी पाहावयास मिळणारी दुर्मिळ अठरा स्वतंत्र हस्तलिखिते मिळवून मोठ्या परिश्रमाने तयार केली आहे आणि प्रत्येक पृष्ठावर सर्व हस्तलिखित प्रतींचे पाठभेद दिले आहेत. त्यांपैकी बहुतेक सर्व 'उदुंबरनामानः' असाच पाठ देतात. फक्त एकाच प्रतीत 'दुम्बरनामानः' असा पाठ आहे व तो लेखकाच्या हस्तदोषाने झालेला आहे. डॉ. केळकरांना संमत असलेला 'डम्बरनामानः' हा पाठ त्या नाटकाच्या कोणत्याही प्रतीत आढळत नाही.

डॉ. केळकरांनी दिलेले दुसरे प्रमाण 'मालतीमाधवा'च्या जगद्धर या टीकाकाराने 'डम्बरनामानः' हा पाठ स्वीकारला आहे, हेही निर्बल आहे. जगद्धर हा मिथिलेतील विदेहनगरचा राहणारा. त्याने 'डम्बरनामानः' असा पाठ दिला तर त्यावरून

त्याच्या काळी उत्तर भारतात काही ठिकाणी तो पाठ प्रचलित होता एवढेच म्हणता येईल. याच्या उलट 'मालतीमाधवा'च्याच त्रिपुरारि नामक दुसऱ्या एका टीकाकाराने 'उदुम्बरनामानः' असाच पाठ घेतला आहे. तसेच 'महावीरचरिता'च्या 'वीरराघव' या टीकाकारानेही तोच पाठ आपल्या टीकेत दिला आहे. तेव्हा भवभूतीच्या पूर्वजांचे कुलनाम 'उदुम्बर' होते यात संशय नाही.

जगद्धराने 'डम्बरनामनः' असा पाठ घेतला त्याचे कारणही उघड आहे. उदुंबर हे एका वृक्षाचे नाव. ते कवीचे कुलनाम कसे असेल अशी शंका येऊन त्याने 'डम्बरनामान' असा पाठ कल्पिलेला दिसतो. त्याचा अर्थ 'ज्याचे नाव प्रसिद्ध आहे' असा एका कोशाच्या आधारे देऊन त्याने आपल्या मनाचे समाधान करून घेतले असावे.

## भवभूतीच्या कुलाचे मूळ गाव उदुंबर

'उदुम्बरनामानः' या पाठाची उपपत्ति निराळ्या रीतीने लावता येते. भवभूतीच्या काळापर्यंत उपनामे देण्याचा प्रघात नव्हता. प्राचीन कोरीव लेखात दान दिलेल्या अनेक ब्राह्मणांची नावे आलेली आहेत. पण इ. स. १००० पर्यंत त्यांची गोत्रे, प्रवर वगैरेच दिले जात; उपनामांचे उल्लेख दिसत नाहीत. (मध्ययुगीन भारत, भा. ३, पृ. २५१ पाहा.) तथापि ब्राह्मण आपण मूळचे कोठले याची चांगली आठवण ठेवीत. अशा मूलस्थानाचे कोरीव लेखात 'नन्दिवर्धनविनिर्गत' 'वलभीविनिर्गत' असे उल्लेख आढळतात. अशा मूलस्थानावरून हल्लीची आडनांवे झालेली दिसतात. हल्ली महाराष्ट्रात आपण गावाच्या नावास 'कर' हा शब्द लावतो ( उ. राजापूरकर ), अगर तो एकारांत करतो. ( उ. उदाहरणार्थ नागपुरे ). पण कर्नाटकात केवळ गावाचे नावच उपनाम म्हणून योजण्यात येते. ( उ. अनिगिंडी, बनहट्टी इत्यादि ). याच कारणाने भवभूतीने आपले उदुंबर हे उपनाम दिले असावे. वृक्षावरून पडलेली गावांची अनेक नावे महाराष्ट्रात सध्या प्रचलित आहेत. उदाहरणार्थ आंबेगाव, चिंचोली, पळसगाव इत्यादि. आठव्या शतकात होऊन गेलेल्या भवभूतीच्या काळीही तोच प्रघात होता हे राष्ट्रकूटनृपति प्रथम कृष्णराज याच्या शकसंवत् ६९४ (इ. स. ७७२)च्या भांदक येथे सापडलेल्या ताम्रपटावरून दिसून येईल.[1] त्या ताम्रपटात उम्बरमन्ति ( सध्याचे यवतमाळ जिल्ह्यातील राणी उमरावती), उंबरग्राम इत्यादि नावे दिली आहेत. तेव्हा उदुंबर या नावाच्या एका गावातून भवभूतीचे पूर्वज पद्मपुर येथ राहण्यास आले व आपल्या मूळ ठिकाणची स्मृति कायम ठेवण्यासाठी त्यांनी उदुंबर हे कुलनाम धारण केले असे दिसते. सध्या

१. ए इ. पु. १४, पृ. १२१ इ.

उमरखेड, उमरगाव यासारख्या नावाची अनेक गावे विदर्भात विद्यमान आहेत. त्यापैकी यवतमाळ जिल्ह्यातील पैनगंगा नदीच्या उत्तर तीरावरील उमरखेड येथे भवभूतीसंबंधी काही परंपरागत कथा प्रचलित आहेत असे कळते. तेव्हा तेच भवभूतीच्या पूर्वजाचे मूलस्थान असावे.

## भवभूतीचे पूर्वज

भवभूति आपल्या 'महावीरचरित' आणि 'मालतीमाधव' या नाटकात आपल्या पूर्वजाविषयी बरीच माहिती देतो. ते तैत्तिरीय शाखेचे कृष्णयजुर्वेदी ब्राह्मण होते. त्यांचे गोत्र काश्यप असून त्यांनी आपल्या शाखेच्या वेदवेदांगाच्या अध्यापनाकरिता वेदविद्यालय चालविले होते असे दिसते; कारण त्यांना 'चरणगुरवः' शाखाध्ययन करणाऱ्यांचे गुरु असे म्हटले आहे. ते मोठे धार्मिक, व्रतानुष्ठान व सोमयाग करणारे आणि पाचही अग्नि राखून सदैव त्यांची होमहवनांनी पूजा करणारे असे अत्यंत पवित्र आचरणाचे ब्राह्मण होते. त्यामुळे त्यांना समाजात मोठा मान असून ते 'पंक्तिपावन' गणले जात. जे पवित्र आचरणाचे व विद्वान् ब्राह्मण एखाद्या पंक्तीत भोजनास बसले असता ती पंक्ति पावन होते त्यास 'पंक्तिपावन ब्राह्मण' असे म्हणत. 'मनुस्मृती'च्या खालील श्लोकात (३,१८४) 'पंक्तिपावन' ब्राह्मण कोणास म्हणावे हे सांगितले आहे—

अग्र्याः सर्वेषु वेदेषु सर्वप्रवचनेषु च ।
श्रोत्रियान्वयजाश्चैव विज्ञेयाः पंक्तिपावनाः ॥

जे चारी वेदात आणि शिक्षा, निरुक्त, व्याकरण, ज्योतिष्, छन्दस् व कल्प या सहाही वेदांगात पारंगत आहेत आणि दहा पिढ्यांपर्यंत ज्यांच्या वंशात वेदविद्येचे अध्ययन चालत आलेले आहे अशा अत्यंत पवित्र आचरणाच्या व विद्वान् ब्राह्मणानाच पंक्तिपावनात गणले जाई. भवभूति आपल्या पूर्वजाविषयी आणखी खालील माहिती 'मालतीमाधवा'त (१,५) देतो—

ते श्रोत्रियास्तत्त्वविनिश्चयाय भूरिश्रुतं शाश्वतमाद्रियन्ते ।
इष्टाय पूर्ताय च कर्मणेऽर्थान्दारानपत्याय तपोऽर्थमायुः ॥

भवभूतीचे पूर्वज आपल्या सखोल वेदज्ञानाचा उपयोग तत्त्वनिश्चयार्थ करीत असत (वादाकरिता नव्हे), आपले धन यज्ञयागाच्या अनुष्ठानात व वापी, कूप, तलाव इत्यादींच्या निर्माणासारख्या लोकोपयोगी कृत्यांत खर्च करीत, संततीकरिता गृहस्थाश्रम स्वीकारीत आणि तपश्चर्येसाठी जीवन धारण करीत. आपले पूर्वज असे पवित्र आचरणाचे, विद्वान् व उदार ब्राह्मण होते आणि अशा वंशात आपला जन्म झाला याचा यथार्थ अभिमान भवभूतीला वाटत होता व तो त्याने आपल्या पूर्वोक्त दोन नाटकाच्या प्रस्तावनात व्यक्त केला आहे.

भवभूति ' महावीरचरिता 'त आपल्या पाच पूर्वजांविषयी माहिती देतो. त्याचा पाचवा पूर्वज महाकवि नामक होता. ' महावीरचरिता 'च्या एका प्रतीत महाकवि हे विशेषण करून सिंहभूति असे त्याचे नाव दिले आहे, पण त्याला इतर हस्तलिखिताचा आधार नाही. म्हणून ते ' भवभूति ' या नावावरून बनविलेले दिसते. ह्या महाकवीने वाजपेय याग केला होता हे भवभूतीने आवर्जून सांगितले आहे. वाजपेय हा अत्यंत महत्त्वाचा व त्रैवर्णिकांना विहित असा सोमयाग होता. क्षत्रियांनी तो केला असता त्यांना ' सम्राट् ' पदवी धारण करण्याचा अधिकार प्राप्त होत असे. वाकाटकवंशातील महाप्रतापी राजा प्रथम प्रवरसेन याने हा याग करून ' सम्राट् ' पदवी धारण केली होती, तिचा साभिमान उल्लेख त्याच्या वंशजांच्या बहुधा सर्व ताम्रपटांत आढळतो. असा हा महत्त्वाचा सोमयाग भवभूतीच्या पाचव्या पूर्वजाने केला होता. त्यानंतर भवभूतीचा पितामह भट्टगोपाल याचा निर्देश आला आहे. हाही स्वतःच्या विद्वत्तेने व पवित्र आचरणाने प्रातःस्मरणीय झाला होता. म्हणून त्याच्या नावामागे ' सुगृहीतनामा ' हे विशेषण लावले आहे. भवभूतीच्या पित्याचे नाव नीलकण्ठ आणि मातेचे जातूकर्णी असे होते. नीलकण्ठाचीही धार्मिक आचरणाबद्दल ख्याति होती. भवभूतीच्या मातेचे जातूकर्णी हे गोत्रनाम दिसते. ह्या गोत्राचा उल्लेख काही प्राचीन ताम्रपटांत आढळतो.[1]

## भवभूतीचे दुसरे नाव

पूर्वोक्त दोन नाटकांत कवीचे नाव देताना ' श्रीकण्ठपदलाञ्छनः ' असा प्रयोग केला आहे. भवभूतीच्या पित्याचे नाव नीलकण्ठ होते. तेव्हा त्याने आपल्या पुत्राचे नाव श्रीकण्ठ ठेवले असावे, असे वाटून अनेक टीकाकारांनी तेच कवीचे मूळ नाव मानले आहे. पुढे त्याने खालील सुंदर श्लोक रचल्यामुळे त्याला भवभूति हे नाव प्राप्त झाले, अशी आख्यायिकाही ते देतात.

**का तपस्वी गतोऽवस्थामिति स्मेराविव स्तनौ ।**
**वन्दे गौरीघनाश्लेषभवभूतिसिताननौ ॥**

[भावार्थ—एकदा भगवान् शंकरांनी पार्वतीला गाढ आलिंगन दिले; तेव्हा त्यांच्या अंगावर चर्चिलेल्या भस्माने पार्वतीचे स्तन शुभ्र झाले, जणू काय ' या तपस्व्याची प्रेमपरवशतेमुळे काय अवस्था झाली आहे पाहा, ' असे ते हंसून सांगत होते. त्या स्तनांना माझा नमस्कार असो.]

हा श्लोक ख्रिस्तोत्तर तेराव्या शतकात होऊन गेलेल्या श्रीधरदासाच्या ' सदुक्ति-कर्णामृता 'त ( १, २२, ५ ) भवभूतीच्या नावावर दिला आहे. त्यावरून ही आख्या-

---

१ राष्ट्रकूट राजी शीलमहादेवीचा जेठवई ताम्रपट ( शके ७०८ ) पाहा. ए. इं., पु. २२, पृ ९८ इ.

यिका बरीच प्राचीन दिसते. काही टीकाकारांच्या मतें श्रीकण्ठ कवीला ' भवभूति ' नाव मिळण्याचें कारण

साम्बा पुनातु भवभूतिपवित्रमूर्तिः ।

' भगवान् शंकराच्या भस्मानें आलिंगनांत जिचा देह पवित्र झाला आहे अशी अम्बा (पार्वती) तुमचें रक्षण करो ' अशी सुंदर पंक्ति त्यानें रचली, हें होय. पण पूर्वोक्त नाटकांतील ' श्रीकण्ठपदलाञ्छनः भवभूतिर्नाम कविः ' या शब्दप्रयोगावरून कवीचें मूळचें नाव भवभूति असून श्री म्हणजे वाग्देवी त्याच्या कण्ठांत असल्यामुळे त्याला श्रीकण्ठ हें टोपण नाव मिळालें असें दिसतें. एखाद्यास सन्मानार्थ जी पदवी दिली जाते तिचा उल्लेख करतांना ' लाञ्छन ', ' भूषण ' वगैरे शब्दांचा प्रयोग करतात. उदाहरणार्थ, भवभूतीचा समकालीन वाक्पतिराज हा आपल्या गौडवध काव्याच्या पुष्पिकेंत 'कविराजलाञ्छनस्य वाक्पतिराजस्य ' असा स्वतःचा उल्लेख करतो. वाक्पतिराजाला जशी कविराज ही पदवी होती तशी भवभूतीला श्रीकण्ठ ही पदवी असावी. शिवाय राजशेखर, कुन्तक, विद्याकर, श्रीधरदास इत्यादि आलंकारिकांनी व सुभाषितसंग्रहकारांनी या कवीचा भवभूति या नावानेंच उल्लेख केला आहे. तेव्हा भवभूति हेंच त्याचें मूळ नाव असावें.

### भवभूति आणि उम्वेक भिन्न होत

अलिकडे काही विद्वानांनी भवभूतीचें उम्बेक असें आणखीही तिसरें नाव होतें असें प्रतिपादिलें आहे. त्याला आधार ' मालतीमाधवा 'च्या सुमारें ५०० वर्षे जुन्या असलेल्या हस्तलिखितांत तें नाटक उम्वेकानें लिहिलें व त्याला कुमारिलभट्टाच्या प्रसादानें वाग्वैभव प्राप्त झालें होतें असे उल्लेख काही अंकांच्या पुष्पिकेंत आले आहेत हा आहे. उम्बेक हा सुप्रसिद्ध मीमांसक होता. त्याचे पूर्वमीमांसेवरील काही ग्रंथ उपलब्ध झाले आहेत आणि त्याच्या मतांचे उल्लेख काही प्राचीन ग्रंथांत आढळले आहेत. भवभूति आणि उम्बेक हे एक किंवा भिन्न हा प्रश्न वादग्रस्त झाला आहे. त्याची सविस्तर चर्चा या प्रकरणाच्या शेवटी एका परिशिष्टांत केली आहे. भवभूति व उम्बेक हे आपापल्या ग्रंथांत आपलें दुसरें नाव सांगत नाहीत. शिवाय भवभूति हा विदर्भाच्या ब्राह्मण कुळांत जन्मला होता. त्याच्या पूर्वजांची महाकवि, गोपाल, नीलकण्ठ ही नावें महाराष्ट्रीय ब्राह्मणांच्या नावांसारखी आहेत. याच्या उलट उम्बेक हें नाव द्राविड आहे हें स्पष्ट आहे. तेव्हा भवभूति व उम्बेक हे भिन्न होते याव संशय नाही. इतर प्रमाणांचें परीक्षण पूर्वोक्त परिशिष्टांत केलें आहे.

### भवभूतीची विद्वत्ता

भवभूतीनें अनेक शास्त्रांचा व विद्यांचा अभ्यास केला होता हें त्याच्या ग्रंथांतील प्रत्यक्षाप्रत्यक्ष उल्लेखांवरून समजतें. आपण नाटकें रचली असली तरी पांडित्यांतही

आपण कमी नाही हे समकालीनाना सांगण्याकरिता तो म्हणतो–

यद्वेदाध्ययनं तथोपनिषदां सांख्यस्य योगस्य च
ज्ञानं तत्कथनेन किं न हि ततः कश्चिद्गुणो नाटके ।

या श्लोकार्धात त्याने आपल्या वेद व उपनिषदे यांच्या अध्ययनाचा तसेच सांख्य व योग या भारतीय दर्शनाच्या ज्ञानाचा उल्लेख केला आहे. त्याच्या ग्रंथांत वेदविद्येच्या अध्ययनाचे, वैदिक यज्ञाचे व संस्काराचे, ऋषींच्या आश्रमाचे, त्यातील मधुपर्कादि विधींचे, बटूंच्या निरागस जीवनक्रमाचे व खेळकर वृत्तीचे जे उल्लेख आले आहेत त्यावरून भवभूतीची वेदविद्येविषयी आत्मीयता आणि आदर व्यक्त होतात. त्याच्या नाटकांतील अनेक वचने वेद, ब्राह्मणग्रंथ, उपनिषदे, श्रौत व गृह्यसूत्रे इत्यादिकांच्या गाढ अध्ययनाने सुचलेली दिसतात. उदाहरणार्थ, ‘उत्तररामचरिता’त ( २,१२ ) शम्बूकवधानंतर उत्पन्न झालेल्या दिव्य पुरुषाला

यत्रानन्दाश्च मोदाश्च यत्र पुण्याश्च सम्पदः ।
वैराजा नाम ते लोकास्तैजसाः सन्तु ते शिवाः ॥

( ज्या ठिकाणी विविध प्रकारचे आनंद व सुखे आहेत आणि जेथे पवित्र ऐश्वर्य प्राप्त होते ते तेजोमय आणि मङ्गल असे वैराज नामक लोक तुला प्राप्त होवोत ) या रामाने दिलेल्या आशीर्वादात ‘यत्रानन्दाश्च मोदाश्च मुदः प्रमुद आसते’ ( ऋ. ९, ११३, ११ ) इत्यादि ऋचेचे प्रतिबिंब स्पष्ट दिसते. ‘उत्तररामचरिता’तील (४,१८)

आविर्भूतज्योतिषां ब्राह्मणानां
ये व्याहारास्तेषु मा संशयोऽभूत् ।
भद्रा ह्येषां वाचि लक्ष्मीर्निषक्ता
नैते वाचं विप्लुतां व्याहरन्ति ॥

या अरुन्धतीच्या उक्तीतील तिसरा चरण

सक्तुमिव तितउना पुनन्तो
यत्र धीरा मनसा वाचमक्रत ।
अत्रा सखायः सख्यानि जानते
भद्रैषां लक्ष्मीर्निहिताधि वाचि ॥

या ऋग्वेदातील ( १०,७१,२ ) ऋचेवरून घेतला आहे यात संदेह नाही. त्याच नाटकाच्या पाचव्या अंकात ( श्लो. २९ ) लव राक्षसी वाणीचे खालील वर्णन करतो–

ऋषयो राक्षसीमाहुर्वाचमुन्मत्तदृप्तयोः
सा योनिः सर्ववैराणां सा हि लोकस्य निर्ऋतिः ॥

( उन्मत्त आणि गर्विष्ठ अशा लोकांच्या वाणीला ऋषि राक्षसी म्हणतात. त्या

वाणीपासून सर्व द्वेषाची उत्पत्ति होते आणि तीच लोकास अधोगतीस नेते) त्यांतील शब्दयोजना 'ऐतरेय ब्राह्मणा'तील (६, ७, ७) 'योऽयं राक्षसीं वाचं वदति स इति, या वै दृप्तो वदति यामुन्मत्तः सा वै राक्षसी वाक्' या वचनावरून घेतली आहे. तसेच त्यापूर्वी त्याच भाषणात आलेले रामाचे वर्णन 'दान्तं हि राजानं राघवं शुश्रुमः। स किल नात्मना दृप्यति नास्य प्रजा वा दृप्ता जायन्ते' हे 'ऐतरेयब्राह्मणा'च्या त्याच संदर्भातील 'नात्मना दृप्यति नास्य प्रजाया दृप्त आ जायते य एवं वेद' या वचनावरून शब्दशः घेतले आहे. पुढे सूनृता (प्रिय) वाणीचे धेनुरूपाने वर्णनही 'ऋग्वेद' १०, १००, ११ या ऋचेवरून सुचलेले दिसते. ते वर्णनही त्याने वेदोचित संस्कारयुक्त स्वराने केले आहे असे सुमन्त्र म्हणतो.[1]

भवभूतीने 'ऋग्वेदा'प्रमाणे 'अथर्ववेदा'चेही अध्ययन केले होते. 'महावीरचरिता'त दोन ठिकाणी (१,६२;२,२४) 'अथर्ववेदा'तील अभिचारमंत्राचा हिंसेकरिता उपयोग केल्या जात असल्याचा उल्लेख आहे. त्या वेदाचा जारणमारणासाठी केलेल्या उपयोगाचे उदाहरण 'राजतरंगिणी'तही (४, १२४) आले आहे.

वेदाप्रमाणे ब्राह्मण ग्रंथातील वचनांचे व आख्यानांचेही उल्लेख भवभूतीच्या नाटकात आढळतात. 'महावीरचरिता'तील (३, १८).

न तस्य राज्यं व्यथते न भ्रश्यति न जीर्यति।
त्वं विद्वान् ब्राह्मणो यस्य राष्ट्रगोपः पुरोहितः॥

या जनकपुरोहित शतानन्दाविषयीच्या उक्तीत

क्षत्रेण क्षत्रं जयति बलेन बलमश्नुते।
त्वं विद्वान् ब्राह्मणो यस्य राष्ट्रगोपः पुरोहितः॥

इत्यादि 'ऐतरेयब्राह्मणा'तील (८, २५) वचनांचे प्रतिबिम्ब सुस्पष्ट आहे. 'उत्तररामचरिता'च्या चौथ्या अंकातील 'ननु मूर्खाः पठितमेव युष्माभिस्तत्काण्डे। किं न पश्यथ प्रत्येकं शतसंख्याः कवचिनो दण्डिनो निषङ्गिणश्च रक्षितारः, तत्प्रायमेव बलमिदं दृश्यते।' इत्यादि लवाच्या भाषणातील अश्वमेधीय अश्वाच्या रक्षणार्थ विहित असलेल्या रक्षकांची संख्या 'शतपथब्राह्मणा'तील (१३, ४, २, ५) नियमास अनुसरून आहे.[2] 'महावीरचरिता'त (अं. १) ब्राह्मण ग्रंथातील त्रिशङ्कु, शुनःशेप इत्यादि

---

१. परिपूतस्वभावोऽस्य वत कुमारः प्राचेतसान्तेवासी। वदत्ययमभिमन्त्र्यमार्पेण संस्कारेण। उ. च. अ. ५.

२. 'तस्यैते पुरस्ताद्रक्षितार उपक्लृप्ता भवन्ति। राजपुत्राः कवचिनः शत राजन्याः निषङ्गिणः शत सूतग्रामण्याः पुत्रा इषुधिषिणः शत क्षात्रसंग्रहीतृणा पुत्रा दण्डिनः शत अश्वशतं निरष्ट निरमण यस्मिन्नेनमपिसृज्य रक्षन्ति।'

विश्वामित्रविषयक आख्यानाचा उल्लेख आहे. पुढे विश्वामित्र अहल्येची कथा सांगतो. त्या भाषणात वेदांतील आख्यानाच्या भाषेचे अनुकरण केले आहे.[1] 'उत्तररामचरिता'तील ( ६, २२ ) 'अङ्गादङ्गात्सृत इव निजस्नेहजो देहसारः ।' इत्यादि पुत्रांचे वर्णन

अङ्गादङ्गात्सम्भवसि हृदयादधिजायसे ।
आत्मा वै पुत्रनामासि सञ्जीव शरदः शतम् ॥

या वैदिक मंत्रातून घेतले आहे.[2] भवभूतीच्या नाटकांत आढळणाऱ्या श्रौत वचनांचे उतारे आणखीही कित्येक दाखविता येतील.

'मालतीमाधवा'तील पूर्वोक्त श्लोकात ( १, १० ) आपण वेदाप्रमाणे उपनिषदांचेही अध्ययन केले आहे असे भवभूतीने सूत्रधारमुखाने सांगितले आहे. त्याच्या ग्रंथात उपनिषदांतील वचनांचे व तत्त्वांचे अनेक उल्लेख आले आहेत. 'बृहदारण्यकोपनिषदा'तील तत्त्वज्ञान याज्ञवल्क्याने राजर्षि जनकास सांगितले होते, त्याचा उल्लेख भवभूतीने 'महावीरचरिता'त व 'उत्तररामचरिता'त अनेकदा केला आहे. ( म. च. १, १४; २, ४३; ३, २६; उ. च. ४, ९ ). 'उत्तररामचरिता'च्या चौथ्या अंकात सीतात्यागाने जनक निर्विण्ण झाला असला तरी तो आत्महत्येचा विचार मनात आणू शकत नाही. कारण तो म्हणतो 'अन्धतामिस्रा ह्यसूर्या नाम ते लोकास्तेभ्य प्रतिविधीयन्ते य आत्मघातिन इत्येवमृषयो मन्यते ।' (सूर्यरहित आणि गडद अंधाराने व्याप्त असलेल्या लोकांमध्ये आत्मघातक्यांना गति मिळते असे ऋषि म्हणतात. जनकाच्या या भाषणात 'ईशावास्योपनिषदा'तील ( ३ ) 'असुर्या नाम ते लोका अन्धेन तमसावृता । तांस्ते प्रेत्याभिगच्छन्ति ये के चात्महनो जनाः ॥' या वचनातील शब्दयोजना अक्षरशः आली आहे. 'महावीरचरिता'तील पुढील नान्दीश्लोकातील चैतन्यज्योतीचे वर्णन उपनिषदांतील ब्रह्माच्या वर्णनाप्रमाणे आहे—

अथ स्वस्याय देवाय नित्याय हतपाप्मने ।
त्यक्तत्रयविभागाय चैतन्यज्योतिषे नमः ॥

भवभूतीने वेदोपनिषदांप्रमाणे अनेक दर्शनांचाही सूक्ष्म अभ्यास केला होता. भवभूति हा मीमांसक उम्बेकाहून भिन्न होय हे आम्ही इतरत्र सिद्ध केले आहे. पण काही विद्वान् म्हणतात त्याप्रमाणे तो मीमांसानभिज्ञ होता असे नाही. तो श्रोत्रियकुलात

१. 'अहल्या नाम गौतमस्य महर्षेरौचथ्यस्य धर्मपत्नी । यस्याः शतानन्द आङ्गिरसोऽजायत । तामिन्द्रश्चकमे । तस्मात्तं गौतमदारावस्कन्दिनमहल्याजार इति निर्दिशन्ति । अथ भगवान्मन्युमाप । तस्या पाप्मानमन्धतामिस्रमभ्यध्यायत । सेयमद्य रामभद्रतेजसा तस्मादेनसो निरमुच्यत ।' म. च, १

२. 'निरुक्त', अध्याय ३.

जन्मला होता. त्याच्या पूर्वजांनी सोमयाग केले होते आणि ते वेदवेदांगाच्या पठन पाठनात आणि पंचाग्निहवनात व्यापृत असत. अशा कुलात वाढलेला भवभूति पूर्व-मीमांसा पढलेला नसेल हे संभवत नाही. किंबहुना या बाबतीत अनुमान करण्याचीही जरुरी नाही. 'महावीरचरिता'च्या अनेक हस्तलिखितात तसेच 'उत्तररामचरिता'तही त्याचा निर्देश करताना 'पदवाक्यप्रमाणज्ञ' असे विशेषण योजले आहे यातील वाक्य-पदाने मीमांसा–विशेषेकरून पूर्वमीमांसा–अभिप्रेत आहे. कारण पूर्वमीमांसेत वेदवाक्यांचे अर्थ करण्याचे नियम दिले आहेत. मीमांसाशास्त्रातील अर्थवाद या पारिभाषिक संज्ञेचा उपयोग 'अर्थवाद एषः। दोष तु कश्चित् कथय येन स प्रतिविधीयेत।' (ही स्तुति झाली. माझा काही दोष सांग म्हणजे तो दूर करता येईल) (उ. च., अंक १) या रामचंद्राच्या उक्तीत आला आहे. पूर्वमीमांसेप्रमाणे वेदान्तशास्त्राशीही भवभूतीचा चांगला परिचय होता. परमहंसामध्ये श्रेष्ठ आणि ज्ञाननिधि हे यथार्थ नाम धारण करणाऱ्या संन्याशाजवळ त्याने वेदान्ताचे अध्ययन केले होते. अद्वैत वेदान्तातील विवर्तवाद भवभूतीनंतर सुमारे एक शतकानी झालेल्या श्रीशंकराचार्यांनी प्रथम प्रसृत केला असे सामान्यतः मानले जाते. पण त्याचे स्पष्ट स्वरूप भवभूतीच्या अनेक उक्तींत दिसून येते हे उल्लेखनीय आहे. उदाहरणार्थ, खालील उक्ति पाहा—'शब्दब्रह्मण-स्तादृशं विवर्तमितिहासरामायणम्।' (उ. च., अं. २); 'विद्याकल्पेन मरुता मेघानां भूयसामपि। ब्रह्मणीव विवर्तानां क्वापि विप्रलयः कृतः॥' (उ. च., ६, ६); 'एको रसः करुण एव निमित्तभेदात्, भिन्नः पृथक् पृथगिवाश्रयते विवर्तान्। आवर्तबुद्बुद-तरङ्गमयान्विकारान् अम्भो यथा सलिलमेव तु तत्समग्रम्॥' (उ. च., ३, ४७). या शेवटल्या उताऱ्यातील पाणी व त्याची भोवरे, बुडबुडे आणि लाटा इत्यादि रूपे याचा दृष्टान्त श्रीशंकराचार्यांनी 'भोक्त्रापत्तेरविभागश्चेल्लोकवत्।' (ब्र. सू. २, १, १३) या ब्रह्मसूत्रावरील आपल्या भाष्यात दिला आहे.[1] तो भवभूतीच्या वरील श्लोकावरून सुचला असावा.

आपण सांख्य व योग ही दर्शने अभ्यासिली आहेत असे भवभूतीने स्वतःच सांगितले आहे. त्यांपैकी योगाचे उल्लेख त्याच्या नाटकात अनेक ठिकाणी येतात. 'महावीरचरिता'तील (अं. ३) परशुरामाला उद्देशून केलेल्या वसिष्ठाच्या भाषणात मैत्र्यादि भावना,[2] विशोका ज्योतिष्मती चित्तवृत्ति, ऋतंभरा प्रज्ञा इत्यादि योगसूत्रातील

१. 'समुद्रादुदकात्मनोऽनन्यत्वेऽपि तद्विकाराणां फेनवीचीतरङ्गबुद्बुदादीना-मितरेतरविभाग इतरेतरसंश्लेषादिलक्षणश्च व्यवहार उपलभ्यते।' शांकरभाष्य, पृ. ३७२.

२. 'मैत्रीकरुणामुदितोपेक्षाणां सुखदुःखपुण्यापुण्यविषयाणां भावनातश्चित्त-प्रसादनम्।' योगसूत्र, १, ३३.

( १, ३३ इत्यादि ) सहा आल्या आहेत. तसेच 'मालतीमाधवा'तील 'षडधिक-दशनाडीचक्रमध्यस्थितात्मा' (५, १), 'नित्य न्यस्तषडङ्गचक्रनिहितं हृत्पद्म-मध्यस्थितं' (५, २) इत्यादि कपालकुण्डलेच्या श्लोकांत तसेच 'मम हि संप्रति सातिशयप्राक्तनोपलम्भसम्भावितात्मनः संस्कारस्यानवरतप्रबोधात्' इत्यादि माधवाच्या भाषणात योगातील कल्पनांचे निर्देश आले आहेत. 'मालतीमाधवा'तील सौदामिनीला गुरुचर्या, तप, तन्त्र, मन्त्र यांप्रमाणेच योगानुष्ठानाने आक्षेपिणी सिद्धि प्राप्त झाल्याचे दाखविले आहे. तिला योगेश्वरी असे म्हटले आहे. ती आपल्या सिद्धीच्या योगे पद्मावतीहून श्रीशैल पर्वतापर्यंतचे शेकडो मैलांचे अंतर स्वतःच नव्हे तर इतरानाही घेऊन अल्पकालात आकाशमार्गाने आक्रमित असल्याचे दाखविले आहे. कापालिक-पंथी कपालकुण्डलेलाही तशीच सिद्धि प्राप्त झाली होती. ती रोज सायकाळी श्रीशैलाहून पद्मावतीस येत असे.

सांख्ययोगशास्त्राप्रमाणे न्यायशास्त्रही भवभूतीला अवगत होते हे त्याच्या 'पदवाक्यप्रमाणज्ञ' या विशेषणातील 'प्रमाण' शब्दावरून दिसते. 'उत्तररामचरिता'च्या चौथ्या अंकातील विष्कंभकात 'भो निगृहीतोऽसि' या सौधातकीच्या वाक्यात न्यायदर्शनातील 'निग्रहस्थान' या न्यायशास्त्रातील पारिभाषिक संज्ञेचा उल्लेख आला आहे.

भवभूतीने कल्पसूत्रांचेही अध्ययन केले होते. कल्पसूत्रात श्रौतसूत्र, गृह्यसूत्र आणि धर्मसूत्र यांचा अंतर्भाव होतो. 'उत्तररामचरिता'च्या चौथ्या अंकातील विष्कम्भकात 'समांसो मधुपर्क इत्याम्नाय बहु मन्यमाना: श्रोत्रियायाभ्यागताय वत्सतरीं महोक्षं महाजं वा निर्वपन्ति गृहमेधिनः।' या भाण्डायनाच्या उक्तीतील शब्दयोजना वसिष्ठ-धर्मसूत्रातून घेतली आहे. तसेच भवभूतीने इतर वेदांगेही अभ्यासिली होती. उदाहरणार्थ, यास्काच्या 'निरुक्ता'तील, 'साक्षात्कृतधर्माण ऋषयः' (·५) हे वचन 'उत्तररामचरिता'च्या सातव्या अंकात आले आहे.

भवभूतीने तन्त्रशास्त्राचा अभ्यास केल्याचा निर्देश 'यद्वेदाध्ययनं' इत्यादि श्लोकात नाही, तथापि अभिनवगुप्ताने आपल्या 'तन्त्रालोका'त 'गुरुशिवाय दीक्षा, अभिषेक इत्यादिकांनी प्रातिभ ज्ञान उत्पन्न होत नाही' या मताचे खंडन करताना भवभूतीचा उल्लेख खालील श्लोकात केला आहे—

असदेतदिति प्राहुर्गुरवस्तत्त्वदर्शिनः ।
श्रीसोमानन्दकल्याणभवभूतिपुरोगमाः ।
तथाहि त्रीशिकाशास्त्रविवृतौ तेऽम्यधुर्बुधाः ।।

त्यावरून भवभूतीचा तन्त्रशास्त्रावरही ग्रन्थ होता व तो निदान अभिनवगुप्ताच्या

कालापर्यंत (इ. स. चे अकराव्या शतकापर्यंत) प्रचलित होता असे दिसते. तंत्र, मंत्र, योग इत्यादिकांनी सौदामिनीला सिद्धि प्राप्त झाली होती असे 'मालतीमाधवा'त म्हटलें आहे.

मीमांसा, वेदान्त, सांख्य, योग, तन्त्र इत्यादि तर्ककर्कश शास्त्राप्रमाणें नाट्यशास्त्र, अर्थशास्त्र, कामशास्त्र इत्यादि सुकुमार शास्त्रांचाही भवभूतीनें चांगला अभ्यास केला होता असे दिसतें. त्यानें नाट्यशास्त्रकार भरतमुनींचा 'उत्तररामचरिता'त 'तौर्यत्रिकसूत्रकार' (नृत्य, गीतवाद्य आणि नाट्य या विषयांचे सूत्रकार) म्हणून उल्लेख केला आहे. भरताच्या रसवादाची त्याला पूर्ण माहिती आहे. 'महावीरचरिता'त वीर, 'मालतीमाधवा'त शृंगार आणि 'उत्तररामचरिता'त करुण अशा मुख्य रसांचा परिपोष त्यानें आपल्या नाटकांत केला आहे. याशिवाय रौद्र, बीभत्स, अद्भुत, हास्य इत्यादि रसही गौण रूपानें त्यांत आले आहेत. रसाची निष्पत्ति विभाव, अनुभाव आणि व्यभिचारिभाव यांनी होते. त्यांपैकी अनुभावाचा उल्लेख मालतीमाधवांत (९, ३९) आला आहे.

'महावीरचरिता'च्या दुसऱ्या व चौथ्या अंकांत माल्यवान् व शूर्पणखा रामाच्या नाशाकरितां विविध युक्त्या योजतात त्यामध्यें भवभूतीनें अर्थशास्त्राचें ज्ञान उत्तम प्रकारें दिसून येतें. त्या नाटकाच्या चौथ्या अंकांत 'लघ्वपि व्यसनपदममियुक्तस्य कृच्छ्रं भवति' हें 'कौटिलीय अर्थशास्त्रा'तील (अधि. ७, अध्याय ५) वचन उद्धृत केलें आहे. तसेंच प्रभुशक्ति, उत्साहशक्ति, धर्मविजयी, प्रकृतिकोप, आभिगामिक गुण, सघवृत्ति, तीक्ष्ण, प्रकाशदण्ड, तूष्णींदण्ड इत्यादि अर्थशास्त्रांतील विविध पारिभाषिक संज्ञा योजिल्या आहेत. याशिवाय तत्कालीन राज्यशासनांत प्रचलित असलेल्या परंतु वाङ्मयांत न आढळणाऱ्या 'कुमारभुक्ति' 'प्रशस्ति' या सारख्या पारिभाषिक संज्ञांचाही त्यानें प्रयोग केला आहे. (म. च. ४,९; ५,१२)

कामशास्त्राचा तर भवभूतीनें सूक्ष्म अभ्यास केलेला दिसतो. 'मालतीमाधवा'च्या एका श्लोकांत (१,६) 'औद्वत्यमायोजितकामसूत्रम्' अशा त्या नाटकांत आपण कामसूत्रांतील सूचनांचा उपयोग केला आहे अशा अर्थाचा शब्दप्रयोग आला आहे. त्या नाटकाच्या दुसऱ्या अंकांत 'गीतश्चायमर्थोऽङ्गिरसा यस्यां मनश्चक्षुषोर्निबन्धस्तस्या मृद्धिः।' असा अंगिरसाच्या 'कामसूत्रा'तील म्हणून उतारा दिला आहे. तें कामसूत्र सध्या उपलब्ध नाही, पण हेंच वचन 'आपस्तम्बधर्मसूत्रा'त उद्धृत केलें आहे. त्याच नाटकाच्या सातव्या अंकांतील बुद्धरक्षितेच्या भाषणांत 'कुसुमसधर्माणो हि योषितः सुकुमारोपक्रमाः। तास्वनधिगतविश्वासैः प्रसभमुपक्रम्यमाणाः सद्यः संप्रयोगविद्वेषिण्यो भवन्ति। एवं किल कामसूत्रकारा आमनन्ति।' असें 'कामसूत्रा'तील म्हणून वचन दिलें आहे तें सध्याच्या वात्स्यायनाच्या 'कामसूत्रा'त (अधि. ३,

अध्याय २ ) बहुतेक त्याच शब्दात आढळते. त्याच अधिकरणाच्या पाचव्या अध्यायात एखाद्या कन्यला गान्धर्वविवाहाकरिता कसे अनुकूल करावें याविषयी पुढील सूचना केल्या आहेत—"कन्या एकान्तस्थली भेटणे शक्य नसल्यास प्रियकराने तिच्याकडे धात्रेयिकी (आपल्या दाईची मुलगी) दूती म्हणून पाठवावी. तिने आपण त्या प्रियकराचे कोणी नव्हे असा बहाणा करून त्याच्या गुणाचे वर्णन करून तिच्या मनात प्रीति उत्पन्न करावी. तसेच दुसऱ्या वराच्या तिला न आवडतील अशा दोषाचा उल्लेख करावा. तसेच तिच्या मातापित्याच्या लोभाचे व गुणानभिज्ञतेचे तसेच बांधवाच्या चचल वृत्तीचे वर्णन करावे. समान परिस्थितीतल्या शकुन्तलादि कन्या आपल्या पसंतीचा पति मिळवून पूर्वी कशा सुखी झाल्या ते सागावे. श्रीमद कुलात दिलेल्या कन्या सवतींनी त्रास दिल्यामुळे कशा दुःखी झाल्या आणि टाकल्या गेल्या हेही वर्णन करावे. सूचित स्थली सवत नसल्यामुळे सदैव प्रियकराच्या प्रेमाची प्राप्ति होईल असे सागावे. ती अनुकूल झाल्यावर तिच्या मनातील धोका, भीति व लज्जा ही त्या त्या उपायानी दूर करावी."

वात्स्यायनाने आपल्या कामसूत्रात केलेल्या सूचनाचाच अवलब कामन्दकीने मालतीच्या मनात माधवाविषयी प्रेम उत्पन्न करण्याकरिता आणि तिला गाधर्व विवाहाकरिता अनुकूल करण्याकरिता केल्याचे भवभूतीने 'मालतीमाधवा'च्या दुसऱ्या अंकातील कामन्दकी, मालती व लवङ्गिका याच्या प्रवेशात दाखविले आहे. त्याने 'निसृष्टार्थदूती' या सारख्या पारिभाषिक संज्ञाही योजिल्या आहेत त्यावरून त्याचा कामशास्त्राचा अभ्यास व्यक्त होतो.

याशिवाय 'महावीरचरिता'त प्रसगाने यकृत्, क्लोम, वृक्क, स्नायु, धमनी, प्लीहृ इत्यादि आयुर्वेदिक पारिभाषिक संज्ञाचा, तसेच असाध्य रोग शरीरातून काढून टाकण्याकरिता वैद्याला क्वचित् प्रसगी कराव्या लागणाऱ्या शस्त्रक्रियेचाही उल्लेख आला आहे ( म. च., ४, २३ ). त्यावरून भवभूतीचे आयुर्वेदाचेही ज्ञान व्यक्त होते.

## भवभूतीचे संस्कृत भाषेवरील प्रभुत्व

भवभूतीचे संस्कृत भाषेवरील प्रभुत्व असामान्य होते. 'उत्तररामचरिता'त म्हटल्याप्रमाणे (य ब्रह्माणमियं देवी वाग्वश्येवानुवर्तते।) देवी सरस्वती त्याला सर्वस्वी वश होती. म्हणून वीर, शृगार, तसेच करुण अशा विविध रसातील त्याची नाटकरचना भाषाप्रभुत्वाच्या दृष्टीने सारखीच यशस्वी झाली आहे. आपली भाषा शुद्ध असावी म्हणून त्याने पाणिनीय व्याकरणाचा सूक्ष्म अभ्यास केला होता. त्याच्या नाटकात व्याकरणदृष्ट्या अशुद्ध रूपे क्वचितच आढळतात. पाणिनीय व्याकरणातील त्याचा-

खोचाही त्याला अवगत होत्या हे 'एहिमन्ये राजपुत्र, जामदग्न्यं विजेष्यसे।' या 'महावीरचरिता'च्या तिसऱ्या अंकातील परशुरामाच्या उक्तीवरून दिसून येईल. पाणिनीच्या 'प्रहासे च मन्योपपदे मन्यतेरुत्तम एकवच्च।' (१, ४, १०६) या सूत्रानुसार या वाक्यातील क्रियापदांची रूपे योजिली आहेत. असे प्रयोग संस्कृत वाङ्मयात क्वचितच आढळतात.

भवभूतीने आपणापूर्वी होऊन गेलेल्या कवींचे व आलंकारिकांचे ग्रंथ चांगलेच अभ्यासिले होते असे दिसते. वाल्मीकीविषयी त्याला नितान्त आदर होता, हे 'महावीरचरित' (१, ७) व 'उत्तररामचरित' (अंक २) या नाटकातील तद्विषयक उल्लेखांवरून स्पष्ट आहे. वाल्मीकीच्या 'रामायणा'चा त्याने सूक्ष्म अभ्यास केला होता. त्यातील पाच उतारे त्याने आपल्या नाटकात घेतले आहेत.[1] कालिदासाच्या ग्रंथांची त्याच्या नाटकांवर कशी छाप पडली आहे, हे मागे पहिल्या प्रकरणात दाखविले आहे. 'काव्यादर्श'कार दण्डी यासारख्या आलंकारिकाच्या 'ओजः समासभूयस्त्वमेतद्गद्यस्य जीवितम्।' (समासप्राचुर्य हा गद्याचा प्राण आहे) या नियमानुसार त्याने आपल्या नाटकात संस्कृत व प्राकृत रचना केली आहे. मायुराजाचे 'उदात्तराघव' यासारख्या आपणापूर्वीच्या नाटकातून त्याने काही कल्पना घेतलेल्या दिसतात. त्यांची चर्चा पुढे करू.

भवभूति हा केवळ पढिक पंडित नव्हता तर अत्यंत रसिक असा श्रेष्ठ कवि व नाटककार होता. केवळ पांडित्याचा नाट्यनिर्मितीत काही उपयोग नाही. त्याकरिता वाणीची प्रौढता, समर्पक शब्दयोजना आणि अर्थगौरव हे गुण आवश्यक आहेत हे त्याने स्वतःच सांगितले आहे–

यत्प्रौढत्वमुदारता च वचसां यच्चार्थतो गौरवं
तच्चेदस्ति ततस्तदेव गमकं पाण्डित्यवैदग्ध्ययोः।। (मा. मा., १, १०)

त्याच्या नाटकात विविध रसांचे प्रयोग, सुदर घटना, वाग्वैचित्र्य इत्यादि गुण आढळतील असे सूत्रधार सांगतो, ते खोटे नाही.

### भवभूतिविषयक आख्यायिका

अशा कवीबद्दल फार प्राचीन काळापासून पंडित समाजात विविध आख्यायिका परंपरेने चालत आल्या आहेत. त्यांपैकी काही मनोरंजक आख्यायिका येथे देऊ.

(१) कालिदास आणि भवभूति हे समकालीन होते असा समज पंडित वर्गामध्ये प्रचलित आहे. कालिदास हा ज्येष्ठ आणि राजमान्यता पावलेला श्रेष्ठ कवि. म्हणून

---

१. पुढे प्रकरण ७ पाहा.

भवभूति आपले ' उत्तररामचरित ' रचल्यावर ते घेऊन अभिप्रायार्थ कालिदासाकडे गेला. कालिदास तेव्हा सारीपट खेळण्यात गुंतला होता. त्याने भवभूतीला ते नाटक वाचून दाखविण्यास सांगितले. भवभूतीने ते समग्र वाचल्यावर कालिदासाने त्याची मुक्तकंठाने प्रशंसा केली, पण त्यात एक दुरुस्ती सुचविली. त्या नाटकाच्या पहिल्या अंकात ( १, २७ ) दण्डकारण्यात असताना आपण सीतेबरोबर गुजगोष्टी करीत कशा रात्रि घालविल्या हे सांगताना राम म्हणतो—

किमपि किमपि मन्द मन्दमासत्तियोगा–
दविरलितकपोल जल्पतोरक्रमेण ।
अशिथिलपरिरम्भव्यापृतैकैकदोष्णो–
रविदितगतयामा रात्रिरेवं व्यरंसीत् ॥

( गाढ आलिंगनात उभयतांचा एकेक हात गुंतून गेला असता, एकमेकांच्या गालाला गाल लावून अत्यंत सान्निध्यामुळे अगदी हळू स्वरात आपण पूर्वापर संबंध नसलेल्या गुजगोष्टी करीत असता रात्र अशा रीतीने निघून गेली. )

या श्लोकाच्या चतुर्थ पादातील ' एवम् ' या शब्दातील अनुस्वार गाळावा अशी सूचना कालिदासाने केली व ती भवभूतीने मान्य केली, अशी आख्यायिका आहे. ' रात्रिरेव व्यरंसीत् ' यातून ' रात्रच संपली, आमच्या गुजगोष्टी मात्र संपल्या नाहीत ' असा व्यङ्ग्यार्थ निघतो. त्यामुळे हा दुसरा पाठ सरस आहे यात संशय नाही व तोच पाठ सध्या बहुधा सर्व आवृत्तीत दिलेला दिसतो. पण डॉ. बेल्वलकर यांना ' रात्रिरेवं व्यरंसीत् ' हा पाठ नेपाळातील एका इ. स. ११९६ च्या सुमारास लिहिलेल्या हस्तलिखित प्रतीत आढळला. या आख्यायिकेत काही तथ्य नाही खरे; पण ' एवं ' हा मूळ पाठ असल्यास भवभूतीने स्वतः किंवा दुसऱ्या कोणी ' एव ' असा दुसरा पाठ घालून त्या श्लोकाला जास्त सुंदर केले आहे यात संशय नाही.

( २ ) भवभूति आणि कालिदास हे समकालीनच नव्हे तर एकाच राजाच्या आश्रयास होते आणि त्यांच्यामध्ये श्रेष्ठत्वाबद्दल स्पर्धा चाले, अशीही पारंपारिक समजूत पंडित समाजात प्रचलित आहे. बल्लाळ नामक ग्रंथकाराने अशा कित्येक आख्यायिका आपल्या ' भोजप्रबन्धा 'त दिल्या आहेत. त्यांपैकी एक अशी —

एकदा धाराधिपति भोजराजाने आपल्या सभेतल्या भवभूति व कालिदास या दोन कवींना एका विशिष्ट प्रसंगाचे वर्णन करण्यास सांगितले. दोघांनीही त्याकरिता एकेक श्लोक रचल्यावर त्यांच्यातील श्रेष्ठतेबद्दल वाद सुरू झाला. तेव्हा कालिदासाने सुचविले की आपण भुवनेश्वरी देवालयात जाऊन देवीकडूनच याचा निर्णय करून घेऊ या. तेव्हा आपल्या सर्व कवींसह भोजराजा त्या देवालयात जाऊन देवीसमक्ष दोन्ही श्लोक

समान पत्रावर लिहून ते तराजूच्या दोन पारड्यात घालून तो तराजू त्यानें भवभूतीच्या हातात दिला. भवभूतीच्या श्लोकाचें पारडे किंचित् हलकें होऊन वर जाऊ लागलें. तेव्हा आपल्या भक्ताची सर्व समासदासमक्ष फजीती होऊ नये म्हणून भुवनेश्वरी देवीनें आपल्या कर्णाभरणाच्या कमलातून मकरन्दाचा एक थेंब डाव्या हाताच्या नखाग्रानें काढून भवभूतीच्या श्लोकाच्या पारड्यात टाकला. त्याबरोबर ते पारडें जड झालें. तेव्हा कालिदास म्हणाला—[1]

> अहो मे सौभाग्यं मम च भवभूतेश्च भणितं
> घटायामारोप्य प्रतिफलति तस्यां लघिमनि ।
> गिरां देवी सद्यः श्रुतिकलितकल्हारकलिका-
> मधूलीमाधुर्यं क्षिपति परिपूर्त्यै भगवती ।।

तेव्हा भवभूति कालिदासाच्या पाया पडला आणि त्यानें राजाच्या गुणज्ञतेची प्रशंसा केली. राजानें भवभूति कवीला चौमर मच हत्ती दान दिले. ही आख्यायिका मनोरंजक असली तरी तीत ऐतिहासिक तथ्य मुळीच नाही. कालिदास हा इ. स. ४०० च्या सुमारास होऊन गेला. त्यानंतर सुमारे तीनशे वर्षांनी भवभूति झाला. तेव्हा ते समकालीन असणें शक्य नाही. त्या दोघांचा आश्रयदाता म्हणून वर्णिलेला भोज हा तर इ. स. च्या अकराव्या शतकाच्या पूर्वार्धात राज्य करीत होता हें त्याच्या ताम्रपटावरून सिद्ध झालें आहे. तेव्हा याप्रकारच्या आख्यायिकांत तथ्य मुळीच नाही. तथापि त्यावरून प्राचीनकाळी कालिदास व भवभूति यांची कवित्वात व नाटकनिर्मितीत तुलना होत असे व तीत कालिदास श्रेष्ठ ठरे असें अनुमान काढण्यास मात्र हरकत नाही.

## भवभूतीचा स्वभाव

भवभूति हा गंभीर वृत्तीचा आणि तापट स्वभावाचा होता, असें त्याच्या ग्रंथावरून दिसतें त्याच्या एकाही नाटकात विदूषकाचें पात्र नाही. सामान्यतः रामचरितविषयक नाटकात विदूषक असत नाही. त्यामुळें 'महावीरचरित' व 'उत्तररामचरित' या नाटकात विदूषक आढळला नाही तर त्यात आश्चर्य नाही. 'मालतीमाधव' नाटकातही मध्यमस्थितीतल्या लोकांचें जीवन हा विषय असल्यामुळें त्यातही विदूषक असणें शक्य नाही. विदूषक हा सामान्यतः राजाचा सुप्रमस्कन्या. तेव्हा तो बहुधा राजचरितविषयक नाटकात आढळतो. मृच्छकटिक हें सामान्य जनांच्या जीवनावर रचलेलें नाटक असलें तरी त्यात चारुदत्ताचा मित्र म्हणून मैत्रेय हे विदूषकासारखें पात्र आलें आहे खरें, पण तसेंही विनोदी पात्र भवभूतीनें निर्माण केलें नाही. याचें कारण भवभूतीचा स्वभाव हेंच असावें. तो स्वतः वेदविद्यारत अशा श्रोत्रिय कुलात जन्मला असल्यामुळें

1. बल्लाळ, 'भोजप्रबन्ध' (चौ. सं. सी., १९३५), पृ. ६२.

विदूषकासारख्या खादाड ब्राह्मणबुवाला रंगभूमीवर आणून ब्राह्मण वर्गाविषयी प्रेक्षकांत हशा व तिरस्कार उत्पन्न करणे त्याला योग्य वाटले नसावे. म्हणून पूर्वीच्या नाटकांत सदैव आढळणारा विदूषक त्याने बुद्धिपुरस्सर गाळलेला दिसतो. तथापि त्याला उच्च दर्जाचा विनोद आवडत नव्हता, असे नाही. त्याची काही उदाहरणे त्याच्या नाटकांत आली आहेत. 'मालतीमाधवा'च्या पहिल्या अंकात मालती आणि माधव यांच्या मदनोद्यानातील प्रथम दर्शनाचा प्रसंग वर्णिला आहे. बकुलवृक्षाच्या खाली उभा असलेल्या माधवाला पाहताच त्याला ओळखून मालतीच्या सख्या टाळ्या वाजवून विला म्हणाल्या 'ताईसाहेब, मोठ्या आनंदाची गोष्ट! हे पाहा इथे कोणाचे तरी कोणी एक उभे आहेत!' सख्यांच्या या भाषणात अल्लड तरुणींचा स्वाभाविक विनोद आला आहे. 'उत्तररामचरिता'तील चित्रदर्शन प्रवेशात लक्ष्मण सीतेला मिथिलेतील विवाह प्रसंगाची चित्रे दाखवीत होता. सीता आणि भरतपत्नी माडवी यांच्या नंतर त्या ठिकाणी त्याची पत्नी उर्मिला हिचे चित्र काढले होते. पण ते न दाखविता तो तिच्या नंतरच्या शत्रुघ्नभार्या श्रुतकीर्तीच्या चित्राकडे वळला. तेव्हा सीता हसून म्हणते, 'वत्स, इयमपरा का?' 'भाउजी, तुम्ही ही मधली स्त्री कोण हे सांगितलं नाही. कोण बरे ही?' या प्रसंगीचा विनोद विदग्ध प्रेक्षकानाच समजण्यासारखा व रुचण्यासारखा आहे. याच्या उलट त्याच नाटकाच्या चौथ्या अंकात वाल्मीकीच्या आश्रमातील बटूच्या संभाषणात त्यांनी प्रथमच पाहिलेल्या घोड्याच्या खालील वर्णनातील निरागस विनोद सर्वांनाच हसविणारा आहे—

पश्चात्पुच्छं वहति विपुलं तच्च धूनोत्यजस्रं
दीर्घग्रीवः स भवति खुरास्तस्य चत्वार एव ।
शष्पाण्यत्ति प्रकिरति शकृत्पिण्डकानाम्रमात्रान्
किं व्याख्यातैर्व्रजति स पुनर्दूरमेह्येहि यामः ।। (उ. च., ४, २६)

भवभूति हा जाडा पंडित, सदाचरणी, उदात्त विचाराचा व गंभीर स्वभावाचा होता. आपण विद्वान्, पवित्र, परोपकाररत आणि संपन्न कुलात जन्मलो आहो, याचा त्याला अभिमान होता. स्वतःच्या विद्वत्त्व, कवित्व, रसिकत्व इत्यादि गुणांची त्याला जाणीव होती. आपण जसे विद्वत्तेत श्रेष्ठ तसे साहित्यनिर्मितीतही सर्वोत्तम गणले जावे अशी त्याची महत्त्वाकांक्षा होती. म्हणून त्याने आपल्या 'महावीरचरिता'चे पहिले पाच अंक रचून ते स्वकालीन विद्वानांना व रसिकांना परीक्षणार्थ दिले. भवभूति विविधशास्त्रपारंगत होता. त्याची कवित्वशक्ति आणि निरीक्षणशक्तिही उच्च दर्जाची होती. पण त्याला कविकुलगुरु कालिदासाच्या तोडीचा मानणे शक्य नव्हते. रसिकांनी त्याच्या नाट्यकाला कमी प्रतीचे लेखले आणि त्याच्या कृतीतील अनेक दोष दाखवून त्याचा पाणउतारा केला. तेव्हा स्वाभिमानी भवभूतीच्या अंगाचा तिळपापड झाला. तो म्हणाला —

ये नाम केचिदिह नः प्रथयन्त्यवज्ञां
जानन्ति ते किमपि तान्प्रति नैष यत्नः ।
उत्पत्स्यतेऽस्ति मम कोपि समानधर्मा
कालो ह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी ॥ (मा. मा., १, ६)

(जे अहंमन्य लोक आमची अवज्ञा टीका करीत आहेत ते मोठे शहाणे आहेत! त्यांच्या करिता मी हे नाटक लिहिले नाही. माझ्याशी समान धर्म असलेला कोणी रसिक पुढे मागे उत्पन्न होईल असा मला भरवसा आहे. कारण काल अनंत आहे. कदाचित् अशा रसिक सध्याही कोठे तरी विद्यमान असेल. कारण पृथ्वी विशाल आहे. असे रसिकच माझ्या कृतीचे योग्य मूल्यमापन करू शकतील.)

भवभूतीने क्रोधाच्या आवेशात महावीरचरित अर्धेच टाकून दिले. 'या अहमन्य शास्त्राभ्यासजड अशा पंडिताची संगत नको', असे म्हणून तो घर सोडून उत्तरेत निघून गेला. 'महावीरचरिता'च्या पाचव्या अंकातील ४६ व्या श्लोकानंतरचा भाग व त्यापुढील सहावा व सातवा हे अंक भवभूतीचे नसून ते सुब्रह्मण्यनामक कोणा दुसऱ्या कवीने रचले होते, असे 'महावीरचरिता'चा टीकाकार वीरराघव सांगतो. (एतावदेव भवभूतेः सूक्तिः । इतः परन्तु सुब्रह्मण्यनाम्नः कस्यचित्कवेर्वचं इति मूल-एव स्फुटीभविष्यति ।)[1] 'महावीरचरिता'च्या बहुतेक दक्षिणी हस्तलिखितात पाचव्या अंकातील ४६ व्या श्लोकापर्यंतचाच भाग आहे. तसेच उत्तरेतील सर्वांत महत्त्वाच्या हस्तलिखितातही त्या श्लोकानंतर 'एतावद्भवभूतेः । अग्रे कविनायक-विनायकभट्टैरपूरि ।' (एथपर्यंतचा भाग भवभूतीचा. या पुढील भाग कविश्रेष्ठ विनायक-भट्ट यानी लिहून हे नाटक पूर्ण केले.) असे म्हटले आहे.[2] उत्तरेतल्या काही हस्तलिखितातही इतकाच भाग असतो. त्यावरून भवभूतीने हे नाटक पुरे केले नसावे. पुढे काही कालानंतर त्याने प्रस्तावनेचा काही भाग नवीन रचून आपल्या इतर नाटका-प्रमाणे कालप्रियनाथाच्या यात्रेत त्याच्या पहिल्या पाच अंकाचा प्रयोग करविला असावा, असे वाटते. महावीरचरिताच्या चिकित्सक आवृत्तीचे संपादक प्रा. तोडरमल्ल यांचेही अनेक हस्तलिखिते पाहिल्यावर असेच मत झाले होते.

भवभूतीचा टीकाकारांवरील रोष दीर्घ काल टिकला. मालतीमाधव नाटक रचल्यानंतर त्याला रसिक समाजात चांगला मान मिळाला असला पाहिजे. तरीही 'उत्तरराम-चरिता'च्या प्रस्तावनेत (१, ५) 'यथा स्त्रीणां तथा वाचां साधुत्वे दुर्जनो जनः ।'

---

१. 'महावीरचरित' (स. टी. आर्. रत्नम् ऐयर इ.) (शकसवत् १८३२), पृ. १९३, तळटीप.

२. 'महावीरचरित' (स. तोडरमल्ल), प्रस्तावना, पृ. ९.

( जसे स्त्रियाच्या पातिव्रत्याच्या बाबतीत तसेच वाङ्मयाच्या गुणाविषयीही लोक दुष्टपणाने वागतात ) अशी कोपरखळी आपल्या टीकाकारास मारल्याशिवाय त्यास राहवले नाही.

### पद्मावतीस निर्याण

क्रोधाच्या आवेशात भवभूति पद्मपुराहून निघाला तो तडक मध्यभारतातील पद्मावती नगरीस गेला. तेथे ज्ञाननिधि नामक यति आपल्या नावाप्रमाणेच ज्ञानाचा निधि म्हणून सुविख्यात झाला होता. त्याच्याजवळ भवभूतीने वेदान्ताचे अध्ययन केले असावे. 'मालतीमाधवा'तील नायक माधव हा विदर्भाच्या मंत्र्याचा मुलगा असून पद्मावतीस आन्वीक्षिकीच्या ( अध्यात्मविद्येच्या ) अभ्यासाकरिता येऊन राहिला होता, असे दाखविले आहे. यात कवीच्या स्वतःच्या चरित्रातील काही भाग प्रतिबिंबित झाला आहे, असे मानण्यास हरकत नाही.

### पद्मावतीचा इतिहास

पद्मावती ही नगरी फार प्राचीन काळापासून नाग राजांची राजधानी आणि विद्येचे माहेरघर म्हणून सुप्रसिद्ध होती. तिचे आता पवाया किंवा पदमपवाया नामक लहानशा खेड्यात रूपांतर झाले आहे. हे खेडे मध्यभारतात ग्वाल्हेरच्या नैर्ऋत्येस ४२ मैलांवर आहे. तेथील उत्खननावरून तेच प्राचीन पद्मावती, याविषयी संशय राहिला नाही

पवायास सापडलेल्या काही नाण्यावरून पद्मावती नगरी खिस्तपूर्व दुसऱ्या शतकात अस्तित्वात होती असे दिसते. त्यानंतर खिस्तोत्तर पहिल्या शतकात शिवनंदी नामक नागराजा तेथे राज्य करीत होता ही माहिती तेथे सापडलेल्या मणिभद्र यक्षाच्या मूर्तीच्या पीठावर कोरलेल्या लेखावरून मिळते.[१] 'नव नागास्तु भोक्ष्यन्ते पुरीं पद्मावतीं नृपाः ।' ( नऊ नाग राजे पद्मावतीस राज्य करतील ) असे पुराणात म्हटले आहे. त्यांची नावे पुराणात आली नाहीत, पण पवायास व त्याच्या सभोवारच्या भागात सापडलेल्या नाण्यावरून महाराज भीमनाग, स्कन्दनाग, बृहस्पतिनाग, देवनाग, विभुनाग, भवनाग इत्यादि नाग राजांची नावे माहीत झाली आहेत.[२] हे नागराजे भारशिव वंशाचे होते. आपल्या कोणी पूर्वजाने शिवलिंग स्वतःच्या स्कंधावर धारण केल्यामुळे संतुष्ट झालेल्या भगवान् शंकराने त्याला राज्यपद दिले, अशी त्यांची श्रद्धा होती. तिचा उल्लेख कोरीव लेखात येतो.[३] तेव्हापासून त्यांच्या वंशाला 'भारशिव' असे नाव प्राप्त झाले. खिस्तोत्तर पहिल्या दुसऱ्या शतकात कुशाणांचे राज्य उत्तर

१. A R. A. S. I for 1915–16, p 106.

२. Trivedi, *Coins of the Naga Kings of Padmavati.*

३. 'वाकाटक नृपति आणि त्यांचा काल', पृ. १९८–१९९.

भारताच्या बऱ्याच मोठ्या प्रदेशावर पसरले होते. या परकी राजांना पिटाळून लावून आपल्या मातृभूमीला दास्यातून मुक्त करण्यात ज्या भारतीय राजांनी व गणराज्यांनी पुढाकार घेतला त्यांमध्ये पद्मावतीचे नाग राजे प्रमुख होते. ते वैदिक धर्माचे व संस्कृतीचे कट्टे पुरस्कर्ते होते. त्यांनी दहा अश्वमेध करून सर्वत्र आपली सत्ता पसरविली होती. तसेच भागीरथीपर्यंतचा प्रदेश शौर्याने पादाक्रान्त करून मिळविलेल्या पवित्र जलाने स्वतःच राज्याभिषेक करवून घेतला होता. ख्रिस्तोत्तर तिसऱ्या शतकाच्या अखेरीस भवनाग नामक बलाढ्य राजा पद्मावतीस राज्य करीत होता. त्याची काही नाणी त्या भागात सापडली आहेत. याच काळात विदर्भात वाकाटकांचा उदय होऊन प्रथम विन्ध्यशक्तीचा पुत्र प्रथम प्रवरसेन याने चार अश्वमेध करून दक्षिण भारतात आपली सत्ता दृढ केली होती. उत्तरेतील भवनाग राजाने वाकाटक प्रवरसेनाच्या गौतमी-पुत्र नामक मुलास आपली मुलगी देऊन उत्तर–दक्षिण भारतात नाग व वाकाटक यांची संयुक्त फळी (axis) स्थापण्याचा प्रयत्न केला होता. तो काही काळ यशस्वी झाला. पण पुढे महाप्रतापी समुद्रगुप्तापुढे नागराजांना हात टेकावे लागले.[1] समुद्रगुप्ताच्या प्रयाग प्रशस्तीत त्याने उच्छेद केलेल्या राजांची नामावलि दिली आहे. तीत पद्मावतीच्या गणपति–नागाचा निर्देश आहे. दुसऱ्या एका नागसेन नामक नागराजाचे राजकारण त्याच्या प्रासादातील मैनेने बाहेर फोडले. त्यामुळे त्याचा नाश झाला अशी आख्या-यिका बाणाने आपल्या 'हर्षचरिता'त (निर्णयसागर प्रत, पृ. १९८) दिली आहे.

गुप्तकालात नागराजांचा उच्छेद झाला तरी पद्मावतीचे महत्त्व नष्ट झाले नाही. त्यानंतर निदान तीनचार शतके तरी ते विद्येचे केन्द्र म्हणून सुविख्यात झाले होते. तेथे विदर्भासारख्या दूरदूरच्या प्रदेशातून विद्याध्ययनाकरिता विद्यार्थी येत असत. ख्रिस्तो-त्तर अकराव्या शतकापर्यंत ते तेथील देवालये, विहार उद्याने, उत्तुंग प्रासाद व सुंदर युवति यांच्या योगे सुविख्यात झाले होते, असे संस्कृत वाङ्मयातील व कोरीव लेखांतील त्याच्या वर्णनावरून दिसते.

धाराधीश भोजाच्या 'सरस्वतीकण्ठाभरणा'तील (२, २२४) पद्मावती नगरी, तिच्या जवळच्या नद्या, पर्वत व उपवने यांचे वर्णन पाहा—

पुरः पाराऽपारा तटभुवि विहारः पुरवरं
ततः सिन्धुः सिन्धुः फणिपतिवनं पावनमतः ।
तदग्रे तुङ्गोऽयं गिरिरिति गिरिस्तस्य पुरतो
विशाला शालाभिर्ललितललनाभिर्विजयते ॥

(ही पुढे जिला उतार नाही अशी पारा नदी दिसत आहे; तिच्या तीरावर विहार व

१. पूर्वोक्त, पृ. ३७–३८.

नंतर उत्कृष्ट नगर आहे. नंतर सागरासारखी सिन्धुनदी व पुढे नागराजाचे पवित्र उपवन दिसत आहे. त्याच्या पुढे गिरि नावाचा उंच पर्वत आहे आणि त्याच्या समोर विशाल पद्मावती नगरी वाडे व सुंदर स्त्रिया यांच्या योगे शोभत आहे. )

खजूराहो येथील विक्रम संवत् १०५८ (इ. स. १०००–०१) च्या शिलालेखात पद्मावतीचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे.[1]—

आसीदप्रतिमा विमानभवनैराभूषिता भूतले
लोकानामधिपेन भूमिपतिना पद्मोत्थवंशेन या ।
केनापीह निवेशिता कृतयुगत्रेतान्तरे श्रूयते
सच्छास्त्रे पठिता पुराणपटुभिः पद्मावती प्रोच्यते ।।
सौधोत्तुङ्गपतङ्गलङ्घनपथप्रोत्तुङ्गमालाकुला
शुभ्राभ्रंकषपाण्डुरोच्चशिखरप्राकारचित्राम्बरा ।
प्रालेयाचलशृङ्गसन्निभशुभप्रासादसद्मावती
भव्या पूर्वमभूदपूर्वरचना या नाम पद्मावती ।।
खङ्गत्तुङ्गतुरगमोद्गमखुरक्षोदाव्रजः प्रोद्धतं
यस्यां जीर्णकठोरवस्त्रमकरोत्कूर्मोदराभं नभः ।
मत्तानेककरालकुम्भिकरटप्रोत्कृ ⏑ – च्टादभुत
युक्त कर्दममुद्रया क्षितितलं तां ब्रूत किं सस्तुमः ।।

( उत्तुङ्ग प्रासादानी सुशोभित झालेली, पद्मवंशातील कोणा राजाने कृतयुग व त्रेतायुग यामधील काळात स्थापिलेली व पुराणवेत्यानी उत्तम शास्त्रात जिचे वर्णन केले आहे अशी अप्रतिम पद्मावती नामक नगरी होती.

ज्या नगरीत सूर्याच्या आकाशातील मार्गाइतक्या उत्तुग सौधाची रांग लागून राहिली होती, जिच्या गगनचुम्बी शुभ्र शिखरांच्या तटानी आकाश चित्रविचित्र दिसत असे, जिच्यामध्ये हिमालयाच्या शिखरासारखे उत्तुग मंगल प्रासाद (देवालये) होते, अशी अत्यंत भव्य व अपूर्व रचनेची पद्मावती नामक नगरी होती.

या नगरीतील दौडणाऱ्या उंच घोड्याच्या टापानी उडविलेल्या धुळीच्या योगे आकाशाला जीर्ण व जाड वस्त्राचे अस्तर उत्पन्न होऊन ते कासवाच्या पोटासारखे दिसू लागत असे व जिच्यातील अनेक मत्त व भीषण आकाराच्या हत्तींच्या गंड-स्थलातून वाहणाऱ्या मदाने पृथ्वीतलावर चिखल होत असे, अशी ती नगरी होती. तिचे वर्णन आम्ही कसे करावे सांगा. )

---

१. ए इं., पु. १, पृ. १४८.


लवणा (नून) नदी
पारा (पार्वती) नदी
उत्तर
पद्मावती
धूमेश्वराचें देवालय
धबधबा
सुवर्ण बिंदु शिवालय
मधुमती (महुअर) नदी
सिंधु (सिंध) नदी
भवभूतिकालीन पद्मावती

प्राचीन पद्मावती

### भवभूतीच्या नाटकांतील पद्मावतीविषयक उल्लेख

भवभूतीचा बराच काळ पद्मावती नगरीत गेला असावा. त्याच्या 'मालती-माधवा 'तील कथानक या नगरीत घडले असे दाखविले असून त्याच्या अनुषंगाने तेथील नद्या, देवालये व वाडे यांचा उल्लेख व वर्णन आले आहे. पद्मावती ही पारा व सिंधु यांच्या संगमावर वसली होती. याचा उल्लेख ' मालतीमाधवा 'च्या चौथ्या अंकातील माधवाच्या पुढील भाषणात आला आहे–

तदुत्तिष्ठ । पारासिन्धुसम्भेदमवगाह्य नगरीमेव प्रविशावः ।

(चल तर. पारा व सिंधु नद्यांच्या संगमावर स्नान करून पद्मावती नगरीत प्रवेश करू.)

सध्या या नद्यांना सिंध व पार्वती अशी नावे आहेत. या संगमाच्या जवळच पूर्वेस स्मशानात कराला नामक चामुण्डा देवीचे देवालय होते. तेथे मालतीला देवीसमोर बळी देण्याकरिता अघोरघंट नामक कापालिकाने आणले होते. पवायाच्या नैर्ऋत्येस दोन मैलांवर सिंधुनदीच्या धोधो वाहणाऱ्या विशाल प्रवाहाच्या प्रपाताने सदैव निनादित होणारे अत्यंत रम्य स्थान आहे. तेथे इ. स. च्या सतराव्या शतकात जहांगीर बादशहाचा परममित्र ओरछाचा राजा वीरसिंहदेव याने बांधलेले धूमेश्वर नामक शिवमंदिर अद्यापि सुस्थितीत आहे. येथील जलप्रपाताचे सुंदर वर्णन ' मालती-माधवा 'च्या नवव्या अंकात सौदामिनीच्या भाषणात आले आहे.

अयमसौ भगवत्याः सिन्धोर्दारितरसातलस्तटप्रपातः ।

यत्रस्थ एव तुमुलो ध्वनिरम्बुगर्भ-
गम्भीरनूतनघनस्तनितप्रचण्डः ।
पर्यन्तभूधरनिकुञ्जविजृम्भमाणो
हेरम्बकण्ठरसितप्रतिमानमेति ॥ ( मालतीमाधव, ९,३. )

( हा पाहा पवित्र सिन्धु नदीचा पृथ्वीतलाला फोडून जाणारा धबधबा !

या ठिकाणचा वर्षाकाळी पाण्याने भरलेल्या नूतन मेघाच्या गंभीर गर्जनेप्रमाणे प्रचण्ड व भयकर आवाज समोवारच्या पर्वतांच्या लतागृहात विस्तार पावून गणपतीच्या गर्जनेप्रमाणे भासत आहे. )

धूमेश्वराच्या उंच चबुतऱ्यावर उभे राहून सिंधुनदीच्या जवळच्या धबधब्याचे दृश्य पाहणाऱ्यास भवभूतीच्या वर्णनात यत्किंचितही अतिशयोक्ति वाटत नाही.

तसेच सौदामिनीच्या भाषणातील पद्मावतीच्या ऐश्वर्याचे वर्णन पहा–

पद्मावती विमलवारिविशालसिन्धु-
पारासरित्परिकरच्छलतो बिभर्ति ।

उत्तुङ्गसौधसुरमन्दिरगोपुराट्ट-
सघट्टपाटितविमुक्तमिवान्तरिक्षम् ।। ( मा. मा., ९, २ )

( ही पद्मावती नगरी सभोवतालच्या स्वच्छ जलाच्या व विशाल अशा सिन्धु व पारा नद्यांच्या रूपाने आपले उत्तुंग प्रासाद, देवालये, गोपुरे व गच्चीवरील विलासगृहे यांच्यामुळे फाटून खाली पडलेले आकाशच जणू काय धारण करीत आहे. )

पवायाच्या पूर्वेस तीन मैलांवर सिन्धु व मधुमती ( सध्याची महुवार ) या नद्यांचा संगम आहे. तेथे सुवर्णबिन्दु नामक शिवालय होते. त्याचाही उल्लेख 'मालती-माधवा'च्या त्याच नवव्या अंकात सौदामिनीच्या भाषणात आला आहे—

अयं च मधुमतीसिन्धुसम्भेदपावनो भगवान् भवानीपतिरपौरुषेयप्रतिष्ठः सुवर्णबिन्दुरित्याख्यायते ।

( हे मधुमती व सिन्धु यांच्या संगमावरील पवित्र असे भगवान् शंकराचे स्वयंभू लिंग सुवर्णबिन्दु या नावाने प्रसिद्ध आहे. )

सिन्धु व महुवार यांच्या संगमाजवळ अद्यापि एक चौथरा असून त्यावर शिवलिंग दिसते. हेच प्राचीन सुवर्णबिन्दु शिवालयाचे स्थान यात संशय नाही. त्याच्याही पूर्वेस प्राचीन लवणा ( सध्याची नून ) नदी आहे. तिचाही उल्लेख सौदामिनीने खालील श्लोकात केला आहे—

सैषा विभाति लवणा ललितोर्मिपङ्क्ति-
रभ्रागमे जनपदप्रमदाय यस्याः ।
गोगर्भिणीप्रियनवोलपमालभारि-
सेव्योपकण्ठविपिनावलयो विभान्ति ।।
( मा. मा., ९-२ )

( ही सुंदर लाटांची लवणा नदी शोभत आहे. वर्षाकालाच्या आरंभी गर्भिणी गाईंना विशेष आवडणाऱ्या नूतन तृणाने युक्त अशी हिच्या काठची कुरणे, ज्यामध्ये येथील लोक विहार करतात ती, सुंदर दिसत आहेत. )

पूर्वीच्या ग्वाल्हेर संस्थानच्या पुरावृत्तखात्याचे संचालक श्री. मो. ब. गर्दे यांनी पवाया येथे उत्खनन करून तेथील एका उत्तुंग हिंदू देवालयाचे अवशेष उजेडात आणले आहेत. हे देवालय एकावर एक अशा तीन चबुतऱ्यांवर उभारले होते. सर्वांत वरच्या चबुतऱ्याची लांबी व रुंदी ५४ फूट ६ इंच भरली. हे देवालय भगवान् विष्णूचे असावे असा तर्क आहे. उत्खननात त्याची मूर्ति सापडली आहे. साची येथील मोठ्या स्तूपाच्या समोर अद्यापि तोरणे दिसतात तसे तोरण या देवळाच्या समोर होते. त्याचा

एक तुकडा उत्खननात सापडला आहे. त्यावर गायनवादनाचा व नृत्याचा सुंदर शिल्पपट्ट आहे.[1]

पवाया येथे यक्ष मणिभद्र, ताल पत्राचे स्तम्भशीर्ष, सूर्य व विष्णु यांच्या प्रतिमा, नागराजाचे शिल्प व भाजक्या मातीच्या अनेक सुंदर मूर्ति, तसेच अनेक नागराजांची नाणी सापडली आहेत. मणिभद्र यक्षाच्या पीठावर नागनृपति शिवनंदी याच्या काळचा खिस्तोत्तर पहिल्या–दुसऱ्या शतकाच्या ब्राह्मी लिपीत लेख कोरला आहे.[2] या सर्व अवशेषांवरुन तेथील इ. स. च्या पहिल्या–दुसऱ्या शतकापासून निदान सातव्या–आठव्या शतकापर्यंतच्या त्या नगरीच्या वैभवाची कल्पना येते.

पद्मावतीच्या आसमंतात्भागाचे बारीक वर्णन भवभूतीच्या 'मालतीमाधवा'त आले आहे, त्यावरुन त्या नगरीवर त्यांचे चांगलेच प्रेम होते आणि तेथे तो बराच काल राहिला होता यात संशय नाही.

## कालप्रियनाथाचा शोध

'मालतीमाधवा'त पद्मावतीच्या परिसराचे बारीक वर्णन आले असल्यामुळे भवभूतीने ते नाटक तेथे असताना रचले असावे असे अनुमान करण्यास हरकत नाही. तथापि त्याचा पहिला प्रयोग पद्मावतीस न होता कालप्रियनाथाच्या यात्रेच्या प्रसंगी झाला असे दिसते. त्या नाटकाच्या प्रस्तावनेत सूत्रधार म्हणतो, 'मारिष, सुविहितानि रङ्गमङ्गलानि, संनिपतितश्च भगवतः कालप्रियनाथस्य यात्राप्रसङ्गेन नानादिगन्तवास्तव्यो महाजनसमाजः। आदिष्टश्चास्मि विद्वज्जनपरिषदा यथा केनचिदपूर्वप्रकरणेन वयं विनोदयितव्या इति।' [मारिषा, रंगभूमीची मंगलकृत्ये उत्तम रीतीने पार पडली आहेत. भगवान् कालप्रियनाथाच्या यात्रेच्या निमित्ताने नाना देशांतील अनेक लोक येथे आले आहेत. तेव्हा विद्वज्जनसभेने मला आज्ञा केली आहे की एखाद्या नवीन प्रकरणाने (नाटकाने) आमचे मनोरंजन करावे.]

'महावीरचरित' व उत्तररामचरित' या नाटकाच्या प्रस्तावनातही ती नाटके कालप्रियनाथाच्या यात्रेच्या प्रसंगीच प्रथम रंगभूमीवर आल्याचा निर्देश आहे; पण तो वरील निर्देशाच्या मानाने त्रोटक आहे. 'महावीरचरित' हे नाटक भवभूतीने विदर्भात रचले असावे हे मागे दाखविले आहे. ते विद्वज्जनास पसंत पडले नसल्यामुळे भवभूतीने अर्धेच टाकले होते. पुढे 'मालतीमाधवा'च्या योगे त्याची कीर्ति पसरल्यावर त्याने 'महावीरचरिता'चाही प्रयोग कालप्रियनाथाच्या यात्रेच्या प्रसंगी करविला असावा. तथापि तेथील यात्रेत रंगभूमीवर आलेले ते भवभूतीचे पहिले नाटक नव्हते.

१. M. B. Garde, *Padmavati*, plate. IX.

२. *A. R. A. S. I.* for 1915-16, p. 106.

नाही तर कालिदासाप्रमाणे त्याने प्रत्येक नाटकाच्या आरंभी शिवस्तुतिपर नान्दी घातली असती. पण तसा प्रकार नाही. भवभूतीने फक्त 'मालतीमाधवा'त आरंभी गणपतीच्या विनोदमय वर्णनानंतर शिवस्तुतिपर श्लोक घातला आहे. 'महावीर-चरिता'च्या नान्दीत स्वयंभू नित्य चैतन्य ज्योतीला म्हणजे ब्रह्माला आणि 'उत्तर-रामचरिता'त पूर्वसूरींना नमन केले आहे. ते त्याच्या वेदान्ती मताला अनुरूप असेच आहे. 'मालतीमाधवा'च्या प्रस्तावनेत त्याने आपण वेद, उपनिषदे, सांख्य इत्यादिकांचे अध्ययन केले होते असे स्वतःच सांगितले आहे. तेव्हा त्याची धार्मिक मते उदार झाली होती व सर्व देवतांत एकच ब्रह्मतत्त्व वास करते, हे मत त्याला मान्य झाले होते, यात संशय नाही. अर्थात् 'तो शैव होता व कालप्रियनाथाच्या यात्रेच्या प्रसंगी त्याच्या नाटकांचे प्रयोग झाले म्हणून कालप्रियनाथ हा उज्जयिनीचा महाकालच असावा' असे म्हणता येत नाही.

'भविष्यपुराण', 'वराहपुराण', 'स्कन्दपुराण' इत्यादि पुराणांत कुष्ठरोग-पीडित कृष्णपुत्र साम्बाची कथा आली आहे. साम्बावर कृष्णाच्या अनेक स्त्रिया अनुरक्त झाल्या होत्या, असे नारदाने कृष्णाला सांगितल्यावर त्याने त्यासंबंधी चौकशी करून साम्बाला 'तू कुष्ठी होशील' असा शाप दिला. नंतर साम्बाने भगवान् सूर्याची आराधना मूलस्थान येथे केल्यावर तो त्या रोगातून मुक्त झाला. पुढे सूर्याने त्याला वर देऊन 'लौकरच तुला माझी प्रतिमा मिळेल, तिची स्थापना कर' असे सांगितले. नंतर नेहमीप्रमाणे ऋषींसह तो चन्द्रभागा नदीस स्नानास गेला असता सूर्याची तेजस्वी मूर्ति वाहत आलेली त्याला दिसली. तेव्हा त्याला सूर्यदेवाच्या सांगण्याची सत्यता पटून त्याने ती मूर्ति प्रवाहातून काढून घेतली आणि तेथील मित्रवनामध्ये ती स्थापिली. नंतर त्याला सूर्यदेव म्हणाले 'सांनिध्यं मम पूर्वाह्णे सुतीरे द्रक्ष्यते जनः। कालप्रिये च मध्याह्नेऽपराह्णे चात्र नित्यशः॥' (लोकांना माझे सांनिध्य सकाळी सुतीर येथे, मध्याह्नी कालप्रिय येथे व सायंकाळी येथे म्हणजे चंद्रभागातीरी मूलस्थान या ठिकाणी नेहमी पाहावयास मिळेल.) काही ठिकाणी सुतीरे याच्या ऐवजी 'मुण्डीरे' असाही पाठ आहे. ही तीन स्थाने कोठे होती याविषयी 'वराहपुराणा'त (अध्याय १७८, श्लो. ५५-५७) खालील वर्णन आढळते —

साम्बः सूर्यप्रतिष्ठां च कारयामास तत्त्ववित्।
उदयाचले च संश्रित्य यमुनायाश्च दक्षिणे॥
मध्ये कालप्रियं देवं मध्याह्ने स्थाप्य चोत्तमम्।
मूलस्थानं ततः पश्चात् अस्तमानाचले रविम्।
स्थाप्य त्रिमूर्ति साम्बस्तु प्रातर्मध्यापराह्णिकम्॥

या श्लोकात साम्बाने सूर्यमूर्तीची स्थापना उदयाचलावर म्हणजे पूर्व दिशेच्या पर्वतावर,

म्हणून त्यातील, तसेच 'उत्तररामचरित' या भवभूतीच्या शेवटच्या नाटकातीलही, कालप्रियनाथाच्या यात्रेचे वर्णन त्रोटक रूपाने आले आहे.

ही तीनही नाटके राजाश्रयाने रंगभूमीवर आली नव्हती. त्यात एकाही राजाच्या सभेचा उल्लेख नाही. उलट त्यांचा प्रयोग व्हावा म्हणून भवभूतीला ती नटांच्या स्वाधीन करावी लागली, असे 'मालतीमाधवा'तील सूत्रधाराच्या खालील उक्तीवरून दिसते — 'भट्टश्रीकण्ठपदलाञ्छनो भवभूतिर्नाम कविर्निसर्गसौहृदेन स्वकृतिमेवंप्राय-गुणभूयसीमस्माकं समर्पितवान् ।' 'महावीरचरिता'तही 'जातूकर्णीचा पुत्र भवभूति हा कवि आमचा मित्र आहे' (भवभूतिर्नाम जातूकर्णीपुत्रः कविर्मित्रधेयमस्माकम्।) असे सूत्रधार मोठ्या आदराने सांगतो. प्राचीनकाली नटांना समाजात मानमान्यता नसे. त्यांना 'जायाजीव' (आपल्या स्त्रीच्या मिळकतीवर जगणारे) असे म्हणत. न्यायालयात त्यांची साक्ष चालत नसे. ऋषिमुनि त्यांचे मुखावलोकन करण्याचे टाळत असत. अशा भरताचा स्नेह राजाश्रयाच्या अभावी भवभूतीला आपला सर्व अहंकार बाजूला ठेवून संपादन करावा लागला, आणि त्याच्या साहाय्याने आपली नाटके रंगभूमीवर आणावी लागली.

ज्या कालप्रियनाथाच्या यात्रेच्या प्रसंगी भवभूतीच्या नाटकाचे प्रथम प्रयोग झाले, त्याचे देवालय कोठे होते याविषयी बहुतेक प्राचीन टीकाकार काही माहिती देत नाहीत. रामचंद्रबुधेन्द्र या 'मालतीमाधवा'च्या टीकाकाराने मात्र कालप्रियनाथ हा विदर्भातील पद्मनगरात स्थापलेला देव होता आणि त्याच्या उत्सवप्रसंगी हे 'मालती-माधव' नाटक प्रथम दाखविले गेले असे म्हटले आहे. पण त्याच्या म्हणण्यास काही आधार दिसत नाही. भवभूति हा स्वतः विदर्भातील पद्मपुरचा राहणारा. त्याचे पूर्वजही तेथे अनेक पिढ्या वास्तव केलेले. त्या नगरात त्याच्या नाटकाचे प्रथम प्रयोग झाले असते तर त्याने त्यामध्ये आपले पूर्वज आणि स्वतःची विद्वत्ता याविषयी जी सविस्तर माहिती दिली आहे ती देण्याची त्याला आवश्यकता वाटली ना. शिवाय विदर्भात कालप्रियनाथ या नावाचे विख्यात क्षेत्र होते, असा इतरत्र कोठेही उल्लेख नाही. तेव्हा हे कालप्रियनाथाचे देवालय विदर्भापासून दूर अंतरावर असावे व त्या ठिकाणी भवभूतीविषयी लोकांस माहिती नसल्यामुळे त्याला ती आपल्या नाटकाच्या प्रस्तावनेत देणे आवश्यक वाटले असावे, असे अनुमान करण्यास हरकत नाही.

भवभूतीच्या नाटकाचे आधुनिक टिप्पणकार कालप्रियनाथ हा उज्जयिनीचा महाकाल होय असे म्हणतात. कालिदासाप्रमाणे भवभूतिही शिवोपासक होता असा समज असल्यामुळे हे मत विद्वन्मान्य झाले आहे. पण ते बरोबर वाटत नाही. उज्जयिनीच्या महाकालाचा उल्लेख व वर्णन अनेक पुराणात आले आहे, पण कोठेही त्याला 'कालप्रियनाथ' म्हटले नाही. भवभूति हा शिवोपासक होता असेही दिसत नाही;

नाही तर कालिदासाप्रमाणे त्याने प्रत्येक नाटकाच्या आरंभी शिवस्तुतिपर नान्दी घातली असती. पण तसा प्रकार नाही. भवभूतीने फक्त 'मालतीमाधवा'त आरंभी गणपतीच्या विनोदमय वर्णनानंतर शिवस्तुतिपर श्लोक घातला आहे. 'महावीर-चरिता'च्या नान्दीत स्वयंभू नित्य चैतन्य ज्योतीला म्हणजे ब्रह्माला आणि 'उत्तर-रामचरिता'त पूर्वसूरींना नमन केले आहे. ते त्याच्या वेदान्ती मताला अनुरूप असेच आहे. 'मालतीमाधवा'च्या प्रस्तावनेत त्याने आपण वेद, उपनिषदं, सांख्य इत्यादि-कांचे अध्ययन केले होते असे स्वतःच सांगितले आहे. तेव्हा त्याची धार्मिक मते उदार झाली होती व सर्व देवतात एकच ब्रह्मतत्त्व वास करते, हे मत त्याला मान्य झाले होते, यात संशय नाही. अर्थात् 'तो शैव होता व कालप्रियनाथाच्या यात्रेच्या प्रसंगी त्याच्या नाटकांचे प्रयोग झाले म्हणून कालप्रियनाथ हा उज्जयिनीचा महाकालच असावा' असे म्हणता येत नाही.

'भविष्यपुराण', 'वराहपुराण', 'स्कन्दपुराण' इत्यादि पुराणात कुष्ठरोग-पीडित कृष्णपुत्र साम्बाची कथा आली आहे. साम्बावर कृष्णाच्या अनेक स्त्रिया अनुरक्त झाल्या होत्या, असे नारदाने कृष्णाला सांगितल्यावर त्याने त्यासंबंधी चौकशी करून साम्बाला 'तू कुष्ठी होशील' असा शाप दिला. नंतर साम्बाने भगवान् सूर्याची आराधना मूलस्थान येथे केल्यावर तो त्या रोगातून मुक्त झाला. पुढे सूर्याने त्याला वर देऊन 'लौकरच तुला माझी प्रतिमा मिळेल, तिची स्थापना कर' असे सांगितले. नंतर नेहमीप्रमाणे ऋषीसह तो चन्द्रभागा नदीत स्नानास गेला असता सूर्याची तेजस्वी मूर्ति वाहत आलेली त्याला दिसली. तेव्हा त्याला सूर्यदेवाच्या सांगण्याची सत्यता पटून त्याने ती मूर्ति प्रवाहातून काढून घेतली आणि तेथील मित्रवनामध्ये ती स्थापिली. नंतर त्याला सूर्यदेव म्हणाले 'सांनिध्यं मम पूर्वाह्णे सुतीरे द्रक्ष्यते जनः। कालप्रिये च मध्याह्नेऽपराह्णे चात्र नित्यशः ॥' (लोकांना माझे सानिध्य सकाळी सुतीर येथे, मध्याह्नी कालप्रिय येथे व सायंकाळी येथे म्हणजे चंद्रभागातीरी मूलस्थान या ठिकाणी नेहमी पाहावयास मिळेल.) काही ठिकाणी सुतीरे याच्या ऐवजी 'मुण्डीरे' असाही पाठ आहे. ही तीन स्थाने कोठे होती याविषयी 'वराहपुराणा'त (अध्याय १७८, श्लो. ५५-५७) खालील वर्णन आढळते —

साम्बः सूर्यप्रतिष्ठां च कारयामास तत्त्ववित् ।
उदयाचले च संश्रित्य यमुनायाश्च दक्षिणे ॥
मध्ये कालप्रियं देवं मध्याह्ने स्थाप्य चोत्तमम् ।
मूलस्थाने ततः पश्चात् अस्तमानाचले रविम् ।
स्थाप्य त्रिमूर्ति साम्बस्तु प्रातर्मध्यापराह्णिकम् ॥

या श्लोकात साम्बाने सूर्यमूर्तीची स्थापना उदयाचलावर म्हणजे पूर्व दिशेच्या पर्वतावर,

यमुनेच्या दक्षिणेस कालप्रिय येथे आणि अस्तमानाचली मूलस्थान येथे अशा तीन ठिकाणी केल्याचा निर्देश आहे. यापैकी पहिल्या स्थानाचा उल्लेख गंगासागरसंगम असाही केलेला आढळतो. काही ठिकाणी त्याला सूर्यकानन किंवा रविक्षेत्र असेही नाव दिले आहे. 'ब्रह्मपुराणा'त उत्कल देशातील कोणादित्य किंवा कोणार्क याला रविक्षेत्र असे नाव दिले आहे. कोणार्क हे पूर्वतीरावर बांधलेल्या अत्यंत भव्य अशा सूर्यमंदिराचे नाव आहे. ते ओरिसा (प्राचीन उत्कल) देशाच्या गंगवंशी प्रथम नरसिंहराजाने इ. स. च्या तेराव्या शतकात बांधले होते. ते पुरीपासून सुमारे वीस मैलावर असून अद्यापि Black Pagoda (काळे देवालय) या नावाने सुविख्यात आहे. हे स्थान अत्यंत प्राचीन काळापासून सूर्याचे पवित्र स्थान म्हणून प्रसिद्ध असावे. म्हणूनच तेथे वालुकामय प्रदेशात एवढे भव्य मंदिर उभारलेले दिसते. पश्चिमेस पंजाबात मूलस्थान किंवा मुलतान येथेही चंद्रभागा ( चिनाब ) नदीच्या तीरी सूर्याचे सुप्रसिद्ध देवालय होते. त्या देवस्थानाला यात्रेचे मोठे उत्पन्न असल्यामुळे अरबांनी तो प्रदेश पादाक्रान्त केल्यावरही त्या उत्पन्नाच्या लोभाने ती मूर्ति भग्न न करता तिची पूजा अर्चा चालू ठेवली होती, असे अरब इतिहासकार अल् मसूदी यांनी लिहून ठेवले आहे.

कोणार्क व मूलस्थान ही सूर्यक्षेत्रे भारताच्या पूर्व व पश्चिम टोकांना होती, तर कालप्रिय हे त्याच्या मध्यभागी यमुनेच्या दक्षिणतीरी होते. म्हणून त्या ठिकाणी सूर्याचे सानिध्य मध्याह्नी असे, असे पुराणात म्हटले आहे. कालप्रिय हे कनोजच्या दक्षिणेस होते असे राजशेखराच्या 'काव्यमीमांसे'तील (पृ. ९४) पुढील उताऱ्यावरून दिसते —

अनियतत्वाद्दिशानामनिश्चितो दिग्विभाग इत्येके। तथाहि यो गाधिपुरस्य दक्षिणः स कालप्रियस्योत्तरः। ( कोणत्याही स्थलाचे केवळ 'दक्षिण' किंवा 'उत्तर' असे वर्णन करू नये, असे काही म्हणतात. कारण असे वर्णन दिशांवर अवलंबून असते. उदाहरणार्थ, जे स्थल गाधिपुराच्या म्हणजे कनोजच्या दक्षिणेस तेच कालप्रियाच्या उत्तरेस असेल. )

कनोजच्या आणि यमुनेच्याही दक्षिणेस असलेले कालप्रियनगर—जेथे कालप्रिय नामक सूर्याचे सुप्रसिद्ध देवालय होते—ते सध्याचे काल्पी शहरच असावे असे सहजच अनुमान करता येते. कालप्रिय आणि काल्पी यांतील नामसादृश्य ध्यानात घेण्यासारखे आहे. अद्यापि काल्पीस उत्खनन झाले नाही. पण त्या शहराच्या बाहेर अद्यापि काल्पदेव का टीला ( काल्पदेवाचे टेकाड ) या नावाचे उच्च टेकाड आहे. तेथेच कालप्रियनाथाच्या प्राचीन देवालयाचे अवशेष असावे.

कालप्रिय हे यमुनेच्या काठी असून तेथे एक विस्तृत आवार असलेले भव्य देवालय होते हे कोरीव लेखावरूनही दाखविता येते. इ. स. च्या दहाव्या शतकाच्या

आरंभी (सन ९१६ च्या सुमारास) मान्यखेट (पूर्वीच्या हैदराबाद संस्थानातील मालखेड) येथे राज्य करणाऱ्या राष्ट्रकूटवंशी महाप्रतापी तृतीय इंद्र राजाने कनोजवर स्वारी केली. त्या स्वारीत त्याला वाटेत कालप्रिय येथे देवळाच्या परिसरात काही काळ थांबावे लागले आणि नंतर त्याने यमुना पार करून कनोज नगर उद्ध्वस्त केले, त्याचे सुंदर वर्णन खालील श्लोकात केले आहे–[1]

> यन्माद्यद्द्विपदन्तघातविषमं कालप्रियप्राङ्गणं
> तीर्णा यत्तुरगैरगाधयमुना सिन्धुप्रतिस्पर्धिनी ।
> येनेदं हि महोदयारिनगरं निर्मूलमुन्मूलितं
> नाम्नाद्यापि जनैः कुशस्थलमिति ख्यातिं परां नीयते ॥

[ तृतीय इन्द्राच्या मदोन्मत्त हत्तींच्या दंतांच्या आघातांनी कालप्रियाचे प्राङ्गण उंचसखल झाले. त्याच्या घोड्यांनी सागराशी विशालत्वात स्पर्धा करणारी यमुना नदी पोहून पार केली. त्याने समूळ उद्ध्वस्त केल्यामुळे ही महोदय (कनोज) नामक शत्रूची राजधानी अद्यापि कुशस्थल या नावाने प्रसिद्ध झाली आहे. (पूर्वीच्या सुसमृद्ध नगरात सध्या गवत उगवले आहे असा अर्थ.) ]

या श्लोकावरून कालप्रिय देवाच्या देवालयाचे अंगण अत्यंत विस्तृत होते, इतके की त्यामध्ये हत्ती, घोडे, पायदळ इत्यादि इंद्र नृपतीची चतुरंग सेना सामावली. ते नगर यमुनेच्या दक्षिण तीरावर होते; कारण त्यानंतर इंद्र राजाला यमुना पार करून कनोजवर चाल करावी लागली. सध्याचे काल्पी हे मान्यखेट पासून कनोजच्या मार्गावर यमुना नदीच्या काठी आहे. काल्पीहून कनोज उत्तरेस सुमारे ७५ मैलावर आहे.

तेव्हा कालप्रिय येथे सर्व भारतात विख्यात असलेले सूर्याचे पवित्र व विशाल देवालय होते. तेथे यात्रेच्या निमित्ताने दूरदूरच्या प्रदेशातून हजारो लोक येत. नटाच्या मंडळीही लोकाश्रयाकरिता अशा प्रसंगी नवीन नवीन नाटकांचे प्रयोग करीत असत. अशा यात्रेच्या प्रसंगी भवभूतीची तीन्ही नाटके प्रथम रंगभूमीवर आली. ही माहिती ध्यानात घेतली असता भवभूतीने 'मालतीमाधवा'च्या आरंभी (अंक १, श्लो. ३) सूर्यस्तुतिपर खालील श्लोक का घातला याचे स्वारस्य ध्यानात येईलः–

> कल्याणानां त्वमसि महसां भाजनं विश्वमूर्ते
> धुर्यां लक्ष्मीमथ मयि भृशं धेहि देव प्रसीद ।
> यद्यत्पापं प्रतिजहि जगन्नाथ नम्रस्य तन्मे
> भद्रं भद्रं वितर भगवन्भूयसे मङ्गलाय ॥

(हे विश्वमूर्ते ! तू मंगल अशा तेजाचा निधि आहेस. मजवर कृपा करून वरिष्ठ

---

१. *E. I.*, Vol. VII, p. 38.

अशी समृद्धि मला दे. मी तुजपुढे नम्र झालो आहे. माझी सर्व पापे नष्ट करून मङ्गल-प्राप्तीकरिता सर्व प्रकारचे कल्याण मला प्राप्त करून दे.)

भवभूति कालप्रिय नगरात बराच काळ राहिला असावा. कारण त्याची तिन्ही नाटके कालप्रियनाथाच्या यात्रेच्या प्रसंगी प्रथम रंगभूमीवर आली, असे त्यात म्हटले आहे. हळू हळू त्याची कीर्ति दिगन्ती पसरू लागली आणि ती कनोजच्या यशोवर्मा नृपतीच्या कानी आली. हर्षानंतर कनोजच्या गादीवर आलेला हाच पहिला सुविख्यात राजा. याने केलेल्या दिग्विजयाचे वर्णन त्याच्या दरबारच्या वाक्पतिराज नामक कवीच्या 'गउडवहो' (गौडवध) नावाच्या प्राकृत काव्यात आले आहे. त्याविषयी माहिती मागील एका प्रकरणात दिली आहे. त्याच्या साम्राज्याचा विस्तार पूर्वेस निदान मगधापर्यंत झाला होता, असे दिसते. कारण त्याने आपल्या नावे स्थापिलेले यशोवर्मपुर (सध्याचे घोसरावा) पुढे निदान सुमार दीडशे वर्षे मरभराटीत होते हेही मागे दाखविले आहे. तसेच त्याच्या एका उदीचिपति (उत्तर प्रदेशाचा अधिपति) मन्याचा कोरीव लेख मगधातील नालन्दा या प्राचीन बौद्ध विद्यापीठात सापडला आहे. त्यातील यशोवर्म्याच्या स्तुतिपर श्लोक मागे दिला आहे.

### यशोवर्म्याचा आश्रय

अशा महाप्रतापी यशोवर्म्याच्या कानी भवभूतीची कीर्ति गेल्यावर साहजिकच त्याला हे कविरत्न आपल्या सभेत असावे अशी इच्छा झाली; कारण अशा कवि-श्रेष्ठाच्या काव्यामुळे राजाची कीर्ति दीर्घ काळ टिकून राहते. एका कवीने म्हटले आहे–

ख्यातिं यान्ति नरेश्वराः कविवरैः स्फारैर्न भेरीरवैः ।

(राजे लोक आपल्या दरबारच्या श्रेष्ठ कवींच्या योगाने प्रसिद्धि पावतात, नगाऱ्याच्या मोठ्या आवाजाने नव्हे.)

त्यात यशोवर्म्याला स्वतःही काव्यनाटके रचण्याची आवड होती. त्याचे काही श्लोक 'सुभाषितरत्नाकर', 'सदुक्तिकर्णामृत' इत्यादि सुभाषितसंग्रहात आणि 'ध्वन्यालोका'दि अलंकारग्रंथात घेतले आहेत. तसेच त्याने 'रामाभ्युदय' नामक रामचरितपर नाटक रचले होते. ते सध्या उपलब्ध नाही, पण त्याचे अनेक उतारे अलंकारग्रंथात उद्धृत केलेले सापडले आहेत. भवभूति या सम्राटाच्या सभेत राजकवि म्हणून होता हे कल्हणाच्या 'राजतरंगिणी'वरून समजते.

कनोजला असताना भवभूतीने नाटकरचना केली काय हे माहीत नाही. तथापि त्याच्या नावावर अनेक मुक्तक (स्फुट) श्लोक सुभाषितसंग्रहात व अलंकारग्रंथात दिलेले आढळतात. ते त्याने या काळात रचले असतील. या मुक्तकांची स्तुति कुन्तक

या श्रेष्ठ आलंकारिकाने आपल्या 'वक्रोक्तिजीवित'त केली आहे. तो म्हणतो, "भवभूतीचे मुक्तकश्लोक रचनासौंदर्याच्या योगाने मनोरम झाले आहेत."[२१]

## वाक्पतिराजाशी मैत्री

कनोज येथे यशोवर्म्याच्या राजसभेत भवभूतीची वाक्पतिराज नामक प्राकृत कवीशी मैत्री जमली. त्याचा काळ एकत्र साहित्यगोष्ठीत मोठ्या आनंदात जाऊ लागला. भवभूति हा वाक्पतिराजापेक्षा वयाने ज्येष्ठ व विद्वत्तेत श्रेष्ठ होता. तेव्हा वाक्पतिराज आपली काव्ये त्याला वाचून दाखवून त्याच्या सल्ल्यानुसार त्यात सुधारणा करीत असला तर त्यात आश्चर्य नाही. अशा चर्चेतून आपणास फार फायदा झाल्याचे वाक्पतिराजाने आपल्या 'गउडवहो' काव्यात प्राजळपणे व कृतज्ञतेने नमूद करून ठेवले आहे. तो म्हणतो—

भवभूइजलहिणिग्गयकव्वामयरसकणा इव फुरन्ति ।
जस्स विसेसा अज्जवि वियडेसु कहाणिवेसेसु ।।
( भवभूतिजलधिनिर्गतकाव्यामृतरसकणा इव स्फुरन्ति ।
यस्य विशेषा अद्यापि विकटेषु कथानिवेशेषु ।। )

( गउडवहो, ७९९ )

( भावार्थ—भवभूति हा सागर आहे. त्या सागरातून निघालेल्या अमृताचे काही बिंदु मात्र अद्यापि माझ्या सुंदर गणलेल्या कथात स्फुरतात. )

वाक्पतिराजाच्या या 'गौडवध' व 'मधुमथनविजय' या दुसऱ्या काव्याविषयी आणि त्याने रचलेल्या प्राकृत गाथाविषयी सविस्तर माहिती मागे दिली आहे.

भवभूति आपल्या उतार वयात केरल देशात पूर्वमीमांसेच्या अध्ययनाकरिता गेला होता. नंतर त्याने तद्विषयक ग्रंथ रचले आणि त्याच्या मातेच्या नावावरून त्याला उम्बेक असे नाव पडले इत्यादि तर्क डॉ. काणे यांनी केले आहेत. पण त्यांना काहीचाही आधार नाही. त्याची चर्चा पुढे एका परिशिष्टात केली आहे.

वाक्पतिराजाने आपले 'गौडवध' काव्य इ. स. ७३९ च्या सुमारास रचले असावे, असे मागे दाखविले आहे. त्यातील पूर्वोक्त भवभूतिविषयक गाथेतील 'अज्जवि' ( अद्यापि ) या पदावरून भवभूति त्या काळी जिवंत नव्हता असे दिसते. त्याचा जन्मकाल माहीत नसल्यामुळे त्याचे आयुर्मान किती होते हे सांगता येत नाही.

---

२१. तथैव विचित्रवक्रत्वविजृम्भित ......भवभूतिराजशेखरविरचितेषु बन्धसौन्दर्यसुभगेषु मुक्तकेषु परिदृश्यते । 'वक्रोक्तिजीवित' (सं.सुशीलकुमार दे) (१९२८), पृ. ७१.

## परिशिष्ट दुसरे

## भवभूति आणि उम्बेक

तर्केषु कर्कशतराः स्युरथापि पुंसां
काले भवन्ति मृदवः कवितासु वाचः ।
दैत्येन्द्रशैलकुलिशो दयिताकपोले
नाथस्य कोमलमुदाहरणं नखं नः ॥

सुभाषित.

भवभूतिविषयक जे अनेक वादग्रस्त प्रश्न आहेत त्यांमध्ये संस्कृत नाटककार भवभूति आणि मीमांसक भट्ट उम्बेक[1] हे एकच किंवा भिन्न हा एक महत्त्वाचा आहे. त्याची चर्चा प्रस्तुत परिशिष्टात करावयाची आहे.

भवभूति आणि उम्बेक हे एकच होत या मताला उपोद्बलक असा पुरावा सुमारे ८० वर्षांपूर्वी कै. शंकर पांडुरंग पंडित यांनी वाक्पतिराजाच्या 'गउडवहो' (गौडवध) नामक काव्याला जोडलेल्या प्रस्तावनेत प्रथम पुढे आणला. 'मालतीमाधव' हे संस्कृत नाटक भवभूतीचे म्हणून सुविख्यात आहे. त्याच्या प्रस्तावनेत भवभूतीने आपल्या कुलाविषयी बरीच माहिती दिली आहे. त्यामध्ये ते नाटक श्रीकण्ठपदलाञ्छन भवभूतीने लिहिले असे स्पष्ट विधान आले आहे. या तऱ्हेचे विधान त्याच्या 'महावीरचरित' व 'उत्तररामचरित' या इतर दोन नाटकांतही आढळते. या नाटकांच्या अंकांच्या पुष्पिका (Colophons) मध्ये किंवा निदान त्यांच्या अखेरीस त्यांचा कर्ता म्हणून भवभूतीचे नाव येते. पण कै. शंकर पांडुरंग पंडित यांना मिळालेल्या व सुमारे पानशे वर्षे जुन्या असलेल्या 'मालतीमाधवा'च्या एका हस्तलिखितात सहाव्या अंकाच्या शेवटी भवभूतीच्या ऐवजी उम्बेकाचार्यांचे नाव नाटककार म्हणून दिलेले आढळले. त्या ठिकाणी उम्बेकाचार्याला 'श्रीकुमारिलस्वामिप्रसादप्राप्तवाग्वैभव' (ज्याला कुमारिलस्वामींच्या प्रसादाने वाग्वैभव प्राप्त झाले आहे असा) असे

---

१. याचे नाव अनेक ठिकाणी उवेक असे येते. 'बवयोरभेदः' या न्यायाने ते उम्बेक असेही आढळते. कमलशीलाच्या टीकेत ते उवेयक असे आले आहे. पुढे दाखविल्याप्रमाणे श्रीदेवाच्या 'स्याद्वादरत्नाकरा'त तर त्याचे 'ओवक' असे अपभ्रष्ट रूप आढळते

विशेषण लावले आहे. त्याच हस्तलिखितात तिसऱ्या अंकाच्या शेवटी ते नाटक भट्ट कुमारिलाच्या शिष्याने रचले असा उल्लेख आहे. हेच हस्तलिखित पूर्वी कै. माधव व्यंकटेश लेले यांच्या संग्रही होते.[१] या हस्तलिखिताच्या पुराव्यावरून भवभूतीचे उम्बेक असे दुसरे नाव होते व तो सुप्रसिद्ध मीमांसक कुमारिलभट्ट याचा शिष्य होता, हे मत प्रचलित झाले. कै. डॉ. रामकृष्णपंत भांडारकर याना हे उल्लेख कुतूहलोत्पादक वाटले; पण त्याच्या काळी या प्रश्नाविषयी इतर काहीच साहित्य उपलब्ध नसल्याने त्यानी त्याविषयी निर्णयात्मक मत दिले नाही.[२] त्यानतर उम्बेकाचे दोन ग्रंथ—( १ ) कुमारिलाच्या ' श्लोकवार्तिका 'वरची ' तात्पर्यटीका ' नामक अपूर्ण व्याख्या[३] आणि ( २ ) मण्डनमिश्राच्या ' भावनाविवेका 'वरची टीका[४]–हे प्रसिद्ध झाले आहेत. तसेच शान्तरक्षिताच्या ' तत्त्वसंग्रहा 'वरची कमलशीलाची टीका,[५] ' चित्सुखी ',[६] चित्सुखीवरील ' नयनप्रसादिनी टीका ',[७] ' शास्त्रदीपिके 'वरील रामकृष्णाची ' युक्तिस्नेहप्रपूरणी सिद्धान्तचन्द्रिका टीका '[८] श्रीदेवाचा ' स्याद्वादरत्नाकर '[९] इत्यादि ग्रंथांतील उम्बेकाविषयी व त्याच्या विविध मताविषयी आलेले उल्लेख माहीत झाले आहेत. त्याचा अभ्यास केल्यावर विद्वानामध्ये दोन तट पडले आहेत. म. म. कुप्पुस्वामी शास्त्री,[१०] गंगानाथ झा[११] आणि पा. वा. काणे[१२] यांच्या मते भवभूति व उम्बेक हे एकच होत. याच्या उलट डॉ. श्री. कृ. बेलवलकर यास उम्बेक हे भवभूतीचे दुसरे नाव असेल असे

---

१. मा. व्य. लेले—' मालतीमाधव—सार व विचार ', पृ. ८४

२. त्याची ' मालतीमाधवा 'ची प्रस्तावना, पृ. ८–९.

३. मद्रास युनिव्हर्सिटी सस्कृत सीरीज, न. १३

४. प्रिन्सेस ऑफ वेल्स् सरस्वतीभवन टेक्स्ट्स्, न. ६ ( भाग १ व २ )

५. गायकवाड्स् ओरिएटल सीरीज, पु २, पृ ८१२.

६. निर्णयसागर प्रेस, पृ. २६५.

७. निर्णयसागर प्रेस, पृ. २६५.

८. निर्णयसागर प्रेस, पृ. २, १४, ३०, ४८ इत्यादि.

९. भट्टपुत्र जयमिश्राच्या श्लोकवार्तिकटीकेला ( मद्रास युनिव्हर्सिटी सस्कृत सीरीज, न. १७ ) जोडलेल्या डॉ. कुन्हन राजाच्या प्रस्तावनेतील ( पृ. १२ ) उतारा पाहा.

१०. सेकड ओरिएटल कॉन्फरन्स्चा रिपोर्ट, पृ. ४११.

११. ' भावनाविवेका 'च्या ( सरस्वतीभवन टेक्स्ट्स् ) द्वितीय भागाची प्रस्तावना, पृ. ४ पाहा.

१२. ' उत्तररामचरिता 'च्या त्याच्या आवृत्तीची प्रस्तावना, पृ. १२–१६.

वाटत नाही.[1] डॉ. कुन्हन राजा यांनी उम्बेकाच्या 'श्लोकवार्त्तिकटीके'स जोडलेल्या आपल्या विस्तृत प्रस्तावनेत या प्रश्नाचा सविस्तर उहापोह केला आहे.[2] एका ठिकाणी उम्बेक हा कुमारिलाचा शिष्य नव्हता, तसेच भवभूति व उम्बेक यांच्या ऐक्याला यत्किंचितही प्रमाण नाही असे त्यांनी स्पष्ट म्हटले आहे, तर दुसऱ्या ठिकाणी ते ऐक्य संभवनीय आहे असे मानले आहे.[3] असे असले तरी त्यांच्या ऐक्याविषयी समज कसा उत्पन्न झाला याची त्यांनी काहीच उपपत्ति सुचविली नाही. याप्रमाणे प्रस्तुत प्रश्न अत्यंत वादग्रस्त असल्यामुळे त्याची थोड्या बारकाईने चर्चा करणे अवश्य आहे.

## उम्बेक कुमारिलाचा शिष्य होता याबद्दल प्रमाणे

उम्बेक आणि कुमारिल यांचा गुरुशिष्यसंबंध सिद्ध करण्यासाठी पुढील प्रमाणे दिली जातात–

( १ ) उम्बेक हा कुमारिलस्वामींचा शिष्य होता अशा आशयाचे दोन उल्लेख '*मालतीमाधवा*'च्या एका अत्यंत प्राचीन हस्तलिखितात आले आहेत.

( २ ) विद्यारण्याच्या 'श्रीमच्छंकरदिग्विजया'त उम्बेक हे मंडनमिश्राचे दुसरे नाव होते, असे खालील श्लोकात ( ७, ११६ ) सांगितले आहे–

उंबेक इत्यभिहितस्य हि तस्य लोके
उंवेति बान्धवजनैरभिधीयमाना ।
हेतोः कुतश्चिदिह वाक् मुरुणाभिशप्ता
दुर्वाससाजनि वधूरुभयभारतीति ।।

[ *अर्थ— तो मंडनमिश्र* उंबेक या नावाने ख्यात आहे. दुर्वासऋषींने जिला काही कारणाने शाप दिला होता ती सरस्वती त्याची पत्नी असून तिला तिचे बांधव उंबा असे म्हणत. तिचे उभयभारती असेही दुसरे नाव आहे. ]

या श्लोकामध्ये उंबेक ( किंवा उंबेक ) असे मंडनमिश्राचे दुसरे नाव होते असे म्हटले आहे. कुमारिलभट्टांनी शंकराचार्यांस आपला शिष्य मंडनमिश्र याजकडे पाठविले अशी कथा पूर्वोक्त 'शंकरदिग्विजया'त दिली आहे. उम्बेक हे मंडनमिश्राचे

१. भवभूतिप्रणीत 'उत्तररामचरिता'चे मराठी भाषांतर, प्रस्तावना, पृ. २६

२. उम्बेकाच्या 'श्लोकवार्तिक' टीकेच्या आवृत्तीची प्रस्तावना, पृ. ३४.

३. 'श्लोकवार्तिकव्याख्या' ( मद्रास युनिव्हर्सिटी संस्कृत सीरीज, नं. १३ ) पृ. १०५–१०८.

दुसरे नाव असल्यास या कथेने 'मालतीमाधवा'च्या पुष्पिकेतील वरील विधानास पुष्टीच मिळते.

( ३ ) उम्बेक मंडनमिश्राच्या 'भावनाविवेका'वरील आपल्या टीकेत 'अन्यदेवहि धात्वर्थसामान्यकरणात्मकम् । अन्यच्च भावना नाम साध्यत्वेन व्यवस्थितम् ॥' या कुमारिलभट्टांच्या 'तन्त्रवार्तिका'तील ( पृ. ३५१ ) श्लोकाचा उत्तरार्ध एके ठिकाणी ( पृ. १३ ) 'भट्टपादैरुक्तम्' या शब्दांनी व दुसऱ्या ठिकाणी (पृ. ४३) 'यथोक्तं गुरुणा' अशा शब्दांनी उद्धृत करतो. त्यावरून तो कुमारिलभट्टांचा शिष्य होता असे दिसते.

( ४ ) उम्बेकाने 'श्लोकवार्तिका'वरील आपल्या टीकेत 'अभिचरन् श्येनेन यजेत' या श्रुतिवाक्याचे विवेचन करीत असता भाष्यकार शबरस्वामी आणि वार्तिककार कुमारिलभट्ट या दोघांच्या मतातील दोष दाखविले आहेत आणि आत्मसमर्थनार्थ

गुरोरप्यवलिप्तस्य कार्याकार्यमजानतः ।
उत्पथप्रतिपन्नस्य परित्यागो विधीयते ॥

ही 'महाभारता'तील[१] उक्ति उद्धृत केली आहे. उम्बेक कुमारिलभट्टाचा शिष्य असल्याच ही उक्ति उद्धृत करण्यामध्ये विशेष स्वारस्य दिसेल.

( ५ ) उम्बेकाची 'श्लोकवार्तिका'वरची टीका स्फोटवादस्थानकापर्यंतच सापडली आहे. त्यानंतर त्याच हस्तलिखितात त्या ग्रंथावरची भट्टपुत्र जयमिश्राची टीका दिली आहे.[२] तेव्हा उम्बेकाच्या निधनानंतर जयमिश्राने त्याचे 'श्लोकवार्तिका'च्या टीकालेखनाचे कार्य पुरे केले असे दिसते. भट्टपुत्र जयनाथ हा कुमारिल भट्टाचा पुत्र असावा. त्याच्या टीकेच्या अगोदर उम्बेकाची टीका लिहिली असल्यामुळे उम्बेक हा कुमारिलाचा समकालीन व शिष्य होता या मतास पुष्टी मिळते.

### वरील प्रमाणांचे परीक्षण

वरील पाच प्रमाणे उम्बेक हा कुमारिलांचा शिष्य होता हे सिद्ध करण्याकरिता पुढे केली जातात. पण ती निर्णायक नाहीत हे पुढील विवेचनावरून दिसून येईल.

( १ ) उम्बेक हा कुमारिलाचा शिष्य होता असे स्पष्ट विधान मालतीमाधवाच्या फक्त एकाच हस्तलिखितात आढळले आहे व ते हस्तलिखितही सुमारे ५०० वर्षांपेक्षा

१. महाभारत, उद्योगपर्व, १७८, ४७–४८; शांतिपर्व, ५७, ६-७; १४०, ४८. या संदर्भाबद्दल मी म. म. डॉ. पा. वा. काणे यांचा आभारी आहे.

२. ही टीका आता मद्रास युनिव्हर्सिटी संस्कृत सीरीज, नं. १७ मध्ये छापली आहे.

ऊनं नाही. भवभूतीच्या या किंवा इतर नाटकाच्या कोणत्याही अन्य हस्तलिखितात असे विधान नाही. ही हस्तलिखिते काश्मीरपासून म्हैसूरपर्यंतच्या दूरदूरच्या प्रांतांतून मिळाली आहेत. उम्बेकाचे 'मालतीमाधवा'चे कर्तृत्व संशयास्पद आहे हे पुढे दाखविले आहे. तेव्हा या प्रमाणावर विशेष भिस्त ठेवता येत नाही.

(२) 'शंकरदिग्विजय' हा ग्रंथ उंबेकानंतर कित्येक शतकांनी रचलेला. त्यातील अनेक कथा कपोलकल्पित असल्याचे सिद्ध झाले आहे. उदाहरणार्थ, शंकराचार्यांकडून पराभव पावल्यानंतर मंडनमिश्राने संन्यास घेऊन सुरेश्वर हे नाव धारण केले ही कथा अविश्वसनीय ठरली आहे.[1] तेव्हा मंडनमिश्र आणि उम्बेक हे एकच आणि म्हणून उम्बेक हा कुमारिलभट्टाचा शिष्य होय, हे त्यातील विधान निःसंदेहपणे स्वीकारता येत नाही.

(३) उम्बेकाने अनेक ठिकाणी कुमारिलभट्टांच्या मताचा उल्लेख केला आहे. पण तसे करताना बहुतेक सर्व ठिकाणी त्यांचा वार्तिककार असाच निर्देश केला आहे. एका ठिकाणी त्यांना 'भट्टपाद' असे म्हटले आहे खरे, पण त्यावरून त्यांचा कुमारिलाविषयी फक्त आदर व्यक्त होतो, गुरुशिष्यसंबंध दाखविला जात नाही. फक्त एकाच ठिकाणी ('भावनाविवेका'वरील टीकेत, पृ. ४३) त्यांच्या मताचा उल्लेख करताना 'तदुक्तं गुरुणा' असे म्हटले आहे. कदाचित् कुमारिलभट्ट मंडनमिश्रांचे गुरु असतील, म्हणून मण्डनमिश्राच्या ग्रंथाचे व्याख्यान करताना उम्बेकाने त्यांच्या गुरूचे वचन 'तदुक्तं गुरुणा' अशा शब्दांनी उद्धृत केले असावे. कुमारिलभट्ट हे उम्बेकाचे स्वतःचे गुरु असते तर 'श्लोकवार्तिका'वरील आपल्या टीकेच्या आरंभी त्याने तसा निर्देश केला असता, पण तसा निर्देश त्या टीकेच्या आरंभीच काय पण इतरत्र कोठेही त्याने केला नाही. डॉ. कुन्हन राजा यांच्या मते तर 'तदुक्तं गुरुणा' हा पाठ संशयास्पद आहे. 'भावनाविवेका'च्या उम्बेककृत टीकेची आणखी हस्तलिखिते सापडल्यास त्यात दुसरा पाठ सापडेल असे त्यांस वाटते. ते कसेही असले तरी केवळ एका ठिकाणच्या पाठावरून कुमारिलभट्ट व उम्बेक यांचा गुरुशिष्यसंबंध निर्विवादपणे सिद्ध झाला असे म्हणता येत नाही.

याच्या उलट, उम्बेकाच्या 'श्लोकवार्तिक' व 'भावनाविवेक' यांवरील टीकांचा सूक्ष्म अभ्यास केल्यास तो टीकाकार केवळ कुमारिलभट्टानंतरच नव्हे, तर मंडनमिश्रानंतरही काही काळाने होऊन गेला असे स्पष्ट दिसून येईल.

---

१. म. म. डॉ. काणे यांचा रॉयल एशियाटिक सोसायटीच्या मुंबई शाखेच्या जर्नल (न्यू सीरीज, पु. ३, पृ. २८९–२९३) मधील लेख पाहा.

कुमारिलभट्टांनी 'श्लोकवार्तिका'च्या निरालम्बनवादप्रकरणात स्वप्नदर्शन, रज्जु-सर्प, गन्धर्वनगर इत्यादि ठिकाणची भ्राति निरालम्बन असते काय; या प्रश्नाची चर्चा करताना पाच श्लोक लिहिले आहेत. (श्लो. १०९ ते ११३ पाहा.) त्या श्लोकाचे व्याख्यान केल्यावर उम्बेकाने अन्य टीकाकाराचे मत 'अन्ये तु आलम्बनकथन-परत्वेन श्लोकपञ्चकं व्याचक्षते' अशा शब्दात देऊन नंतर त्याचे खंडन केले आहे. त्यावरून उम्बेक कुमारिलभट्टांचा साक्षात् शिष्य नसून त्या दोघांमध्ये बराच काळ गेला होता आणि त्या काळात 'श्लोकवार्तिका'वर अन्य टीकाही लिहिल्या गेल्या होत्या, असे स्पष्ट दिसते.

उम्बेकाने केवळ कुमारिलभट्टाच्या 'श्लोकवार्तिका'वरच टीका लिहिली असे नाही. त्याने मंडनमिश्राच्या 'भावनाविवेका'वरही टीका लिहिली आहे. त्या टीकेचे बारकाईने वाचन केले असता मंडनमिश्र आणि उम्बेक एकच हे विद्यारण्याचे मत चूक आहे असे स्पष्ट दिसते.[1] मूळ ग्रंथाला मंगल श्लोक नाही. पण उम्बेकाचार्यांच्या टीकेच्या आरंभी

यस्य स्फुरन्ति युगपत्सकलाः पदार्था
यश्चैक एव जगदारभते समग्रम् ।
तस्मै जगत्त्रयनताय महेश्वराय
कृत्वा नमः क्रियत एव मया प्रबन्धः ॥

असा मंगल श्लोक आढळतो. त्यावरूनही मूळ ग्रंथकार व टीकाकार एक नव्हते हे स्पष्ट दिसते. इतकेच नव्हे, तर टीकेवरून उम्बेक काही काळाने होऊन गेला असेही सिद्ध होते. उम्बेकाने अनेक ठिकाणी 'भावनाविवेका'चे भिन्न भिन्न पाठ देऊन चर्चा केली आहे. तेव्हा तो व मंडनमिश्र हे भिन्न होते एवढेच नाही, तर त्या दोघांमध्ये बऱ्याच मोठ्या कालाचे व्यवधान होते, आणि त्या कालात त्या ग्रंथाच्या अनेक प्रती झाल्यामुळे पठनपाठनात बरेच पाठभेद उत्पन्न झाले होते हे स्पष्ट आहे.

(४) उम्बेकाने 'गुरोरप्यवलिप्तस्य' इत्यादि श्लोक भाष्यकार शबरस्वामीच्या मताचे खंडन केल्यावर घातला आहे. त्यापूर्वीचे त्याचे शब्द असे आहेत—"श्येना-दीनां तु न साक्षात्प्राप्त्युपचारेण नापि तत्फलस्यानर्थत्वमिति तस्यानर्थत्वप्रतिपादनपरं 'श्येनो वज्र इषुः' इत्येवमादि भाष्यमुपेक्षणीयम् ।" तेव्हा 'गुरोरप्यवलिप्तस्य' इत्यादि 'महाभारता'तील श्लोक उद्धृत करताना 'भाष्यकार शबरस्वामी व श्लोक-

१. डॉ. राजा यांची 'श्लोकवार्तिकव्याख्ये'च्या आवृत्तीस जोडलेली प्रस्तावना, पृ. १८–२० पाहा.

वार्त्तिककार कुमारिलभट्ट यासारख्या पूज्य आचार्यांच्या मतांचे खंडन करतांना मर्यादानियम होत नाही, कारण त्यांची मते चूक आहेत, असे त्यास सुचवावयाचे होते. त्यावरून तो कुमारिलभट्टाचा शिष्य होता असे सिद्ध होत नाही.

( ५ ) जयमिश्र हा कुमारिलभट्टाचा पुत्र होता याला प्रमाण नाही. तोही स्वतःच्या टीकेत वार्त्तिककाराच्या अन्य टीकाकाराच्या मताचा उल्लेख व खंडन करताना दिसतो. त्यावरून तो वार्त्तिककार कुमारिलभट्टानंतर काही काळाने होऊन गेला हे उघड आहे. ' भट्टपुत्र ' हे विशेषण प्राचीन काळी ब्राह्मणाच्या नावामागे लावण्याचा प्रचार होता हे अनेक कोरीव लेखावरून दाखविता येते. उदाहरणार्थ, पाल नृपति प्रथम महीपाल याच्या बनगड ताम्रपटावील अनेक ब्राह्मणाच्या नावामागे ' भट्टपुत्र ' हे विशेषण लावलेले आढळते.[1] जबलपुर जिल्ह्यातील तिगोवा येथील गुप्तकालीन मंदिरात नंतर कोरलेल्या एक लेख आहे. त्यात ' भट्टपुत्र उमदेव ' याचा निर्देश आहे. तेव्हा ' भट्टपुत्र ' या विशेषणावरून जयमिश्र हा कुमारभट्टाचा पुत्र होता हे सिद्ध होत नाही. त्याची टीका उम्बेकाच्या टीकेनंतर लिहिलेली एका हस्तलिखितात दिसते. पण एवढ्यावरून जयमिश्र उम्बेकानंतर लागलीच झाला असे सिद्ध होत नाही. अशा जोड टीकांची इतरही काही उदाहरणे डॉ. राजा यांनी जयमिश्राच्या शर्करिका टीकेला लिहिलेल्या प्रस्तावनेत दिली आहेत. अर्थातच या प्रमाणावरून उम्बेक हा कुमारिल भट्टाचा शिष्य होता असे अनुमान करणेही शक्य नाही हे उघड आहे.

येथपर्यंत उम्बेक हा कुमारिलभट्टाचा शिष्य होता हे सिद्ध करण्याकरिता पुढे केलेली प्रमाणे कशी निर्बल आहेत हे दाखविले. आता **उम्बेकाच्या कालाच्या पूर्वापर मर्यादा निश्चित करू.**

**अन्तःप्रमाणे**—उम्बेकाने ' श्लोकवार्त्तिका 'वरील टीकेत अनेक प्रतिपक्षीयांच्या मताचा उल्लेख केला आहे.[2] तथापि त्यांपैकी बहुतेकांचे निर्देश द्वैतवादी, अद्वैतवादी, आत्माद्वैतवादी, नानाद्वैतवादी, याज्ञिक, शाक्य, क्षपणक, माध्यमिक अशा सामान्य रूपाने आहेत. त्यामुळे उम्बेकाच्या कालनिर्णयाला त्यांची काहीही मदत होत नाही. वैयक्तिक उल्लेख भर्तृमित्र, भर्तीश्वर स्वास्थ्यनायक माधव, उपवर्ष, वृत्तिकार व दिङ्नाग यांचे आले आहेत. त्यांपैकी उपवर्ष, वृत्तिकार व दिङ्नाग हे फार प्राचीन ग्रंथकार असल्यामुळे त्यांच्या निर्देशांचाही या बाबतीत काही उपयोग होत नाही. भर्तृमित्र हा कुमारिलभट्टाहून प्राचीन होता हे पार्थसारथिमिश्राच्या तद्विषयक उल्लेखावरून

१. ' एपिग्राफिया इंडिका ', पु. १४, पृ. ३२८.

२. डॉ. राजा यांची ' श्लोकवार्त्तिकव्याख्ये 'ला जोडलेली प्रस्तावना, पृ. ५०–५१.

अनुमानिता येते. भर्त्रीश्वर व सांख्यनायक माधव यांच्याविषयी काहीच माहिती नाही. 'भावनाविवेका 'वरील त्याच्या टीकेत अनेक पाठांचा उल्लेख असल्यामुळे तो मंडनमिश्रानंतर निदान पन्नास पाउणशे वर्षांच्या आत झाला नसावा. मंडनमिश्राचा काल सामान्यतः इ. स. ७०० ते ७२५ असा धरला जातो. तेव्हा उम्बेकाच्या कालाची पूर्व मर्यादा सुमारे इ. स. ७७५ धरावयास हरकत नाही.

*बाह्य प्रमाणे*—आता आपण बाह्य प्रमाणांकडे वळू. उम्बेक हा फार मोठा मीमांसक होऊन गेला. एका प्राचीन पारंपरिक श्लोकात म्हटले आहे—

उम्बेकः कारिकां वेत्ति तन्त्रं वेत्ति प्रभाकरः ।
वामनस्तूभयं वेत्ति नोभयं वेत्ति रेवणः ।।

काही ठिकाणी 'मण्डनस्तूभयं वेत्ति' असाही पाठ आहे. उम्बेकाची मते अनेक ग्रंथकारांनी उल्लेखिली आहेत. त्यामध्ये बौद्ध तत्त्वज्ञ शांतरक्षिताच्या 'तत्त्वसंग्रह 'नामक ग्रंथाचा टीकाकार कमलशील हा कालक्रमाने पहिला आहे. तत्त्वसंग्रहाच्या एका श्लोकात वेद हे पौरुषेय आहेत असे प्रतिपादिले आहे.[1] या श्लोकावर व्याख्या करिताना कमलशीलाने उंवेयक नामक ग्रंथकाराचे मत देऊन त्यावर टीका केली आहे. वेद हे अपौरुषेय व स्वतःप्रमाण आहेत असे मीमांसकांचे मत आहे. कुमारिलभट्टांनी हे मत 'श्लोकवार्तिका 'च्या शब्दपरिच्छेदप्रकरणात प्रतिपादिले आहे. त्यावर उम्बेकाची व्याख्या आहे. तथापि कमलशीलाने आपल्या टीकेत उंवेयकाचे मत जितके सविस्तर दिले आहे तितके उम्बेकाच्या 'श्लोकवार्तिका 'वरील व्याख्येत दिसत नाही. उम्बेकाहून भिन्न असा उंवेयक नामक दुसरा कोणी ग्रंथकार कुमारिल व कमलशील यांच्या मधील काळात झालेला माहीत नाही. तेव्हा उंवेयक हे उम्बेकाचेच लेखकाच्या प्रमादाने झालेले अपभ्रष्ट रूप असावे.[2] तसे असल्यास उम्बेकाचा वेदांचे अपौरुषेयत्व व स्वतःप्रामाण्य सिद्ध करणारा दुसरा एखादा ग्रंथ असावा असे वाटते. कमलशील हा शांतरक्षिताचा शिष्य असून तो इ. स. ८०० ते ८२५ ह्या काळात होऊन गेला. तेव्हा उम्बेक त्यापूर्वी इ. स. ७७५ ते ८०० या काळात झाला असावा.

यानंतर श्रीदेवाच्या 'स्याद्वादरत्नाकरा 'त उम्बेकाच्या मताची चर्चा आहे. श्रीदेव खिस्तोत्तर ११०० च्या सुमारास होऊन गेला. यापुढील उल्लेख चित्सुखाचार्यांच्या

---

१. 'तत्त्वसंग्रह' (गायकवाड्स् ओरिएंटल सीरीज) भाग २, पृ. ८१२, स्वतःप्रामाण्य प्रकरण पाहा.

२. उम्बेक नावाचे 'ओवक' असे अपभ्रष्ट रूप श्रीदेवाच्या 'स्याद्वादरत्नाकरा 'त आढळते असे डॉ. राजानी दाखविले आहे. जयमिश्राच्या श्लोकवार्त्तिकटीकेची प्रस्तावना, पृ. १२ पाहा.

मताची तत्त्वप्रदीपिका किंवा चित्सुखी या ग्रंथात पुढीलप्रमाणे आला आहे. 'उक्तं चैतदुम्बेकेन । यथाऽङ्गुल्यग्रे हस्तियूथशतमास्ते तत्रार्थव्यभिचार' स्फुट इति । ( एखाद्याने आपणास असे सांगितले की अंगुलीच्या टोकावर हत्तींचे शंभर कळप राहिले आहेत तर तो आप्त किंवा सामान्यतः यथार्थ वक्ता असला तरी त्याचे म्हणणे खरे असणे शक्य नाही, हे उघड आहे, असे उम्बेकाने म्हटले आहे. ) चित्सुखाचार्य खिस्तोत्तर तेराव्या शतकात होऊन गेले. यानंतर पार्थसारथिमिश्राच्या 'शास्त्रदीपिका' ग्रंथावरील 'युक्तिस्नेहप्रपूरिणी' सिद्धान्तचन्द्रिका नामक टीकेत रामकृष्णाने उम्बेकाचे अनेक उतारे दिले आहेत, ते सर्व आता त्याच्या श्लोकवार्त्तिकव्याख्येत सापडतात हे डॉ. राजानी दाखविले आहे. हा रामकृष्ण उत्कल ( ओरिसा ) देशाधिपति प्रतापरुद्र गजपति याच्या दरबारी होता असे त्याच्या टीकेतील प्रास्ताविक श्लोकावरून दिसते. प्रतापरुद्राने सुमारे इ. स. १४९७ ते १५३९ पर्यंत राज्य केले. तेव्हा सोळाव्या शतकातही उम्बेकाच्या ग्रंथाचा प्रचार होता असे दिसते.

वरील विवेचनावरून उम्बेक हा इ. स. ७७५ ते ८०० या काळात होऊन गेला असे दिसून येईल.

### भवभूति आणि उम्बेक एकच काय ?

आता आपण 'भवभूति आणि उम्बेक हे एकच किंवा भिन्न ?' हा प्रश्न घेऊ.

भवभूति ह्याने सुमारे इ. स. ७००–७३० या कालात आपली नाटके रचली असावी असे आपण 'राजतरंगिणी'तील उल्लेख आणि इतर प्रमाणे यावरून सिद्ध केले आहे. तेव्हा तो इ. स. ७७५ नंतर होऊन गेलेल्या उम्बेकाचा समकालीन असणे शक्य नाही हे उघड आहे. तथापि त्यांचे उम्बेकाशी ऐक्य प्रतिपादणाऱ्या प्रमाणांचाही विचार केला पाहिजे. ती प्रमाणे येणेप्रमाणे—

### भवभूति आणि उम्बेक यांच्या एकत्वाची प्रमाणे

( १ ) 'मालतीमाधवा'च्या सुमारे पाचशे वर्षे जुन्या असलेल्या हस्तलिखितात ते नाटक उम्बेकाने लिहिले असे म्हटले आहे. म्हणून भवभूति आणि उम्बेक एक होत.

( २ ) उम्बेकाने 'श्लोकवार्त्तिका'वरील आपल्या तात्पर्यटीकेच्या आरंभी

ये नाम केचिदिह नः प्रथयन्त्यवज्ञां
जानन्ति ते किमपि तान्प्रति नैष यत्नः ।
उत्पत्स्यतेऽस्ति मम कोऽपि समानधर्मा
कालो ह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी ॥

हा श्लोक घातला आहे. हाच श्लोक 'मालतीमाधवा'च्या प्रस्तावनेत आला आहे. भवभूति आपल्या श्लोकांची स्वतःच्या नाटकात अनेकदा पुनरुक्ति करतो. तेव्हा त्याने

'मालतीमाधवा 'तला श्लोक 'श्लोकवार्तिका 'वरील आपल्या टीकेच्या आरंभी घातला असल्यास आश्चर्य नाही. म्हणून उम्बेक व भवभूति हे एकच होत.

(३) चित्सुखाचार्यांच्या 'तत्त्वप्रदीपिके 'त (निर्णयसागर आवृत्ति, पृ. २६९) पुढील उतारा आला आहे.

तस्माच्छास्त्र शब्दविज्ञानादसंनिकृष्टे बुद्धिरिति लक्षणमलक्षणम्। तथा आप्तवाक्यं शब्दप्रमाणमिति नैयायिकानामपि।

आप्तोदीरितवाक्येषु मालतीमाधवादिषु।
व्यभिचाराद्य तदुक्तमाप्तत्वस्यानिरुक्तितः॥

स्वकपोलकल्पितमालतीमाधवादिवाक्येषु प्रामाण्याभावादतिव्याप्तिः। न हि पुरा आप्त एव सन् नाटकनाटिकादिप्रबन्धविरचनमात्रेणानाप्तो भवति भवभूतिः। उक्तं चैतदुम्बेकेन — 'यदाप्तोऽपि करुर्मचिदुपदिशति न स्वयाननुभूतार्थविषयं वाक्यं प्रयोक्तव्यम्। यथा अङ्गुल्यग्रे हस्तियूथशतमास्ते' इति। स्वार्थव्यभिचारः स्फुटः॥

[नैयायिक शब्दप्रमाण मानतात. त्यावर चित्सुखाचार्यांची ही टीका आहे. शब्दप्रमाणाची व्याख्या 'आप्तवाक्यं शब्दः' अशी नैयायिक करतात. शब्द म्हणजे आप्तांचे वचन. वस्तूंचे यथार्थ ज्ञान देणाऱ्यास आप्त म्हणतात. नैयायिकांचे हे प्रमाण मानल्यास अतिव्याप्तिदोष येतो. भवभूति शास्त्रपारंगत असल्याने त्याचे शास्त्रीय ग्रंथ शब्दप्रामाण्याखाली येऊ शकतील. पण 'मालतीमाधवा 'दि नाटकनाटिका त्यानेच रचल्या असल्याने त्याही प्रमाण मानाव्या लागतील. ही नाटकें स्वकपोलकल्पित किंवा काल्पनिक आहेत हे सर्वांस माहीत आहे. शास्त्रीय ग्रंथ रचणारा भवभूति आप्त आणि नाटकें रचणारा मात्र अनाप्त असें म्हणता येणार नाही. उम्बेकानेही म्हटले आहे की आप्तसुद्धा 'ज्याचा स्वतःला अनुभव नाही असें काही सांगू नये' असाच उपदेश करतात. उदाहरणार्थ, (अमक्याच्या) अंगुलीच्या टोकावर हत्तींचे शंभर कळप राहतात असें सांगू नये, कारण त्यातील असत्यता स्पष्ट दिसेल.]

'चित्सुखी 'वरील नयनप्रसादिनी टीकेत या उताऱ्यावर खालील टीप दिली आहे. भवभूतिरुम्बेकः। एतदेव ग्रन्थान्तरस्थेन तद्वचनेन संमवयति। (भवभूति हाच उम्बेक होय. वर जें म्हटले आहे ते त्याच्याच म्हणजे भवभूतीच्या अन्य ग्रंथातील वचनावरून समर्थित करतात—'उक्तं चैतदुम्बेकेन' या शब्दांनी.) तेव्हा भवभूति आणि उम्बेक हे एकच होत.

### वरील प्रमाणांचे परीक्षण

आता आपण वरील प्रमाणांचे परीक्षण करूं.

( १ ) पहिल्या प्रमाणाबद्दल मागे सविस्तर विवेचन केले आहे. भवभूतीच्या नाटकाच्या अनेक हस्तलिखितांचा पुरावा दूर सारून केवळ एका हस्तलिखितातील विधानावर विश्वास ठेवणे योग्य नाही. भवभूति स्वतःच्या ग्रंथात उम्बेक असे स्वतःचे नाव देत नाही, तसेच उम्बेकही आपल्या टीकात कोठेही आपला भवभूति या नावाने निर्देश करीत नाही. इतराचा पुरावा या बाबतीत काय कामाचा ?

शिवाय भवभूति हा विदर्भातील ब्राह्मण होता. त्याच्या पूर्वजाची महाकवि, गोपाल, नीलकंठ ही नावे तत्कालीन महाराष्ट्रीय ब्राह्मणाच्या नावासारखी आहेत. याच्या उलट उम्बेक हे नाव द्राविड देशातील आहे हे स्पष्ट दिसते. या नावातील भिन्नतेवरूनही भवभूति आणि उम्बेक भिन्न वाटतात.

( २ ) ' श्लोकवार्तिका 'वरच्या उम्बेकाच्या तात्पर्यटीकेचे फक्त एकच अपूर्ण हस्तलिखित आजपर्यंत सापडले आहे. त्यावरून पं. एस्. के. रामनाथशास्त्री यानी त्याचा काही भाग ( पृ. १-३८४ ) संपादिला व बाकीचा ( पृ. ३८५-४७४ ) डॉ. कुन्हन राजानी तयार केला. हा ग्रंथ मद्रास विश्वविद्यालयाच्या संस्कृत ग्रंथमालेत ( क्र. १३ ) सन १९४० मध्ये प्रसिद्ध झाला आहे. या ग्रंथाला डॉ. राजानी विस्तृत प्रस्तावना जोडली आहे. तीत ते म्हणतात, " हे हस्तलिखित अत्यंत जीर्ण स्थितीत आहे. त्याच्या पहिल्या पृष्ठावरचा बराच भाग नष्ट झाला आहे. त्यामुळे आरंभीची एक ओळ पूर्णपणे गेली आहे. दुसऱ्या व तिसऱ्या ओळीतील अक्षरेही नष्ट झाली आहेत. ' ये नाम कचिदिह नः ' इत्यादि श्लोक आता मुळीच दिसत नाही. त्यातील अक्षराची संख्या पाहता तो पहिल्या ओळीत आला असणे अशक्य नाही खरे, पण तो तेथे आला असेल असे वाटत नाही. कारण ( १ ) तो श्लोक या टीकेच्या आरंभी अनुरूप वाटत नाही. भवभूति विद्वान् व शास्त्रपारंगत होता. असा गृहस्थ नाटके लिहू लागला तर त्याला लोक हसतील. हीच गोष्ट भवभूतीच्या बाबतीत घडली असावी. त्याने ' महावीरचरित ' लिहिल्यावर विद्वानात त्याची मानखंडना झाली असावी. म्हणून त्याने त्यानंतरच्या ' मालतीमाधव ' नाटकात आपल्या टीकाकारास ' ये नाम केचिदिह नः प्रथयन्त्यवज्ञाम् ' इत्यादि शब्दात उत्तर दिले आहे. त्या नाटकात तो श्लोक प्रसंगानुरूप आहे. पण भवभूति व उम्बेक हे एकच असल्यास ' श्लोकवार्तिका '-वरील टीकेच्या आरंभी तो योग्य दिसत नाही. कारण त्यासारख्या शास्त्रीय ग्रंथ लिहिणाऱ्याची लोकात अवज्ञा कशी होईल ? ( २ ) हा श्लोक त्या टीकेच्या आरंभी आला असल्यास त्यापूर्वी अवश्य असलेल्या मंगल श्लोकाला तेथे ( पहिल्या ओळीत ) पुरेशी जागा राहत नाही. उम्बेकाने ' भावनाविवेका 'वरील आपल्या टीकेच्या आरंभी ' यस्य स्फुरन्ति युगपत् सकलाः पदार्थाः ' इत्यादि मागे उद्धृत केलेला श्लोक दिला आहे. त्यावरून तो ग्रन्थारंभी मंगल श्लोक घालीत असे हे स्पष्ट आहे. '

वरील दोन कारणावरून ' ये नाम केचिदिह नः ' इत्यादि श्लोक ' श्लोकवार्तिका 'वरील उम्बेकाच्या टीकेच्या आरंभी होता काय याविषयी डॉ. राजा यांस संशय वाटतो. त्या टीकेचे एकच हस्तलिखित व तेही जीर्ण अवस्थेत सापडले असल्याने या बाबतीत निश्चित विधान करणे अशक्य आहे. तथापि वरील श्लोक त्या हस्तलिखितात होता असे मानले तरी तो तेथे अननुरूप असल्याने तो मूळचा उम्बेककृत नसून भवभूति व उम्बेक हे एकच होत असे मानणाऱ्या कोणा लेखकाने समासात ( मार्जिनमध्ये ) लिहिला असावा व नंतर तो टीकेत शिरला असे अनुमान डॉ. राजा यांनी केले आहे. ते पुढे म्हणतात—' तो श्लोक येथे उम्बेकाने घातला होता असे मानले तरी त्यावरून त्याचे भवभूतीशी ऐक्य प्रस्थापित होत नाही. कारण, ( १ ) इतर काही लेखका-प्रमाणे त्याने तो आपल्या पूर्वीच्या ( भवभूतीच्या ) ' मालतीमाधवा 'तून घेतला असेल. ( २ ) उम्बेक मोठा मीमांसक होता, पण भवभूति मीमांसक नसून वेदान्ती होता. त्याने आपल्या नाटकात परमहंस ज्ञाननिधि नामक गुरूचा आदरपूर्वक निर्देश केला आहे. तसेच विवर्तादि वेदान्ताच्या संज्ञा योजिल्या आहेत, त्यावरूनही हे स्पष्ट दिसते. तेव्हा भवभूति व उम्बेक हे एकच, हे मत निराधार आहे.

डॉ. राजा यांचा सिद्धांत आम्हास मान्य असला तरी त्यांनी त्यास दिलेली कारणे मात्र आम्हास उपयुक्तिक वाटत नाहीत. ' ये नाम केचिदिह नः ' इत्यादि श्लोक उम्बेकाच्या तात्पर्यटीकेच्या हस्तलिखितात आरंभी होता, असे पं. रामनाथ शास्त्री हे सांगत असल्यामुळे त्याविषयी संशय घेण्यास जागा नाही. तो श्लोक टीकेच्या आरंभी अनुरूप नाही हे म्हणणे आम्हास पटत नाही. उम्बेक हा जाडा मीमांसक होता. पूर्वमीमांसेच्या अनेक प्रश्नांवर त्याची मते इतरांच्याहून निराळी होती, हे पार्थसारथिमिश्राच्या ' शास्त्रदीपिके 'वरील टीकेत त्याच्या मताचे जे अनेक उल्लेख आले आहेत त्यावरून स्पष्ट दिसते. या कारणास्तव त्याच्या हयातीतच त्याच्या मतावर टीका झाली असल्यास नवल नाही. तो मोठा मानी व स्पष्टवक्ता होता, हे शबरस्वामी व कुमारिलभट्ट यांच्या मतावरील त्याच्या प्रखर टीकेवरून तसेच त्याने ' गुरोरप्यवलिप्तस्य ' इत्यादि जो श्लोक उद्धृत केला आहे त्यावरूनही उघड आहे. अशा मानी गृहस्थाला स्वकालीनांनी केलेला अनादर सहन न होऊन ' माझ्या ग्रंथाचे महत्त्व जाणणारा कोठे तरी असेल, किंवा पुढे मागे उत्पन्न होईल. त्याच्याकरिता मी हे लिहीत आहे, तुमच्या करिता नव्हे ' असे आपल्या टीकाकारास सांगावेसे वाटल्यास आश्चर्य नाही. हे आपले मनोगत व्यक्त करण्यास भवभूतीचा ' ये नाम केचिदिह नः प्रथयन्त्यवज्ञाम् ' इत्यादि श्लोक उत्कृष्ट आहे असे वाटून नवा श्लोक न रचता त्याने तो उद्धृत केला असावा. त्या श्लोकात भवभूतीचे नाव नसल्याने तो उम्बेकाच्या बाबतीतही तितकाच अनुरूप होत होता. उम्बेकाने ' गुरोरप्यवलिप्तस्य ' इत्यादि

दुसराही अन्यकृत श्लोक स्वमतसमर्थनार्थ उद्धृत केला आहे. अशा प्रकारे टीकाकारांनी प्राचीन ग्रंथातून श्लोक घेऊन त्यांचा आपल्या ग्रंथात उपयोग केल्याची काही उदाहरणे डॉ. राजांनी दिली आहेत. दण्डीच्या 'काव्यादर्शा'तील 'चतुर्मुखमुखाम्भोजवनहंसवधूर्मम । मानसे रमतां नित्यं सर्वशुक्ला सरस्वती ॥' हा मंगलश्लोक त्यानंतर कित्येक शतकांनी होऊन गेलेल्या उवटाने आपल्या 'सर्वानुक्रमणीभाष्या'त आरंभी घातला आहे. तसेच बाणाच्या कादम्बरीतील 'रजोजुषे जन्मनि सत्त्ववृत्तये' इत्यादि मंगलश्लोक माधव नामक सामवेदटीकाकाराने ग्रंथारंभी दिला आहे. अशा तऱ्हेची उदाहरणे काही कोरीव लेखांतही आढळतात. उदाहरणार्थ, चालुक्यनृपति द्वितीय त्रिभुवनमल्ल याच्या शक सवत् १००६ च्या हद्दली येथील कोरीव लेखात बाणाच्या 'हर्षचरिता'च्या आरंभीचा 'नमस्तुङ्गशिरश्चुम्बिचन्द्रचामरचारवे । त्रैलोक्यनगरारम्भमूलस्तम्भाय शम्भवे ॥' हा मंगलश्लोक दिला आहे. तेव्हा 'ये नाम केचिदिह नः' इत्यादि केवळ समान श्लोकांवरून भवभूति व उम्बेक हे एकच असे म्हणता येत नाही.

डॉ. राजा यांची इतर प्रमाणे मात्र आग्रहास ग्राह्य वाटत नाहीत. 'ये नाम केचिदिह नः' इत्यादि श्लोक हस्तलिखिताच्या आरंभी असता तर त्या पहिल्या ओळीत मंगल श्लोकास जागा राहिली नसती हे प्रमाण निरपवाद नाही. सर्वच ग्रंथकार आपल्या सर्व ग्रंथांच्या आरंभी मंगलश्लोक घालतात, असे नाही. उदाहरणार्थ, मंडनमिश्रांच्या 'भावनाविवेका'च्या आरंभी तसा श्लोक नाही. तसेच, भवभूति हा वेदान्ती असल्यामुळे त्याने पूर्वमीमांसेवर ग्रंथ लिहिला असणे शक्य नाही, हे प्रमाणही सबळ नाही. भवभूति विद्वान् श्रोत्रियकुलात जन्मला होता. त्याच्या पूर्वजांनी सोमयाग केले होते. ते वेद-वेदांगांच्या पठनपाठनात तसेच पञ्चाग्निहवनात व्यापृत असत. अशा कुलात वाढलेला भवभूति पूर्वमीमांसानभिज्ञ असेल असे वाटत नाही. किंबहुना, या बाबतीत अनुमान करण्याचीही जरूरी नाही. आपल्या नाटकाच्या प्रस्तावनेत तो स्वतःचे 'पदवाक्यप्रमाणज्ञ' असे वर्णन करतो. यातील 'वाक्य' पदाने मीमांसा, विशेषेकरून पूर्वमीमांसा, अभिप्रेत आहे. कारण पूर्वमीमांसेत वेदवाक्यांचा अर्थ करण्याचे नियम दिले आहेत. भवभूतीच्या नावावर असलेले पूर्वमीमांसेचे ग्रंथ अद्यापि सापडले नाहीत हे खरे. पण हे प्रमाण केवळ अभावात्मक आहे. कदाचित् पुढेमागे असे ग्रंथही प्रकाशात येतील. भवभूतीने आपल्या ज्ञानाचे वर्णन करताना 'यद्वेदाध्ययनं तथोपनिषदां साङ्ख्यस्य योगस्य च । ज्ञानं तत्कथनेन किम्' इत्यादि श्लोकात पूर्वमीमांसेचा उल्लेख केला नाही, असा आक्षेप कित्येक विद्वान् घेतात, पण त्यात तथ्य नाही; कारण वरील श्लोकात उपनिषदांच्या उल्लेखाने जसे त्याचे वेदान्तज्ञान अभिप्रेत आहे तसेच 'वेदाध्ययन' शब्दाने पूर्वमीमांसेचे अध्ययन सूचित आहे. भवभूतीने तन्त्रशास्त्राचा अभ्यास केल्याचाही वरील श्लोकात निर्देश नाही. तथापि अभिनवगुप्ताने आपल्या 'तन्त्रालोका'त

गुरुशिवाय दीक्षा, अभिषेक इत्यादिकांनी प्रातिभ ज्ञान प्राप्त होत नाही, या मताचे खंडन करताना भवभूतीचा उल्लेख खालील श्लोकात केला आहे.[१]

असदेतदिति प्राहुर्गुरवस्तत्त्वदर्शिनः ।
श्रीसोमानन्दकल्याणभवभूतिपुरोगमाः ।
तथाहि श्रीशिकाशास्त्रविवृतौ तेऽभ्यधुर्बुधाः ।।

त्यावरून भवभूतीचा तन्त्रशास्त्रावर ग्रंथ होता हे स्पष्ट दिसते. तसा त्याचा पूर्वमीमांसेवरही असेल. तेव्हा केवळ या अभावात्मक प्रमाणावरून त्याचे उम्बेकाहून भिन्नत्व सिद्ध होत नाही.

( ३ ) ' चित्सुखी 'तील उल्लेखाचे जरा बारकाईने वाचन केल्यास चित्सुखाचार्यांसही भवभूति व उम्बेक हे एक वाटत नव्हते, हे दिसून येईल. ते म्हणतात, ' न हि पुरा आप्त एव सन् नाटकनाटिकादिप्रबन्धविरचनमात्रेण अनाप्तो भवति भवभूतिः । उक्तं चैतदुम्बेकेन ' यदाप्तोऽपि कस्मैचिदुपदिशति —" इत्यादि. भवभूति व उम्बेक हे एकच असे चित्सुखाचार्यांचे मत असते तर त्यांनी ' उक्तं चैतदुम्बेकेन ' असे न म्हणता ' उक्तं च तेनैव ' असे म्हणून त्यापुढील उम्बेकाच्या टीकेतील उतारा दिला असता. ' चित्सुखी 'च्या टीकाकाराने ' भवभूतिरुम्बेकः ' असे म्हटले आहे खरे, पण तो अलीकडचा ग्रंथकार आहे. त्याच्या त्या विधानावरून त्याच्या काळी भवभूति व उम्बेक एक होत असा समज प्रचलित झाला होता, एवढेच आपणास म्हणता येईल.

हा समजही कसा उत्पन्न झाला हे सांगणे कठीण नाही. त्याचे कारण एकच. ते म्हणजे ' ये नाम केचिदिह नः प्रथयन्त्यवज्ञाम् ' इत्यादि श्लोक. हा श्लोक ' मालतीमाधवा 'त भवभूतीने स्वतःचा वृत्तान्त देताना घातला आहे, हे टीकाकारास माहीत होते. तोच श्लोक ' श्लोकवार्तिका 'वरील उम्बेकाच्या टीकेच्या आरंभी दिसल्यावर भवभूति व उम्बेक हे एकच असा टीकाकाराचा समज झाला असावा. तसेच उम्बेकाने ज्या ठिकाणी ' गुरोरप्यवलिप्तस्य ' इत्यादि श्लोक उद्धृत केला आहे त्या ठिकाणी कुमारिलाच्या मताचे खंडन असल्याने तो कुमारिलाचा शिष्य होता अशी समजूत रूढ झाली. कुमारिलाचा शिष्य मंडनमिश्र हा सुविख्यात मीमांसक होऊन गेला. उम्बेकही तसाच जाडा मीमांसक होता व तो कुमारिलभट्टांना गुरु मानतो असे वाटल्यामुळे उम्बेक व मंडनमिश्र एकच असाही समज उत्पन्न झाला. तो विद्यारण्याच्या ' शंकरदिग्विजया 'त ' उम्बेक इत्यभिहितस्य हि यस्य लोके ' इत्यादि पूर्वोक्त श्लोकात स्पष्ट दिसतो. मंडनाने संन्यास घेऊन सुरेश्वर असे नाव धारण केले असे ' शंकर-

---

१. हा उतारा माझे मित्र डॉ. ग. त्र्य. देशपांडे यांनी प्रथम माझ्या नजरेस आणून दिला म्हणून मी त्यांचा आभारी आहे.

दिग्विजया 'त वर्णिले आहे. म्हणून मंडनमिश्र, उम्बेक, भवभूति व सुरेश्वर हे एकच असे मानले गेले. विद्यारण्याच्या 'शंकरदिग्विजया 'त मंडनमिश्रांना अनेक ठिकाणी विश्वरूप म्हटले आहे. तेव्हा भवभूति, सुरेश्वर व विश्वरूप ही तीन्ही नावे एकाच व्यक्तीची होत, असे वाटून 'याज्ञवल्क्यस्मृती 'च्या 'बालक्रीडा' टीकेच्या एका उपटीकाकाराने पुढील श्लोकात त्या तिघांचे ऐक्य कल्पिले आहे—यत्प्रसादादयं लोको धर्ममार्गस्थितः सुखी । भवभूतिसुरेशाख्यं विश्वरूपं प्रणम्य तम् ॥ साराश, टीकाकाराची सर्व मते एकत्र केल्यावर मंडन, सुरेश्वर, विश्वरूप, उम्बेक आणि भवभूति अशी पाच नावे एकाच व्यक्तीने धारण केली होती, असे मानावे लागेल. या मतामुळे संस्कृत वाङ्मयाच्या इतिहासात अत्यंत घोटाळा उत्पन्न झाला आहे. ही सर्व गुंतागुंत उलगडण्याचा प्रयत्न येथे केला नाही. पण भवभूति व उम्बेक हे भिन्न होते हे मात्र सिद्ध करण्यास पुरेशी प्रमाणे आहेत, ती प्रस्तुत परिशिष्टात मांडली आहेत.

* * *

भवभूति आणि उम्बेक यांच्यावरील प्रस्तुत लेख मराठीत सन १९५७ मध्ये 'महाराष्ट्र साहित्यपत्रिके 'त ( वर्ष ३१, अं. १२० ) प्रसिद्ध झाला होता. त्यावर म. म. डॉ. पा. वा. काणे यांनी काही आक्षेप 'उत्तररामचरिता 'च्या चौथ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत घेतले आहेत. त्याचाही विचार येथे केला पाहिजे.

## डॉ. काणे यांचे आक्षेप

डॉ. काणे यांनी आमच्या मतावर पुढील आक्षेप घेतले आहेत—

( १ ) प्रा. मिराशी उम्बेक हा इ. स. ७७५ ते ८०० या सुमारास होऊन गेला असे मानतात. पण प्राचीन किंवा मध्ययुगीन कालातील ग्रंथकर्त्यांचे काल हे अस्थिर असतात. उम्बेक इ. स. ७५० च्या सुमारास झाला असणे शक्य आहे. तो कुमारिलाचा शिष्य होता. भवभूति आठव्या शतकाच्या पहिल्या पादात होऊन गेला. तो त्या शतकाच्या दुसऱ्या पादातही आणखी काही वर्षे असावा. तो सन ६८० च्या सुमारास जन्मला असल्यास त्याने आपल्या म्हातारपणात इ. स. ७५० किंवा ७६० या वर्षी ( उम्बेकाच्या नावावर मोडणारे ) मीमांसाविषयक ग्रंथ लिहिले असणे अशक्य नाही. एखाद्या ग्रंथकाराचे ग्रंथकर्तृत्व ५० किंवा ६० वर्षे चालणे शक्य असते. आमचीच गोष्ट घ्याना. आमची 'साहित्यदर्पणा 'ची आवृत्ति आम्ही ३० वर्षांचे असताना सन १९१० मध्ये प्रसिद्ध झाली आणि आमचा 'हिस्टरी ऑफ धर्मशास्त्र ' हा ग्रंथ आता १९६२ मध्ये पूर्ण होत आहे.

( २ ) उम्बेक हे नाव संस्कृतोद्भव नाही. पण एवढ्या एका कारणाकरिता उम्बेक व भवभूति हे भिन्न मानणे योग्य होणार नाही. उम्बेक हे नाव उमा शब्दापासून

निघाले असावे. उमा याचे पालि भाषेत उम्बा आणि दक्षिणभारतातील भाषात उम्बो असे झाले असावे. उम्बापासून औंबेय आणि औंबेयक असे शब्द बनले असावे. ( उम्बायाः अयम् इति औम्बेयकः । ) भवभूतीच्या मातेचे नाव उमा असावे.

भवभूति द्राविड भूमीशी आणि तेथील वाक्प्रचाराशी परिचित होता हे 'उत्तर-रामचरिता'चा टीकाकार घनश्याम याने दाखविले आहे. त्या नाटकाच्या दुसऱ्या अंकात लक्ष्मणाचा पुत्र चन्द्रकेतु हा अश्वमेधाच्या अश्वाचे रक्षण करीत असल्याचे ऐकून वासंती उद्गारते, 'हन्त, मातर्जीवामि ।' असे उद्गार द्राविड स्त्रिया काढतात असे घनश्याम सांगतो.

भवभूतीने नाटके लिहून झाल्यावर पूर्वमीमांसेचा अभ्यास करून काही मीमांसा ग्रंथावर टीका लिहिल्या असाव्या आणि नंतर त्याला दक्षिण भारतीय ग्रंथकारांकडून उंबेक असे नामाभिधान प्राप्त झाले असावे. पूर्वमीमांसेचे अध्ययन खिस्तोत्तर सहाव्या शतकानंतर दक्षिणेतच—विशेषतः केरलात—होत असे. भवभूतीला करल देश परिचित होता, याचे एक गमक मालतीमाधवाच्या तिसऱ्या अंकात सापडते. लवङ्गिकेने काम-विह्वळ माधवाच्या वर्णनात[1] कृतककोपाने ज्याचे कपोल रक्तवर्ण झाले आहेत अशा केरलसुन्दरींचा उल्लेख केला आहे त्यावरुन भवभूतीला केरल देश परिचित होता व तेथे त्याने पूर्वमीमांसेचे अध्ययन आपल्या वार्धक्यात केले, असे दिसते.

## डॉ. काणे यांच्या आक्षेपास उत्तरे

डॉ. काणे याचे आक्षेप व स्पष्टीकरणे शक्य तो त्यांच्या शब्दात दिली आहेत. ती सर्व तर्कात्मक आहेत. त्याना काहीचाही आधार नाही. डॉ. काणे यांनी अन्य संदर्भात 'काव्यमीमांसा' या ग्रंथावर टीपा लिहिणाऱ्याच्या बाबतीत जे उद्गार काढले आहेत ते त्यांच्या स्वतःच्या वरील संशोधनास लागू पडतात काय हे विचारी वाचकांनी ठरवावे. "This is an example of how research becomes vitiated by conjectures and carelessness. People make conjectures, often assume what is to be proved by independent evidence and do not see that they are arguing in a circle." ( तर्क आणि निष्काळजीपणा याच्या योगाने संशोधन कसे दूषित होते याचे हे उदाहरण आहे. लोक तर्क करतात, जे स्वतंत्र पुराव्याने सिद्ध करावयास पाहिजे तेच गृहीत धरतात आणि आपण तर्काच्या चक्रकापत्तीत सापडलो आहो, हे लक्षात घेत नाहीत. )

---

१. हे वर्णन माधवाचे नाही, मालतीचे आहे.

भवभूति आणि उम्बेक एक का, तर भवभूतीला उंबेक (औंबेयक) हे नाव त्याच्या उंबानामक मातेवरुन मिळाले होते म्हणून; आणि भवभूतीच्या मातेचे नाव उम्बा कशावरून, तर त्याचे उम्बेक हे दुसरे नाव होते म्हणून. यातील चक्रकापत्ति कोणाच्याही लक्षात यावी इतकी स्पष्ट आहे.

आता डॉ. काणे यांच्या आक्षेपाचे थोडक्यात परीक्षण करू.

## उम्बेक भवभूतींनंतर काही काळाने होऊन गेला

आक्षेप पहिला – डॉ. काणे यांच्या मते कुमारिल सन ६५० ते ७०० या कालात होऊन गेला. उम्बेकाच्या कुमारिलकृत 'श्लोकवार्त्तिक' आणि मण्डनमिश्रकृत '*भावनाविवेक' या ग्रंथावरील टीकातील उल्लेखावरुन तो त्या दोघांनंतर बऱ्याच* काळाने होऊन गेला असे दिसते. अर्थातच तो कुमारिलाचा शिष्य होणे शक्य नाही. आणि त्याचा काल सन ७०० ते ७५० हा मानणेही शक्य नाही. 'उत्तररामचरिता'च्या तिसऱ्या आवृत्तीत डॉ. काणे 'भवभूति' इ. स. च्या आठव्या शतकाच्या पहिल्या पादात होऊन गेला असे म्हणत होते. आता तो त्या शतकाच्या दुसऱ्या पादातही होता, असे म्हणतात. आणि त्या योगे त्याचे उम्बेकाशी ऐक्य साधू पाहतात. *यात जे सिद्ध करावयाचे तेच गृहीत धरल्यासारखे ( begging the question )* होते. अन्य प्रमाणानी भवभूति व उम्बेक यांचे ऐक्य सिद्ध होत असते तर डॉ. काणे यांच्याप्रमाणे भवभूतिही दीर्घायुषी होता असे मानता आले असते. पण तसा स्वतंत्र पुरावा उपलब्ध नाही.

## भवभूति द्राविड देशात राहिला नव्हता

आक्षेप दुसरा—भवभूति कधीकाळी दक्षिणभारतात—केरळसारख्या दूरप्रांतात—मीमांसेच्या अध्ययनाकरिता गेला होता याला काडीचाही आधार नाही. त्याचे पूर्वज वेदविद्येचे पारंगत पंडित होते. तो स्वतः 'पदवाक्यप्रमाणज्ञ' होता. तेव्हा त्याला पूर्वमीमांसेच्या अध्ययनाकरिता केरळसारख्या दूरदेशी जाण्याची मुळीच आवश्यकता नव्हती. म्हणून दक्षिण देशात राहिल्यामुळे त्याला 'उम्बेयक' हे नाव पडले हे अनुमान बिनबुडाचे ठरते. केरलसुंदरीच्या कृतकोपमूलक रक्तवर्ण कपोलावर आधारलेले त्याचे केरलदेशगामित्व तर हास्यास्पद आहे. ते *अनुमान खरे मानले तर भवभूति 'मालती-*माधव' नाटक रचण्यापूर्वीच केरलदेशात जाऊन राहिला होता असे मानावे लागेल. राजशेखर अनेक देशांच्या युवतींचे वर्णन करतो. तो काय त्या सर्व देशात जाऊन राहिला होता ?

'हन्त, मावर्जयामि' या उद्गारावरून घनश्याम टीकाकाराने केलेले भवभूतीच्या द्राविडत्वासंबंधी अनुमान तर बालिश आहे. हाच तो घनश्याम नव्हे काय, ज्याने कालिदास, ईश्वरकृष्ण आणि भर्तृमीढ याचे ऐक्य प्रतिपादून डॉ. माईणकरांसारख्या विद्वानाला चकविले होते ? त्याच्या विधानावर किती विश्वास ठेवावा हे वाचकांनी ठरवावे.

तर मग भवभूति आणि उम्बेक याचे जे ऐक्य 'मालतीमाधवा'च्या पूर्वोक्त हस्तलिखितात गृहीत धरले आहे याची उपपत्ति कशी लावावयाची ? या प्रश्नाचे उत्तर वर दिले आहे. या समजाचे कारण एकच—ते म्हणजे 'ये नाम केचिदिह नः प्रथयन्त्यवज्ञाम्' इत्यादि श्लोक. हा श्लोक भवभूतीने 'मालतीमाधवा'त स्वतःचा वृत्तांत देताना घातला आहे, हे टीकाकारांना माहीत होते. तोच श्लोक 'श्लोकवार्त्तिका'वरील उम्बेकाच्या टीकेच्या आरंभी दिसल्यावर भवभूति व उम्बेक एकच असा समज टीकाकाराचा झाला असावा. पण भवभूति आणि उम्बेक यांच्या कालातील अंतर आणि त्यांची भिन्न पद्धतींची नावे यावरून ते भिन्न होते यात संशय नाही.

येथवर डॉ. काणे यांनी आमच्या भवभूतिविषयक विविध प्रश्नांसंबंधी मतावर केलेल्या टीकेचा परामर्श घेतला. डॉ. काणे यांच्या गाढ विद्वत्ता आणि दीर्घ परिश्रम याबद्दल आम्हास नितान्त आदर आहे. वर जी त्यांच्या आक्षेपांना उत्तरे दिली त्यात सत्यान्वेषणाखेरीज दुसरा हेतु नाही.

---

## परिशिष्ट तिसरे

# 'कालप्रियनाथ म्हणजे काल्पी येथील सूर्यदेव' या सिद्धान्तावर डॉ. काणे यांनी घेतलेल्या आक्षेपांचे परीक्षण

कालप्रियनाथ म्हणजे काल्पी येथील सूर्यदेव या आमच्या सिद्धान्तावर डॉ. काणे यानी 'उत्तररामचरिता'च्या चौथ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत कडाडून हल्ला चढविला आहे.[1] त्यानी 'कालप्रियानाथ' असा पाठ स्वीकारला असून त्याचा अर्थ भगवान् शंकर असा केला आहे. पण हा भवभूतीचा मूळ पाठ असणे संभवनीय नाही. त्यात 'भवानीपतिः' या शब्दातल्याप्रमाणे 'विरुद्धमतिकृत्' हा दोष उत्पन्न होतो.[2] (काव्यप्रकाश, उल्लास ७ पाहा.) कालप्रियनाथ याने सूर्यदेव विवक्षित आहे या आमच्या मतावर त्याचे आक्षेप पुढीलप्रमाणे आहेत.

**डॉ. काणे यांचे आक्षेप**

(१) कालप्रियनाथ म्हणजे उज्जयिनीचा महाकाल. हे दैवत कालिदासाच्या पूर्वीपासून प्रसिद्ध होते. त्या ठिकाणी हजारो लोक यात्रेच्या निमित्ताने जमत. अशा ठिकाणी भवभूतीसारख्या उदयेच्छु कवीला आपली नाटके दाखविणे योग्य व फायदेशीर झाले असावे. भगवान् शिवाला 'कालप्रियनाथ' कोठेही म्हटले नाही खरे, पण त्याला महाभारताच्या अनुशासन पर्वात 'कालपूजितः' आणि शान्तिपर्वात 'कालनाथ' म्हटले आहे. ही नावे 'कालप्रियनाथा'हून भिन्न नाहीत. भवभूतीच्या नाटकात उल्लेखिलेले 'कालप्रियनाथ' हे पूर्ण नाव तरी सूर्यदेवाचे म्हणून पुराणात कोठे येते? तेथे ते 'कालप्रिय' असेच येते. तेव्हा ते कालप्रियनाथ नव्हे.

(२) 'वराहपुराणा'तील मागे उद्धृत केलेल्या श्लोकात कालप्रियाचा उल्लेख आला आहे. पण ते पुराण नतरचे आहे. कारण त्यात 'भविष्यमिति विख्यातं ख्यातं

---

१. नव्या आवृत्तीत रामचन्द्रबुधेन्द्र या टीकाकाराला अनुसरून कालप्रियनाथ हा पद्मपुरातील शंकर होय, असे त्यानी प्रतिपादिले आहे. पण तेथील देवाचे नाव कालप्रियनाथ होते याला प्रमाण नाही.

२. 'भवाची पत्नी ती भवानी. तिचा पति भवाशिवाय दुसरा कोणी' असा अनिष्ट अर्थ उत्पन्न होतो म्हणून हा दोष.

कृत्वा पुनर्नवम् ।' असे म्हटले आहे. तेव्हा ते पुराण नंतरचे आहे. 'भविष्यपुराणा'च्या काही प्रतींत ' सांनिध्यं मम पूर्वाह्ले सुतीरे दृश्यते जनैः । कालप्रिये च मध्याह्ले अपराह्ले चात्र नित्यशः ॥ ' या श्लोकात सुतीरे याच्याबद्दल मुण्डीरे असे नाव आले आहे. हे मुण्डीर म्हणजे उत्तर गुजरातेत पाटण शहरापासून सुमारे १८ मैलांवरचे मोढेर येथील सूर्याचे देवालय असावे. हे देवालय विक्रम संवत् १०८३ ( सन १०२६ ) च्या सुमारास बांधले होते. म्हणून वराहपुराणातील हा उतारा अकराव्या शतकानंतरचा दिसतो. तेव्हा ही सूर्याची देवालये सन ७०० च्या अगोदर होती हे सिद्ध करण्यास त्याचा काही उपयोग नाही.

( ३ ) प्रा. मिराशी कोणार्क येथील सूर्याचे देवालय सांबाने बांधले असे म्हणतात ते चूक आहे. सांबाने बांधलेले देवालय उदयाचलावर होते. कोणार्क वाळवटात आहे. ते देवालय गंग नृपति नरसिंहदेव ( सन १२३८–१२६४ ) याने बांधले.

( ४ ) भवभूतीची तीन्ही नाटके कालप्रियनाथाच्या यात्रेच्या प्रसंगी रंगभूमीवर आली. कालप्रियनाथ याने काल्पी येथील सूर्याचे देवालय विवक्षित असल्यास भवभूति काल्पी येथे दीर्घकाल राहिला होता, असे मानावे लागेल. त्याला यत्किंचितही पुरावा नाही. तो कनोजच्या यशोवर्म्याच्या आश्रयास होता असे ' राजतरंगिणी 'त म्हटले आहे खरे, पण ते खरे नसावे; कारण ' राजतरंगिणी ' भवभूतीनंतर ४०० वर्षांनी लिहिली गेली.

( ५ ) कालप्रियनाथ याने सूर्यदेव विवक्षित असल्यास पुराणात उल्लेखिलेल्या इतर ठिकाणच्या सूर्यांची नावे 'नाथ 'शब्दान्त ( उदाहरणार्थ ' मूलस्थाननाथ ' याधारखी ) का नसावी ?

( ६ ) राजशेखराने ' काव्यमीमांसे 'त कालप्रिय गाधिपुराच्या ( कनोजच्या ) दक्षिणेस आहे असे म्हटले आहे खरे, पण त्यायोगे कालप्रिय हे एक शहर होते एवढेच सिद्ध होईल. तेथे सूर्याचे देवालय होते असे सिद्ध होत नाही.

तेव्हा कालप्रियनाथ हे पद्मपुरातील शंकराचे देवालय असावे. तसे नसल्यास ते उज्जयिनीच्या महाकालाचे देवालय असेल. पण ते सूर्याचे देवालय असणे असंभवनीय आहे, असा निर्णय डॉ. काणे यांनी काढला आहे.

## डॉ. काणे यांच्या आक्षेपांस उत्तरे

डॉ. काणे यांनी माझ्या कालप्रियनाथविषयक मताच्या परीक्षणास आपल्या प्रस्तावनेची तब्बल अकरा पृष्ठे दिली आहेत. त्यात अनेक ठिकाणी पुनरुक्ति व असंबद्ध विधाने आहेत. तथापि त्या अस्ताव्यस्त ( rambling ) विवेचनातून महत्त्वाचे मुद्दे काढून वर दिले आहेत. आता त्यांचे चिकित्सक परीक्षण करू.

## कालप्रियनाथ हे सूर्याचे देवालय होते

( १ ) आक्षेप पहिला—उज्जयिनीच्या महाकालाचे देवालय फार प्राचीन आहे, तेथे यात्रा भरत असे, हे मान्य आहे. पण तेवढयावरून महाकाल आणि कालप्रियनाथ एक होत नाहीत.[1] महाभारत व पुराणे धुंडाळल्यावर डॉ. काणे याना 'कालपूजित' आणि 'कालनाथ' एवढीच कालशब्द असलेली शंकराची नावे (किंवा विशेषणे) सापडली, 'कालप्रियनाथ' काही सापडले नाही. तेव्हा त्यानी 'कालप्रियनाथ' हे सूर्याचे नाव तरी कोठे येते, असा प्रतिप्रश्न केला आहे. त्याचे उत्तर देणे सोपे आहे. भविष्य व वराह पुराणातून मागे उद्धृत केलेल्या श्लोकावरून हे स्पष्ट दिसेल की भारतात सूर्याची तीन देवालये सुप्रसिद्ध होती: – ( १ ) पूर्वाचलावर किंवा पूर्वतीरावर– तेथे सूर्यदेवाचे सान्निध्य प्रातःकाळी असे; ( २ ) कालप्रिय येथे– तेथे ते सान्निध्य मध्याह्नी असे; आणि ( ३ ) पश्चिम पर्वतावर मूलस्थान येथे– तेथे ते अपराह्णी असे. कालप्रिय येथील देव म्हणून तेथील सूर्यदेवाला कालप्रियनाथ म्हणत. कालप्रिय याने काल्पीचा निर्देश होतो, हे तृतीय इन्द्राच्या कनोजवरील स्वारीच्या वर्णनाचा श्लोक वर उद्धृत केला आहे त्यावरून आणि 'यो गाधिपुरस्य दक्षिणः स कालप्रियस्योत्तरः' या 'काव्यमीमांसे'तील राजशेखराच्या विधानावरून स्पष्ट आहे. तेथे एक विशाल देवालय होते हे इन्द्राच्या स्वारीच्या वर्णनावरून आणि ते देवालय सूर्याचे होते हे भविष्य व वराहपुराणातील उल्लेखावरून सिद्ध होते.

'कालप्रियनाथ' यातील वैशिष्ट्यपूर्ण भाग कोणता? 'कालनाथ' किंवा 'कालप्रिय'? हे वाचकानी ठरवून त्यावरून त्यानी या वादासंबंधी आपले मत ठरवावे.

## भविष्यपुराण भवभूतीनंतरचे नाही

आक्षेप दुसरा—एखादा साक्षीदार आपल्या अशीलाच्या विरुद्ध जाऊ लागला म्हणजे तो त्या विशिष्ट घटनेच्या वेळी उपस्थितच नव्हता, असा आक्षेप घेऊन त्याची साक्ष खोटी ठरविण्याचा प्रयत्न वकील करीत असतात. 'वराहपुराणा'वरून कालप्रिय येथे सूर्यदेवाचे सुप्रसिद्ध देवालय होते आणि तेथे त्या देवाचे सान्निध्य मध्याह्नी असते अशी लोकांची श्रद्धा होती, असे स्पष्ट होत असल्याने ते पुराणच भवभूतीच्या नंतरचे, असे ठरविण्याचा प्रयत्न डॉ. काणे यानी केला आहे, पण तो साधला नाही. प्रथम त्यानी 'मुरारे' याच्याबद्दल 'मुरारे' असा आपल्याला सोईचा असा पाठ घेऊन

---

१ नव्या आवृत्तीत तर महाकालाचा पक्ष सोडून डॉ. काणे हे 'कालप्रियनाथ' हा पद्मपुरातील शंकर होय असे म्हणतात. यावरून त्यांच्या मताची अस्थिरता व्यक्त होते तसेच महाकालासंबंधी त्यांचे सर्व विवेचन असंबद्ध ठरते. पद्मपुर येथील देवालयातील शिवमूर्तीला कालप्रियनाथ म्हणत याला मुळीच पुरावा नाही.

ते मुंडीर म्हणजे गुजरायेतील मोढेर असा तर्क केला. तेथील सूर्याचे देवालय इ. स. च्या अकराव्या शतकात बांधले. म्हणून 'वराहपुराण' भवभूतीनंतर कित्येक शतकांनी रचले असे अनुमान करून त्याचे प्रामाण्य उडविण्याचा त्यांनी प्रयत्न केला. पण तो टिकत नाही. 'मुंडीरे' असा पाठ घतला तरी 'वराहपुराणा'तील वर्णन गुजरायेतील सूर्याच्या देवालयाला अनुलक्षून असणे शक्य नाही. कारण मुंडीर येथील देवालय भारताच्या पूर्व दिशेस होते, असे त्या पुराणातील वर्णनावरून दिसते. मोढेर पूर्व भारतात नाही.

यानंतर 'वराहपुराण' 'भविष्यपुराणा'नंतरचे असे त्यातील एका उल्लेखावरून सिद्ध करण्याचा प्रयत्न त्यांनी केला आहे. त्यांनी उद्धृत केलेल्या 'भविष्यमिति विख्यातं ख्यातं कृत्वा पुनर्नवम् ।' या पादाचा संबंध 'साम्बः सूर्यप्रतिष्ठां च कारयामास तत्त्ववित्' या पुढील पादाशी नाही तर त्यामागील श्लोक 'साम्बस्तु सह सूर्येण रथस्थेन दिवानिशम् । रविं प्रपच्छ धर्मात्मा पुराणं सूर्यभाषितम् ॥' याच्याशी आहे. 'वराहपुराण' 'भविष्यपुराणा'नंतर रचले गेले असे मानले तरी ते भवभूतीनंतरचे, हे कसे सिद्ध होते ? डॉ. काणे यांनीच इतरत्र म्हटल्याप्रमाणे पुराणातील विविध भागांचा काल ठरविणे शक्य नाही. भविष्यपुराण हे सर्व पुराणांत पहिले मानले जाते. अर्थात् त्यातही पुष्कळ भाग मागाहून घुसडला गेला असावा. असो.

'वराहपुराण' 'भविष्यपुराणा'नंतरचे म्हणून त्यातील कालप्रियनाथाचा उल्लेख नंतरचा असे क्षणभर मानले तरी खुद्द 'भविष्यपुराणा'तील खालील श्लोकात कालप्रियाचा उल्लेख येतो त्याची वाट काय ?

सांनिध्यं मम पूर्वाह्णे सुतीरे दृश्यते जनः ।
कालप्रिये च मध्याह्नेऽपराह्णे चात्र नित्यशः ॥

तेव्हा काही झाले तरी कालप्रिय डॉ. काण्यांचा पिच्छा सोडत नाही.

'भविष्यपुराण'ही भवभूतीनंतर दीर्घकालानंतर रचले, असे मानले तरी खंबायतच्या ताम्रपटातील ( सन ९३० ) व राजशेखराच्या ( दहावे शतक ) 'काव्यमीमांसे'तील कालप्रियाचे उल्लेख शिल्लक राहतातच. कालप्रियनगर भवभूतीनंतर अस्तित्वात आले आणि शंभरदीडशे वर्षांच्या आत सर्व भारतभर सूर्यदेवाचे पवित्रस्थान म्हणून प्रसिद्ध झाले याविषयी निश्चित पुरावा आहे काय ?

## कोणार्क देवालयाचे स्थान प्राचीन

आक्षेप तिसरा—कोणार्क येथील सध्याचे देवालय साम्बाने बांधले, असे आम्ही कोठेही म्हटले नाही. ते देवालय गंगनृपति नरसिंहदेव याने तेराव्या शतकात बांधले, असेच आम्ही आपल्या लेखात स्पष्ट म्हटले आहे. ( संशोधनमुक्तावलिः सर १, पृ. १००; स्टडीज् इन इंडॉलॉजी, भाग १, पृ. ३९. ) सूर्याचे एक देवालय पूर्वभारतात

समुद्रतीरी ( सुतीरे ) होते असे वर्णन पुराणात असल्यामुळे कोणार्क येथील सध्याचे देवालय पवित्र अशा पुरातनस्थली बांधले असावे, एवढेच अनुमान केले आहे. या-संबंधी एका तज्ज्ञाचे मत उद्धृत करतो. डॉ. आर. सी. हझरा यांचा पुराणांचा अभ्यास दांडगा आहे. त्यांनी महापुराणे आणि उपपुराणे यांवर चिकित्सक दृष्टीने लिहिलेले ग्रंथ सुप्रसिद्ध आहेत. त्यांचे याविषयीचे मत पाहा—' Sutira (literally meaning ' a beautiful shore ' ) must be another name for Mundira, which, again, must be very close to, or even identical with, Konārka situated on the seashore very close to the river Chandrabhāgā ( a branch of the river Prāchī in Orissa. ) [ *Studies in the Upapurānas*, p. 105. ]

[ सुतीर ( सुंदर तीर ) हे मुंडीर याचे दुसरे नाव असावे आणि ते ओरिसातील प्राची नदीला मिळणाऱ्या चंद्रभागानदीजवळ समुद्रतीरी असलेल्या कोणार्कच्या अगदी जवळ असाव किंवा तेच ते असेल. ]

पूर्वदिशेच्या सूर्यदेवाच्या देवळाच्या निश्चित स्थळाचा संबंध भवभूतीच्या काल-प्रियनाथाशी साक्षात् येत नाही. तेव्हा ही सर्व टीका एका दृष्टीने अप्रस्तुत आहे.

## भवभूति उत्तरभारतात दीर्घकाल होता

आक्षेप चौथा—भवभूति कालप्रिय ( काल्पी ) येथे दीर्घकाल राहिला असे मानण्यास आधार नाही, असे डॉ. काणे म्हणतात. ' उत्तररामचरिता 'च्या पूर्वीच्या आवृत्तीत कालप्रियनाथ म्हणजे उज्जयिनीचा महाकाल असे ते मानत होते. ( आता त्यांनी आपले मत बदलले आहे. ) भवभूति उज्जयिनीला तरी दीर्घकाल राहिला, याविषयी डॉ. काणे यांच्याजवळ पुरावा आहे काय ? असे आक्षेप न घेणेच बरे. तथापि ते घेतल्यास उत्तर देणे कठिण नाही. भवभूति ग्वाल्हेर संस्थानातील पद्मावती ( पद्मपवाया ) येथे पुष्कळ काळ राहिला असावा. त्या नगरीचे आणि तिच्या आस-पासच्या प्रदेशाचे सूक्ष्म वर्णन त्याने आपल्या ' मालतीमाधवा 'त केले आहे. तेथून कालप्रिय ( काल्पी ) फार दूर नाही.

भवभूति कनोजच्या यशोवर्म राजाच्या आश्रयास होता असे कल्हण सांगतो, पण त्यावर डॉ. काण्यांचा विश्वास नाही. त्याचे सयुक्तिक कारण त्यांनी दिले नाही. भवभूति कनोजला राजदरबारी असता तर त्याने तेथेच आपली नाटके करविली असती असे डॉ. काणे म्हणतात. पण भवभूतीला राजाश्रय अगदी शेवटी शेवटी—कालप्रियनाथ ( काल्पी ) येथे त्याच्या नाटकांची प्रशंसा झाल्यावर —मिळाला असेल. कदाचित् राजाश्रय असताही कालप्रियनाथाच्या यात्रेच्या प्रसंगी विशाल जनसमूहापुढे आपली नाटके यावीत, असे त्याला वाटले असेल. पण हे सर्व तर्कच आहेत. भवभूतीच्या

जीवन-चरिताविषयी आपणास फारशी माहिती नसल्यामुळे त्यातील कोणता तर्क सुप्रतिष्ठित आहे, हे सांगणे शक्य नाही.

**आक्षेप पाचवा**—कालप्रियनाथ हे सूर्य देवाचे नाव असल्यास त्याची पुराणातील इतर नावे 'नाथ' पदान्त का नाहीत असा आक्षेप डॉ. काणे यांनी घेतला आहे. तो पोकळ आहे. शंकराची नावे सामान्यतः 'ईश्वर' पदान्त असतात. कालप्रियनाथ हे शंकराचे नाव असल्यास ते 'ईश्वर' पदान्त का नाही, असा प्रतिप्रश्न त्यास करता येईल.

**आक्षेप सहावा**—राजशेखराच्या 'काव्यमीमांसे'तील 'यो गाधिपुरस्य दक्षिणः स कालप्रियस्योत्तरः।' यावरून कालप्रिय हे कनौजच्या दक्षिणेस शहर होते एवढेच सिद्ध होईल. तेथे सूर्याचे देवालय होते हे सिद्ध होत नाही, असे डॉ. काणे म्हणतात. पण तृतीय इन्द्राच्या स्वारीच्या वर्णनावरून कालप्रियाचे देवालय यमुनेच्या काठी दक्षिणेस होते हे स्पष्ट आहे. पुराणातील 'यमुनायास्तु दक्षिणे मध्ये कालप्रियं देवम्' यावरून ते देवालय सूर्याचेच होते हे सूर्यप्रकाशाइतके स्पष्ट आहे. वरील उताऱ्यात कालप्रियाला देव म्हटले आहे. तसाच उल्लेख पुढील श्लोकात 'मूलस्थानं ततः पश्चादस्तमानाचले रविम्' असा केला आहे. या दोन्ही ठिकाणी 'कालप्रिय येथील देव' आणि 'मूलस्थान येथील देव' असाच अर्थ विवक्षित आहे.

## कालप्रियनाथ म्हणजे काल्पी येथील सूर्यदेवच

साम्बाने चंद्रभागातीरी मूलस्थान येथे सूर्याचे देवालय प्रथम स्थापिले. नंतर त्यानेच मुंडीर (किंवा मुंडीर) व कालप्रिय येथे सूर्याची देवालये बांधली असे भविष्य व वराह पुराणात म्हटले आहे. अशा प्रकारची साम्प्रदायिक समजूत त्या काळी होती, हे उघड आहे. मूलस्थानचे सूर्याचे देवालय चिनी यात्रेकरू ह्युएनत्संग याने वर्णिले आहे. 'मूलस्थान' या देवळाच्या नावावरून इतरत्रही सूर्याची स्थाने त्याकाळी होती, हे अनुमान करता येते. सूर्यदेवाची पूजा भारतात सातव्या शतकात व त्यापूर्वीही प्रचलित होती. बाणाने हर्षाचा पिता प्रभाकरवर्धन याच्या सूर्यपूजेचे वर्णन 'हर्षचरिता'त केले आहे. हर्षाच्या ताम्रपटात प्रभाकरवर्धनाचा पिता आदित्यवर्धन आणि पितामह राज्यवर्धन हेही 'परमादित्यभक्त' होते असे म्हटले आहे. या सर्व पुराव्यावरून सातव्या शतकात मूलस्थानाबरोबर तितकीच पवित्र गणलेली सूर्यदेवाची स्थाने कालप्रिय व मुंडीर येथे होती असेच अनुमान कोणीही निराग्रही मनुष्य काढील. अर्थात् कालप्रिय येथील देवालय भवभूतीच्या पूर्वी निदान दीडशे वर्षे सुप्रसिद्धच होते, असे दिसते.

'उदयाचले' आणि 'अस्तमानाचले' यांनी 'पूर्व दिशेस' आणि 'पश्चिम दिशेस' एवढाच अर्थ पुराणातील उताऱ्यात विवक्षित आहे. कोणार्काचे स्थान पर्वतावर नाही तर मूलस्थान (मुलतान) हे तरी पर्वतावर वसले आहे काय? अशा आक्षेपात तथ्य नाही.

---

प्रकरण पाचवे

# महावीरचरित

प्राचेतसो मुनिवृषा प्रथमः कवीनां
यत्पावनं रघुपतेः प्रणिनाय वृत्तम् ।
भक्तस्य तत्र समरंसत मेऽपि वाचः
स्ताः सुप्रसन्नमनसः कृतिनो भजन्ताम् ॥

'महावीरचरित', १, ७

'महावीरचरित' हे भवभूतीचे पहिले नाटक असून ते रचण्यास त्याने विदर्भात असताना आरंभ केला होता; त्याच्या पाचव्या अंकातील ४६ श्लोकापर्यंतचा भाग त्याने रचून ते अपूर्णच सोडून दिले होते, हे मागील चौथ्या प्रकरणात दाखविले आहे. सध्या या नाटकाचे सात अंक उपलब्ध असून पाचव्या अंकाच्या ४६ श्लोकानंतरचा भाग उत्तर व दक्षिण भारतात भिन्न रूपाने उपलब्ध आहे. उत्तर भारतात प्रचलित असलेला पाठ कोणा विनायकभट्ट नामक कवीने आणि दक्षिण भारतातील भाग सुब्रह्मण्य कवीने रचला असे टीकातील व हस्तलिखितातील उल्लेखावरून समजते. आरंभीच्या प्रस्तावनेवरून इतर दोन नाटकाप्रमाणे हे नाटकही कालप्रियनाथाच्या यात्रेच्या प्रसंगी प्रथम रंगभूमीवर आले होते, असे दिसते. त्या वेळीही ते अपूर्णच असेल. तरीही पाचव्या अंकाच्या ४६ व्या श्लोकानंतरचा भवभूतीने लिहिलेला भाग *नष्ट का व्हावा याची उपपत्ति लागत नाही.*

प्रस्तुत नाटकाच्या नान्दीत स्वयम्‌ नित्य, पापविनाशक, जन्मरहित अशा चैतन्य-ज्योतीला म्हणजे ब्रह्माला नमन आहे. नंतर सूत्रधार म्हणतो, "कालप्रियनाथाच्या यात्रेत

जमलेल्या सज्जनांनी मला अशा स्वरूपाचे नाटक दाखविण्याविषयी आज्ञा केली आहे—

" महापुरुषसंरम्भो यत्र गम्भीरभीषणः ।
प्रसन्नकर्कशा यत्र विपुलार्था च भारती ।।
अप्राकृतेषु पात्रेषु यत्र वीरः स्थितो रसः ।
भेदैः सूक्ष्मैरभिव्यक्तैः प्रत्याधारं विभज्यते ।।

( म. च., १, २-३ )

अर्थातच त्यांनी ' महावीरचरिता 'चाच प्रयोग करावा असे सुचविले आहे. "

या प्रस्तावनेतील आरंभीच्या श्लोकात भवभूतीने प्रस्तुत नाटकाचे स्वरूप विशद केले आहे. त्यामध्ये रामाचा परशुराम, वाली इत्यादिकांशी गंभीर आणि भयानक स्वरूपाचा कलह असून त्याच्या अर्थगौरवयुक्त वर्णनात प्रसाद आणि ओज हे गुण आहेत. प्रस्तुत नाटकातील रस वीर असून तो श्रेष्ठ पात्राच्या ठिकाणी वर्णिला आहे. राम, परशुराम, वाली इत्यादिकांच्या बाबतीत तो वीर रस व्यक्त रूपात असून वसिष्ठ-विश्वामित्रादिकांमध्ये तो सूक्ष्म रूपात आहे.

नंतर सूत्रधार या नाटकाचा कर्ता भवभूति याचे जन्मस्थान, त्याचे पूर्वज, त्याचे मातापिता, गुरु इत्यादिकांविषयी माहिती देतो. ती मागील प्रकरणात दिली आहे. नंतर तो म्हणतो, " कवीला वीर आणि अद्‌भुतरसाची विशेष आवड असल्याने त्याने तिन्ही जगाच्या दुःखाचे मूळ नाहीसे करणारे, विपुलसाहसयुक्त आणि अद्‌भुत असे हे दुष्टाचे दमन करणाऱ्या रघुनन्दन रामाचे चरित्र नाटकरूपाने रचले आहे. तो कवि म्हणतो—

प्राचेतसो मुनिवृषा प्रथमः कवीनां
यत्पावनं रघुपतेः प्रणिनाय वृत्तम् ।
भक्तस्य तत्र समरंसत मेऽपि वाच-
स्तत् सुप्रसन्नमनसः कृतिनो भजन्ताम् ।।

( म. च., १, ७ )

( आद्य कवि भगवान् वाल्मीकि मुनि यांनी जे रामचंद्राचे पावन चरित्र रचले त्यामध्ये मी रामभक्त असल्यामुळे माझी वाणी रममाण झाली. सज्जनांनी प्रसन्न अंतःकरणाने या माझ्या कृतीचा आस्वाद घ्यावा. )"

नंतर पुढील प्रवेशाची सूचना देताना सूत्रधार म्हणतो, "रामाच्या अगच्या नैसर्गिक वीर्याला अस्त्रांची जोड देऊन ते अधिक प्रबळ करण्याकरिता आणि त्याला सीतेची प्राप्ति करून देण्याकरिता दशमुख रावणाच्या कुळाचा घात करून कल्याणाला पात्र होणाऱ्या रामाला त्याच्या लक्ष्मण नामक धाकट्या भावासह विश्वामित्र ऋषि

आपल्या यज्ञाच्या रक्षणार्थ दशरथाकडून मागून घेऊन आपल्या तपोवनास परत गेले. त्यांनी यज्ञाला येण्याविषयी विदेहाधिपति जनकाला निमंत्रण दिले होते, पण आपण अगोदरच यज्ञदीक्षा घतली असल्यामुळे जनकाने आपल्या कुशध्वज नामक भावाला सीता आणि उर्मिला यासह पाठविले आहे. "

नंतर पहिल्या अंकाच्या मुख्य प्रवेशास आरंभ होतो. कुशध्वज सीता आणि उर्मिला यासह रथात बसलेल्या अशा प्रवेश करतो, पण विश्वामित्राला रामलक्ष्मणासह येताना पाहून ते सर्व रथातून उतरतात. 'विश्वामित्र आणि कुशध्वज याचे परस्पर कुशल प्रश्न झाल्यावर कुशध्वज नागरलेल्या यज्ञभूमीतून निघालेली ही सीता आणि ही दुसरी उर्मिला, अशी आपल्या बंधूच्या दोन कन्यांची ओळख करून देतो. ते ऐकून राम म्हणतो—

उत्पत्तिर्देवयजनाद् ब्रह्मवादी नृपः पिता ।
सुप्रसन्नोज्ज्वला मूर्तिरस्याः स्नेहं करोति मे ॥

(म. च., १, २१)

( ह्या सीतेची उत्पत्ति यज्ञभूमीतून झाली आहे, हिचा पिता जनक ब्रह्मवेत्ता आहे आणि हिचे रूप प्रसन्न व सुंदर आहे. म्हणून माझ्या मनात हिच्याविषयी स्नेह उत्पन्न झाला आहे. )

विश्वामित्रही रामलक्ष्मणांची ओळख करून देतात. इतक्यात रामचन्द्राच्या तेजाने आपल्या पापातून मुक्त झालेल्या अहल्येचे पदधातून 'जय, जय, जगत्पते रामचंद्र' असे शब्द ऐकू येतात. विश्वामित्रांनी तिचे पूर्ववृत्त सांगितल्यावर सीतेला रामचंद्राच्या सुंदर रूपाला अनुरूप असा त्याचा प्रतापही आहे, असे वाटते. इतक्यात रावणाचा पुरोहित सर्वमाय नामक वृद्ध राक्षस येतो आणि कुशध्वजाला रावणाचा पुढील निरोप सांगतो, " तुमच्याजवळ अयोनिज कन्यारूपी रत्न आहे, आम्ही त्याची मागणी करतो. कोठेही रत्न असले—ते इंद्राजवळ असले तरीही—ते आम्हाला मिळते. कन्या ही तर दुसऱ्याला देण्याची वस्तू आहे. ती मला दिल्यास मी तुमचा संबंधी होईन आणि पुलस्त्य, पुलह यासारखे श्रेष्ठ ऋषि तुमचे नातलग होतील." लक्ष्मणाला रावणाच्या दुष्टपणाबद्दल क्रोध येतो, पण राम म्हणतो, " रावण धर्म्य मार्गापासून च्युत झाला असला तरी विद्वान् आहे. एका परशुरामाखेरीज सर्व जग जिंकणारा त्यासारखा वीर नाही. सर्व गुण काही सर्वत्र असत नाहीत. तेव्हा त्याला सामान्य जनाप्रमाणे मानणे योग्य नाही." इतक्यात आश्रमात ताटका राक्षसी आल्यामुळे यज्ञाला उपस्थित झालेले ऋषि, त्यांच्या स्त्रिया व मुले यांची भयाने गाळण उडते. ताटकेला पाहून लक्ष्मण तिचे स्वरूपवर्णन करतो—

अन्त्रप्रोतबृहत्कपालनलकक्रूरक्वणत्कङ्कण-
प्रायप्रेङ्खितभूरिभूषणरवैराघोषयन्त्यम्बरम् ।
पीतोच्छर्दितरक्तकर्दमघनप्राग्भारघोरोल्लल-
द्व्यालोलस्तनभारभैरववपुर्दर्पोद्धतं धावति ॥

(म. च., १, ३५)

( आतड्यांमध्ये गुंफलेल्या मोठ्या नृकरोटी व हाडे यांनी बनविलेली कंकणे व इतर भूषणे यांच्या परस्पराघाताने होणाऱ्या घोर आवाजाने आकाश दणाणून टाकणारी आणि रक्त पिऊन वमन केल्यामुळे त्याचा दाट चिखल ज्यांवर पसरला आहे अशा घोर आणि लोंबणाऱ्या स्तनांमुळे भयंकर दिसणारी ही ताटका मोठ्या वेगाने धावत येत आहे. )

या वर्णनात भवभूतीचे बीभत्स रसाचे वर्णन करण्यातील वाक्पाटव दिसून येते. कोणताही प्रसंग सूचक शब्दानी थोडक्यात वर्णन न करता त्याचा पाल्हाळ करण्याकडे त्याची प्रवृत्ति आहे. या श्लोकात बीभत्सरसाच्या वर्णनाला अनुरूप कठोरवर्णयुक्त व समासप्रचुर अशा गौडी रीतीचा उपयोग केला आहे.

विश्वामित्र रामाला ताटकेला मारण्याची आज्ञा करतात, पण राम ती स्त्री असल्यामुळे प्रथम घुटमळतो. पण तसे केले नाही तर ती सर्व ब्राह्मणांचा संहार करील, असे विश्वामित्रानी सांगितल्यावर तो तिला यमसदनास पाठवतो. मेलेल्या ताटकेचे लक्ष्मणाने केलेले वर्णन वरीलप्रमाणेच अत्यंत बीभत्स आहे.

सर्वमाय राक्षसाच्या समक्ष हा प्रकार घडतो. ते पाहून तो म्हणतो, "ताटके, हे कसे झाले? पाण्यात भोपळे बुडावे आणि दगड तरावे असे हे झालेले दिसते." (अम्बुनि मज्जन्त्युलाबूनि, ग्रावाणः प्लवन्ते ।)

नंतर विश्वामित्र स्वतःला कृशाश्वापासून प्राप्त झालेली जृंभकास्त्रे रामाला देतात. लक्ष्मण त्या प्रसंगाने खालील वर्णन करतो —

झटित्यर्वीत्तप्तद्रुतकनकसिक्ता इव दिशः
पिशङ्गत्वासन्ध्यान्तरित इव निर्भाति दिवसः ।
ज्वलत्केतुव्रातस्थगितमिव दिव्यास्त्रनिचयै-
र्नभो नैरन्तर्यप्रचलिततडित्पिञ्जरमिव ॥

(म. च., १, ४१)

(काय हे आश्चर्य ! सर्व दिशा एकदम जणू काय तप्त आणि पातळ सुवर्णाने सिंचल्यासारख्या झाल्या आहेत, चहूकडे पिंगट रंग पसरल्यामुळे जणू काय संध्याकाळ झाली आहे, असे वाटत आहे. या दिव्य अस्त्रानी व्यापलेले आकाश जणू काय

ज्वलन्त अशा उल्काच्या समूहानी झाकून गेले आहे आणि एक सारख्या उत्पन्न झालेल्या विजानी पिंगट झाले आहे. )

या श्लोकातील वर्णन अद्‌भुतरसात्मक आहे आणि त्यात त्याला अनुरूप अशी गौडी रीती योजिली आहे.

विश्वामित्रानी ही अस्त्रे रामाला देऊ केली तेव्हा ती लक्ष्मणालाही प्राप्त व्हावी अशी विनंती राम करतो. ती ते मान्य करतात. रामासारखा जावई प्राप्त व्हावा अशी इच्छा कुशध्वजाने व्यक्त करताच 'जनकाने केलेल्या पणाच्या पूर्तीकरिता तुम्ही ध्यान करताच प्राप्त होणारे शिवधनुष्य येथे आणवावे' असे विश्वामित्र सुचवितात. त्या-प्रमाणे तेथे ते धनुष्य आल्यावर रामाने त्याला प्रत्यंचा लावून ओढताच ते भग्न होते. तेव्हा कुशध्वज रामाला सीता आणि लक्ष्मणाला उर्मिला अर्पण करतो. तेव्हा 'माण्डवी आणि श्रुतकीर्ति या भरत आणि शत्रुघ्नाकरिता द्याव्या' असे विश्वामित्र त्याला सुचवितात. कुशध्वजाने या बाबतीत जनक आणि त्याचा पुरोहित शतानंद याना विचारले पाहिजे असे म्हणताच 'मी त्याना हे कळवीन' असे सांगून विश्वामित्र शुनःशेप नामक आपल्या दत्तक पुत्राला 'आपण सर्व महर्षि व महाराज दशरथ यासह मिथिलेला यावे. यज्ञ समाप्त होताच या सर्व राजकुमाराचा तेथे विवाह होईल' असा संदेश देऊन वसिष्ठाकडे पाठवितात.

हे सर्व रावणाचा दूत सर्वमाय राक्षस याच्या समक्ष होते. तो म्हणतो, 'रावणाने मोठ्या विनयाने सीतेला मागणी घातली तरी ती तुम्ही दिली नाही. तेव्हा इन्द्राच्या नगरातील अप्सराप्रमाणे सीतेला लंकेच्या बंदी होऊन जावे लागेल.' इतक्यात पडद्यात आरडाओरड होते. सुबाहु आणि मारीच हे राक्षस यज्ञात विघ्न उत्पन्न करण्यास आलेले पाहून विश्वामित्र रामलक्ष्मणाना त्याना मारण्याची आज्ञा करतात. ( अंक १ )

या अंकात भवभूतीने वाल्मीकिरामायणातील कथेत अनेक फरक करून अहिल्यो-द्धार, ताटकावध, जृंभकास्त्राची प्राप्ति, शिवधनुर्भंग ही सर्व विश्वामित्राच्या आश्रमा-तच घडली असे दाखविले आहे. तसेच सीता व उर्मिला यासह कुशध्वजाला विश्वा-मित्राच्या आश्रमात आणून आणि सीतेच्या समक्ष रामाने पराक्रम घडवून तिच्या मनात रामाविषयी प्रेम उत्पन्न केले आहे. शिवाय रावणाने सीतेला घातलेली मागणी विश्वामित्र व कुशध्वज यानी धुडकावल्यामुळे पुढील कलहाचे बीज उत्पन्न झाल्याने दाखविले आहे. एकदरीत या अंकामध्ये कथानकाची बरीच प्रगति झाली आहे. तथापि त्यातील विविध प्रसंग ( उदाहरणार्थ अहिल्योद्धार ) रंगभूमीवर न दाखविता पात्राच्या भाषणातून ते सुचविले आहेत, हा दोष मानता येईल. वर्णनेही क्लिष्ट व पाल्हाळाने युक्त अशी आहेत.

दुसऱ्या अंकाच्या आरंभी रावणाचा अमात्य माल्यवान् आणि शूर्पणखा यांचा लंकेतील प्रवेश घातला आहे. रामाने ताटकेला मारले, सुबाहूला ठार केले आणि मारीचाला मिरकावून दिले, रामादिकांचा मिथिलेत विवाह झाला, तसेच त्याला अगस्त्य ऋषींनी माहेन्द्र धनुष्याची भेट दिली इत्यादि वार्ता ऐकलेल्या माल्यवानाच्या मनात चिन्ता उत्पन्न होते. इतक्यात त्याने महेन्द्रद्वीपाव परशुरामाकडे पाठविलेला जासूद त्याचे तमालपत्राच्या रसाने ताडपत्रावर लिहिलेले पत्र घेऊन येतो. त्यात परशुराम लिहितो—

'तुम्हाला माहीत आहेच की आम्ही दण्डकारण्यातील तीर्थात राहणाऱ्या उपासकांना अभय दिले आहे. त्याना विराध, दनुकबन्ध इत्यादि राक्षस त्रास देतात असे आम्ही ऐकले आहे. त्यांचा बंदोबस्त करून आम्हाला शिवोपासक म्हणून तुमच्या विषयी वाटणाऱ्या प्रेमाला अनुरूप असे वर्तन करावे.

ब्राह्मणातिक्रमत्यागो भवतामेव भूतये ।
जामदग्न्यश्च वो मित्रमन्यथा दुर्मनायते ।।

(ब्राह्मणाना त्रास देण्याचे थांबविण्यात तुमचेच कल्याण होणार आहे. नाही तर तुमचा मित्र असलेल्या ह्या जामदग्न्याला बरे वाटणार नाही.)

यात आपण सर्व क्षत्रियांना क्षणात निःपात केला तसा राक्षसांचाही करू, ही रावणाला दिलेली धमकी गर्भित आहे. तिच्याच बरोबर 'माझी मैत्रीही तुम्ही ऋषींची पीडा थांबवल्यास तुम्हास मिळेल' हा वाच्यार्थही विवक्षित असल्यामुळे हा श्लोक 'काव्यप्रकाशा'दि अलंकारग्रंथांत त्यामध्ये वाच्य व व्यङ्ग्य याना समान प्राधान्य असते अशा मध्यम काव्याचे उदाहरण म्हणून दिला आहे.

परशुरामाचे वरील पत्र वाचल्यावर माल्यवान् महेन्द्रद्वीपात जाऊन शिवधनुष्याच्या भंगाचे वृत्त जामदग्न्याला (परशुरामाला) सांगण्याचे व त्याला रामाविरुद्ध चिथावण्याचे ठरवतो.

यानंतर दुसऱ्या अंकातील मुख्य प्रवेशास सुरवात होते. आरंभी जामदग्न्याचे खालील शब्द पडद्यातून ऐकू येतात—

भो भो विदेहनगरीगताः कुलचारिणः । कथयन्तु भवन्तः कन्यान्तःपुरगताय रामभद्राय ।

कैलासोद्धारसारत्रिभुवनविजयौजित्यनिष्णातदोष्णः
पौलस्त्यस्यापि हेलापहृतरणमदो दुर्दमः कार्तवीर्यः ।
यस्य क्रोधात्कुठारप्रविघटितमहास्कन्धबन्धस्यघोरो-
दोःशाखावण्डमुण्डस्तरुरिव विहितः कुल्यकार्यैः पुराभूत् ।।

सोऽयं त्रिःसप्तवारानविकलविहितक्षत्रतन्त्रप्रमारो
वीरः क्रौञ्चस्य भेदात्कृतधरणितलापूर्वहंसावतारः ।
जेता हेरम्बभृङ्गिप्रमुखगणचमूचक्रिणस्तारकारे-
स्त्वां पृच्छन् जामदग्न्यः स्वगुरुहरधनुर्भङ्गरोषादुपैति ॥

(म. च., २, १६-१७)

[ अहो मिथिलेतील राजवाड्यातील लोक हो ! कन्यान्तःपुरातील रामभद्राला माझा निरोप कळवा.

कैलासपर्वताला उचलण्यात आणि त्रिभुवनावर विजय मिळविण्यात ज्याचे बाहू निष्णात होते अशा रावणाचाही रणमद सीलेने हरण करणारा दुर्जय असा कार्तवीर्य पूर्वी ज्याच्या क्रोधावेशामुळे कुठाराच्या आघातांनी विशाल शाखा व खोड तोडलेल्या वृक्षाप्रमाणे भुज, शिर इत्यादिकांपासून वगळा केला गेलेला, कदाचारच्या अस्थिरूपाने अवशिष्ट राहिला—

तो हा महावीर जामदग्न्य ( परशुराम )—ज्याने एकवीस वेळा सर्व क्षत्रियकुलाचा संहार केला, ज्याने क्रौंच पर्वतात छिद्र करून हंसांना पृथ्वीवर ( भारतात ) येण्यास अपूर्व असा मार्ग करून दिला, ज्याने हेरम्ब ( गजानन ), भृङ्गि इत्यादि गणांच्या सेनेने वेष्टित अशा कार्त्तिकेयाचा पराभव केला तो हा—आपले गुरु भगवान् शंकर यांच्या धनुष्याचा तू भंग केल्यामुळे कोपाविष्ट होऊन—तुला शोधीत येत आहे. ]

या श्लोकात जामदग्न्याचा उद्दाम गर्विष्ठपणा, आपल्या पराक्रमाची प्रौढी, स्वतःच्या अनन्वित क्रूर कृत्याविषयी पश्चात्तापाऐवजी वाटणारी धन्यता इत्यादि त्याच्या स्वभावातील विशेष उत्तम रीतीने व्यक्त झालेले आहेत. रौद्र रसाला अनुरूप अशी समासप्रचुर गौडी रीति आणि आरभटी वृत्तिही योजिली आहे.

भगवान् शंकराचा शिष्य—ज्याने वेदाध्ययनाने विशुद्ध चारित्र्य संपादन केले आहे असा—जामदग्न्य याला भेटण्याला राम तयार होतो, पण भीतीने सीता त्याला परावृत्त करू इच्छिते. इतक्यात वेत्रधारी सेवक भीतीने त्याला अडथळा करू शकले नाहीत असा जामदग्न्य परिजनांच्या हाहाकारास न जुमानता रामाच्या शोधाकरिता कन्यान्तःपुरात घुसतो. ते पाहून अशा विद्वानाने शिष्टाचारपद्धतीचे उल्लंघन करावे याचे रामाला आश्चर्य वाटते आणि तो स्वतः त्याला भेटण्यास पुढे होतो. पण सीता त्याला बिलगते. तेव्हा रामाच्या मनात विरोधी भावनांचा कल्लोळ उत्पन्न होतो. तो म्हणतो—

उत्सिक्तस्य तपःपराक्रमनिधेरभ्यागमादेकतः
सत्सङ्गप्रियता च वीररभसोन्मादश्च मां कर्षतः ।

वैदेहीपरिरम्भ एष च मुहुश्चैतन्यमामीलय-
न्नानन्दी हरिचन्दनेन्दुशिशिरस्निग्धो रुणद्धयन्यतः ॥

( म. च., २, २२ )

( तपश्चर्या व पराक्रम यांचा निधिच अशा या जामदग्न्याच्या आगमनामुळे त्याला भेटण्याकरिता माझ्या मनातील सत्संगाविषयी प्रेम आणि वीररसाचा आवेश हे मला एका बाजूला ओढीत आहेत तर दुसऱ्या बाजूला सीतेचे आनंददायक आणि हरिचंदन व चंद्र याप्रमाणे शीतल आणि प्रेमयुक्त असे आलिंगन माझे चैतन्य नाहीसे करून मला येथून हालू देत नाही. )

या श्लोकात रामाच्या मनातील आवेग आणि हर्ष यांचा उद्रेक उत्तम रीतीने वर्णिला आहे. हा श्लोक भावसंधि नामक ध्वनिकाव्याचे उदाहरण म्हणून 'काव्य-प्रकाश'त उद्धृत केला आहे.

पुढे जामदग्न्याला पाहून त्याची तपश्चर्या आणि पराक्रम यांच्याविषयी रामाला परमादर वाटतो. त्याचे सुन्दर वर्णन तो खालील श्लोकात करतो —

ज्योतिर्ज्वालाप्रचयजटिलः सन्निधत्ते कुठार-
स्तूणीरोंऽसे वपुषि च जटावाससीराजनानि ।
पाणौ बाणः स्फुरति वलयीभूतलोलाक्षसूत्रे
वेषः शोभां व्यतिकरवतीमुग्रशान्तस्तनोति ॥

( म. च., २, २६ )

( याच्या जवळ तेजःपुंज असा परशु आहे, याच्या खांद्यावर भाता लटकावला आहे, याने जटा, धनुष्य, वल्कले आणि कृष्णाजिने धारण केली आहेत, लोंबणाऱ्या रुद्राक्ष मालेचे वलय घातलेल्या हातात बाण शोभत आहे, असा याचा हा उग्र तसाच शम-द्योतक वेष वीर आणि शान्त रसाच्या मिश्रणाची शोभा धारण करीत आहे. ) जामदग्न्याचे हे शब्दचित्र एखाद्या कसलेल्या चित्रकारालाही मार्गदर्शक व्हावे असे मनोरम आहे.

रामाला पाहताच त्याचे गम्भीर आणि मनोहर रूप पाहून जामदग्न्याचे मन त्याच्याकडे आकृष्ट होते. तो मनात म्हणतो 'रमणीयः क्षत्रियकुमार आसीत् ।' ( हा क्षत्रियकुमार रमणीय होता असे आता म्हणावयाचे ! ) यातील 'आसीत्' या भूतकालवाचक क्रियापदाने त्याचा लौकरच होणारा नाश सूचित केला आहे. नंतर तो रामाला म्हणतो—

प्रागप्राप्तनिशुम्भशाम्भवधनुर्द्वेधाविधाविर्भव-
त्क्रोधप्रेरितभीमभार्गवभुजस्तम्भापविद्धः क्षणात् ।

सज्वाल- परशुर्भवत्वशिथिलस्त्वत्कण्ठपीठातिथि-
र्येनानेन जगत्सु खण्डपरशुर्देवो हरः ख्याप्यते ।।

(म. च., २, ३३)

( आजपर्यंत ज्या शिवधनुष्याला इजा पोचली नव्हती त्याचा भंग करून तू मला क्रोध आणला आहेस. त्या क्रोधाने प्रेरित होऊन या माझ्या बाहूने फेकलेला हा तेजःपुंज परशु—ज्याच्यामुळे भगवान् शंकराचे खण्डपरशु हे नाव त्रिभुवनात प्रसिद्ध झाले आहे तो—एका क्षणात जोराने तुझ्या मानेवर पडो. )

भगवान् शंकराने आपल्या परशूचा लहानसा तुकडा आपला शिष्य परशुराम याला दिला. तेव्हापासून शंकराला खंडपरशु हे नाव प्राप्त झाले या कथेचा संदर्भ येथे आहे. या श्लोकाच्या पहिल्या तीन पादांत रौद्ररस व्यङ्ग्य असल्यामुळे त्यात समास-प्रचुर अशी रचना केली आहे. पण चौथ्या पादात परशुरामाच्या मनातील भगवान् शंकराविषयी भक्ति व्यक्त करावयाची असल्याने त्यात समास कटाक्षाने टाळले आहेत. त्यातील शब्दयोजनाही अत्यंत अनुरूप अशी आहे.

ह्या भाषणाने भयभीत न होता राम धैर्याने व आदरपूर्वक स्वराने जामदग्न्याला म्हणतो, 'आपण हजार वर्षे शिष्यत्व केल्यावर सैन्यासहित कार्तिकेयाचा पराभव केल्यामुळे संतुष्ट होऊन भगवान् शंकरांनी आपणास प्रसाद म्हणून दिला तोच का हा परशु ?' नंतर राम जामदग्न्याचे खालील वर्णन करतो—

उत्पत्तिर्जमदग्नितः स भगवान् देवः पिनाकी गुरु-
र्वीर्यं यत्तु न तद्गिरां पथि ननु व्यक्तं हि तत्कर्मभिः ।
त्यागः सप्तसमुद्रमुद्रितमहीनिर्व्याजदानावधिः
सत्यब्रह्मतपोनिधेर्भगवतः किं वा न लोकोत्तरम् ।।

(म. च., २, ३६)

( आपले पिता जमदग्नि ऋषि आणि गुरु साक्षात् भगवान् शंकर, आपले शौर्य तर अवर्णनीय, कृतीतच व्यक्त झालेले, दान खरेखुरे सप्तसमुद्रवलयांकित पृथ्वीचे असे आहे. खरोखर आपण वेदविद्या आणि तपश्चर्या यांचे निधि आहा. आपले काय लोकोत्तर नाही ? )

हे रामाचे आदरयुक्त भाषण ऐकून परशुरामाला क्षणभर त्याच्याविषयी प्रेम वाटते. तो म्हणतो—

राम राम नयनाभिरामतामाशयस्य सदृशीं समुद्वहन् ।
अप्रतर्क्यगुणरामणीयकः सर्वथैव हृदयङ्गमोऽसि मे ।।

(म. च., २, ३७)

( रामा, तू मनाने थोर तसाच रुपानेही सुंदर आहेस. कल्पना करण्यासही अशक्य अशा रमणीय गुणांचा तू मला सर्वस्वी हृदयंगम झाला आहेस. ) या श्लोकातील शब्दयोजना आणि त्याचे रथोद्धता वृत्तही अर्थाला अनुरूप असे आहे. नंतर तो म्हणतो, 'खरोखर आज तुझ्यासारख्या अद्भुत वीराची प्राप्ति झाल्यामुळे तुला आपल्या हृदयाशी कवटाळावे असे मला वाटते.' तेव्हा राम म्हणतो, 'भगवन्, आपण मला हृदयाशी कवटाळावे म्हणता, पण ते प्रस्तुत प्रसंगाला विरुद्ध आहे.'

हे रामाचे शब्द ऐकताच परशुराम मनात म्हणतो, 'अहो या क्षत्रियकुमाराचे अंतःकरण दुसऱ्याच्या गुणोत्कर्षाचे ग्रहण करणारे असे सौजन्याने पवित्र झाले आहे. याचा अहंकार याच्या खरोखरीच्या विनयामुळे लौकर लक्षात येण्यास कठीण असून कुशाग्रबुद्धीच्या लोकांसच आकलन होणारा असा आहे.'

नंतर जामदग्न्य सीतेच्या सख्यांना तिला अंतःपुरात घेऊन जाण्यास सांगतो. तितक्यात सीरध्वज जनक मनुष्य घेऊन आपल्या शतानन्द नामक पुरोहितासह तेथे येण्यास निघतो. रामासारख्या सुंदर आणि हृदयाह्लादक अशा विवाहकंकण धारण करणाऱ्या तरुण क्षत्रियकुमाराला त्याने आपल्या गुरुचा ( भगवान् शंकराचा ) अवमान केला म्हणून ठार करावे लागणार म्हणून जामदग्न्याच्या डोळ्यात अश्रू उभे राहतात. ते पाहून राम म्हणतो, 'खरेच करुणेमुळे आपणास त्रास होत आहे!' त्यावर जामदग्न्य आपण स्वतःच्या मातेचाही शिरच्छेद केला आणि एकवीस वेळा गर्भातील क्षत्रिय शिशूंचेही तुकडे तुकडे करून आपल्या क्रोधाची शान्ति केली असे आपल्या रांगीट स्वभावाचे वर्णन करतो. त्यावर राम म्हणतो —'नृशंसता हि नाम पुरुषदोषः । तत्र का विकत्थना ।' ( क्रौर्य हा पुरुषाच्या ठिकाणचा दोष आहे. त्याची इतकी बढाई कशाला ? )

इतक्यात जनक राजा आणि त्याचा पुरोहित शतानंद तेथे येऊन पोचतात. शतानंद म्हणतो—

त्वं नः पूज्यतमोऽतिथिर्यदि ततः सज्जातिथेया वयम्

( तू आम्हाला पूज्य असा अतिथि आहेस म्हणून तुझे आतिथ्य करण्यास आम्ही तयार आहो. ) त्यावर जामदग्न्य उत्तरतो, 'मला आतिथ्य नको.' तेव्हा शतानन्द म्हणतो—

कन्यान्तःपुरमकुमारप्रविशता सन्दूषिता नः स्थितिः ।

( कन्यान्तःपुरात घुसून तू आमच्या मर्यादेचा भंग केलास. ) त्यावर जामदग्न्य म्हणतो, 'मी अरण्यवासी ब्राह्मण. मला राजेलोकांच्या घरच्या रीतिरिवाजाची माहिती नाही.'

तेव्हा जनक म्हणतो–

पाप वाञ्छसि कर्म राघवशिशावस्मत्सनाथे कथम्

( म. च., २, ५० )

( आम्ही त्याचे रक्षणकर्ते असताना या बालक रामचंद्राविषयी दुष्ट कर्म करण्याचे कसे इच्छितोस ? )

इतक्यात कञ्चुकी प्रवेश करून म्हणतो–

देव्यः कङ्कणमोचनाय मिलिता राजन्वरः प्रेष्यताम् ॥

( म. च., २, ५० )

( महाराज, अंतःपुरात राणीसाहेब विवाहकंकणे सोडण्याकरिता जमल्या आहेत. जावईबुवाना तिकडे पाठवा. )

एकाच श्लोकाचे भिन्न भिन्न चरण निरनिराळ्या पात्रांनी म्हणणे यात कृत्रिमता आहे. भासाने आपल्या नाटकात असे श्लोक घातले आहेत. पण असे करणे आक्षेपार्ह आहे. कालिदासाने आपल्या नाटकात असे कोठेही केले नाही. या श्लोकातील दुसरा दोष अकाण्डच्छेद हा हेमचन्द्राने आपल्या 'काव्यानुशासना'त दाखविला आहे. शतानन्द व जनक यांच्या भाषणात वीररस उत्तरोत्तर वाढत असता कंचुकीच्या भाषणाने त्याचा एकदम भंग होतो, हा अपकर्ष( anticlimax )रूपी दोष आहे.

जनक आणि शतानन्द रामाला अंतःपुरात जाण्यास सांगतात. 'ही गुरुजनांची आज्ञा आहे' असे रामाने म्हणताच परशुराम उत्तरतो, 'लोकधर्माचे आचरण कर. तुझे नातलग तुला डोळे भरून पाहू देत. पण फार वेळ आत राहू नकोस. आम्ही अरण्यवासी लोक जनपदात फार काळ राहत नाही.'

इतक्यात सुमंत प्रवेश करून राजाला म्हणतो, 'वसिष्ठ आणि विश्वामित्र दशरथाजवळ बसले आहेत. त्यांनी आपणास परशुरामासह बोलाविले आहे.' तेव्हा ते सर्व तिकडे जातात. ( अंक २ )

या अंकातील परशुराम आणि राम यांचा प्रवेश उत्कृष्ट साधला आहे. परशुरामाचा घमंडखोर स्वभाव आणि रामाची धीरोदात्त वृत्ति परस्परांच्या विरोधामुळे उठून दिसतात.

तिसऱ्या अंकात वसिष्ठ, विश्वामित्र, जामदग्न्य ( परशुराम ) आणि शतानन्द प्रवेश करतात.

वसिष्ठ आणि विश्वामित्र जामदग्न्याला म्हणतात, 'राजा दशरथ यज्ञादिकांच्या अनुष्ठानाने इंद्राचा सखा झाला आहे. इंद्र जसा स्वर्गात तसा हा पृथ्वीवर थोर राजा

आहे. त्याचे आम्ही पुरोहित आहो. जास्त काय सांगावे ? तो सूर्यवंशात जन्मला आहे. अशा ह्या दशरथ राजा पुत्राच्या स्नेहाने तू शांत व्हावे अशी याचना करतो.

तुझ्याकरिता कालवड मारली जाईल आणि घृतयुक्त असे चमचमीत भोजन तुला मिळेल. तू श्रोत्रिय आहेस आणि आम्हा श्रोत्रियांच्या गृही आला आहेस. तर आमच्या आतिथ्याचा स्वीकार कर.'

त्यावर जामदग्न्य उत्तर करतो, 'राम लहान असला तरी आपल्या अद्भुत कर्मांनी ख्याति पावला आहे. अशा रामाकडून अपमान झाला असताही तापट स्वभावाचा जामदग्न्य स्वस्थ का बसला असे पुढे कोणी विचारल्यास आपणासारख्या गुरुंच्या गौरवामुळे असे जाणणारा, सांगणारा आणि ऐकणारा तरी कोण असेल ? उलट माझ्यासारख्या वीराचा द्वेष करणारे सहज सापडतील.'

त्यावर वसिष्ठ त्याची समजूत घालण्याचा पुष्कळ प्रयत्न करतात. ते म्हणतात, 'अरे, जन्मभर या शस्त्रधारणरूपी पिशाचिकेचा काय उपयोग ? तू श्रोत्रिय आहेस. पवित्र मार्गाचे अनुसरण कर. ज्यामुळे चित्त प्रसन्न राहते त्या मैत्र्यादि भावनाचा अवलंब कर. तुला ज्योतिष्मती योगवृत्ति सहज प्राप्त होईल. ज्याच्या योगे परब्रह्माचे ज्ञान होईल ते ब्राह्मणाने आचरावे. त्यायोगे पाप व अपमृत्यु टळतील. तुझे तर याच्या उलट आचरण आहे.'

त्यावर जामदग्न्य म्हणतो–'माझ्या शत्रूचा निःपात न करता माझे गुरु भगवान् शंकर आणि गुरुपत्नी पार्वती याना मी तोंड कसे दाखवू ?'

विश्वामित्र वसिष्ठ आणि शतानन्द यांच्याशी परशुरामाचा संबंध स्पष्ट करतात. ते म्हणतात, 'हिरण्यगर्भ ब्रह्मा यापासून वसिष्ठ, भृगु आणि अंगिरस् हे ऋषि उत्पन्न झाले. त्यापैकी हे वसिष्ठ, तू भृगुचा पुत्र आणि शतानन्द हा अंगिरसाचा पौत्र.' पण जामदग्न्य म्हणतो–'पूज्य व्यक्तींना माझ्या कडून अविक्रम होत असेल तर मी त्याबद्दल प्रायश्चित्त घेईन. पण माझ्या शस्त्रग्रहणरूपी महाव्रताला कमीपणा आणणार नाही.'

शेवटी तो म्हणतो–

एतस्य राघवशिशोः कृतचापलस्य
लूत्वा शिरो मयि वनाय पुनः प्रयाते ।
स्वस्त्यस्त्विचराय रघवो जनकाश्च सन्तु
माभूत्पुनर्वत कथञ्चिदतिप्रसङ्गः ॥ (म. च., ३, १६)

(या उद्दाम राघवशिशूचा कण्ठच्छेद करून मी पुनः वनात गेल्यावर रघुकुलातील आणि जनककुलातील पुरुष सुखाने राहोत. पुन. मात्र असा अतिप्रसंग होता कामा नये.)

रामचंद्राचा शिरच्छेद करण्याचा जामदग्न्याचा निश्चय पाहून जनकाचा पुरोहित शतानन्द याला पराकाष्ठेचा क्रोध येतो. तो म्हणतो, 'विदेहाधिपति राजर्षि जनक हे माझे प्रिय यजमान आहेत. त्यांच्या छायेचेही अतिक्रमण करण्याची कोणाची छाती आहे ! त्यांच्या जावयाला इजा करणे तर दूरच राहिले.

वयमिह यथा गृह्यो वह्निस्तथैव चिरं स्थिताः
सुचरितगुरुस्तम्भाधारे गृहे गृहमेधिनः ।
यदि परिभवस्तत्रान्यस्मादुपैति विगस्तु नः
प्रियमपि तपो धिग्ब्राह्मण्यं धिगङ्गिरसः कुलम् ॥

( म. च., ३, १७ )

( सच्चारित्र्यरूपी बळकट स्तम्भाचा आधार असलेल्या या गृहस्थाच्या घरी आम्ही गृह्याग्नीप्रमाणे चिरकाल मान्यतेने राहिलो. त्याचा दुसऱ्याकडून अपमान होत असेल तर आम्हाला प्रिय असले तरी त्या आमच्या तपाला, ब्राह्मण्याला आणि आङ्गिरस कुलाला धिक्कार असो ! ) '

शतानंदाचे हे उद्गार ऐकून विश्वामित्र म्हणतात, 'शाबास ! गौतमा, शाबास ! ह्या जनक राजाला तुझ्या सारखा पुरोहित मिळाल्यामुळे तो धन्य झाला आहे. कारण,

न तस्य राष्ट्रं व्यथते न भ्रश्यति न जीर्यति ।
त्वं विद्वान् ब्राह्मणो यस्य राष्ट्रगोपः पुरोहितः ॥

( म. च., ३, १८ )

( ज्याचा पुरोहित आणि राष्ट्ररक्षक तू विद्वान् ब्राह्मण आहेस त्या जनक राजाचे राज्य कधीही दुःखी, नाशवंत आणि जीर्ण होणार नाही. ) '

त्यावर जामदग्न्य म्हणतो, 'तुझ्यासारख्या अनेक क्षत्रिय पुरोहिताच्या ब्रह्मतेजाने यापूर्वी टुरटुर लावली होती. पण क्षुद्र तेज अलौकिक तेजापुढे फिके पडते. '

त्यावर शतानंदाचा क्रोध अनावर होऊन तो उद्गारतो, 'अरे निरपराधी राजकुलाचा संहार करणाऱ्या, महापातक्या, दुर्वृत्ता, बीभत्स कर्म करणाऱ्या, अपूर्व पाखंड्या, दुष्ट विरदाज्या, काण्डपृष्ठा ( जातिभ्रष्टा ) ! काय यावरही तू आत्मप्रौढी मानतोस ? काय तू ब्राह्मण आहेस ? काय पहा या ब्राह्मणाचा आचार ! याने आपल्या प्रत्यक्ष मातेचा शिरच्छेद, गर्भांची हत्या, वानप्रस्थ क्षत्रियानाही न सोडता सर्व राजांचा वध ही ब्रह्महत्येसारखी पातके केली आहेत. '

जामदग्न्य त्यावर उसळून म्हणतो, 'अरे, क्षत्रियाचे स्वस्तिवाचन करणाऱ्या दुष्ट सामन्तपुरोहिता, अहल्यापुत्रा, तू मला काण्डपृष्ठ ( जातिभ्रष्ट ) म्हणतोस काय ! '

जामदग्न्याने आपल्या अहल्या मातेचा उल्लेख करून आपणास उघड उघड जारिणीपुत्र म्हटले याचा शतानन्दाला संताप येतो आणि तो म्हणतो–

'हे राजलोक आणि वसिष्ठविश्वामित्रांसारखे महर्षि आपल्या थोरपणामुळे अत्यंत क्षमाशील आहेत. ते क्षमा करणार असतील तर करोत. हा शतानन्द मात्र क्षमा करणार नाही.'

असे म्हणून तो कमण्डलूतील उदकाने आचमन करतो आणि शापोदक घेऊन म्हणतो, 'मी या आततायीला, विद्युल्लतेचा अग्नि जसा एखाद्या वृक्षाला जाळून टाकतो त्याप्रमाणे, भस्म करतो.'

तेव्हा पश्चात्तून दशरथ त्याला शाप देण्यापासून निवृत्त करतो. तो म्हणतो– 'भगवन् शतानन्द, शांत हो.

श्लाघ्यो गुणैर्द्विजवरश्च निजश्च बन्धु–
स्तस्मिन्गृहानुपगते सदृशं किमेतत् ।
विद्वानपि प्रचलितस्तु यदेष मार्गा–
त्क्षात्रं हि तत्र विनयाय शमं भज त्वम् ।।

(म. च., ३, २२)

(हा जामदग्न्य गुणानी श्लाघ्य आहे. द्विजश्रेष्ठ असून तुझा बन्धु आहे. हा आपल्या घरी आला आहे. त्याच्याशी असे वागणे योग्य आहे काय? हा विद्वान् असूनही सन्मार्गापासून च्युत झाला आहे खरा. पण त्याचे नियमन करावयाला क्षात्र तेज समर्थ आहे. तू शांत हो.)

वसिष्ठही त्याचे शापोदक काढून घेऊन म्हणतात, 'वत्सा शतानन्दा, महाराज दशरथ म्हणतात तसे कर. आम्ही जे कल्याणकारक आहे ते चिन्तनाने घडवून आणू. तू आवालिप्रभृति ऋर्षीसह शांतीकरिता हवन कर आणि वामदेव ऋषि आमच्या शिष्यासह विजयप्राप्तीकरिता सूक्त, साम व अनुवाक याचा जप करोत.'

नंतर जनक प्रवेश करून म्हणतो, 'शत्रूंचा अभाव, वार्धक्य, धर्मानुष्ठान आणि ब्रह्मज्ञान यामुळे माझे विजयी क्षात्रतेज शांत झाले होते. त्याचा आता उद्भव होऊन हे माझे धनुष्य पुनः मला क्षात्र कर्माकरिता उद्युक्त करीत आहे.'

त्यावर जामदग्न्य म्हणतो–

त्वं ब्रह्मण्यः किल परिणतश्चासि धर्मेण युक्त–
स्त्वां वेदान्तेष्वचरम ऋषिः सूर्यपुत्रः शशास ।

इत्याचारादसि यदि मया प्रश्रयेणोपजुष्ट-
स्तत्किं मोहादविदितभयः कर्कशानि ब्रवीषि ।।
(म. च., ३, २६)

('तू वेदवेत्ता, वृद्ध आणि धार्मिक आहेस. सूर्यपुत्र श्रेष्ठ ऋषि (याज्ञवल्क्य) यांनी तुला उपनिषदांचे तत्त्वज्ञान शिकविले आहे. म्हणून शिष्टाचाराप्रमाणे मी तुझ्याशी सभ्यपणाने वागलो तरी तू अज्ञानामुळे निर्भय होऊन का अशी कर्कश भाषणे करीत आहेस?')

पुढेही त्यांच्यामध्ये अशीच बाचाबाची होऊन जनक आपले धनुष्य सज्ज करतो. तेव्हा दशरथ पडद्यातून म्हणतो, 'हे राजा, तू आतापर्यंत अखंड यज्ञ करून अनेक गोसहस्रदाने ज्या हाताने दिलीस तो तुझा–वृद्ध धनुर्धराचा–हात धनुष्याला स्पर्श करतो हे काय?'

त्यावर जनक उत्तर देतो–सखे, महाराज दशरथ,

अस्मानधिक्षिपतु नाम न किञ्चिदेतत्
कस्य द्विजे परुषवादिनि चित्तभेदः ।
वत्सस्य मङ्गलविरुद्धमयं तु पापः
कर्णे रटत्कटु कथं नु बटुर्विषह्यः ।। (म. च., ३, ३१)

(मित्रा, महाराज दशरथा, हा आमचा असा अपमान करतो ते एक असो. कठोर बोलणाऱ्या ब्राह्मणावर काय रागवायाचे? पण वत्स रामचंद्राविषयी अमंगल आणि कर्णकटु बोलणारा हा पापी दुष्ट बटु, याचे हे कृत्य कोण सहन करील?)

आपणाला जनकाने बटु म्हणावे याचा जामदग्न्याला संताप येतो आणि तो म्हणतो, 'माझा हा परशु तुझे तुकडे तुकडे करील.' इतका हातघाईवर प्रसंग आला असता दशरथ प्रवेश करून मध्ये पडतो आणि म्हणतो–

एष नो नरपतिर्यथा स्थितः
स्व शरीरमपि न स्थितं तथा ।
तत्र वाक्परिभवैः कृतैर्वयं
सर्वथैव ननु दुःखमास्महे ।। (म. च., ३, ३३)

(हा जनक राजा आमच्या शरीरापेक्षा आम्हाला प्रिय आहे. तू आपल्या शब्दांनी त्याचा अपमान करतोस, यामुळे आम्हास फार दुःख होत आहे.)

पण दशरथाच्या या सामोपचाराच्या भाषणाला जामदग्न्य भीक घालत नाही. तेव्हा दशरथ त्याला शासन करण्याचा निश्चय व्यक्त करतो. कारण, तो म्हणतो,

निःसन्देहविपर्यये सति पुनर्ज्ञाने विरुद्धक्रियं
राजा चेत्पुरुषं न शास्ति तदयं प्राप्तः प्रजाविप्लवः ॥

(म. च., ३, ३५)

( संदेह आणि विपरीत ज्ञान नसता मुद्दाम कुमार्गाने जाणाऱ्याला राजाने शासन केले नाही तर प्रजेवर मोठा अनर्थ गुदरेल. )

विश्वामित्र जामदग्न्याला वसिष्ठांचे पाय धरून त्यांच्यापासून ज्ञान प्राप्त करून घेण्याचा उपदेश करतात. त्यावर जामदग्न्य उत्तर करतो,

धर्मे ब्रह्मणि कार्मुके च भगवानीशो हि मे शासिता
सर्वक्षत्रनिबर्हणस्य विनयं कुर्युः कथं क्षत्रियाः ।
संबन्धस्तु वसिष्ठमिश्रविषये मान्यो जरायां न तु
स्पर्धायामधिकः समश्च तपसा ज्ञानेन मान्योऽस्ति मे ॥

(म. च., ३, ३७)

( धर्माच्या आणि वेदाच्या ज्ञानात तसेच धनुर्वेदात माझे गुरु भगवान् शंकर आहेत. ज्याने सर्व क्षत्रियांचे निर्दालन केले त्या माझे शासन क्षत्रियच कसे करणार ? वसिष्ठ ऋषि वृद्ध असल्यामुळे त्यांचा संबंध मला आदरणीय आहे. पण स्पर्धा झाली तर ते माझ्याहून वरचढ नाहीत. तपश्चर्या आणि ज्ञान यात माझ्या तोडीचा कोणी आहे का ?)

वसिष्ठ हे स्वभावतःच क्षमाशील. ते म्हणतात, ' या भृगुपुत्राकडून माझा पराजय होत आहे हे मला प्रियच आहे. हा आमचा संबंधी आहे, पण घोर कर्म करण्यास प्रवृत्त झालेल्या ह्याला अवध्य कसे मानावे ? मी याच्याकडे एकच वेळ रागाने दृष्टि फेकली तर हा भार्गवशिशु नष्ट होईल. '

विश्वामित्रानाही अखेरीस जामदग्न्याचा संताप येतो. ते म्हणतात -

ब्रह्मक्षत्रसमाजमाक्षिपसि यद्वत्से च घोराशय-
स्तेनातिक्रमणेन दुःखयसि नः पाल्योऽसि सम्बन्धतः ।
आतस्त्वां प्रति कोपनस्य तरलः शापोदकं दक्षिणः
प्राक्संस्कारवशेन चापमितरः पाणिर्ममान्विष्यते ॥

( म. च. ३, ४३ )

( तू ब्राह्मण आणि क्षत्रिय समाजाचा अपमान करीत आहेस. वत्स रामचंद्राविषयी भयंकर विचार मनात आणला आहेस. या अतिक्रमणामुळे तू आम्हास दुःख देत आहेस. तू आमचा संबंधी आणि म्हणून रक्षणीय आहेस. तरी तुझ्याविषयी रागाने

कंप पावणारा माझा उजवा हात शापोदक घेण्याकरिता पुढे होत आहे, तर पूर्वीच्या संस्कारामुळे डावा हात धनुष्य घेण्यास सरसावत आहे ).

त्यावर जामदग्न्य म्हणतो—

त्वं ब्रह्मवर्चसधरो यदि वर्तमानो
यद्वा स्वजातिसमयेन धनुर्धरः स्याः ।
उग्रेण भोस्तव तपस्तपसा दहामि
पक्षान्तरे च सदृशं परशु करोतु ।।

( म. च., ३, ४४ )

(सध्याच्या आपल्या स्थितीस अनुसरून तू ब्रह्मतेजाचा उपयोग करणार असलास किंवा आपल्या क्षत्रियजातीला अनुसरून धनुष्य घेणार असलास तरी मी स्वतःच्या तेजाने तुझ्या तेजाला जाळून टाकीन आणि धनुष्य घेतलेस तर माझा परशु योग्य ते करील.)

आता विश्वामित्र जामदग्न्याची लढाई जुंपणार, इतक्यात अंतःपुरातून परत येण्यास निघालेला राम पडद्यातून म्हणतो—

अयमहं भो , कौशिकान्तेवासी रामः प्रणम्य विज्ञापयामि—

पौलस्त्यविजयोद्दामकार्तवीर्यार्जुनद्विषम् ।
जेतारं क्षत्रवीर्यस्य विजयेयं नमोऽस्तु वः ।।

( म. च., ४, ४५ )

( हा मी विश्वामित्राचा शिष्य राम आपणास नमन करून विनंती करतो—
'पौलस्त्य रावणाचा पराजय केल्यामुळे उन्मत्त झालेल्या कार्तवीर्याचा शत्रु आणि क्षत्रवीर्याचा पाडाव करणारा जामदग्न्य याच्यावर मला विजय प्राप्त होवो ! हा माझा आपणास नमस्कार ! ' )

तेव्हा जनक आणि दशरथ त्याला विजय इच्छितात. जामदग्न्य हसून म्हणतो, ' ये, राजपुत्रा, ये. तू काय या जामदग्न्याला जिंकीन म्हणतोस ? हा रेणुकेचा पुत्र दुर्दमनीय असून तुझाच काळ होणार आहे—

कृत्तक्षत्रियकण्ठकन्दरसरत्कीलालनिर्वापित—
प्रत्युद्भूतशिखाकरालहुतभुग्भङ्कारिभिर्मार्गणैः ।
एतद्घस्मरकालदण्डकवलव्यापारमभ्यस्यतु
ब्रह्मस्तम्बनिकुञ्जपुञ्जितघनज्याघोषघोरं धनुः ।।

( म. च., ३, ४८ )

( ज्यांनी उत्पन्न केलेल्या अग्नीच्या भयंकर ज्वाला कापलेल्या क्षत्रियांच्या कण्ठातून वाह-

णाच्या रक्ताने विझवल्यामुळे आवाज होत आहे अशा बाणाच्या योगे हे माझे भयंकर धनुष्य-ज्याच्या प्रत्यंचेचा आवाज मेघगर्जनेप्रमाणे ब्रह्माण्डात दुमदुमत आहे ते-जगताचा संहार करणाऱ्या कालरुद्राच्या भक्षणव्यापाराचे अनुकरण करो.) (अंक ३)

या अंकात कथानकाची प्रगति मुळीच झाली नाही. तरी त्यातील भाषणांत त्या त्या पात्राचा स्वभाव उत्तम रीतीने व्यक्त झाला आहे. परशुरामाचा घमेंडखोर स्वभाव, त्याचा क्रूर निर्दयपणा, भगवान् शंकराविषयी भक्ति, पण वसिष्ठादिकांशी उर्मटपणा, शतानन्दाच्या बाबतीत तर शिवराळपणा उत्कृष्ट रीतीने चित्रिला आहे. शतानंदाचा तापटपणा, वसिष्ठाचा शांत स्वभाव, विश्वामित्रांची तडजोडी वृत्ति, दशरथ-जनकाची रामाविषयी चिंतातुरता आणि अन्य उपाय हरल्यास शस्त्र घेण्याची तयारी, यांचेही शब्दचित्र उत्तम साधले आहे. पण भवभूतीचा पाल्हाळ करण्याचा स्वभाव आणि पुनरुक्तीची आवड ही याही अंकात दिसून येतात.

चौथ्या अंकाच्या आरंभी एक विष्कंभक (लहान प्रवेश) घातला आहे. शूर्पणखा आणि माल्यवान् विमानातून मिथिलेला येतात. वैमानिकांना उद्देशून देवानी केलेल्या भाषणावरुन त्यांना रामाने जामदग्न्याचा पराभव केल्याचे कळते. माल्यवान् शूर्पणखेला सांगतो की 'ज्या भरतमाता कैकयीला दशरथाने पूर्वी दोन वर देण्याचे वचन दिले होते तिची मन्थरा नामक दासी दशरथाच्या समाचार जाणण्याकरिता अयोध्येहून मिथिलेला आली आहे. तू तिच्या अंगात संचार करुन असे असे कर.' असे म्हणून तो तिच्या कानात आपली योजना सांगतो व म्हणतो, 'अशा योगाचारन्यायाने (फसवणुकीने) आपण रामाला दण्डकारण्यात आणून विराध, दनुकबन्ध इत्यादिकांकडून त्याचा नाश करु. रावणाला सीतेचा ध्यास लागला आहे. पण राम साम, दाम व भेद यानी वश होणार नाही. त्याच्या बाबतीत दण्डाचा आणि त्यातही तूष्णीं-दण्डाचा (गूढवधाचा) अवलंब केला पाहिजे. आपण सीतेचे हरण केल्यावर लज्जेमुळे राम आत्मघात करुन घेईल किंवा संधि करावयास तयार होईल. कदाचित् क्रोधाच्या आवेशात आमचा नाश करण्यास तो प्रवृत्त झाला तर त्याला रावणाचा मित्र वाली याच्या हाताने ठार करु.'

माल्यवान् पुढे म्हणतो, 'फक्त बिभीषणाचे मात्र भय वाटते. त्याच्या ठिकाणच्या आभिगामिक (आकर्षक) गुणामुळे तो प्रजेचा आवडता झाला आहे. खर, दूषण वगैरे राक्षस हे स्वार्थाकरिता रावणाची सेवा करीत असले तरी बिभीषणाला आम्ही राज्याबाहेर घालवले तर ते त्याला येऊन मिळतील. असे हे राजकुल आतून पोखरलेले असल्यामुळे रामाने स्वारी करताच कोलमडेल. कारण म्हटले आहे 'लघ्वपि व्यसन-पदमभियुक्तस्य कृच्छ्रसाध्यं भवति।' (राज्यावर शत्रूची स्वारी झाली असता

लहानशाही संकटाचा प्रतिकार करणे शक्य होत नाही. ) तेव्हा खरादि राक्षसांचा अगोदरच नाश घडवून आणला पाहिजे. नंतर बिभीषण कदाचित् सुग्रीवाच्या आश्रयास जाईल, पण वाली त्याची गय करणार नाही.' शूर्पणखा विचारते, 'पण रामानें परशुरामाचा पराभव केला तसा वालीचाही करून त्याला मारलें तर ?' 'तर मग आम्हां सर्वांचा नाश अटळ आहे. आमच्या कुलाचा एक तन्तु बिभीषण याला तरी राम राज्यलक्ष्मी देवो,' असें म्हणून माल्यवान् शूर्पणखेला मन्थरेच्या अंगात संचार करण्यास पाठवितो.

यानतर मुख्य प्रवेशाला सुरवात होते. वसिष्ठ आणि विश्वामित्र यांसह दशरथ आणि जनक प्रवेश करतात. जनक रामाच्या विजयाबद्दल दशरथाचें अभिनंदन करतो. त्यावर विश्वामित्र म्हणतात, 'हे थोर पुण्याईचें फळ आहे.' तेव्हा दशरथ उत्तर करतो—

आदित्या कुलदेवतामिव नृपा पूर्वे दिलीपादय-
स्तेजोराशिमदभ्रतोपतिमुपि भक्त्या यदाशिश्रयन् ।
पाकः श्लाघ्यतरश्च भूरितपसां सत्याशिषामाशिष-
स्तासामप्ययमेव मङ्गलनिधिर्यन्नः प्रसन्नो भवान् ।।

( म. च., ४, १४ )

( सूर्यवंशातले पूर्वीचे दिलीपादि नृपति यांनी तेजोराशि वसिष्ठाची जी कुलदेवतेप्रमाणे भक्तीने आराधना केली तिचा, तसेच महान्, सत्यवक्ते तपस्वी यांनी जे आशीर्वाद दिले त्याचाही अत्यंत श्लाघ्य असा परिपाक हाच की सर्व मङ्गलाचे निधि असे आपण ( विश्वामित्र ) आम्हावर प्रसन्न झाला आहा. )

वसिष्ठही विश्वामित्राची प्रशंसा करतात. विश्वामित्र म्हणतात, 'रामानें हा विजय मिळविला यात आश्चर्य नाही कारण प्रत्यक्ष इन्द्रही ज्याचें अनेक युद्धात साहाय्य मागतो त्या दशरथाचा तो पुत्र आहे.' इतक्यात राम व जामदग्न्य प्रवेश करतात. राम जामदग्न्याला म्हणतो —

यद् ब्रह्मवादिभिरुपासितवन्द्यपादे
विद्यातपोव्रतनिधौ तपतां वरिष्ठे ।
दैवात्कृतस्त्वयि मया विनयापचार-
स्तत्र त्वं प्रसीद भगवन्नयमञ्जलिस्ते ।। ( म. च., ४, २१ )

( हे भगवन्, ब्रह्मवेत्त्यांनीही ज्याचे पादवंदन व सेवा केली, जे आपण विद्या, तप आणि व्रत यांचे निधि असे तापसश्रेष्ठ आहा, त्याच्याशी दैवगतीमुळे मी अविनयाने वागलो त्याबद्दल मला क्षमा करा. मी हात जोडतो. )

या वेळी जामदग्न्याचा सर्व अहंकार जिरला होता. तो रामाला म्हणतो, 'तू या जामदग्न्याचा अपराध केलास ? नाही; तू उपकारच केलास कारण,

पुण्या ब्राह्मणजातिरन्वयगुणः श्लाघ्यं चरित्रं च मे
येनैकेन हृतान्यमूनि हरता चैतन्यमात्रामपि ।
एकः सन्नपि भूरिदोषगहनः सोऽयं त्वया प्रेयसा
वत्स ब्राह्मणवत्सलेन शमितः क्षेमाय दर्पामयः ॥

(म. च., ४, २२)

( प्रिय वत्सा, ब्राह्मणाविषयीच्या वात्सल्याने तू माझ्या अंगचा गर्वरूपी रोग—जो अनेक दोषाचे आगर होता असा—माझ्या कल्याणाकरिता नाहीसा केलास. त्या एकट्या गर्वाने माझी पवित्र ब्राह्मण जाति, थोर कुल, श्लाघ्य चारित्र्य, किंबहुना माझे सर्व ज्ञानही नष्ट करून टाकले होते. )'

नंतर राम जामदग्न्यास वसिष्ठविश्वामित्राकडे घेऊन जातो. जामदग्न्य विश्वामित्रासहित वसिष्ठांना वंदन करून म्हणतो—

वृद्धातिक्रमसंभृतस्य महतो निर्णिक्तये पाप्मनः
प्रायश्चेतनमादिशन्तु गुरवो रामेण वान्तस्य मे ।
प्राग्धर्मस्य भवन्त एव परमं द्रष्टार आसन्गुरो-
र्लब्ध्वा ज्ञानमनेकधा प्रवचनैर्मन्वादयः प्राणयन् ॥

(म. च., ४, २५)

( रामाने दमन केलेल्या मला आपण वृद्धाचा उपमर्द केल्यामुळे प्राप्त झालेल्या महापातकाचे प्रायश्चित्त आपण सांगावे. प्रारंभी आपणच धर्माचे श्रेष्ठ द्रष्टे होता. आपणा गुरूंपासून ज्ञान प्राप्त करून घेऊन मन्वादिकांनी आपल्या अनेक स्मृति रचल्या. )

त्यावर वसिष्ठ म्हणतात—अद्य नः श्रोत्रियाणां कुले जातोऽसि ।
दुर्विनीते त्वयि वयं दुःखिताः सुखिनोऽन्यथा ।
निसर्गो ह्येष वृद्धानां यत्तु श्रेयस्तदेव तत् ॥

(म. च., ४, ३८)

( आज तू आम्हा श्रोत्रियाच्या कुलात जन्मलास. तुझ्या उद्दामपणाने आम्हास दुःख झाले होते. आता तू पालटलास म्हणून आम्ही सुखी झालो आहो. हा आम्हा वृद्धाचा स्वभावच आहे. पण जे कल्याणकारक असते ते सदैव तसेच असते. )

विश्वामित्रही त्याला दुजोरा देतात. ते म्हणतात, 'रामभद्राने तुझ्या पापाचा नाश केला आहे. प्रायश्चित्ताप्रमाणे राजदण्डानेही पापाचे क्षालन होते. आता तर भगवान् वसिष्ठानी दशरथ राजासमोरच ते सांगितले आहे.'

त्यावर दशरथ म्हणतो--

निसर्गत पवित्रस्य किमन्यत्पावनं तव ।
तीर्थोदकं च वह्निश्च नान्यतः शुद्धिमर्हतः ।।

(म. च., ४, २७)

( तू स्वभावत च पवित्र आहेस. तुला दुसरे काय पावन करणार ? तीर्थोदक आणि अग्नि याना दुसऱ्याकडून पावन होण्याची गरज नसते. )

हे ऐकून जामदग्न्य लज्जित होतो आणि म्हणतो, ' भगवति वसुन्धरे, मला तुझ्या पोटात जागा दे. '

नतर ते सर्व एकत्र बसून गोष्टी करतात. पुढे जामदग्न्य अरण्यगमनाकरिता त्याची अनुज्ञा मागतो. तेव्हा विश्वामित्रही जावयास निघतात. ते वसिष्ठानाही आपल्या सिद्धाश्रमास भेट देण्यास आमंत्रण देतात. इतक्यात पडद्यातून सीता त्याना वंदन करते. तेव्हा ऋषि तिला पुढील आशीर्वाद देतात--

' वत्से जानकि

वीरेण ते विनयमाङ्गलिकेन पत्या
वृत्रद्रुहः प्रशमितेषु महाभयेषु ।
क्षत्रप्रकाण्डगृहिणीबहुमानपूजा-
मूर्जस्वलामपि शची मनसा करोतु ।। '

(म. च., ४, ३५)

( वत्से सीते, विनयाने मंगल्युक्त झालेल्या तुझ्या शूर पतीने इन्द्राचे शत्रूंपासून उत्पन्न झालेले घोर भय नाहीसे केल्यावर शची क्षत्रियश्रेष्ठाची गृहिणी म्हणून तुझी मनाने बहुमानपूर्वक पूजा करो. )

यात रामाचा रावणावरचा भावी विजय सूचित केला आहे. नंतर वसिष्ठ विश्वामित्र जातात. जामदग्न्यही जाताना वसिष्ठ-विश्वामित्राचे आशीर्वाद घेतो. नतर तो रामाला म्हणतो—

यन्मया क्षत्रविच्छेदविश्रान्तेनापि धारितम् ।
तदेतदधुना धत्से धनुः करणशून्यताम् ।।

(म. च., ४, ३७)

इध्मादिप्रयोजनस्तु परशुः ।

पुण्यानामृषयस्तटेषु सरितां ये दण्डकाया वने
भूयांसो निवसन्ति तेषु सततं लङ्कासदो राक्षसाः ।

विध्वंसाय चरन्ति तत्प्रमथने त्वस्योपयोगो भवे–
त्संप्रत्येष सहामुनैव धनुषा वत्सेऽधिकारः स्थितः ।।

( म. च., ४, ३८ )

( मी क्षत्रियांचा उच्छेद केल्यावरही जवळ बाळगलेल्या या धनुष्याचा आता काहीच उपयोग नाही. हा परशु मात्र समिधा तोडण्याला उपयोगी पडेल.

दण्डकारण्यामध्ये पवित्र नद्यांच्या तीरावर आश्रमात जे अनेक ऋषि राहतात त्यांचा वध करण्याकरिता लंकेतून राक्षस येतात. त्यांच्या नाशाकरिता याचा उपयोग होईल. आता हे धनुष्य धारण करण्याचा आणि राक्षसनिर्दाळनाचा अधिकार, वत्सा, तुझा आहे.)

ते ऐकून रामाच्या मनात विचार येतो की आपण कोणत्या तरी उपायाने दंडकारण्यात जावे. तो म्हणतो, 'गुरुजनांचे माझ्यावर प्रेम असल्यान हे कसे घडावे ? परशुरामाने आता शस्त्रत्याग केला आहे आणि मी परतंत्र आहे. तेव्हा राक्षस येथून तपस्व्यांना काढून लावतील.'

इतक्यात पडद्यातून लक्ष्मण सांगतो, 'रामा, आमची मध्यम माता कैकेयी हिची प्रियसखी मन्थरा अयोध्येतून तुम्हाला भेटण्यास आली आहे.' नंतर शूर्पणखेने आविष्ट झालेली मन्थरा प्रवेश करून रामाला म्हणते, 'तुझ्या मध्यम मातेने तुला आलिंगन देऊन ही आज्ञा केली आहे – पूर्वी महाराजानी मला दोन वर देण्याचे वचन दिले होते. त्यासंबंधी माझी विज्ञापना त्याना कळव.' असे म्हणून ती एक लेख देते. तो लेख लक्ष्मण पुढीलप्रमाणे वाचतो–

अस्त्वेकेन वरेण वत्सभरतो भोक्ताधिराज्यश्रियः
यात्वन्येन विहाय कालहरणं रामो वने दण्डकाम् ।
तस्यां चीरधरश्चतुर्दशसमास्तिष्ठन्वसौ त पुनः
सीतालक्ष्मणमात्रकात्परिजनादन्यो न चानुव्रजेत् ।।

( म. च., ४, ४१ )

( एका वराने भरताला तुमचे साम्राज्य मिळावे दुसऱ्या वराने लागलीच रामाने दण्डकारण्यात जावे. तेथे वल्कले धारण करून त्याने चौदा वर्षे राहावे आणि सीता व लक्ष्मण याशिवाय दुसऱ्या कोणीही त्याच्या बरोबर जाऊ नये. )

रामाला पाहिजे होते तेच घडून येते. मन्थरा निघून गेल्यावर मातुल युधाजित् आणि भरत प्रवेश करतात आणि रामाला राज्याभिषेक करावा ही प्रजाजनाची इच्छा दशरथाला कळवतात. वसिष्ठ आणि विश्वामित्र येथे नाहीत, ही अडचण दशरथाने मांडताच जनक म्हणतो, 'भगवान् वामदेव येथे आहेतच. वसिष्ठविश्वामित्रांच्या

प्रस्वात् चागले कृत्य केल्यास त्याना ते आवडेलच.' तेव्हा दशरथ जामदग्न्यविजयोत्सवाबरोबरच राज्याभिषेकोत्सव व्हावा अशी आज्ञा करतो. 'अशा प्रसंगी ज्याला जे पाहिजे ते त्याला द्यावे' असे दशरथाने म्हणताच राम पुढे होऊन, 'बाबा, माझी मध्यम माता जे दोन वर मागत आहे ते दिला द्यावे' अशी विनंती करतो. त्याला दशरथाने संमति देताच तो कैकेयीचे मागील दोन वराविषयीचे पत्र वाचून दाखवितो. ते एकताच दशरथ व जनक मूर्छित होतात. युधाजित् खिन्न होऊन म्हणतो—

पतिर्मृत्योर्वक्त्रे व्रजति वनमेतत्सुतयुग
वधूटी रक्षोभ्यो बलिरिव वराकी प्रणिहिता ।
निरालम्बो लोकः कुलमयशसा तच्च निहतं
स्वसुर्मे दौरात्म्य जगदविकल विक्लवयति ।।

(म. च., ४, ५३)

(पति मृत्युमुखात जातो आहे. हे दोन पुत्र वनाला चालले आहेत. बिचारी ही लहान सून राक्षसाना बलिप्रमाणे दिली जात आहे. लोक निराधार झाले आहेत. आमच्या कुलाला बट्टा लागला आहे. माझ्या बहिणीच्या या दुष्टपणामुळे सर्व जग विव्हल झाले आहे.)

शेवटी युधाजित् शरभङ्ग ऋषींनी दिलेल्या पादुका भरताला देण्याविषयी रामाला विनंती करतो. रामाने तसे केल्यावर भरत त्या शिरसावंद्य करून म्हणतो, 'आपण परत याल तोपर्यंत मी जटा धारण करून व आपल्या पादुकाना अभिषेक करून पृथ्वीचे पालन करीन.'

नंतर दशरथ सावध झाल्यावर जनक आणि भरत त्याला घेऊन जातात. तेव्हा युधाजित् रामाबरोबर तपोवनास जाण्याकरिता निघालेल्या अयोध्यावासी जनांचे येणेप्रमाणे वर्णन करतो—

स्कन्धारोपितयज्ञपात्रनिचयाः स्वैर्वाजपेयार्जितै-
श्छत्त्रैर्वारयितु तवार्ककिरणानेते महाब्राह्मणाः ।
साकेताः सह मैथिलैरनुपतत्पत्नीगृहीताग्नयः
प्राग्वत्स्यापितहोमधेनव इमे धावन्ति वृद्धा अपि ।।

(म. च., ४, ५८)

(हे अयोध्यावासी महाब्राह्मण, वृद्ध असले तरीही मिथिलेतील ब्राह्मणासह खांद्यावर यज्ञपात्रे घेऊन वाजपेय यज्ञात मिळालेली छत्रे तुजकरिता—तुला सूर्यकिरणाचा ताप होऊ नये म्हणून—घेऊन आणि आपल्या होमधेनु पुढे घालून धावत चालले आहेत. त्यांच्या मागून त्यांच्या पत्नी गृहाग्नि घेऊन जात आहेत.)

हे सर्वच वर्णन अनुचित आहे. ते 'वाल्मीकिरामायणा'तून घेतले आहे.[1] तेथे ते उचित आहे. कारण राम अयोध्येतून वनास निघाला होता. साकेताचे (अयोध्येचे) ब्राह्मण मिथिलेत आपल्या पत्नी व गृह्याग्नीसह आले कसे आणि त्यांना वनगमनाची वार्ता लागलीच समजली कशी ? येथे भवभूतीने कथानकाचा घोटाळा केला आहे.

नंतर युधाजिताला परत पाठवून राम लक्ष्मण व सीता यासह वनास जावयास निघतो. तेव्हा लक्ष्मण म्हणतो, 'शृंगवेरपुरी राहणाऱ्या गुहाने विराध राक्षसाने त्या प्रदेशापर्यंत धुमाकूळ माडल्याचे आपणाला सांगितले आहे.' तेव्हा राम उत्तर करतो-

दुष्ट विराधाला मारण्यासाठी प्रयागाजवळच्या मन्दाकिनी नदीने वेष्टिलेल्या चित्रकूटाला आपण जाऊ आणि नंतर

मुनिभिरुपजुष्टतीर्थां रक्षांसि निहत्य दण्डकां प्राप्य ।
सन्निहितगृध्रराजं क्रमेण यामो जनस्थानम् ॥ ( म. च., ४, ६१ )

( ऋषि जेथील तीर्थ क्षेत्रात राहत आहेत अशा दण्डकारण्यात जाऊन, राक्षसांचा संहार करून, नंतर आपण क्रमाने जिथे गृध्रराज राहतो त्या स्थानाजवळच्या जनस्थानाला पोचूं. ) ( अंक ४ )

या अंकामध्ये भवभूतीने मूळ कथानकात अनेक फरक केले आहेत. रामादिकांचा विवाह मिथिलेत झाला असल्यास त्याकरिता कैकेयी आदिकरून दशरथाच्या राण्या आल्या नाहीत, हे विलक्षण वाटते. तसेच, रामाला यौवराज्याभिषेक करण्याचे ठरले ते तो अयोध्येत परत गेल्यावर काही काळाने. त्यावेळी तेथे भरत नव्हता. तो मातुलगृही गेला होता. स्वतः भवभूतीनेही 'उत्तररामचरिता'त तसेच म्हटले आहे. उत्तररामचरितातील

जीवत्सु तातपादेषु नवे दारपरिग्रहे ।
मातृभिश्चिन्त्यमानानां ते हि नो दिवसा गताः ॥

हा श्लोक ( १, १९ ) पाहा. पण कैकेयीला दोषमुक्त करण्याकरिता भवभूतीने राज्याभिषेकाची सूचना भरत आणि युधाजित् यांच्याकडून आल्याचे दाखविले आहे. मन्थरेनेही कैकेयीकरिता हे वर मागितले ते तिच्या अंगात शूर्पणखेचा संचार झाला होता म्हणून. तसेच त्याच्या युद्धाशी भाल्यवानाचे कारस्थान होते, हेही भवभूतीने कल्पिले आहे. रामाला राज्याभिषेक करावयाचा तो दशरथाच्या राजधानीतच करणे योग्य होते. तो वसिष्ठाच्या अनुपस्थितीत मिथिलेत गडबडीने करण्याचे प्रयोजन काय

१. वाल्मीकिरामायण (चिकित्सक आवृत्ति), अयोध्याकाण्ड, ४०, १९-२१.

हे भवभूतीने सांगितले नाही. रामाच्या मिथिलेतील राज्याभिषेकास वसिष्ठांचा विरोध येईल असे वाटून त्यांना विश्वामित्राबरोबर सिद्धाश्रमास पाठविलेले दिसते. तरीही राम सीतालक्ष्मणासह वनाला जावयास निघाला तो निमिषार्धात ही वार्ता सर्वत्र पसरून अयोध्येतील ब्राह्मण आपले गृह्याग्नि घेऊन आणि होमधेनूंना पुढे घालून त्याच्या पुढे धावत चालले ही! हे सर्व फरक रामायणाच्या कथेत करताना भवभूतीने विवेक दाखविला नाही, असे म्हणणे भाग आहे. त्याला सविधानक-रचनेची कला अजून नीट अवगत झाली नव्हती हे उघड आहे.

माल्यवानाचे राजकारणही असेच अपरिपक्व आहे. आपण काय काय उपाय योजणार याची सविस्तर माहिती तो अगोदरच देतो; तसेच ते फसले तर काय करावयाचे हेही सांगून ठेवतो. त्यामुळे प्रेक्षकांचे कुतूहल नष्ट होते. खऱ्या मुत्सद्याच्या युक्त्या त्यांच्या परिणामावरून अनुमानावयाच्या असतात. 'फलानुमेयाः प्रारम्भाः' असे त्यांचे वर्णन कालिदासाने केले आहे. या बाबतीत 'मुद्राराक्षसा'तील राक्षस व चाणक्य यांची कारस्थाने पाहावी. त्यांच्या पासंगास माल्यवान् पुरणार नाही.

पाचव्या अंकाच्या आरंभी एक विष्कंभक आहे. अरुणाचे दोन पुत्र संपाति व जटायु असे होते. एकदा त्यांनी सूर्यमंडलापर्यंत उडण्याचा अविचार केला. तेव्हा त्याच्या पंखांना इजा पोचू नये म्हणून संपातीने त्यावर आपल्या पंखांचे आवरण घातले. पण त्यामुळे त्याचे दोन्ही पंख जळून गेले. तेव्हापासून तो दक्षिणेत मलय पर्वताच्या गुहेत राहत असे. तेथे जटायु त्याला भेटण्यास येई. अशा एका भेटीत जटायु त्याला राम पंचवटीत येऊन राहिल्याचा वृत्तान्त सांगतो. तो म्हणतो, 'अगस्त्यांनी सांगितल्याप्रमाणे जनस्थानात गोदावरीच्या तीरी पञ्चवटीत राम सीतालक्ष्मणासह राहत असता त्याच्यावर मोहित होऊन शूर्पणखा त्याच्याकडे आली. पण लक्ष्मणाने तिचे कान, नाक आणि ओठ कापून रावणाच्या तिरस्काराचा प्रशस्तिलेखच जणू काय तिच्यावर लिहिला. त्याचा सूड घेण्याकरिता चौदा हजार आणि चौदा राक्षस दूषण, खर आणि त्रिशिरा या आपल्या नेत्यांसह रामावर चालून आले, पण रामाने एकट्याने त्या सर्वांचा संहार केला. ते ऐकल्यावर 'आता रावण याचा वचपा काढल्याशिवाय राहणार नाही. तेव्हा तू राम, लक्ष्मण व सीता यांच्यापासून क्षणभरही दूर राहू नको' असे उपदेश जटायूस सांगतो. नंतर जटायु तेथून उडून आकाशमार्गाने पञ्चवटीस येतो, तेव्हा त्याला खालील दृश्य दिसते.

दूरं दुतश्चित्रमृगेण रामस्तया दिशा गच्छति लक्ष्मणोऽपि ।
तत: परिव्राड्‌वपुः प्रविष्टो विविक्तमस्याः दशकन्धरोऽयम् ॥
( म. च., ५, १६ )

( आश्चर्यकारक अशा सुवर्णमृगाने रामाला पर्णकुटीपासून दूर नेले आहे. त्याच दिशेने लक्ष्मणही जात आहे. इतक्यात संन्याशाच्या रूपाने हा एकटाच रावण तेथे प्रवेश करीत आहे. )

तितक्यात सहस्राधिक पिशाचमुख खेचर जोडलेल्या रथात सीतेला घालून दुष्ट रावण कोठे तरी जात आहे असे जटायूला दिसते. तेव्हा तो त्याला युद्धाचे आव्हान देतो. येथे विष्कंभक संपतो.

मुख्य प्रवेशात राम व लक्ष्मण सीताहरणाबद्दल शोक करताना दिसतात. शोकसंतप्त राम खिन्न होऊन म्हणतो—

यैर्गुप्तान्यकुतोभयानि भुवनान्यासन्महाभोगव-
स्ते सूर्यान्वयकेतवो नृपतयः पूर्वे तिरस्कारिताः ।
कल्पान्तेष्वपि यः स्थिरः स गमितः साधुर्जटायुर्दिवं
पत्नीं हारयता वने यदकृत लोकैः कृतं तन्मया ।।

( म. च., ५, २१ )

( ज्यानी रक्षण केल्यामुळे सर्व भुवने निर्धास्त असत त्या सूर्यवंशात उत्पन्न झालेल्या महातेजस्वी पूर्वजांना मी काळोखी फासली. प्रलयकालीही जो सुस्थिर असे अशा साधु जटायूला परलोकी पाठविले. पत्नीला अरण्यामध्ये दुसऱ्याला नेऊ दिले. जे इतरांनी केले नाही ते मी केले आहे ! )

त्यावर लक्ष्मण म्हणतो, ' तात जटायूची ती अखेरची अवस्था अजून माझ्या डोळ्यासमोर आहे. खालील उद्गार काढून त्यांनी आपला प्राण सोडला—

यामोषधिमिवायुष्मन्विचिनोषि वने वने ।
सा सीता मम च प्राणा रावणेनोभयं हृतम् ।।

( बाळा, वनावनामध्ये जिचा औषधीसारखा शोध तू करीत आहेस ती सीता तसेच माझे प्राणही रावणाने हरण केले. )

हा श्लोक प्रायः याच शब्दात वाल्मीकिरामायणात आला आहे.

राम व लक्ष्मण जनस्थानातून पुढे दंडकारण्याच्या पश्चिम भागात जातात, तो मतङ्गाश्रमात राहणाऱ्या पण रामाच्या शोधात असलेल्या श्रमणा नामक सिद्धा शबरी तापसीची आपणाला कबन्ध राक्षसापासून वाचविण्यासाठी केलेली आर्त विनवणी त्यांना ऐकू येते. तेव्हा राम त्याच्या नाशार्थ लक्ष्मणाला पाठवतो. लक्ष्मण त्याला ठार मारून श्रमणेला घेऊन येतो. ती बिभीषणाचे पत्र रामाला देते. राम बिभीषणाला लंकेचे राज्य देऊ, असे सूचित करतो. तेव्हा ' रावण सीतेला नेत असता तिने अवणाथ अनसूयेने

दिलेले आणि त्यावर तिचे नाव असलेले उत्तरीय खाली टाकले आणि ते ऋष्यमूक पर्वतावर वास्तव्य करणाऱ्या सुग्रीव, बिभीषण, हनुमान् इत्यादि रामभक्तांनी घेतले आहे ' असे श्रमणा रामलक्ष्मणांना सांगते. नंतर लक्ष्मणाने ठार केलेल्या दनु कबन्ध राक्षसाच्या चितेचे किळसवाणे वर्णन आले आहे. त्या चितेतून उत्पन्न होऊन एक दिव्य पुरुष रामाला म्हणतो –

दनुर्नाम श्रियः पुत्रः शापाद्राक्षसतां गतः ।
इन्द्रास्त्रकृतकाबन्ध्यः पूतोऽस्मि भवदाश्रयात् ।।
( उ. च., ५, ३४ )

( मी श्रीनामक अप्सरेचा दनु नामक पुत्र आहे. शापामुळे मी राक्षस झालो आणि इन्द्राच्या अस्त्राने माझे हातपाय तोटल्यामुळे मी कबन्ध झालो. आपल्या आश्रयाने मी पावन झालो आहे. )

हाही श्लोक अगदी याच शब्दात 'वाल्मीकिरामायणा'त (४,४,१२) आला आहे.

पुढे तो सांगतो, ' माल्यवानाच्या चिथावणीवरुन तुमचा घात करण्यासाठी मी हे अरण्य उद्ध्वस्त केले होते. आता त्याने वालीला तुमच्या घाताकरिता उद्युक्त केले आहे आणि वालीनेही ते काम रावणाच्या मैत्रीखातर पत्करले आहे. ' तेव्हा राम म्हणतो —

नैतादृशः सुहृत्कार्ये माध्यस्थ्यमवलम्बते ।
ममाप्यस्मिन्महावीरे सोत्कण्ठमिव मानसम् ।।
( म. च., ५, ३६ )

( वालीसारखा महावीर आपल्या मित्राच्या कार्यात तटस्थ राहत नाही. मलाही त्याला भेटण्याची उत्सुकता आहे. )

हे ऐकून इतर सर्व म्हणतात, ' रामाशिवाय इतर कोणाच्या तोंडून असे उद्गार निघतील ? ' पुढे जाताना त्यांना वालीने ठार केलेल्या दुन्दुभि राक्षसाच्या अस्थींच्या पर्वतान आपल्या मार्गात अडथळा आणल्याचे दिसते. तेव्हा राम आपल्या पायाच्या अंगठ्याने तो अस्थिपर्वत विन्ध्यपर्वतापलीकडे फेकून देतो. पुढे त्यांना ऋष्यमूक व पम्पा यांचा प्रदेश लागतो. त्यांतील निर्झराच्या व अरण्याच्या वर्णनाचे दोन श्लोक ( ५, ४० आणि ४१ ) ' उत्तररामचरिता 'तही दण्डकारण्याच्या वर्णनात आले आहेत. कदाचित् ते भवभूतीने या नाटकात मागाहून घातले असतील.

त्या वेळी पावसाळ्याचा आरंभ होत असल्यामुळे रामाला सीतेच्या विरहाने दुःख असह्य होऊन त्याच्या डोळ्यात अश्रु उभे राहतात आणि तो धनुष्याचा आधार घेऊन उभा राहतो. तो म्हणतो,

स्थितमुपनतजृम्भाणर्भस्थिम्बैः कदम्बैः
कृतमविकलकण्ठैस्ताण्डवं नीलकण्ठैः ।
उपरिविघटमानप्रौढतापिच्छनील-
श्रयति शिखरमद्रेर्नूतनस्तोयवाहः ॥ ( म. च., ५, ४२ )

( या कदम्ब वृक्षाची फुले नुकतीच फुलू लागली आहेत. मधुर स्वराचे मोर नाचत आहेत. आणि फुललेल्या तमाल पुष्पांप्रमाणे नीलवर्ण नूतन मेघ गिरिशिखराचा आश्रय घेत आहे. )

रामाची ही अवस्था पाहून त्याचे मन दुसऱ्या गोष्टीकडे वळेल तर बरे, असे विचार लक्ष्मणाच्या मनात येतात. तोच पडद्यात वालीचे माल्यवानाला उद्देशून खालील शब्द ऐकू येतात —

'मामा, मामा, मागे फिरा. तुमच्या आज्ञेने मी असे करणे अयोग्य असले तरीही रामासारख्या सज्जनाचा वध करीन. तुम्ही माझा मित्राचे ( रावणाचे ) वडील नातलग आहा, तेव्हा माझेही तसेच आहा.' तो वाली आहे असे श्रमणा त्याना सांगते आणि त्याचे पुढील वर्णन करते—

बिभ्राणश्चारुचामीकरकमलमयं दाम दत्तं मघोना
पिङ्गेनाङ्गेन संध्याच्छुरित इव महानम्बुवाहस्तडित्वान् ।
उत्पाताविद्धमूर्तेरधदुपरि गिरेर्गैरिकाद्गस्य लक्ष्मी-
मन्तः सीमन्तरेखामिव वियति जवाद्रिन्द्रसूनुस्तनोति ॥
( म. च., ५, ४४ )

( याने इंद्राने दिलेली सुंदर सुवर्ण कमलाची माळ धारण केली आहे, सर्वांग पिंगट असल्यामुळे हा संध्याकाळच्या प्रकाशाने लाल झालेल्या, विद्युल्लतेने युक्त अशा विशाल मेघासारखा दिसत आहे. ज्वाळांनी वेष्टित अशा पर्वताच्या गेरूने युक्त असलेल्या पठाराची शोभा धारण करणारा हा वाली वेगाने येत असता जणू काय आकाशाची सीमन्तरेखाच भासत आहे. )

नतर वाली प्रवेश करतो. त्याला रामाशी कलह करणे आवडत नाही. तो म्हणतो, 'लोकांच्या आग्रहाला बळी पडले म्हणजे मनुष्य मोठ्या अयोग्य वर्तनाच्या खड्डयात पडतो. पाहा, या माल्यवानाने मी रावणाला वचन दिलेल्या मैत्रीची आठवण देऊन या रामाला ठार करण्याचे काम माझ्यावर टाकले आहे. आज सकाळपासून माझ्या पाठीमागे लागून त्याने मला किष्किन्धेतून बाहेर काढले तेव्हाच त्याने माझा पिच्छा सोडला. अरेरे, ही फारच वाईट गोष्ट झाली !

दौरात्म्याद्रिमिनिजाजवञ्चो मायाविभिर्वञ्चिते
धर्मात्मन्यतिथौ निरागसि जगत्पूज्ये गृहानागते ।
एतस्मिन्नुचितं न नाम विहितं वाचाऽपि नोक्तं प्रियं
धिक् पापेन मया रिपाविव कथं बद्धो वधायोद्यमः ।।
(म. च., ५, ४६)

( दुष्टपणामुळे मायावी शत्रूंनी फसविलेल्या, सरळ स्वभावाच्या, निरपराधी, धर्मात्मा व सर्व जगाला पूज्य अशा हा राम माझ्या घरी आला असता मी त्याच्याशी योग्य रीतीने वागलो नाही, त्याच्याशी चार गोड शब्दही बोललो नाही, उलट पापी असा मी याचा शत्रूप्रमाणे वध करण्याचा प्रयत्न करीत आहे. मला धिक्कार असो ! ) '

येथे भवभूतिप्रणीत प्रस्तुत नाटकाचा भाग संपतो. यानंतरचा भाग भवभूतीचा नसल्यामुळे तो पुढे थोडक्यात देऊ. पण त्याच्या पूर्वी या अंकातील संविधानकाची समीक्षा केली पाहिजे. रामचरित्रातील एखादा विशिष्ट प्रसंग घेऊन त्यावर नाटक रचण्याऐवजी त्याच्या पूर्वचरित्रातील सर्वच प्रसंग भवभूतीने प्रस्तुत नाटकात घेतले असल्यामुळे त्यात नाटकात आवश्यक असलेले कार्यैक्य ( unity of action ) साधले नाही. कबन्धाने श्रमणेला पकडणे आणि वालीने रामाशी युद्ध करणे ही दोन्ही माल्यवानाच्या विचारणेवरून झाली असे दाखवून कवीने या प्रसंगापुरते कार्यैक्य साधण्याचा प्रयत्न केला आहे. पण इतर अनेक प्रसंग त्याला आरंभीच्या विष्कंभकात जटायूच्या तोंडून वर्णावे लागले आहेत. तसेच एकाच अंकात पंचवटीपासून किष्किंधे-पर्यंतचा प्रदेश रामलक्ष्मणांनी आक्रमिला आणि त्या प्रवासात कबन्धवध, वालीयुद्ध इत्यादि घटना घडल्या असे दाखवावे लागले आहे. यात संस्कृत नाटकात सामान्यतः आढळणारे स्थलैक्यही ( unity of place ) साधले नाही.

रामचरित्रात आक्षेपार्ह अनुचित वाटणाऱ्या घटना दोन. पहिली पंचवटीत राम चित्रमृगाचे रूप धारण करणाऱ्या मारीचाच्या मागे लागून दूरवर गेला असता त्या राक्षसाच्या आर्त हाकेने फसून सीतेने लक्ष्मणाला वाक्ताडन करणे, आणि दुसरी वाली आणि सुग्रीव यांचे युद्ध चालू असता रामाने वृक्षाआडून बाण मारून वालीला घायाळ करणे. यांपैकी पहिलीचा निर्देश भवभूतीने सीताहरणाचा प्रसंग जटायूच्या मुखाने वर्णन करून टाळला आहे. दुसरी घटना तो कशी वर्णन करणार होता हे समजण्यास साधन नाही. तथापि त्याने केलेल्या वालीच्या वर्णनावरून रामाने त्याच्याशी धर्मयुद्ध करूनच त्याला ठार केले, असे दाखविण्याचा भवभूतीचा उद्देश असावा असे वाटते. 'महावीर-चरिता'चा राहिलेला भाग लिहिणाऱ्या दोन्ही कवींनी तसेच दाखविले आहे. हे पुढे दिसेल.

हा राहिलेला भाग उत्तर आणि दक्षिण भारतात दोन निरनिराळ्या कर्त्यांनी लिहून नाटक पुरे केले आहे. उत्तरेतील प्रचलित भाग कविश्रेष्ठ विनायकाने लिहिला होता. पाचव्या अंकातील ४६ व्या श्लोकापासून त्या अंकाच्या समाप्तीपर्यंतचा भाग आपणांसही एका विशिष्ट्या पाठात उपलब्ध झाला आहे. हा विशिष्ट पाठ कोणी रचला याच्याविषयी विद्वानांनी भिन्न भिन्न मते व्यक्त केली आहेत. पण तो पाठ भवभूतीचा नव्हे हे सर्वांनाच मान्य असल्यामुळे त्या वादात येथे शिरण्याची जरूरी नाही.[1] तोडरमल्लानी आपल्या चिकित्सक आवृत्तीत दिलेल्या आणि टी. आर. रत्नम् ऐयर आणि रंगाचार्य यांच्या आवृत्तींच्या परिशिष्टात ' सर्वतः प्रचलितः पाठः '[2] ( उत्तर-भारतात सर्वत्र प्रचलित असलेला पाठ ) या शब्दांनी वर्णिलेला पाठच घेऊन पुढील भागाचा खालील सारांश दिला आहे--

## उत्तर भारतात प्रचलित असलेला पाठ

राम व वाली यांची गाठ पडल्यावर दोघांनाही परस्पराविषयी आदर वाटतो. वाली रामाला युद्धाचे आव्हान देतो, पण वाली शस्त्रहीन असता सशस्त्र आपण त्याच्याशी युद्ध करावे हे योग्य नाही असे रामाला वाटते. पण वाली म्हणतो, ' आम्ही वानर शस्त्रांनी विजय प्राप्त करीत नसतो. तुझा आग्रहच असेल तर आमचे शस्त्र हे पर्वत. चल आपण युद्धाला योग्य अशा ठिकाणी जाऊ. '

नंतर त्यांचे युद्ध इतरत्र होते. वालीचा स्वर आणि रामाच्या धनुष्याचा टणत्कार ऐकून बिभीषण, सुग्रीव व इतर वानर तेथे येतात. इतक्यात श्रमणा म्हणते, ' हा पहा रामाचा बाण वालीचे शरीर, दुन्दुभि राक्षसाच्या अस्थींचा समूह, सात तालवृक्ष, पर्वत आणि पृथ्वीतल यांचा भेद करून पुनः रामाच्या भात्यात परत आला आहे. नंतर वाली आपल्या कृत्याबद्दल रामाची क्षमा मागून सुग्रीव व बिभीषण यांना रामाशी सख्य करण्याविषयी सांगतो आणि सर्व वानरांना पुढील युद्धात शौर्याने लढण्याचा आदेश देऊन स्वतःला कट्टेलाट करून घेण्याकरिता योग्य ठिकाणी नेण्याचा आदेश देतो. ( अंक ५ )

सहाव्या अंकाच्या आरंभी आपल्या सर्व योजना निष्फळ झालेल्या पाहून खिन्न झालेला माल्यवान् प्रवेश करतो. त्रिजटेकडून त्याला लंकादहनाची वार्ता कळते. अद्यापि रावण सीतेचा नाद सोडत नाही म्हणून त्याची राणी मंदोदरी त्याला उपदेशाच्या चार

---

१. तोडरमल्ल यांना मात्र हा पाठ भवभूतीनेच रचला असावा असे वाटते. महावीरचरिताची प्रस्तावना, पृ ८. सुशीलकुमार दे यांना हे मत मान्य नाही. इ. अॅ., पु ५९, पृ. १६.

२. पूर्वोक्त, पु. ५९, पृ. १६.

गोष्टी सांगण्याकरिता गेल्याचेही त्याला त्रिजटेकडून कळते. या विष्कंभकानंतरच्या मुख्य प्रवेशात मन्दोदरी रावणाला 'वानरांनी समुद्रावर दगडाचा पूल बांधला आहे व ते दगड पाण्यावर तरंगत आहेत,' असे सांगते, पण ते त्याला खरे वाटत नाही. इतक्यात त्याचा प्रहस्त नामक सेनापति येऊन रामाचा अंगद नामक दूत आल्याचे सांगतो. रावणाला अंगदाच्या सप्रोक्तीचा क्रोध येऊन तो त्याला शासन करण्याकरिता प्रहस्ताला आज्ञा करतो, पण अंगद देखून उडी मारून नाहीसा होतो. नंतर रावण सेनापतीला आपले राक्षस सैन्य सज्ज करून वानरांवर पाठविण्याची आज्ञा करतो आणि मन्दोदरीला आंत जाण्यास सांगून स्वतः युद्धाकरिता निघतो.

नंतर इंद्र आपला सारथी मातलि याच्या बरोबर रथात बसून युद्ध पाहण्याकरिता येतो. कुबेरही गन्धर्वराज चित्ररथाला युद्धाची वार्ता आणण्यास पाठवतो. रावण रथात बसून रामाबरोबर युद्ध करण्यास आला आहे पण राम पादचारी आहे हे पाहताच इंद्र मातलीला रामाकडे आपला रथ नेण्यास सांगतो. त्याच्या चित्ररथाशी झालेल्या भाषणात युद्धातील विविध घटनांचे वर्णन येते. शेवटी राम रावणाचा आणि लक्ष्मण इन्द्रजिताचा शिरच्छेद करतात आणि त्याबरोबर त्यांच्यावर आकाशातून पुष्पवृष्टि होते. ( अंक ६ )

सातव्या अंकाच्या आरंभी रावणवधामुळे शोक करणारी लंकेची अधिदेवता आणि कुबेराने रामाला पुष्पक विमान देण्याशाठी पाठविलेली आपल्या अलकानगरीची अधिदेवता यांचा प्रवेश घातला आहे. अलका लंकेचे सांत्वन करते. पुढे त्यांच्या भाषणावरून सीतेची अग्निशुद्धि आणि बिभीषणाचा राज्याभिषेक होऊन बिभीषण अयोध्येस जाण्याकरिता रामाकडे पुष्पक विमान घेऊन चालल्याचे कळते.

या विष्कंभकानंतरच्या मुख्य प्रवेशात राम, लक्ष्मण, सीता, बिभीषण आणि सुग्रीव विमानाने लंकेहून अयोध्येला जाताना सेतु, कावेरी नदी, अगस्त्याश्रम, पम्पाप्रदेश, जटायूचे निधनस्थल, सह्याद्रि, मेरु, गन्धमादन इत्यादिकांचे वर्णन करतात. या वर्णनात पम्पापरिसरात लक्ष्मणाने पायाने अस्थींची राशि उडविल्याचा उल्लेख आहे तो या नाटकाच्या पाचव्या अंकातील रामाने ते कृत्य केल्याच्या वर्णनाच्या विरुद्ध आहे. या प्रमाणावरूनही या भागाचा कर्ता भवभूतीहून भिन्न होता हे सिद्ध होते.

विश्वामित्राच्या आश्रमाजवळ आल्यावर त्यांच्याविषयीच्या आदराने राम विमानातून उतरू इच्छितो, पण विश्वामित्र त्याला तसेच पुढे जाण्यास सांगतात. पुढे रामादिक येत आहेत अशी वार्ता हनुमानाकडून समजताच भरत व शत्रुघ्न त्यांच्या स्वागताकरिता सैन्यासह सामोरे जातात. वसिष्ठ ऋषिही दशरथाच्या राण्या व अरुंधती यांसह त्यांना येऊन भेटतात. रामाच्या अभिषेकाकरिता शिष्यांसह विश्वामित्रही येतात. रामाला अभिषेक होतो आणि भरतवाक्याने नाटक समाप्त होते.

## दक्षिण भारतात प्रचलित असलेला पाठ

दक्षिण भारतात प्रचलित असलेल्या पाचव्या अंकातील ४६ व्या श्लोकापासून सातव्या अंकाअखेरचा पाठ वरील पाठाहून अत्यंत भिन्न आहे. तो कोणा सुब्रह्मण्य कवीने रचला होता असा काही हस्तलिखितात उल्लेख आढळतो. डॉ. सुशीलकुमार दे यांनी दाखविल्याप्रमाणे हा सुब्रह्मण्य ' प्रबोधचन्द्रोदया 'वरील ' प्रौढप्रकाश 'नामक टीकेचा आणि ' अभिनवपञ्चाशीति ' नामक आयुर्वेदविषयक ग्रंथावरील ' धर्मप्रदीपिका ' टीकेचा तन्नामक कर्ता असावा. या दोन्ही टीकांत तसेच ' महावीरचरिता 'च्या म्हैसूर येथील हस्तलिखितात तो पोल्लर वंशात जन्मला होता आणि त्याचा पिता वेंकटेश आणि माता वेंकटाक्षा होती अशी त्याच्याविषयी समान माहिती दिलेली आढळते. आता या पाठाचा सारांश देऊ.

रामाशी युद्ध करावे लागणार या कल्पनेने वालीच्या मनात काहूर माजते. रामासारख्या भगवान् विष्णूच्या अवताराशी युद्ध करावे तर आपला अधःपात होईल, न करावे तर अपकीर्ति होईल, अशी त्याच्यापुढे ' उभयतःपाशा रज्जू 'चे बन्धन दिसून तो संमुग्ध होतो. शेवटी ' मी तुल्यबल योद्ध्याशीच युद्ध करतो, तेव्हा तू आपले सामर्थ्य दाखव; मग मी तुझ्याशी लढेन ' असे रामाला म्हणण्याचे तो ठरवतो. रामाला ती अट ऐकून क्रोध येतो. तेव्हा वाली त्याची क्षमा मागतो आणि ते दोघे युद्धाकरिता संग्रामभूमीला जातात. ( अंक ५ )

सहाव्या अंकाच्या आरंभीच्या विष्कंभकात संपाति आणि हनुमान् हे दोघेही वालीच्या शोधार्थ निघालेले दिसतात. नंतरच्या मुख्य प्रवेशात वालीबरोबर युद्ध करण्याकरिता धनुष्यावर लावलेला बाण व्यर्थ होऊ नये म्हणून राम जवळच्या वृक्षराईत दिसणाऱ्या हरिणावर तो सोडतो तो तो मृगरूपधारी वाली होता असे कळते. त्याला दिव्य रूपाची प्राप्ति होऊन तो येऊन रामाचा जयजयकार करतो. आणि सांगतो की ' मी पूर्वी दुन्दुभि राक्षसाला मारून त्याचा देह मतंग ऋषीच्या आश्रमाच्या परिसरात फेकून दिला होता. तेव्हा त्यांनी मला वीरधर्माच्या विरुद्ध अशे हरिणरूपाने मरण येईल असा शाप दिला होता. ' नंतर तो दिव्य पुरुष गेल्यावर राम लक्ष्मणाला सुग्रीवाच्या सान्त्वनाकरिता किष्किंधेला पाठवतो व स्वतः ऋष्यमूक पर्वतावर वर्षाकालाचे चार महिने काढतो. तेथे अगस्त्य ऋषि त्याला भेटावयास येतात ते रामाला दिव्य दृष्टि देऊन लंकेत रावण व माल्यवान् यांचे काय कारस्थान चालले ते समक्ष दाखवितात. ( अंक ६ ).

सातव्या अंकाच्या आरंभीच्या विष्कंभकात आनंदित झालेले इन्द्र व दशरथ हे विमानाने अयोध्येत येतात. त्याच्या भाषणावरून रामाने रावणाला मारून त्याचे राज्य

बिभीषणाला दिले, नंतर सीताशुद्धि झाली आणि रामादि सर्व अयोध्येस आले असून रामचन्द्राचा पट्टाभिषेकोत्सव होणार आहे तो पाहण्यास ते स्वर्गातून आले आहेत असे कळते. ते रामाचा अभिषेक पाहतात आणि दिवस्यात भगवान् शंकर ब्रह्मदेवासह विकडेच येत असलेले पाहून त्याना सामोरे जातात.

यानंतरच्या मुख्य प्रवेशात राज्याभिषेक केलेला सपरिवार राम, सीता, वसिष्ठ आणि विश्वामित्र येतात. वसिष्ठ आणि विश्वामित्र रामाला आशीर्वाद देतात. नंतर ब्रह्मदेवासहित भगवान् शंकर, इन्द्र आणि दशरथ प्रवेश करतात. भगवान् शंकर रामाने सर्व जगाचा उपद्रव नाहीसा केला याबद्दल संतोष व्यक्त करतात. 'आता जगाचे पालन करण्याचा अधिकार तुला प्राप्त झाला आहे. तेव्हा वसिष्ठ आणि विश्वामित्र सांगतील त्या मार्गाने तू जावे' असे ते रामाला सांगतात. इन्द्रही रामाला 'राजसूय व अश्वमेध यज्ञ करून आम्हाला आनन्दित कर' असे म्हणतो. दशरथही म्हणतो, 'तू अरण्यात गेलास तेव्हा मला स्वर्गातही स्वारस्य वाटत नव्हते. तू आता परत आलात तेव्हा माझ्या मनात आनंदाचे इतके भरते आले आहे की त्यापुढे मला मोक्षही नीरस वाटू लागला आहे.' नंतर शंकरादि देव व दशरथ जातात आणि शेवटच्या भरत-वाक्यात राम 'उत्तम सविधानाने युक्त असा अमृताप्रमाणे गोड असणारा हा सन्दर्भ सदैव विद्वानांना अमन्द हृदयानन्द देत राहो' असे मागणे विश्वामित्राला मागतो आणि नाटकाची समाप्ति होते.

वरील दोन पाठांपैकी एकही भवभूतीच्या शैलीचा नाही आणि त्याने लिहिला असणे शक्य नाही. त्यातल्या त्यात उत्तरभारतीय पाठ बरा आहे. त्यात वाल्मीकि रामायणाचे बहुशी अनुसरण केले आहे. पण दक्षिणभारतीय पाठ अगदीच कमी दर्जाचा आहे. त्यात अधिकृत रामचरित्राचे वर्णन अत्यल्प असून अद्भुताची भेसळ मात्र अतिशय घातली आहे.

## मूळ रामकथेत केलेले फरक

भवभूतीने या नाटकाचे सविधानक 'वाल्मीकिरामायणा'तून घेतले यात संशय नाही. त्या रामायणाने आरणाला रामचरित्राची गोडी लागल्याचे त्याने स्वतःच प्रस्तावनेत ( १,७ ) सांगितले आहे. त्याने त्यातून काही श्लोक शब्दशः घेतले आहेत[1]

१. महावीरचरितातील 'यामोषधि–' ( ५, २४ ) हा श्लोक चिकित्सक आवृत्तीत पुढीलप्रमाणे आला आहे–

यामोषधिमिवायुष्मन्नन्वेषसि महावने ।
सा देवी मम च प्राणा रावणेनोभय हृतम् ॥ ( अरण्य, ६३,१४)

(पुढे चालू)

आणि काही वर्णनेही वनुसारच केली आहेत. रामायणातील पूर्व रामचरित्र आपल्या नाटकाचे सविधानक म्हणून घेताना त्यात कार्यैक्य (unity of action) कसे साधावयाचे हा प्रश्न प्रामुख्याने भवभूतीपुढे होता. त्या चरित्रात अनेक पात्रे व घटना आल्या आहेत, पण ती पात्रे व त्या घटना चरित्रनायकाच्या आयुष्यातील आहेत या एका गोष्टीखेरीज त्यांना जोडणारा दुसरा दुवा नाही. तेव्हा कार्यैक्य साधण्याकरिता तसेच आकर्षक नाट्यप्रसंग उत्पन्न करण्याकरिता भवभूतीला मूळ रामायणकथेत अनेक फेरफार करावे लागले आहेत. त्यांचे विवरण मागे त्या त्या अंकाचा सारांश देताना केले आहे. त्यातील मुख्य बदल म्हणजे त्यातील अनेक घटना रावणाचा अमात्य माल्यवान् याच्या कपटी कारस्थानामुळे झाल्या आहेत हा होय. प्रस्तुत नाटकाच्या उत्तरभारतीय पाठातील सहाव्या अंकाच्या पहिल्या श्लोकात त्या घटना रावणाच्या दुर्विनयरूपी वृक्षाच्या अवयवरूपाने माल्यवानाने वर्णिल्या असल्या तरी त्यातील बहुतेक त्याच्या स्वतःच्या कपटी कारस्थानामुळे उत्पन्न झाल्या आहेत यात संशय नाही. माल्यवान् म्हणतो, ' रावणाचा दुर्विनय वृक्ष पाहा–

> बीजं यस्य विदेहराजतनयायाच्ञाङ्कुरोऽपि स्वसु–
> र्यात्रा सौ परिवर्ञ्चितं किसलयं मारीचमायाविधिः ।
> शाखाजालमयोनिजापहरणं तस्य स्फुटं कोरका
> कीशाधीशवधोऽनुजस्य गमनं सख्यं तयोस्तेन च ॥

( सीतेकरिता रावणाने घातलेली मागणी हे त्या दुर्विनय वृक्षाचे मूळ, शूर्पणखेला रामलक्ष्मणाला फसविण्याकरिता पाठविणे हा त्याचा अंकुर, मारीचाने चित्रमृगाचे रूप घेऊन रामाला कपटाने फसविणे ही त्याची पालवी, सीतेचे हरण ह्या त्याच्या शाखा आणि वानराचा अधिपति वाली याचा वध, बिभीषणाचे निर्गमन आणि त्याचे रामलक्ष्मणाशी सख्य या त्याच्या स्पष्ट दिसणाऱ्या कळ्या होत. )'[1]

ह्यांपैकी बहुतेक घटना माल्यवानाच्या कारस्थानाने झाल्या असे दाखवून भवभूतीने प्रस्तुत नाटकात कार्यैक्य साधण्याचा प्रयत्न केला आहे. त्याकरिता आणि नायकाच्या चारित्र्याला उठाव देण्याकरिता त्याला मूळ कथेत अनेक बदल करावे लागले

---

( मागील पानावरून )

महावीरचरितातील 'दनुर्नाम श्रियः पुत्रः' (५, ३४) चिकित्सक आवृत्तीत पुढीलप्रमाणे आला आहे–

> दनुर्नाम दितेः पुत्रः शापाद्राक्षसतां गतः ।
> आख्यातस्तेन सुग्रीवः समर्थो वानराधिपः ॥ (किष्किन्धा, ४,१२)

आहेत. त्याने सीता व उर्मिला याना विश्वामित्राश्रमात आणून त्याच्या आणि राम-लक्ष्मणाच्या मनात परस्पर दर्शनाने अनुराग उत्पन्न केला आहे. अहल्योद्धार, ताटकावध व शिवधनुर्भंग ह्या घटना विश्वामित्राश्रमात सीतेच्या समक्ष घडल्या असे दाखवून तिच्या मनात रामविषयक प्रेमाचा अंकुर उत्पन्न केला आहे. माल्यवानाच्या चिथावणी-वरून परशुराम रामाला ठार मारण्याकरिता मिथिलेत गेला होता. युधाजित् आणि भरत यानीच दशरथाला रामाच्या राज्याभिषेकाची विनंती मिथिलेत केली आणि त्या प्रसंगी माल्यवानाच्या सूचनेप्रमाणे शूर्पणखेने पछाडलेल्या मंथरेने कैकेयीच्या म्हणून दिलेल्या पत्रातील विनंतीप्रमाणे तिजकरिता रामाने दोन वर मिथिलेतच दशरथाकडे मागितले, असे दाखवून भवभूतीने कैकेयीला दोषमुक्त केले आहे. पंचवटीतील खर-दूषणादि राक्षसांचा वध, सीताहरण इत्यादि घटनांच्या मुळाशी माल्यवानाचे कारस्थान होते, त्यानेच रावणाला दिलेल्या मैत्रीच्या वचनाची वालीला आठवण देऊन त्याला रामवधार्थ उद्युक्त केले, असे दाखवून रामाच्या चारित्र्यावरील वालीच्या कपटवधाचा कलंक कवीने नाहीसा केला आहे. पण या फरकामुळे भवभूतीचा उद्देश सर्वस्वी साध्य झाला नाही. त्याच्या योगे प्रस्तुत नाटकाचे कथानक काही ठिकाणी असंभवनीय झाल्याचे आम्ही मागे दाखविले आहे. संस्कृत आलंकारिकानाही असे फरक करणे संमत नव्हते. मूळ कथानकात रसविरोधी भाग असेल तर तो गाळून अभीष्ट रसाला उचित असे नवीन प्रसंग घालण्याला त्यांची हरकत नव्हती, पण रामायणासारखे सिद्ध-रसत्वाबद्दल सुप्रसिद्ध असे जे प्राचीन ग्रंथ आहेत त्यात कवीने स्वेच्छेने रसविरोधी बदल करणे त्याना पसंत नव्हते. आनन्दवर्धनाने म्हटले आहे—

सन्ति सिद्धरसप्रख्या ये च रामायणादयः।
कथाश्रया न तैर्योज्या स्वेच्छा रसविरोधिनी ॥
(ध्वन्यालोक, उद्योत ३)

तेव्हा 'महावीरचरिता'त भवभूतीने मूळ रामायण कथेत केलेले सर्वच फरक आनन्द-वर्धनासारख्या सहृदयधुरंधराला संमत झाले नव्हते यात संशय नाही.

### स्वभावचित्रण

प्रस्तुत नाटकातील स्वभावचित्रण मात्र मनोरम झाले आहे. भवभूतीने त्यातील नायक राम हा आदर्श पुरुष दाखविला आहे. त्याने त्याला कोठेही अवतारी पुरुष म्हणून वर्णन केले नाही. तो मनुष्यच आहे, पण तो धीरोदात्त असून त्याच्या अंगी अनेक गुण आहेत. तो स्वतः अत्यंत शूर आहे, पण त्याला इतर शूराविषयी मत्सर नाही. तो परशुराम, वाली किंबहुना रावण याच्याही अंगच्या गुणाबद्दल आदर दाखवतो. कारण तो म्हणतो, 'न वसन्त्येकत्र सर्वे गुणाः' (सर्व गुण एकत्र वास करत नाहीत.)

त्याचा आत्मविश्वास दांडगा आहे. परशुरामाच्या धमक्यांनी तो घाबरत नाही. उलट त्याने आपणाबद्दल दया दाखवावी याची त्याला चीड येते. परशुरामाचा पराभव केल्यावर तो आपणाला त्याच्याशी अविनयाने वागावे लागले यावद्दल त्याची क्षमा मागतो. त्याच्या ठिकाणचे अनेक गुण—त्याची पितृभक्ति, गुरुविषयी नितान्त आदर, बन्धुप्रेम, धर्मरक्षणाविषयी कळकळ इत्यादि—भवभूतीने प्रस्तुत नाटकात विविध प्रसंगांनी दाखविले आहेत. परशुरामाची व्यक्तिरेखाही उत्कृष्ट रीतीने काढली आहे. त्याची विद्वत्ता, तपश्चर्या, दातृत्व आणि शौर्य ही असामान्य आहेत. जनस्थानातील तपस्व्यांच्या रक्षणाकरिता तो रावणासही ताकीद देतो. तो अत्यंत अभिमानी आहे. मानरक्षणापुढे त्याला मुक्तिही तुच्छ वाटते ( म. च., ३, ९ ). तसेच त्याला आपल्या शौर्याची अमर्याद घमेंड आहे. तीमुळे तो शतानंदाला दुरुत्तरे बोलतो आणि वसिष्ठ-विश्वामित्राचा सामोपचाराचा उपदेश धुडकावून लावतो. रामाने त्याचा दर्पामय ( गर्वरूपी रोग ) नाहीसा केल्यावर त्याला स्वतःच्या वर्तनाची लाज वाटून तो अत्यंत विनयाने वागतो आणि दुर्वर्तनाबद्दल प्रायश्चित्ताची याचना करतो. वसिष्ठ आणि विश्वामित्र यांच्या ठिकाणी विद्वत्तेत व तपश्चर्येत साम्य असले तरी त्यांच्या स्वभावातील फरकही भवभूतीने दाखविला आहे. वसिष्ठ अत्यंत शान्त व आत्मनिग्रही आहेत. परशुरामाने त्यांचा अपमान केला तरी ते आपल्या मनाची शांति ढळू देत नाहीत. शापाने किंवा दृष्टिक्षेपाने त्याला भस्म करण्याचे सामर्थ्य त्यांच्या ठिकाणी आहे, पण चिंतनानेच त्याला वठणीवर आणणे त्यांना पसंत पडते. त्यांच्या मानाने विश्वामित्राचे व्यक्तिमत्त्व जास्त तेजस्वी आहे. भवभूतीला त्याच्याविषयी अत्यंत आदर होता. तो त्याने या नाटकात तसेच ' उत्तररामचरिता 'तही विविध प्रसंगांनी दाखविला आहे. तेही परशुरामाला सामोपचाराच्या गोष्टी सांगून शांत करण्याचा प्रयत्न करतात. पण तो आपला दुराग्रह सोडत नाही असे पाहताच त्याला शापाने भस्म करण्यास किंवा शस्त्राने ठार करण्यास तयार होतात. ' शापादपि शरादपि ' असे द्विविध सामर्थ्य त्यांच्या ठिकाणी आहे. शतानन्द हा विद्वान्, ब्रह्मवर्चस अंगी असलेला, पण तापट असा तरुण पुरोहित आहे. त्याला आपल्या यजमानाबद्दल अत्यंत आदर व कृतज्ञता आहे. त्याच्या जामातांच्या केसालाही तो इजा लावू देणार नाही. त्याच्या सारखा विद्वान् ब्राह्मण राष्ट्ररक्षक पुरोहित लाभल्यामुळे जनकाचे राज्य कधीही दुःखी, जीर्ण किंवा शीर्ण होणार नाही याबद्दल विश्वामित्रांना खात्री वाटते. तो तापट स्वभावाचा असल्यामुळे परशुरामाचा रामवधाचा दुराग्रह पाहताच त्याचा तोल सुटून तो त्याला दुरुत्तरे बोलतो आणि शापाने त्याला नष्ट करण्यास हातात उदक घेतो. जनक व दशरथ यांचीही स्वभावचित्रे थोडक्यात पण उत्कृष्ट काढली आहेत. जनक तत्त्वज्ञानी व शांत स्वभावाचा आहे, पण तोही परशुरामाच्या वल्गना ऐकून त्याच्या शासनार्थ

धनुष्य सज्ज करतो. त्या मानाने दशरथ अधिक क्षमाशील आहे. तो शतानन्द आणि जनक यांना परशुरामाला अनुक्रमे शापाने व शस्त्राने दण्ड करण्यापासून परावृत्त करतो. पण परशुराम सामोपचाराचे बोलणे ऐकत नाही हे पाहताच तो त्याला शस्त्राने वठणीवर आणण्याची धमकी देतो. लक्ष्मणाचे शौर्य व भ्रातृप्रेम, भरताची रामभक्ति रावणाची परस्त्रीविषयी आसक्ति, माल्यवानाचा कारस्थानी व कपटी स्वभाव, संपाति व जटायु यांचे भ्रातृप्रेम व रामादिकांच्या सुरक्षिततेची चिन्ता, वालीची सत्यप्रियता व मित्रनिष्ठा यांची रेखाचित्रे भवभूतीने थोडक्यात पण कुशलतेने काढली आहेत.

प्रस्तुत नाटकात स्त्रीपात्रे प्रमुख नाहीत तथापि त्यात सीतेचे स्वभावचित्रण बरेच स्पष्ट आहे. वाल्मीकीच्या आश्रमात रामाला पाहताच त्याच्या सुन्दर रूपाने तिचे मन आकृष्ट होते. त्याच्या तेजाने अहल्या शापमुक्त झाल्याचे पाहताच सौंदर्याप्रमाणे त्याचा प्रभावही मोठा आहे असा विचार तिच्या मनात येतो. विश्वामित्रांनी रामाला ताटकावधाचा आदेश दिला तेव्हा त्याच्याबद्दल तिला काळजी वाटते, पण त्याने तिला यमसदनास पाठविल्यावर तिला आल्हादाश्चर्य वाटते. तेथे शिवधनुष्य आणल्यावर रामाच्या हातून त्याला दोरी लावली जाईल काय, न लावली गेल्यास आपल्या नशीबी काय येईल, याबद्दल तिच्या मनात क्षणभर संशय उत्पन्न होतो, तिच्या चुलत्याने तिची बहीण ऊर्मिला हिला लक्ष्मणाला दिल्याचे सांगताच आता आपल्या बहिणीचा वियोग होणार नाही याचा तिला आनंद होतो. क्रोधसंतप्त परशुरामाला अन्तःपुरात घुसताना पाहून ती भीतीने रामाला घट्ट धरून ठेवते, राम निर्भयपणे परशुरामाशी सामना देतो हे पाहताच त्याच्या धैर्याचे तिला कौतुक वाटते, वनवासात आपल्या पतिबरोबर आपणास राहता येईल याचा तिला आनंद होतो, इत्यादि प्रसंगांनी तिच्या स्वभावातील कोमल छटा भवभूतीने वर्णिल्या आहेत. दुसरे स्त्रीपात्र शूर्पणखा. ही माल्यवानाला त्याच्या कपटयोजनात साहाय्य करते. त्याच्यापुढे विविध प्रश्न उपस्थित करून त्याची उत्तरे घेते, आणि मंथरेच्या अंगात संचार करून रामाकडून कैकयीचे वर मागण्याचे वचन घेते. रामाने अरण्यात जाण्याचे कबूल करताच तिला त्याच्या उदात्त स्वभावाचे आश्चर्य वाटून ' नम इदानीं भगवते संसाराय, यस्मिन्नीदृशा अपि कल्पद्रुमाः प्ररोहन्ति । ' ( या संसाराला नमस्कार असो, ज्यामध्ये रामासारखे कल्पवृक्ष निर्माण होतात ) असे तिच्या तोंडून न राहून उद्गार निघतात. शूर्पणखा रामाच्या विरोधी आहे तर सिद्धा श्रमणा शबरी त्याची भक्त आहे. ती मतङ्गमुनींच्या आश्रमात राहत होती, पण वानरांच्या विनंतीवरून बिभीषणाचे पत्र घेऊन ती रामाला शोधत फिरत असते. नंतर ती रामाची मार्गदर्शक होऊन त्याला सीतेची माहिती देते आणि ऋष्यमूक पर्वतावर पोचवते.

रसपरिपोष

प्रस्तुत नाटकात वीररस प्रमुख असून त्याला रौद्र, बीभत्स व अद्भुत रसांनी जोड दिली आहे. राम व वाली यांच्या भाषणात वीररसाचा प्रकट आविष्कार असून वसिष्ठ, विश्वामित्र, जनक, दशरथ यांच्या उक्तींत तो सूक्ष्म आहे. परशुरामाच्या काही भाषणात रौद्र आणि ताटका, कबन्ध इत्यादिकांच्या वर्णनात बीभत्स रस आहे. कुम्भकर्णाच्या वर्णनात अद्भुत रस आणि सीताविरोगामुळे शोकमग्न झालेल्या रामाच्या उद्गारात करुण-विप्रलंभ रस व्यक्त झाला आहे. या सर्व रसाच्या वर्णनात भवभूतीचे सारखेच वाक्पत्व दिसून येते. तो खरोखरीच वश्यवाक् कवि आहे. त्याची वाणी वीर, रौद्र व बीभत्स रसाच्या वर्णनात कर्कश आहे तर इतरत्र अनेक ठिकाणी प्रसन्न आहे. विषयाला अनुरूप असे तिचे रूप बदलते हे मागे अनेक ठिकाणी दाखविले आहे. त्याने अनेक अलंकार योजून आपल्या शैलीला सजविले आहे. त्यांची चर्चा इतरत्र केली आहे. त्याने प्रस्तुत नाटकात वीस निरनिराळ्या वृत्तात सुमारे दोनशे श्लोक घातले आहेत. वीर, रौद्र व बीभत्स रसाच्या वर्णनात तो शार्दूलविक्रीडित, स्रग्धरा यासारख्या पल्लेदार वृत्तांची योजना करतो, तर शृंगार व करुण रसाच्या अभिव्यक्तीकरिता वसन्ततिलका, मालिनी, मन्दाक्रान्ता अशी लहान वृत्ते योजतो.

एकंदरीत 'महावीरचरिता'तील संविधानकरचनेत काही दोष दिसत असले तरी स्वभावचित्रणात आणि रसवर्णनात भवभूतीने बरीच प्रगति केली होती यात संशय नाही. आता आपण त्याच्या 'मालतीमाधव' नाटकाकडे वळू.

———

## प्रकरण सहावे

# मालतीमाधव

भूम्ना रसानां गहनाः प्रयोगाः
  सौहार्दहृद्यानि विचेष्टितानि ।
औद्धत्यमायोजितकामसूत्रं
  चित्राः कथा वाचि विदग्धता च ॥

मालतीमाधव, १, ६

पाचव्या प्रकरणात दाखविल्याप्रमाणे भवभूतीने हे नाटक मध्यभारतातील पद्मावती-नगरीत लिहिले असावे; कारण त्यात तत्कालीन पद्मावती नगरीचे व तिच्या परिसरातील नद्या, पर्वत व देवालये याचे बरेच सविस्तर वर्णन आले आहे.

प्रस्तावनेच्या आरंभी नान्दीचे दोन श्लोक घातले आहेत. पहिल्यात गजाननाचे विनोदपूर्ण वर्णन आहे.

सानन्दं नन्दिहस्ताहतमुरजरवाहूतकौमारबर्हि–
त्रासान्नासाग्ररन्ध्रं विशति फणिपतौ भोगसङ्कोचभाजि ।
गण्डोड्डीनालिमालामुखरितककुभस्ताण्डवे शूलपाणे–
र्वैनायक्यश्चिरं वो वदनविधुतयः पान्तु चीत्कारवत्यः ॥

(मा. मा., १, १)

[ भगवान् शंकराच्या ताण्डव नृत्याच्यावेळी नन्दीने मोठ्या आनन्दाने मृदङ्ग वाजविण्यास सुरवात केली तेव्हा त्याचा (मेघगर्जनेसारखा गंभीर) आवाज ऐकून कार्ति-

केयाचे वाहन मोर तेथे आला. त्याला पाहताच भीतीने आपल्या अंगाचा संकोच करून ( शंकराने धारण केलेला ) सर्प गजाननाच्या सोंडेतील समोरच्या छिद्रात शिरू लागला. तेव्हा गजाननाने चीत्कार-करून आपले मुख बराच वेळ जोराने हलविले. त्याबरोबर त्याच्या गंडस्थलावरील भ्रमर उडून त्याच्या गुंजारवाने सर्व दिशा निनादित झाल्या. गजाननमुखाची ती मुद्राची हल्वाहल्व तुमचे रक्षण करो ! ]

भवभूतीच्या काळी गजाननाची निम्नहर्ता म्हणून पूजा प्रचलित झाली होती. ग्रंथारंभी त्याला नमन करण्याचा प्रघात पडला होता. म्हणून या नाटकाच्या आरंभी त्याने गजाननाला प्रार्थना केली आहे. भवभूति वेदान्ती होता. तेव्हा त्याला गजाननादि देव ही परब्रह्माची सगुण रूपे होत हे मत मान्य होते. अद्वैत तत्त्वाच्या तुलनेने त्याचे स्थान गौण. म्हणून त्याने येथे गजाननाचे वर्णन विनोदाने केले आहे. पुढे या तऱ्हेची मुख्य देवाचीही वर्णने करण्याचा प्रघात पडला.

दुसरा श्लोक भगवान् शंकराच्या वर्णनपर आहे—

चूडापीडकपालसंकुलगलन्मन्दाकिनीवारयो
विद्युत्प्रायललाटलोचनपुटज्योतिर्विमिश्रत्विषः ।
पान्तु त्वामकठोरकेतकशिखासंदिग्धमुग्धेन्दवो
भूतेशस्य भुजङ्गवल्लिवलयस्रङ्नद्धजूटा जटाः ॥

( मा. मा., १, २ )

( भगवान् शंकराच्या व्यासदृश भुजंगरूपी मालांनी बांधलेल्या जटा तुमचे रक्षण करोत-त्या जटांत मस्तकावर बांधलेल्या नृकपालांमध्ये गंगेच्या धारा गळत आहेत; त्यांचा रंग विद्युल्लेखेसारख्या तृतीय नेत्रातील अग्नीच्या ज्वालांनी मिश्रित झाला आहे आणि त्यातील सुंदर चंद्राची कोर जणू काय कोमल केतकीपत्रच भासत आहे. )

नान्दी झाल्यावर सूत्रधार म्हणतो, 'अहो, सर्व भुवनांचा दीप असा हा भगवान् सूर्य जवळजवळ पूर्णपणे उगवला आहे तेव्हा मी त्याची उपासना करतो.' असे म्हणून तो 'कल्याणानां त्वमसि महसां भाजनं विश्वमूर्ते' इत्यादि सूर्यप्रार्थनापर श्लोक म्हणतो. तो मागे दिला आहे. ज्याच्या आवारातील रंगभूमीवर भवभूतीची नाटके प्रथम विद्वज्जनांपुढे आली तो कालप्रियनाथ म्हणजे काल्पीतील सूर्यदेव होय हे आम्ही मागे सिद्ध केले आहे. तेव्हा त्याच्या प्रार्थनेचा श्लोक प्रस्तुत नाटकाच्या आरंभी यावा, यात समर्पकत्व आहे.

नंतर सूत्रधार म्हणतो, ' विद्वज्जनपरिषदेने मला अपूर्व प्रकरणाने मनोरंजन करण्याविषयी आज्ञा केली आहे. तिची अपेक्षा आहे की त्यामध्ये खालील गुण असावे —

भूम्ना रसानां गहना: प्रयोगाः
सौहार्दहृद्यानि विचेष्टितानि ।
औद्धत्यमायोजितकामसूत्रं
चित्रा कथा वाचि विदग्धता च ॥

( मा. मा. १, ६ )

( त्या प्रकरणात पुष्कळ रसाचे गहन प्रयोग असावे. मैत्रीमुळे हृदयंगम वाटणारी कृत्ये असावी; कामसूत्रात सांगितल्याप्रमाणे साहसक्रियाचे वर्णन असावे; आश्चर्यकारक कथा असाव्या आणि वाणीचे वैदग्ध्यही असावे. )

नंतर सूत्रधार ' महावीरचरिता 'तल्याप्रमाणे प्रकरणकार भवभूति याचे जन्मस्थान, पूर्वज व विद्वत्ता याविषयी थोडक्यात माहिती देऊन म्हणतो की ' त्याने आम्हा नटाविषयीच्या मैत्रीमुळे विद्वज्जनानी अपेक्षित असे गुण असलेली आपली ही कृति आमच्या स्वाधीन केली आहे.' विद्वानानी आपल्या ' महावीरचरिता 'त दोष दाखवून आपला अनादर केला होता त्याबद्दल त्या कवीने खालील उद्गार काढले आहेत.

ये नाम केचिदिह नः प्रथयन्त्यवज्ञां
जानन्ति ते किमपि तान्प्रति नैष यत्नः ।
उत्पत्स्यतेऽस्ति मम कोऽपि समानधर्मा
कालो ह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी ॥

( मा. मा., १, ८ )

( जे कोणी आमच्याविषयी अनादर पसरवीत आहेत ते फार शहाणे आहेत. त्यांच्याकरिता ही माझी कृति नाही. माझ्यासारख्या वृत्तीचा कोणी पुढे मागे उत्पन्न होईल किंवा सध्याही कोठे तरी असेल. कारण काल अनन्त आहे आणि पृथ्वी विशाल आहे. तसा रसिकच माझ्या कृतीचे गुणग्रहण करील. )

भवभूतीचे बोल खरे ठरले. त्याला त्याच्या हयातीतच मान मिळू लागला आणि पुढे राजाश्रयही मिळाला. नंतरच्या कालात तर त्याच्या नाटकाच्या गुणाची खूप प्रशंसा होऊन त्याला काहींनी कालिदासाच्या तोडीचा किंबहुना काही गुणात श्रेष्ठही मानले. असो.

पुढे भवभूतीने आपल्या वेदाच्या, तसेच उपनिषदाच्या अध्ययनाचा आणि सांख्ययोगादि दर्शनाच्या ज्ञानाचा उल्लेख करून म्हटले आहे की या विद्वत्तेचा

नाट्करचनेत काही उपयोग नाही. समर्पक आणि सुंदर शब्दयोजना आणि अर्थगौरव हे गुण असतील तर तेच नाटककाराच्या विद्वत्तेचे आणि रसिकतेचे द्योतक होतात. हे गुणही आपल्या नाटकात आहेत हे भवभूतीने येथे सूचित केले आहे. नंतर सूत्रधार कामन्दकीची आणि त्याचा सहाय्यक नट अवलोकितेची भूमिका करण्यास निघून जातात.

नंतर पहिल्या अंकाच्या विष्कंभकात कामन्दकी आणि अवलोकिता यांचा प्रवेश घातला आहे त्यावरून आपणांस वरील प्रास्ताविक माहिती मिळते. कामन्दकी, भूरिवसु आणि देवरात भिन्न भिन्न प्रदेशातून विद्याध्ययनाकरिता एकत्र—बहुधा पद्मावतीतच—आले होते. पुढे कामन्दकीची आचार्यशिष्या सौदामिनी हिच्या समक्ष भूरिवसु आणि देवरात यांनी प्रतिज्ञा केली की आपणांस अपत्ये होतील त्यांचा विवाहसंबंध आपण अवश्य करू. नंतर देवरात विदर्भदेशाधिपतीचा मन्त्री झाला. भूरिवसूला पद्मावतीच्या राजाचे प्रधानामात्यपद मिळाले. कामन्दकी बौद्धधर्म स्वीकारून पद्मावतीच्या विहारात राहू लागली आणि सौदामिनीने योगाभ्यासाने आश्चर्यकारक मन्त्रसिद्धि प्राप्त करून घेतली आणि ती कापालिकाचे आणि तान्त्रिकाचे मुख्य स्थान श्रीपर्वत (मल्लिकार्जुन) येथे त्या व्रताचे अनुष्ठान करू लागली. पुढे देवरातास माधव नामक पुत्र आणि भूरिवसूला मालती नावाची कन्या झाली. पूर्वीच्या प्रतिज्ञेप्रमाणे या दोघांचा विवाह जुळून यावा म्हणून देवराताने माधवाला आन्वीक्षिकी (अध्यात्म) विद्येच्या अध्ययनाकरिता पद्मावतीस पाठविले. यात भूरिवसूला त्याच्या पूर्वीच्या प्रतिज्ञेची आठवण द्यावी असा त्याचा हेतु होता. त्याने आपली पूर्वीची सहाध्यायिनी कामन्दकी पद्मावतीतच असल्यामुळे तिला हा संबंध जुळवून आणण्याकरिता विनंती केली. कामन्दकीने भूरिवसूच्या घरी नेहमी जाणे येणे असे. तिने मालतीला लहानपणापासून खेळविले व शिकविले होते. त्यामुळे तिलाही मालतीचा लळा लागला होता. तेव्हा तिने देवरातची विनंती मोठ्या आनंदाने मान्य केली. पण तेथील राजाचा नर्मसुहृद (खुषमस्कऱ्या) नन्दन राजामार्फत मालतीची मागणी घालत होता; म्हणून तिने मोठ्या कुशलतेने मालती आणि माधव या दोघांच्या मनात परस्परांविषयी प्रेम उत्पन्न होईल असे उपाय योजण्यास आरंभ केला. आपल्या अवलोकिता नामक शिष्येकडून माधवाला सांगून तो भूरिवसूच्या महालासमोरच्या रस्त्याने वरचेवर फिरेल आणि त्या महालातील उंच खिडकीत बसलेल्या मालतीच्या दृष्टीस पडेल असे केले होते. त्याचे मदनासारखे सुंदर रूप पाहून मालतीचे मन त्याच्यावर बसले. तिने काढलेले माधवाचे चित्र त्याचा सेवक कलहंस याच्या द्वारे माधवाच्या दृष्टीस पडेल अशी योजना मालतीची सखी लवङ्गिका हिने केली आहे, असेही समजते. तसेच माधवाचा बालमित्र मकरन्द आणि अमात्य नन्दनाची बहीण मदयन्तिका यांचा विवाह व्हावा म्हणून कामन्दकीने आपली प्रियसखी बुद्धरक्षिता हिलाही प्रयत्न करण्यास सांगितले होते.

कामन्दकी आणि अवलोकिता यांच्या संभाषणात अघोरघंट कापालिकाविषयीही माहिती आली आहे. हा अघोरघंट श्रीपर्वताहून पद्मावतीस तेथील स्मशानाजवळच्या कराला नामक चामुंडा देवीच्या देवालयात मन्त्रसाधना करण्याकरिता आला होता. त्याचे ' मुण्डधारी ' म्हणजे नरकपाल धारण करणारा, असे वर्णन आले आहे. त्याची शिष्या कपालकुण्डला हीही त्याच्या सारखीच होती हे तिच्या नावावरूनच स्पष्ट आहे. ती त्या कराला देवीच्या देवळात रोज सायंकाळी येत असते; देवीला विविध प्राण्यांचे बळी दिले जातात, इत्यादि माहितीही या विष्कंभकात मिळते.

एकदरीत भवभूतीने हा विष्कंभक चांगला रचला आहे. त्यात प्रास्ताविक माहिती देऊन त्याने प्रेक्षकांच्या मनात पुढील घटनांविषयी कुतूहल उत्पन्न केले आहे.

नंतरच्या मुख्य प्रवेशात माधवाचा सेवक कलहंस चित्रफलक घेऊन माधवाच्या शोधार्थ मदनोद्यानात येतो. नंतर माधव आणि त्याचा मित्र मकरन्द तेथे येतात आणि कांचनार वृक्षाच्या छायेत विश्रान्ति घेतात. माधव आणि मकरन्द बालपणापासून मित्र होते. किंबहुना मकरन्दाची माता त्याच्या बालपणीच निधन पावल्यामुळे माधवाच्या मातेनेच आपल्या अंगाच्या दुधावर त्याला वाढविले होते ( अं. ९, श्लो. ४० ). तेव्हा तोही विदर्भातून पद्मावतीस विद्याभ्यासाकरिता आलेला दिसतो. माधव आणि मकरन्द यांचे एकमेकांवर निस्सीम प्रेम होते. माधवाचे वैक्लव्य मकरन्दाच्या लक्षात येते आणि ते प्रेममूलकच असावे अशी त्याला शंका येते. तेव्हा तो माधवाला त्याचे कारण विचारतो. तेव्हा माधव म्हणतो, " नुकताच पद्मावतीच्या सर्व महिलांनी भगवान् कामदेवाचा उत्सव केला होता. त्या यात्रेत अवलोकितेच्या सांगण्यावरून मी गेलो होतो. इकडे तिकडे हिंडत मी एका बकुलवृक्षाच्या जवळ उभा राहिलो आणि तेथे पडलेली फुले वेऊन एक सुंदर रचनेची माळ गुंफू लागलो. इतक्यात कामदेवाच्या देवळातून त्याच्या जणू काय जगद्विजयाची पताकाच अशी, कुमारिकेचा सुंदर पोषाख केलेली, कन्या बकुलाची फुले वेचू इच्छिणाऱ्या आपल्या परिजनाच्या विनंतीवरून तेथे आली.

सा रामणीयकनिधेरधिदेवता वा
सौन्दर्यसारसमुदायनिकेतनं वा ।
तस्याः सखे नियतमिन्दुकलामृणाल-
ज्योत्स्नादि कारणमभून्मदनश्च वेधाः ॥

( मा. मा., १, २१ )

( मित्रा, ती रमणीयत्वाच्या निधीची अधिदेवता किंवा सौंदर्याच्या सारसर्वस्वाचे

अधिष्ठान अशी आहे. खरोखर, तिला स्वतः मदनाने चंद्रकला, कमलतंतू, चन्द्रिका इत्यादिकांपासूनच उत्पन्न केले असावे.)

तिला पाहताच ती कोणा तरी महाभागाच्या करिता झुरत आहे असे मला वाटले; कारण—

परिमृदितमृणालीम्लानमङ्गं प्रवृत्तिः
कथमपि परिवारप्रार्थनाभिः क्रियासु ।
कलयति च हिमांशोर्निष्कलङ्कस्य लक्ष्मी-
मभिनवकरिदन्तच्छेदकान्तः कपोलः ॥

( मा. मा., १, २२ )

( तिचे शरीर चुरडलेल्या कमलनालाप्रमाणे म्लान झालेले दिसले. परिजनांनी पुष्कळ प्रार्थना केल्यावर ती काही कर्म करू लागे. तिचे कपोल नुकत्याच कापलेल्या हस्तिदन्ताप्रमाणे मनोहर असून त्याच्या ठिकाणी निष्कलंक चन्द्राचे सौंदर्य दिसत होते. माझ्या दृष्टीस पडल्यापासून ती माझ्या नेत्रांना अमृतशलाकेप्रमाणे आनन्दित करीत होती. हे माझे मन काही कारण नसताही तिच्यावर आसक्त झाले आहे.)

हे ऐकून मकरन्द म्हणाला—स्नेहश्च निमित्तसव्यपेक्षश्चेति विप्रतिषिद्धमेतत् । पश्य—

व्यतिषजति पदार्थानान्तरः कोऽपि हेतु-
र्न खलु बहिरुपाधीन्प्रीतयः संश्रयन्ते ।
विकसति हि पतङ्गस्योदये पुण्डरीकं
द्रवति च हिमरश्मावुद्गते चन्द्रकान्तः ॥

( मा. मा., १, २४ )

( प्रेम आणि ते काही हेतूंमुळे उत्पन्न व्हावे यात स्वभावतःच विरोध आहे. पाह्य की काही अवर्णनीय आन्तर हेतुमुळे पदार्थ एकमेकांकडे आकर्षिले जातात. प्रेम हे बाह्य कारणांमुळे उत्पन्न होत नाही. सूर्य उगवला की कमल विकसित होते आणि चन्द्र क्षितिजावर आला की चन्द्रकान्त मणि पाझरू लागतो. यात काही कार्यकारणभाव आहे काय ? )

नतर माधव म्हणतो, " इतक्यात मला पाहून तिच्या सख्या टाळ्या वाजवून आणि घाबरलेल्या कलहंसाच्या गतीने तिच्याकडे गडबडीने जाऊन तिला म्हणाल्या— 'बाईसाहेब, मोठ्या आनंदाची गोष्ट ! हे पाहा येथे कोणापैकी कोणी उभे आहे' असे म्हणून त्यांनी माझ्याकडे बोट केले. तेव्हा

स्तिमितविकसितानामुल्लसद्भ्रूलतानां
मसृणमुकुलितानां प्रान्तविस्तारभाजाम् ।
प्रतिनयननिपाते किञ्चिदाकुञ्चितानां
विविधमहमभूवं पात्रमालोकितानाम् ।। (मा. मा., १, २७)

( तिने माझ्यावर विविध प्रकारच्या नेत्रकटाक्षांचा वर्षाव केला. काहींत तिचे नेत्र निश्चल व पूर्णपणे विकसित होते आणि भुवया सुंदर रीतीने वर चढल्या होत्या, तर काहींत तिचे नेत्र मंद आणि कळ्यांसारखे किंचित् आकुंचित होते. काही कटाक्षांत तिचे नेत्रप्रान्त विस्तृत तर इतर काहींत किंचित् आकुंचित होत होते. असे बहुविध कटाक्ष तिने मजकडे फेकले. )

मी आपल्या मनाची चलबिचल लपविण्याकरिता गुंफत असलेली बकुलमाळ कशीबशी पुरी केली. इतक्यात तिच्या बरोबरचे मालदार वगैरे सेवक आले आणि ती हत्तिणीवर बसून नगराच्या मार्गाने निघून गेली. पण जाताना—

यान्त्या मुहुर्वलितकंधरमाननं त-
दावृत्तवृन्तशतपत्रनिभं वहन्त्या ।
दिग्धोऽमृतेन च विषेण च पक्ष्मलाक्ष्या
गाढं निखात इव मे हृदये कटाक्षः ।।

(मा. मा., १, २९)

( जाताना मान वळवून जिचे मुख वळलेल्या देठाच्या कमलासारखे होते त्या सुंदरीने माझ्या हृदयावर अमृताने तसाच विषाने माखलेला कटाक्ष जणू काय गाढ रोवला. )

त्यावर मकरन्द विचारतो, 'पण तिचे नाव व कुल माहीत झाले काय ?' त्यावर माधव उत्तरतो, "ती हत्तिणीवर बसली तेव्हा तिच्या परिवारातील एक सखी थोडी मागे राहिली आणि फुले वेचण्याच्या मिषाने मजजवळ येऊन मला म्हणाली, 'महाभाग, आपली ही पुष्पमाला सुंदर गुंफिली आहे. आमच्या ताईसाहेबांना अशा नवीन व आश्चर्यकारक पुष्पमालाविषयी कुतूहल आहे. तर आपले कौशल्य कृतार्थ होऊ द्या. ही माला आमच्या ताईसाहेबांच्या गळ्यात पडून बहुमोल होऊ द्या.'[१] तिनेच पुढे मला सांगितले की आपली स्वामिनी अमात्य भूरिवसूची कन्या मालती असून ती स्वतः तिच्या दाईची कन्या—जिच्यावर तिची मर्जी आहे अशी—लवङ्गिका होय. नंतर ती माझ्या कडून बकुलमाला घेऊन निघून गेली."

---

१. हे सर्व भाषण श्लेषयुक्त आहे. त्याचे दोन अर्थ होतात. त्याचे विवरण आठव्या प्रकरणात पाहा.

हे त्यांचे भाषण ऐकतांच माधवाचा सेवक कलहंस पुढे होऊन माधवाची तसबीर त्याना देतो. ती लवङ्गिकेकडून त्याच्या मंदारिका नामक प्रेयसीकडे आली होती आणि तिच्या नकळत त्याने आणली होती. मकरन्दाच्या सूचनेवरुन माधव त्याच फलकावर मालतीचे चित्र काढून त्याच्या खाली स्वतः रचलेला खालील श्लोक लिहितो—

जगति जयिनस्ते ते भावा नवेन्दुकलादय:
प्रकृतिमधुराः सन्त्येवान्ये मनो मदयन्ति ये ।
मम तु यदियं याता लोके विलोचनचन्द्रिका
नयनविषयं जन्मन्येकः स एव महोत्सवः ॥

( मा. मा., १, ३६ )

( या जगामध्ये नूतन इन्दुकलेसारखे स्वभावतःच सुंदर आणि आकर्षक असे अनेक पदार्थ आहेत, ज्यांच्या योगे मनाला उन्माद चढतो. पण माझ्या बाबतीत ही, माझ्या नेत्रांना चन्द्रिकेप्रमाणे आनन्दित करणारी, ज्या दिवशी माझ्या दृष्टिपथात आली तो एकच दिवस माझ्या आयुष्यात खरा महोत्सवाचा होय. ) तितक्यात मन्दारिका तेथे येते आणि तो चित्रफलक घेऊन जाते. नंतर मध्यान्ह झाल्यामुळे माधव व मकरन्द घरी जाण्यास निघतात. ( अंक १ )

दुसऱ्या अंकाच्या आरंभी मालतीच्या दोन सख्यांचा लहान प्रवेश घातला आहे. त्यावरुन कामन्दकीला मकरन्दाकडून मदनोद्यानात घडलेला सर्व वृत्तान्त कळला असून ती मालतीला भेटण्याकरिता आल्याचे कळते. तसेच अमात्य नरेन्द्राकरिता राजाने मागणी घातली असून भूरिवसूने त्याला 'प्रभवति निजस्य कन्यकाजनस्य महाराजः ।' ( महाराज आपल्या कन्येच्या बाबतीत मुखत्यार आहेत ) असे उत्तर दिल्याचेही समजते.

नंतरच्या मुख्य प्रवेशात मालती व लवङ्गिका बोलत बसल्याचे दाखविले आहे. लवङ्गिका मालतीला माधवाकडून मिळालेली बकुलमाला देते. 'ही एका भागात विस्कळित झालेली दिसते' असे मालतीने म्हणताच 'त्याचे कारण तूच' असे म्हणून लवङ्गिका सकाळचा वृत्तान्त वर्णन करते. तसेच ती मन्दारिकेने परत केलेला चित्रफलक मालतीला दाखविते. त्यावर काढलेले आपले चित्र पाहून आणि त्या खालचा माधवाने लिहिलेला श्लोक वाचून तिला आपणाप्रमाणे माधवही प्रेमपरवश झाल्याबद्दल खात्री होते. 'वल्लभसमागमच अशा उत्कट प्रेमाला योग्य असतो' असे लवङ्गिकेने सुचविताच खालील मालती म्हणते—

ज्वलतु गगने रात्रौ रात्रावखण्डकलः शशी
दहतु मदनः किं वा मृत्योः परेण विधास्यति ।

मम तु दयितः श्लाघ्यस्तातो जनन्यमलान्वया
कुलममलिन न त्वेवायं जनो न च जीवितम् ।।

(मा. मा., २, २)

(पूर्ण झालेला चंद्र रोज रात्री आकाशात प्रकाशित राहो; मदनही मला जाळो; मृत्यूपेक्षा वाईट असे तो काय करील ? माझा थोर पिता आणि सत्कुलोत्पन्न माता, तसेच माझे निष्कलंक कुल ही मला प्रिय आहेत. त्याच्यापुढे हा जन (माधव) किंवा माझे प्राण याची मातब्बरी मला वाटत नाही.)

इतक्यात प्रतीहारी येऊन कामन्दकी आल्याची वर्दी देते. नंतर कामन्दकी प्रवेश करते. तिला भूरिवसूने राजाला दिलेले उत्तर या लोकीच्या तसेच परलोकीच्या कल्याणाला विरुद्ध नसल्यामुळे मोठे चातुर्याचे वाटते. मदनोद्यानातील घटना, बकुलमाला आणि चित्रफलक याचा वृत्तान्त ऐकल्यावर तिला अतिशय आनंद झालेला असतो; कारण, ती म्हणते—'इतरेतरानुरागो हि विवाहकर्मणि परार्ध्यं मङ्गलम् । गीतश्चायमर्थोऽङ्गिरसा यस्या मनश्चक्षुषोर्निबन्धस्तस्यामृद्धिरिति ।' (वधूवरांचे परस्परावरचे प्रेम हे विवाहकृत्यातील श्रेष्ठ मङ्गल होय. अङ्गिरसानेही हेच सांगितले आहे—'जिच्याविषयी मन आणि नयन आकृष्ट होतात त्या वधूच्या योगे समृद्धि प्राप्त होते.')

मालतीने कामन्दकीला 'आपले कुशल आहे ना ?' असे विचारताच ती एक उसासा टाकून म्हणते 'आता कुशलच म्हणावयाचे !' लवङ्गिकेने खिन्नतेचे कारण विचारताच ती उत्तरते 'अग, हे मालतीविषयीचे प्रेम ! हे माझ्या भिक्षुणीधर्माच्या विरुद्ध आहे. पण काय करावे ? मालतीचे हे नैसर्गिक विलासयुक्त रूप मदनाचे विजयी अस्त्र आहे. ते अयोग्य वराला दिल्यामुळे शोचनीय होईल आणि त्यातील उत्कृष्ट गुण विफल होतील.' पुढे ती म्हणते, 'काय हे आश्चर्य !

गुणापेक्षाशून्यं कथमिदमुपक्रान्तमथवा
कुतोऽपत्यस्नेहः कुटिलनयनिष्णातमनसाम् ।
इव त्वेदं पर्यं यदुत नृपतेर्नर्मसचिवः
सुतादानान्मित्रं भवतु स हि नो नन्दन इति ।।'

(मा. मा., २, ७)

(गुणाची अपेक्षा न करिता भूरिवसूने हे करण्याचे कसे ठरविले कोण जाणे ! अथवा कुटिल राजनीतीत निष्णात अशा लोकांच्या मनात अपत्यस्नेह कोठला ? याचा उद्देश हाच दिसतो की राजाचा तो खुषमस्कऱ्या नन्दन कन्यादानाने मित्र आपला व्हावा.)

तेव्हा लवङ्गिका म्हणते, 'भगवती म्हणतात तेच खरे. नाहीतर कुरूप, वृद्ध वर निश्चित करताना आमच्या अमात्यसाहेबांनी काहीच विचार कसा नाही केला ?'

मालतीलाही ते ऐकून आपल्यावर वज्राघात झाल्यासारखे वाटते. नंतर 'आपण या आमच्या प्रियसखीला ह्या जीवनमरणातून वाचवा' अशी प्रार्थना लवङ्गिकेने करताच कामन्दकी म्हणते, 'या बाबतीत कुमारिकेचा पिता किंवा त्यांचे दैव हेच प्रभावी ठरते. प्राचीन काळी शकुन्तला दुष्यन्तावर आणि उर्वशी पुरूरव्यावर अनुरक्त झाली, वासवदत्ता, पित्याने संजय राजाला देऊ केल्यावरही, स्वतःला उदयनाला अर्पण करती झाली, अशी प्राचीन उदाहरणे आहेत, पण असे साहस उपदेशिणे योग्य नव्हे.'

नंतर लवङ्गिकेने विचारल्यावरून कामन्दकी माधवाच्या कुलाविषयी माहिती सांगते. ती म्हणते, 'माधवाचा पिता देवरात हा श्रेष्ठ पुरुष असून विदर्भ राजाचा अमात्य आहे. मालतीचा पिता त्याचा सहाध्यायी होता. त्याला त्याच्याविषयी पूर्ण माहिती आहे.

व्यतिकरितदिगन्ताः श्वेतमानैर्यशोभि-
सुकृतविलसितानां स्थानमूर्जस्वलानाम् ।
अकलितमहिमानः केतनं मङ्गलानां
कथमपि भुवनेऽस्मिंस्तादृशाः संभवन्ति ॥
(मा. मा., २, ९)

(आपल्या शुभ्र यशाने ज्यांनी दिगन्तांना व्यापले आहे; ज्यांनी प्रभावी आणि कल्याणप्रद अशी कृत्ये केली आहेत; ज्यांच्या थोरपणाचा थांग लागत नाही; जे सर्व मंगलांचे स्थान आहेत; असे देवरातासारखे महात्मे क्वचितच या भुवनात अवतरतात.)

माधव हा देवराताचा एकुलता एक मुलगा. विद्येने शोभणारा. तो अल्पवयस्क असला तरी अध्यात्मविद्येच्या अध्ययनाकरिता आपल्या मकरन्द नामक बालमित्रासह येथे आला आहे. त्याला पाहणाऱ्या नगरस्त्रियांच्या कटाक्षांच्या योगे या नगरातील वाड्यांच्या खिडक्या जणू काय नीलकमलांनी भरल्या सारख्या वाटतात.'

ते ऐकल्यावर लवङ्गिका उद्गारते, 'पारिजात वृक्ष महासागराशिवाय अन्यत्र उत्पन्न होतो काय?'

इतक्यात संध्याकाळचा सूचक शंखध्वनि होतो. तेव्हा कामन्दकी जावयास निघते. तेव्हा ती आपल्याशी म्हणते, 'मी निसृष्टार्थदूतीचे कर्तव्य पार पाडले आहे—

वरेऽन्यस्मिन्द्वेषः पितरि विचिकित्सा च जनिता
पुरावृत्तोद्गारैरपि च कथिता कार्यपदवी ।
स्तुतं माहाभाग्यं यदभिजनतो यच्च गुणतः
प्रसङ्गादेतस्यैतस्य खलु विषये परिचयः ॥
(मा. मा., २, १३)

(दुसऱ्या वराविषयी दोष दाखवून दिला. पित्याच्या हेतूविषयी मालतीच्या मनात संशय उत्पन्न केला. तिने काय करावे ते सुचविले. कथाप्रसंगाने माधवाच्या कुलाच्या आणि गुणाच्या थोरपणाची स्तुति केली. आता त्या दोघांचा परिचय घडवून आणावयाचा आहे.) (अंक २)

हा दुसरा अंक चांगला साधला आहे. यामध्ये मालतीची शालीन मनोवृत्ति उत्कृष्ट रीतीने वर्णिली आहे. कामन्दकीने आपले निसृष्टार्थदूतीत्व चातुर्याने पार पाडले आहे. या बाबतीत भवभूतीने वात्स्यायनाच्या 'कामसूत्रातील' सूचना तंतोतंत अमलात आणल्या आहेत, हे मागे चौथ्या प्रकरणात दाखविले आहे. कलहंसाच्या प्राकृत भाषणातही 'गद्यात समासप्राचुर्य असावे' या नियमास अनुसरून दीर्घसमासरचना केली आहे, पण इतरत्र श्लोकांत प्रसादगुण आला आहे.

तिसऱ्या अंकाच्या आरंभीच्या प्रवेशकातील बुद्धरक्षिता व अवलोकिता या कामन्दकीच्या दोन शिष्यांच्या संवादावरून आपणास समजते की कृष्णचतुर्दशी (वैशाखातील शिवरात्रि) निमित्त मालती आपल्या मावेसह शंकरपुराच्या (शिवालय असलेल्या उपनगराच्या) जवळच्या वसन्तोद्यानात फुले वेचून ती भगवान् शंकराला अर्पण करण्याकरिता जाणार आहे. तेथे माधवाने यावे असा निरोप कामन्दकीने त्याला पाठविला आहे. कामन्दकीच्या आदेशानुसार बुद्धरक्षितेने मदयन्तिकेजवळ मकरन्दाचे गुणवर्णन करून तिच्या मनात त्याच्याविषयी परोक्षानुराग उत्पन्न केला आहे. तीही वसन्तोद्यानात जाणार असून तिने बुद्धरक्षितेला तेथे बोलाविले आहे.

नंतर कामन्दकी प्रवेश करते. चैत्र शुक्ल त्रयोदशीस माधव व मालती यांची मदनोत्सवप्रसंगी प्रथम दृष्टादृष्ट झाली. त्यानंतर लोटलेल्या सुमारे दीड महिन्याच्या काळात तिची अवस्था मदनबाधेने फारच खराब झाली होती. कामन्दकीचे तिच्याकडे वरचेवर जाणे येणे असे. विविध उपायांनी तिने तिचा विश्वास संपादन केला होता. त्याचे ती वर्णन करते—

व्रजति विरहे वैचित्यं न प्रसीदति संनिधौ
रहसि रमते प्रीत्या वाचं ददात्यनुवर्तते ।
गमनसमये कण्ठे लग्ना निरुध्य निरुध्य मां
सपदि शपथैः प्रत्यावृत्तिं प्रणम्य च याचते ।। (मा. मा., ३, २)

(मी जवळ नसले म्हणजे ती खिन्न होते, माझ्या सान्निध्यात प्रसन्न असते. एकांतात तिला आनंद होतो, माझ्याशी प्रेमाने बोलते, मी सांगितल्याप्रमाणे करते, मी जावयास निघाले म्हणजे माझ्या गळ्याला मिठी मारून मला पुनः पुनः अडवते आणि आणाशपथा घालून व पाया पडून लौकर परत येण्याविषयी विनविते.)

नंतर लवङ्गिका आणि मालती प्रवेश करतात. लवङ्गिका समासप्रचुर प्राकृत भाषणात वसन्तोद्यानातून येणाऱ्या वायूचे वर्णन करते. माधवही कामन्दकीच्या सूचनेनुसार त्या निकुंजाजवळ येतो. तितक्यात मालती लवङ्गिकेला म्हणते, 'सखे, या कुब्जकनिकुञ्जात आपण फुले वेचूया.' तिचे ते शब्द प्रथमच ऐकल्यावर आपली काय अवस्था झाली ते माधव वर्णन करतो—

प्रथमप्रियावचनसश्रवस्फुर-
स्पुलकेन संप्रति मया विडम्ब्यते ।
घनराजिनूतनपयःसमुक्षण-
क्षणबद्धकुड्मलकदम्बडम्बरः ॥

(मा. मा., ३, ७)

( प्रियेचे हे पहिलेच शब्द ऐकल्यावर माझ्या अंगावर रोमांच उभे राहिल्यामुळे मी नूतन घनांचे जलबिन्दु पडल्याबरोबर क्षणात कळ्यांचा समूह ज्याच्यावर दिसू लागतो त्या कदंबाचे अनुकरण करीत आहे. )

नंतर कामन्दकी मालतीला आपल्या जवळ बसवून तिच्या विरहामुळे माधवाची कशी अवस्था झाली ते वर्णन करते—

धत्ते चक्षुर्मुकुलिनि रणत्कोकिले बालचूते
मार्गे गात्रं क्षिपति बकुलामोदगर्भस्य वायोः ।
दाहप्रेम्णा सरसबिसिनीपत्रमात्रान्तराय-
स्ताम्यन्मूर्तिः श्रयति बहुशो मृत्यवे चन्द्रपादान् ॥

(मा. मा., ३, १२)

( तो नुकताच मोहोर आलेल्या आणि कोकिळ शब्द करीत असलेल्या लहान आम्रवृक्षाकडे टक लावून पाहत राहतो, बकुलपुष्पांनी सुवासित झालेल्या वायूच्या मार्गात उभा राहतो आणि आपले संतप्त शरीर जळून जाऊन आपल्याला मृत्यु यावा म्हणून त्यावर फक्त कमलपत्राचे आवरण घालून एकसारखे चंद्रकिरणांचे सेवन करतो. )

माधवाची ती अवस्था आपणामुळे व्हावी याचे मालतीला पराकाष्ठेचे दुःख होते. तिची सखी लवङ्गिकाही मालतीचीही तशीच करुणास्पद अवस्था झाल्याचे समासप्रचुर प्राकृत भाषेत सांगते.

तेव्हा कामन्दकी म्हणते, 'या सर्व गोष्टी माधवाच्या प्रेमामुळे होत असल्या तर ते खरोखर मालतीच्या गुणश्रेष्ठतेचेच फळ आहे. त्यायोगे मला आनंद होत असला तरी तिची ही दारुण अवस्था पाहून माझे हृदय विदीर्ण होत आहे.'

त्यावर लवङ्गिका मालतीने जवळ बाळगलेला माधवाचा चित्रफलक आणि त्याने गुंफलेली आणि तिने गळ्यात घातलेली बकुलमाला दाखवून म्हणते, 'यामुळे मालती जिवत तरी राहिली आहे.'

इतक्यात पडद्यातून लोकांचा गलबला ऐकू येतो. कोणी रक्षक ओरडून लोकाना सागतो, 'हे शंकरपुरवासी जनहो, जवळच्या मठातून आपला लोखंडी पिंजरा फोडून हा भयकर वाघ अनेक घोडे व माणसे याना ठार करून त्यांच्या गात्रातून वाहणाऱ्या रक्ताने झालेल्या चिखलातून कृतान्तासारखा संचार करीत आहे. तेव्हा यथाशक्ति स्वतःचे रक्षण करा.'

हे भाषण प्राकृतात आहे तरीही यात दीर्घसमास योजिले आहेत. अशा प्रसंगी कोणी इतक्या पाल्हाळाचे दीर्घसमासयुक्त भाषण करणे शक्य नाही. म्हणून ते अप्रासंगिक आहे. मदोन्मत्त हत्ती सैरावरा धावत असल्यामुळे झालेल्या याच तऱ्हेच्या दंगलीचे वर्णन 'मृच्छकटिकनाटका'त किती सुटसुटीत प्राकृत वाक्यात केले आहे ते पाहावे. म्हणजे प्रस्तुत भाषणाचे अनौचित्य ध्यानात येईल.

इतक्यात मदयन्तिकेबरोबर शिवमंदिराला जाण्याकरिता आलेली बुद्धरक्षिता प्रवेश करून म्हणते, 'माझी प्रियसखी, अमात्य नन्दनाची भगिनी मदयन्तिका ही परिजनाची दाणादाण झाल्यामुळे ह्या वाघाच्या तडाक्यात सापडली आहे. तिला सोडवा.'

ते ऐकून 'बुद्धरक्षिते, कुठे आहे ती' असे म्हणत माधव पुढे होतो. त्याला पाहताच मालतीला आनद होतो आणि भयही वाटते. ती त्याच्याकडे सारखी पाहू लागते. ते पाहून माधव म्हणतो—

अविरलमिव दाम्ना पौण्डरीकेण नद्धः
स्नपित इव च दुग्धस्रोतसा निर्भरेण।
कवलित इव कृत्स्नश्चक्षुषा स्फारितेन
प्रसभममृतमेघेनेव सान्द्रेण सिक्तः ॥ (मा. मा., ३, १६)

(माझ्याकडे ही डोळे भरून पाहत असल्यामुळे ही मला जणू काय शुभ्र कमलाच्या मालेने घट्ट बांधून टाकत आहे किंवा संतत दुग्धवर्षावाने स्नान घालत आहे. पूर्ण विकसित अशा नेत्रानी ती मला जणू काय ग्रासीत आहे किंवा अमृतमेघाच्या दाट प्रवाहाने जणू काय सिंचन करीत आहे.)

हे वर्णन सुदर आहे. पण प्रस्तुतसारख्या गडबडीच्या प्रसंगी असे विचार कोणाच्याही मनात येणे असंभवनीय वाटते. मग अलंकारप्रचुर भाषेत वर्णन करणे तर दूरच!

इतक्यात मदयन्तिकेवर वाघ झडप घालतो, पण त्याने खाली पाडलेल्या एका पुरुषाने आयुध घेऊन मकरन्द मध्ये पडतो. त्यावर वाघ हल्ला करतो, पण मकरन्द त्याला ठार करतो, असे माधव व कामन्दकी यांना दुरून दिसते.

वाघाच्या हल्ल्यामुळे पुष्कळ रक्तस्राव होऊन मकरन्द बेशुद्ध होतो. त्याला मदयन्तिका सावरून धरते हे पाहून ते सर्व तिकडे जातात. ( अंक ३ )

चौथ्या अंकाच्या आरंभी शंकरनगरातील देवालयाजवळ मदयन्तिकेने मूर्च्छित मकरन्दाला आणि मालतीने माधवाला सावरून धरले आहे आणि जवळ कामन्दकी, बुद्धरक्षिता आणि लवङ्गिका बसल्या आहेत, असा प्रवेश घातला आहे. मकरन्द नंतर त्यांच्या प्रयत्नांनी शुद्धीवर येतो. तेव्हा मालती माधवाच्या कपाळावर स्पर्श करून त्याला शुद्धीवर आणते आणि म्हणते, 'महाभाग, मी आपले अभिनन्दन करते. हे महाभाग, आपले मित्र, आता सावध झाले आहेत.' नंतर मकरन्द सांगतो की, 'मी आज नगरात काही वार्ता ऐकली. तिच्यामुळे माधवाची खिन्नता अधिकच वाढेल अशी मला भीति वाटली. तो वसन्तोद्यानात गेला आहे असे अवलोकितेकडून कळल्यावरून मी इकडे येताना वाघाच्या तावडीत सापडलेल्या या कुलीन कन्येला पाहिले.' नंतर 'मालतीने तुझे अभिनन्दन केले आहे. तेव्हा या प्रसंगी तिला काही भेट द्यावी' अशी सूचना कामन्दकीने करताच माधव म्हणतो—

यद्वृत्तव्रणितसुहृद्भ्रमोहमुग्धं
कारुण्याद्विहितवती गतव्ययं माम् ।
तत्कामं प्रभवति पूर्णपात्रवृत्त्या
स्वीकर्तुं मम हृदयञ्च जीवितं च ॥
( मा. मा., ४, १ )

( वाघाने जखमी केलेला आपला मित्र बेशुद्ध झालेला पाहून मूर्च्छित झालेल्या मला हिने करुणेने शुद्धीवर आणले म्हणून मी हिला माझे हृदय आणि जीवित पूर्णपात्र (बक्षीस) म्हणून देत आहे. तिने त्याचा स्वीकार करावा. )

यावर शालीनतेने मालती उत्तर देत नाही, पण तिची सखी लवङ्गिका तिच्या तर्फे त्यांचा स्वीकार करते. इतक्यात अमात्य नन्दनाचा सेवक येऊन मदयन्तिकेला तिच्या भावाचा संदेश सांगतो की, 'आज महाराजांनी आमच्या वाड्यात येऊन भूरिवसुविषयी आपला विश्वास आणि आमच्यावर अनुग्रह व्यक्त करून मालती आम्हाला अर्पण केली. तेव्हा तू या आनन्दोत्सवाकरिता ये.' ते ऐकून मालती आपली भावजय होणार याबद्दल मदयन्तिकेला आनंद होतो. कामन्दकीही तिचे बरकरणी अभिनन्दन करते. नंतर मकरन्दाकडे प्रेमपूर्ण कटाक्ष फेकून मदयन्तिका बुद्धरक्षितेसह जाते.

राजाने नन्दनाला मालती दिल्याची वार्ता ऐकून माधव अत्यंत खिन्न होतो. तेव्हा त्याचे सांत्वन करताना कामन्दकी म्हणते--" भूरिवसु काही तुला आपण होऊन मालती देणार नव्हता. त्याने 'महाराजाची आपल्या कन्येवर सत्ता आहे' असे राजाला म्हटले खरे, पण त्यामुळे परिस्थितीत काही बदल झाला नाही. भूरिवसूचे हे बोलणे वरकरणी आहे. मालती ही काही राजाची मुलगी नव्हे. आणि कन्याप्रदानामध्ये राजेलोकांची आज्ञा प्रमाण मानली पाहिजे असा काही धर्माचारसंकेत नाही. तेव्हा तुम्हा दोघांचा संयोग व्हावा म्हणून इच्छेने प्राणांचीही पर्वा न करता मी यत्न करीन."

हे सर्व मालतीच्या समक्ष घडते. इतक्यात पडद्यामागून 'भगवती कामन्दकी, आईसाहेबांची विनंती आहे की आपण मालतीला घेऊन लौकर यावे.' जाताना मालती स्वगत म्हणते–'आता माझी जगण्याची इच्छा संपली. निर्दयपणामुळे बाबांचे कापालिकत्व दिसून आले. माझ्या दुर्दैवाच्या दारुण कृत्याचा परिणाम पूर्ण झाला. आता मी कुणाला दोष देऊ आणि कुणाला शरण जाऊ?' कामन्दकी मालतीसह गेल्यावर माधव स्वगत म्हणतो, 'भगवती केवळ माझ्याविषयीच्या स्नेहामुळे मला आश्वासन देत आहे. माझे जीवित सफल होईल काय, याविषयी माझ्या मनात शंका उत्पन्न झाली आहे. तर आता काय करावे? महामांसविक्रयाशिवाय अन्य उपाय मला दिसत नाही.' नंतर तो मकरन्दाला म्हणतो— 'मित्रा तुला मदयन्तिका दुर्लभ नाही. कारण,

प्रमथ्य क्रव्याद मरणसमये रक्षितवतः
परिष्वङ्ग लब्ध्वा तव कथमिवान्यत्र रमताम् ।
तया च व्यापारः कमलनयनाया नयनयो-
स्त्वयि व्यक्तस्नेहस्तिमितरमणीयश्चिरमभूत् ॥

(मा. मा., ४, ९)

(त्या मांसभक्षक वाघाला मारून तू तिचे मृत्यूपासून रक्षण केलेस. तुझे आलिंगन लाभलेल्या तिचे मन दुसऱ्याच्या ठिकाणी कसे रमेल? त्या कमलनयनेच्या नेत्रांचे कटाक्ष तुझ्याविषयीचे प्रेम व्यक्त करीत तुझ्यावर स्थिर होऊन रमणीय भासत होते.) तर चल आता आपण पारा आणि सिन्धु नदीच्या संगमावर स्नान करून नगरीत प्रवेश करू.' (अंक ४).

या दोन अंकात मालती आणि माधव यांचे प्रेम परस्पर दर्शनाने व भेटीने वृद्धिंगत झालेले दाखविले आहे. बुद्धरक्षितेने मदयन्तिकेच्या मनात मकरन्दाविषयी परोक्षानुराग उत्पन्न केला होता. त्याला मकरन्दाने तिला वाघाच्या तावडीतून सोडविल्यामुळे

अंकुर फुटला आहे. यापुढे ही दोन प्रेमप्रकरणे बरोबर चालू लागतात. वसन्तोद्यानाच्या, मालतीच्या प्रेमरवस्थेच्या आणि वाघाने माडलेल्या धुमाकुळाच्या प्राकृत भाषेतील वर्णनात दीर्घसमासांची दुर्बोधता आली असली तरी संस्कृत श्लोकात मात्र प्रशंसनीय प्रसादगुण आणि रमणीयता दिसून येतात.

पाचव्या अंकाचे स्थल पद्मावती नगराच्या बाहेरचे स्मशान आणि त्याच्या जवळचे कराला देवीचे देवालय हे आहे. आरंभी कापालिक अघोरघंटाची शिष्या कपालकुंडला आकाश मार्गाने येते आणि शक्तिनाथ शंकराचे स्तवन करते—

पडधिकदशनाडीचक्रमध्यस्थितात्मा
हृदि विनिहितरूपः सिद्धिदस्तद्विदां यः ।
अविचलितमनोभिः साधकैर्मृग्यमाणः
स जयति परिणद्धः शक्तिभिः शक्तिनाथः ॥
( मा. मा., ५, १, )

[ सहा चक्रांनी युक्त अशा दशनाडीचक्राच्या मध्यभागी राहणारा, हृदयामध्ये ज्याचे स्वरूप भासते, जो आपले स्वरूप जाणणाऱ्याना सिद्धि देतो, ज्याचे ज्ञान साधक एकाग्र मनोवृत्तीने मिळवू पाहतात, तो ( इच्छा, ज्ञान आणि क्रिया या ) तीन शक्तींनी वेष्टिलेला असा शक्तिनाथ ( शिव ) हा ( सदैव ) विजयी असतो. ]

नंतर ती आपणास आपल्या हृदयकमलामध्ये शिवरूपी आत्म्याचे दर्शन झाल्यामुळे आपण उत्तनाने श्रम न भासता मेघातून जात आहो असे सांगते. नंतर ती आकाश मार्गाने जात असताना स्वतःचे वर्णन करते—

विष्वग्वृत्तिर्जटानां प्रचलति निबिडग्रन्थिबन्धोऽपि भारः
संस्कारप्रवाणदीर्घं पटु रटति कृतावृत्तिखट्वाङ्गघण्टा ।
ऊर्ध्वं धूनोति वायुर्विवृतशवशिरःश्रेणिकुञ्जेषु गुञ्ज-
न्नुत्तालः किंकिणीनामनवरतरणत्कारहेतुः पताकाम् ॥
( मा. मा., ५, ४ )

( माझ्या जटाना मी घट्ट बांधले असले तरी आकाशात उडताना त्या सगळीकडे पसरत आहेत. माझ्या खट्वांगाला बांधलेली घंटा मागेपुढे होऊन दुसऱ्या वस्तूच्या आघाताने मोठा आवाज करीत आहे. पताकेला बांधलेल्या घुंगुराना सारखा निनादित करणारा आणि उघड्या नरकपालांच्या माळामध्ये गुंजारव करणारा सोसाट्याचा वारा त्या पताकेला वर फडफडावीत आहे. )

नंतर ती म्हणते, चिताधूमाने सूचित केलेल्या स्मशानत्राच्या जवळचे हे कराला देवीचे देवालय आहे. येथे माझे गुरु अघोरघंट यानी मन्त्रसाधना पुरी केली

असून त्याच्या आज्ञेने मला पूजासामग्री जमवावयाची आहे. त्यानी मला सांगितले आहे 'भगवती कराला देवीला नवस केल्याप्रमाणे मला स्त्रीरत्न अर्पण करावयाचे आहे. ते स्त्रीरत्न याच नगरात आहे.' नंतर त्या स्मशानात महामांसविक्रयाकरिता आलेला खड्गधारी पुरुष तिच्या दृष्टीस पडतो. त्याचे रूप ती वर्णन करते—

कुवलयदलश्यामोऽप्यङ्गं दधत्परिपाण्डुर
ललितचरणन्यासः श्रीमान्मृगाङ्कनिभाननः ।
हरति विनयं वामो यस्य प्रकाशितसाहसः
प्रविगलदसृक्खड्गः पाणिर्ललन्नरजाङ्गलः ।।

( मा. मा., ५, ५ )

( नीलकमलाप्रमाणे कृष्णवर्ण पण फिक्ट झालेल्या शरीराचा, ललित गतीने चालणारा, चन्द्रासारखे मुख असलेला असा हा पुरुष आहे. याच्या डाव्या हातात ज्यातून दाट रक्त गळत आहे असे नरमांस असून त्याचा साहसी स्वभाव व उद्दामपणा व्यक्त होत आहे. ) तो कामन्दकीच्या मित्राचा पुत्र माधव असून महामांसविक्रयाकरिता आला आहे हे ती ओळखते. पण 'त्याच्याशी आपल्याला काय करावयाचे आहे', असे म्हणून ती आपले कार्य उपादण्याकरिता पुढे जाते. त्यावेळी सध्याकाळ संपून अंधकार सर्वत्र पसरत होता हे तिने केलेल्या वर्णनावरून समजते.

या विष्कंभकानतर मागे वर्णिल्याप्रमाणे माधव महामांसविक्रयाकरिता स्मशानात प्रवेश करतो. महामांसविक्रयाचे स्पष्टीकरण करताना 'मालतीमाधवा'चा टीकाकार जगद्धर स्मशानसिद्धयोगिनीमताचा पुढील उल्लेख करतो 'वीरहस्तान्मांसं गृहीत्वा वीरायाभिमतवरदानमिति स्मशानसिद्धयोगिनीमतम् ।' ( पिशाचाना नरमांस विकून त्यांच्याकडून इष्टार्थाच्या प्राप्तीकरिता वरप्राप्ति करून घेणे हा महामांसविक्रयाचा अर्थ आहे. )

माधव स्वतःशी म्हणतो, मालतीचे एकसारखे चिन्तन केल्यामुळे ती माझ्यापुढे सदोदित आहे असे वाटते. कारण—

लीनेव प्रतिबिम्बितेव लिखितेवोत्कीर्णरूपेव च
प्रत्युप्तेव च वज्रलेपघटितेवान्तर्निखातेव च ।
सा नश्चेतसि कीलितेव विशिखैश्चेतोभुवः पञ्चभि-
श्चिन्तासन्ततितन्तुजालनिबिडस्यूतेव लग्ना प्रिया ।।

( मा. मा., ५, १० )

( माझी प्रिया मालती माझ्या मनात जणू काय एकरूप झालेली, प्रतिबिंबित, चित्रित, उत्कीर्ण, कोंदणात बसवलेली, वज्रलेपाने चिकटवलेली, आत खोल खणलेली, मदनाच्या

पाचाही बाणांनी खिळलेली, सतत चिंतनाच्या धाग्यानी घट्ट शिवलेली अशी झाली आहे. )

या श्लोकात उत्प्रेक्षांचा जणू पाऊस पडला आहे. त्यावरून भवभूतीच्या बहुविध कल्पनेचे दर्शन होते. नंतर माधव तेथील पिशाचांना शस्त्राने पवित्र न झालेले आपल्या हातातील नरमांस विकत घेण्याविषयी आवाहन करतो. त्याबरोबर पिशाचांचा कलकलाट ऐकू येतो. स्मशानात सर्वत्र पिशाचे विविध व्यापारात मग्न असलेली दिसतात. त्यांपैकी एकाचे तो खालील वर्णन करतो—

उत्कृत्योत्कृत्य कृत्तिं प्रथममथ पृथूत्सेधभूयांसि मांसा–
न्यंसस्फिक्पृष्ठपिण्डाद्यवयवसुलभान्युग्रपूतीनि जग्ध्वा ।
आर्त्तस्नायवन्त्रनेत्रः प्रकटितदशनः प्रेतरङ्कः करङ्का–
दङ्कस्थादस्थिसंस्थं स्थपुटगतमपि क्रव्यमव्यग्रमत्ति ॥

(मा. मा., ५, १६)

( हे दीन पिशाच आपल्या मांडीवर प्रेत घेऊन प्रथम त्याचे निरनिराळ्या अवयवांवरील चामडे काढून खातो, नितम्ब, पाठ, जांघा, यांत सहज मिळणारे आणि खूप आल्यामुळे वाढलेले दुर्गन्धि मांस भक्षण केल्यावर स्नायु, आतडी व नेत्र काढून घेऊन हाडाच्या पोकळीतील मांसही दात विचकत सावकाशपणे खात आहे. )

हे अत्यंत किळस आणणारे वर्णन बीभत्सरसाचे 'मूर्धाभिषिक्त उदाहरण' असून ते 'दशरूपावलोक', 'काव्यप्रकाश' इत्यादि नाट्य व अलंकार यांविषयीच्या अनेक ग्रंथांत उद्धृत केले आहे. त्यावरून भवभूतीची प्रतिभा बीभत्सरसाच्या वर्णनातही कशा रस घेत असे ते दिसून येईल.

माधव पुनः महामांसविक्रयाची घोषणा करतो. तो सर्व स्मशानभर हिंडतो, पण त्याच्या आवाहनाला एकही पिशाच साद देत नाही. इतक्यात 'हे निष्करुण बाबा, राजाची मर्जी मिळविण्याचे तुमचे साधन जी मी तिचा वध केला जात आहे' असे अत्यंत आर्त उद्गार त्याला ऐकू येतात. तेव्हा ते कराला देवीच्या देवालयातूनच आले असावे असे वाटून तो तिकडे जातो. तो त्याला चामुण्डा देवीपुढे मालतीला उभी करून अघोरघंट व कपालकुण्डला तिचे स्तवन करताना दिसतात. त्या स्तवनाचा दण्डक वृत्तातील हा श्लोक पाहा—

प्रचलितकरिकृत्तिपर्यन्तचञ्चन्नखाघातभिन्नेन्दुनिःस्यन्दमानामृत–
श्च्योतजीवत्कपालावलीमुक्तचण्डाट्टहासत्रसद्भूरिभूतप्रवृत्तस्तुति
श्वसदसितभुजङ्गभोगाङ्गदग्रन्थिनिष्पीडनस्फारफुल्लत्फणापीठनि–
र्यद्विषज्योतिरुज्जृम्भणोड्डामरव्यस्तविस्तारिदोःखण्डपर्यासितक्ष्माधरम् ।

ज्वलदनलपिशङ्गनेत्रचछटाभारभीमोत्तमाङ्गभ्रमिप्रस्तुतालातचक्र-
क्रियास्यूतदिग्भागमुत्तुङ्गखट्वाङ्गकोटिध्वजोद्भूतिविक्षिप्ततारागण
प्रमुदितकटपूतनोत्तालवेतालतालस्फुटत्कर्णसंभ्रान्तगौरीघनाश्लेषहृष्य-
न्मनस्त्र्यम्बकानन्दि वस्ताण्डवं देवि भूयादरिष्टघ्नं च हृष्टचै च नः ॥

(हे देवि तुझे तांडव नृत्य–ज्यामध्ये तू धारण केलेल्या हस्तिचर्माच्या हेलावण्यामुळे त्याच्या नखांनी चन्द्राला भोकें पडून त्यातून गळणाऱ्या अमृताने तू धारण केलेले नरकपाल जिवंत होऊन अट्टहास करतात आणि त्यामुळे घाबरून जाऊन अनेक प्राणी तुझी स्तुति करतात; ज्यामध्ये तू बाहूभूषण म्हणून बांधलेल्या कृष्णसर्पांच्या ग्रंथि आवळल्यामुळे त्याच्या फणांतून बाहेर पडणाऱ्या विषामुळे भयंकर दिसणाऱ्या आणि इतस्ततः फिरणाऱ्या बाहुदण्डामुळे सभोवतालचे पर्वत दूर फेकले जातात; ज्यामध्ये प्रज्वलित अग्नीसारख्या पिंगट अशा नेत्रांनी भीषण झालेल्या तुझ्या मस्तकाच्या भ्रमणाने सर्व दिशांत जणू काय अलातचक्र दिसते आणि उंच अशा खट्वाङ्गाच्या टोकाला बांधलेल्या ध्वजाने तारांचे समूह इतस्ततः फेकले जातात; ज्यामध्ये आनन्दित पिशाचे आणि प्रचण्ड वेताल यांनी जोराने टाळ्या वाजवल्यामुळे कानठाळी बसून घाबरलेल्या पार्वतीने घट्ट आलिंगन दिल्यामुळे भगवान् शंकराला मोठा आनंद होतो—ते तुझे तांडव नृत्य आमचे कल्याण करो व आम्हाला आनंद देवो!)

नंतर कपालकुण्डला मालतीला म्हणते—'दारुण कृतान्त आज तुला त्वरा करीत आहे. तर आपल्या प्रियजनांचे स्मरण कर.' तेव्हा मालती म्हणते, 'प्रिय माधवा, मी परलोकी गेले तरी तुम्ही माझे स्मरण ठेवा. ज्याचे स्मरण प्रियजन करतात तो निधन पावत नाही.' तेव्हा अघोरघंट आपले खड्ग उगारून 'मन्त्रसाधनाकरिता तुला अर्पिलेल्या पूजेचा स्वीकार कर' असे देवीला आवाहन करतो, तोच माधव पुढे होऊन त्याचे शस्त्र खाली पाडतो. माधवाने विचारल्यावरून मालती सांगते, 'मी गच्चीवर निजले होते आणि येथे जागी झाले एवढेच मला माहीत आहे. पण तुम्ही इथे कसे?' तेव्हा माधव म्हणतो, 'तुझ्या पाणिग्रहणाने धन्य व्हावे म्हणून नरमांस विकण्याकरिता येथे आलो होतो. हे काकतालीयच झाले म्हणावयाचे!' तेव्हा अघोरघंट 'तुलाच चामुण्डेला प्रथम बळी देतो' असे माधवाला म्हणतो. तेव्हा मालती घाबरून त्याच्याशी झगडा न करण्याबद्दल माधवाला विनविते. माधव मालतीला आणि अघोरघंट कपालकुंडलेला त्याच श्लोकात धीर देतो. इतक्यात पडद्यातून पुढील घोषणा ऐकू येते—

'हे मालतीला शोधणारे लोक हो! भूरिवसूला आश्वासन देणारी अप्रतिहत-बुद्धीची भगवती कामन्दकी तुम्हाला सांगते की या करालेच्या देवालयाला वेढा घाला;

काण अघोरघंटाशिवाय दुसऱ्या कोणी हे कृत्य केले असणे शक्य नाही. तसेच कराला देवीला बळी देण्याखेरीज यात दुसरा हेतु दिसत नाही.' तेव्हा आपणाला सैनिकांनी वेढल्याचे कपालकुण्डलेच्या ध्यानात येते. माधवही म्हणतो, 'आधी या मालतीला तिच्या बांधवांच्या स्वाधीन करून नंतर त्यांच्या समक्षच या दुष्टाला ठार करावे.' नंतर माधव व अघोरघंट दोघेही एकमेकांना उद्देशून म्हणतात–

'आः पाप!

कठोरास्थिग्रन्थिव्यतिकररणत्कारमुखरः
खरस्नायुच्छेदक्षणविहितवेगव्युपरमः।
निरातङ्कः पङ्केष्विव पिशितखण्डेषु निपत-
त्प्रसिर्गात्रं गात्रं सपदि लवशस्ते विकिरतु॥

(मा. मा., ५, ३४)

(अरे पाप्या, हा माझा खड्ग–जो तुझ्या कठोर हाडांच्या गाठींवर केलेल्या आघाताने आवाज करील, तुझ्या कठोर स्नायूंचा छेद करताना क्षणभर ज्याचा वेग किंचित कमी होईल, पण चिखलाप्रमाणे मांसखंडात ज्याला अडथळा होणार नाही असा–तुझ्या प्रत्येक अवयवाचे तुकडे तुकडे करून फेकून देवो!' (अंक ५)

या अंकात बीभत्स व रौद्र रसाचे साम्राज्य असल्यामुळे बहुधा सर्वत्र दीर्घ समासाचा व कठोर वर्णांचा उपयोग केला आहे. भवभूतीच्या विशाल प्रतिभेला अतिशय विस्ताराची आवड असल्यामुळे अघोरघंटाने केलेल्या कराला देवीच्या स्तुतीत त्याने प्रत्येक पादात ५४ अक्षरे असलेल्या प्रदीर्घ दण्डक वृत्ताची योजना केली आहे. या वृत्तात आरंभी दोन लघुअक्षरांचे नगण आणि नंतर दोन गुरु अक्षरांमध्ये एकलघु अक्षर असलेले सोळा रगण असतात. त्यामुळे त्यात देवीच्या नृत्यातील पदविन्यासाचे अनुकरण झाले आहे. या प्रसंगी मालतीला बळी देण्याच्या वेळीच माधवाचे स्मशानात असणे हा योगायोग काकतालीय प्रकारचा आहे व तसे भवभूतीनेही म्हटले आहे. पण असे योगायोग जीवनातही दृष्टीस पडतात.[1] म्हणून ते आक्षेपार्ह नाहीत. शेवटला श्लोक दोन पात्रांनी एकमेकास म्हणावा, यात कृत्रिमता आहे. तिची काही उदाहरणं या, तसेच भवभूतीच्या इतरही नाटकात आढळतात.

---

१. ह्या तऱ्हेचा योगायोग बाणाने 'हर्षचरिता'च्या आठव्या उच्छ्वासात वर्णिला आहे तो पाहावा. हर्षाची बहीण राज्यश्री विंध्यारण्यात अग्नीत उडी घेणार होती तोच हर्ष तेथे येऊन तिला वाचवतो. हा योगायोग प्रत्यक्ष घडलेला आहे.

कारण अघोरघंटाशिवाय दुसऱ्या कोणी हे कृत्य केले असणे शक्य नाही. तसेच कराला देवीला बळी देण्याखेरीज यात दुसरा हेतु दिसत नाही.' तेव्हा आपणाला सैनिकांनी वेढल्याचे कपालकुण्डलेच्या ध्यानात येते. माधवही म्हणतो, 'आधी या मालतीला तिच्या बांधवांच्या स्वाधीन करून नंतर त्यांच्या समक्षच या दुष्टाला ठार करावे.' नंतर माधव व अघोरघंट दोघेही एकमेकांना उद्देशून म्हणतात–

'आः पाप !

कठोरास्थिग्रन्थिव्यतिकररणत्कारमुखरः
खरस्नायुच्छेदक्षणविहितवेगव्युपरमः ।
निरातङ्कः पङ्केष्विव पिशितखण्डेषु निपतन्–
प्रसिगोऽयं गात्रं सपदि लवशस्ते विकिरतु ॥

(मा. मा., ५, ३४)

(अरे पाप्या, हा माझा खड्ग–जो तुझ्या कठोर हाडांच्या गाठींवर केलेल्या आघाताने आवाज करील, तुझ्या कठोर स्नायूंचा छेद करताना क्षणभर ज्याचा वेग किंचित कमी होईल, पण चिखलाप्रमाणे मांसपिंडात ज्याला अडथळा होणार नाही असा—तुझ्या प्रत्येक अवयवाचे तुकडे तुकडे करून फेकून देवो !' (अंक ५)

या अंकात बीभत्स व रौद्र रसांचे साम्राज्य असल्यामुळे बहुधा सर्वत्र दीर्घ समासांचा व कठोर वर्णांचा उपयोग केला आहे. भवभूतीच्या विशाल प्रतिभेला अतिशय विस्ताराची आवड असल्यामुळे अघोरघंटाने केलेल्या कराला देवीच्या स्तुतीत त्याने प्रत्येक पादात ५४ अक्षरे असलेल्या प्रदीर्घ दण्डक वृत्ताची योजना केली आहे. या वृत्तात आरंभी दोन लघुअक्षरांचे नगण आणि नंतर दोन गुरु अक्षरांमध्ये एकलघु अक्षर असलेले सोळा रगण असतात. त्यामुळे त्यात देवीच्या नृत्यातील पदविन्यासांचे अनुकरण झाले आहे. या प्रसंगी मालतीला बळी देण्याच्या वेळीच माधवाचे स्मशानात असणे हा योगायोग काकतालीय प्रकारचा आहे व तसे भवभूतीनेही म्हटले आहे. पण असे योगायोग जीवनातही दृष्टीस पडतात.¹ म्हणून ते आक्षेपार्ह नाहीत. शेवटचा श्लोक दोन पात्रांनी एकमेकांस म्हणावा, यात कृत्रिमता आहे. तिची काही उदाहरणे या, तसेच भवभूतीच्या इतरही नाटकात आढळतात.

---

१. ह्या तऱ्हेचा योगायोग बाणाने 'हर्षचरिता'च्या आठव्या उच्छ्वासात वर्णिला आहे तो पाहावा. हर्षाची बहीण राज्यश्री विंध्यारण्यात अग्नीत उडी घेणार होती तोच हर्ष तेथे येऊन तिला वाचवतो. हा योगायोग प्रत्यक्ष घडलेला आहे.

सहाव्या अंकाच्या आरंभी एक लहान विष्कंभक घातला आहे. कपालकुण्डला प्रवेश करून म्हणते, ' हे दुष्ट माधवा, त्या दिवशी माझ्या गुरूला तू मालतीकरिता ठार केलेस. त्यावेळी मी तुझ्यावर निर्दयपणे हल्ला केला तरी तू स्त्री म्हणून माझी उपेक्षा केलीस. पण लक्षात ठेव. मुंगसाला मारल्याबद्दल सूड उगवण्याला दारुण दंशांची आणि विषाने उग्र अशी भुजंगी तयार असल्यावर त्या भुजंगाच्या शत्रूला शांति कोठून मिळणार ? ' इतक्यात ' जोपर्यंत वऱ्हाडी येत नाहीत तोपर्यंत विघ्ननिवारणार्थ मालतीने नगरदेवतेच्या दर्शनाकरिता जाऊन यावे. आणि तिथे वैवाहिक वस्त्रालंकार घेऊन सेवकांनी तिच्या मागून जावे ' अशी भगवती कामन्दकीची सूचना ऐकू येते. तेव्हा त्या गर्दीत न मिसळता माधवाचा सूड घेण्याकरिता उपाय योजण्यासाठी कपालकुंडला ठेपून निघून जाते.

नंतरच्या मुख्य प्रवेशात कामन्दकीच्या सूचनेप्रमाणे माधव व मकरन्द नगरदेवतेच्या मंदिरात मालती येण्याची वाट पाहत असलेले दिसतात. देवळाकडे येणाऱ्या वधूयात्रेचे वर्णन कलहंस शोभासमासयुक्त क्लिष्ट प्राकृत भाषेत करतो. माधव व मकरन्द ती स्वारी देवळाच्या झरोक्यातून पाहतात. देवळाजवळ आल्यावर मालती हत्तिणीवरून उतरते आणि देवळात जाऊ लागते. सोबत कामन्दकी व लवङ्गिका असतात. इतक्यात प्रतीहारी वधूची वस्त्राभूषणे घेऊन येते आणि म्हणते, ' राजेसाहेबांनी ही शुभ्र रेशमाची साडी, ही ओढणी आणि हे सर्वांगावर घालण्याचे अलंकार, तसेच हे मोत्यांचे हार,

( हे साध्या भोळ्या मालती, ही साहस करण्याची इच्छा सोडून दे. हे रंभोरु, आपली भीति टाकून दे. माझे चित्त तुझ्या दुःखदायक विरहाचा क्लेश सहन करण्यास असमर्थ आहे.)

तेव्हा मालती खाली पडल्यापडल्याच त्याला आपली प्रार्थना स्वीकारण्याविषयी विनविते. तेव्हा लवङ्गिकेच्या जागी उभा असलेला माधव म्हणतो—

किं वा भणामि विच्छेददारुणायासकारिणि ।
कामं कुरु वरारोहे देहि मे परिरम्भणम् ॥

( मा. मा., ६, ११ )

( वियोगाचे दारुण दुःख देणाऱ्या हे वरारोहे, मी काय सांगू ? तुला वाटेल तसे कर. पण मला ( एकवार ) मिठी मार. )

तेव्हा आपल्या सखीने आपली विनंती मान्य केली हे समजून आनंदित झालेली मालती उठते आणि माधवाला आलिंगन देते, आणि म्हणते, “सखे, माझे डोळे अश्रूंनी भरले असल्यामुळे तू मला दिसत नाहीस. पण आज तुझ्या शरीराचा निराळाच स्पर्श भासतो. तू माधवाला नमस्कार करून ही माझी विनंती कळव:—‘मी डोळे भरून आपल्या सुंदर मुखचंद्राचे दर्शन घेऊ शकले नाही. मी दीर्घकाल वियोगदुःख सहन केले. पण आता मात्र निराश झाले आहे.’ तसेच, हे प्रियसखी, तू मात्र माझी सदैव आठवण ठेव. माधवानी आपल्या सुंदर हातानी गुंफलेल्या ह्या मनोहर बकुलमालेला तू माझ्याप्रमाणे जप आणि सदैव हृदयावर धारण कर.” असे म्हणून माधवाला लवङ्गिका समजून ती त्याच्या गळ्यात बकुलमाला घालू लागते, तोंच आपली चूक तिच्या ध्यानात येऊन ती भीतीने कापू लागते. तेव्हा माधव म्हणतो—

उद्दामदेहपरिदाहमहाज्वराणि
सङ्कल्पसङ्गमविनोदितवेदनानि ।
त्वत्स्नेहसंवदविलम्बितजीवितानि
किं वा मयापि न दिनान्यतिवाहितानि ॥

( मा. मा., ६, १३ )

( शरीराचा तीव्र दाह करणारा प्रखर विरहज्वर अनुभवीत, तुझ्या संकल्पसमागमाने आपला मनस्ताप घालवीत, आणि माझ्यावरच्या तुझ्या प्रेमाच्या जाणिवेनेच स्वतःचे जीवन टिकवीत, मीही इतके दिवस काढले नाहीत काय ? )

तेव्हा कलहंस उद्गारतो, ‘अहो सरमणीयता संविधानस्य ।’ ( वाहवा काय ही सुंदर घटना घडून आली तरी ! )

सहाव्या अंकाच्या आरंभी एक लहान विष्कंभक घातला आहे. कपालकुण्डला प्रवेश करून म्हणते, ' हे दुष्ट माधवा, त्या दिवशी माझ्या गुरूला तू मालतीकरिता ठार केलेस. त्यावेळी मी तुझ्यावर निर्दयपणे हल्ला केला तरी तू स्त्री म्हणून माझी उपेक्षा केलीस. पण लक्षात ठेव. भुजगाला मारल्याबद्दल सूड उगवण्याला तीक्ष्ण दंतांची आणि विषाने उग्र अशी भुजगी तयार असल्यावर त्या भुजंगाच्या शत्रूला शांति कोठून मिळणार ! ' इतक्यात ' जोपर्यंत वऱ्हाडी येत नाहीत तोपर्यंत विघ्ननिवारणार्थ मालतीने नगरदेवतेच्या दर्शनाकरिता जाऊन यावे. आणि तिचे वैवाहिक वस्त्रालंकार घेऊन सेवकांनी तिच्या मागून जावे ' अशी भगवती कामन्दकीची सूचना ऐकू येते. तेव्हा त्या गर्दीत न मिसळता माधवाचा सूड घेण्याकरिता उपाय योजण्यासाठी कपाल-कुंडला तेथून निघून जाते.

नंतरच्या मुख्य प्रवेशात कामन्दकीच्या सूचनेप्रमाणे माधव व मकरन्द नगर-देवतेच्या मंदिरात मालती येण्याची वाट पाहत असलेले दिसतात. देवळाकडे येणाऱ्या वधूयात्रेचे वर्णन कलहंस दीर्घसमासयुक्त क्लिष्ट प्राकृत भाषेत करतो. माधव व मकरन्द ती स्वारी देवळाच्या झरोक्यातून पाहतात. देवळाजवळ आल्यावर मालती हत्तिणी-वरून उतरते आणि देवळात जाऊ लागते. सोबत कामन्दकी व लवङ्गिका असतात. इतक्यात प्रतीहारी वधूची वस्त्राभूषणे घेऊन येते आणि म्हणते, ' राजेसाहेबांनी ही शुभ्र रेशमाची साडी, ही ओढणी आणि हे सर्वांगावर घालण्याचे अलंकार, तसेच हे मोत्यांचे हार, ही चन्दनाची उटी आणि ही शुभ्र पुष्पमाला पाठविली आहे. ही वस्त्राभरणे देवीच्या समोर मालतीला लेववावी. ' ते ऐकून कामन्दकी लवङ्गिकेला म्हणते, ' तू मालतीबरोबर गाभाऱ्यात जा. मी या अलंकारातील रत्नांची शास्त्रपरीक्षा करते. ' नंतर माधव व मकरन्द देवळाच्या गाभाऱ्यात स्तंभाआड राहून पुढील प्रकार पाहतात.

गाभाऱ्यात गेल्यावर लवङ्गिका मालतीला पाणिग्रहणाच्या मंगल प्रसंगी तिच्या मातेने तिला देवीच्या पूजेकरिता पाठविल्याचे सांगते. मालतीला या प्रसंगी पराकाष्ठेचे दुःख होते. ती लवङ्गिकेला म्हणते, ' मी आता आपल्या जिवाचे बरे वाईट करून घेणार आहे. तू मात्र माझ्या निधनामुळे माझे प्रियकर माधव जीविताविषयी उदासीन होणार नाहीत असे कर. दुसऱ्याची झाल्यामुळे अपराधी बनलेली मी प्राणत्याग करणार आहे. त्यामध्ये तू अडथळा आणू नको ' असे म्हणून ती लवङ्गिकेच्या पाया पडते. तेव्हा मकरन्द माधवाला लवङ्गिकेच्या ठिकाणी उभा रहाण्याविषयी खुणावतो. तसे करून माधव म्हणतो—

सरले साहसरागं परिहर रम्भोरु मुञ्च सरम्भम् ।
विरसं विरहायासं सोढुं तव चित्तमसहं मे ॥

(मा. मा., ६, १० )

कारक होईल, अशी शंका माधवाने व्यक्त करताच कामन्दकी म्हणते, 'तुला त्याची काळजी कशाला ? ते मी पाहून घेईन.' नंतर ती मालती व माधव याना सागते, 'या झाडीतून तुम्ही दीर्घिकेजवळच्या उद्यानात विवाहमंगलाकरिता जावे. तेथ अवलोकितेने विवाहाची सर्व सामग्री तयार ठेवली आहे. तेथील उद्यानाचे ती वर्णन करते -

गाढोत्कण्ठकठोरकेरलवधूगण्डावपाण्डुच्छदै-
स्ताम्बूलीपटलैः पिनद्धफलितव्यानम्रपूगद्रुमाः ।
कक्कोलीफलजग्धिमुग्धविकिरव्याहारिणस्तद्भुवो
भागाः प्रेङ्खितमातुलुङ्गवृतयः प्रेयो विधास्यन्ति वाम् ॥
(मा. मा., ६, १९)

(उत्कट अशा उत्कंठेने प्रौढ केरल स्त्रियांच्या गालाप्रमाणे पादरट पानवेलींनी वेष्टिलेल्या आणि सुपारीच्या भाराने वाकलेल्या पोफळी जेथ आहेत, जेथ कंकोळीची फळे खाऊन आनंदित झालेले पक्षी चिवचिव करीत आहेत, जेथ कन्यांत हलणाऱ्या महाळुंगाच्या वृक्षाची कुंपणे घातली आहेत, असे त्या उद्यानातील भाग तुम्हाला आनंद देतील.)

'तेथ तुम्ही मदयन्तिका व मकरन्द येतील तोपर्यंत थांबावे.' हे ऐकल्यावर ही ही आपल्याला इष्ट अशी गोष्ट होणार याबद्दल माधवाला आनंद झाला. नंतर कामन्दकी लवङ्गिका व मालतीवेषधारी मकरन्द यांच्यह जाते. माधवही मालतीचा हात धरून उद्यानाकडे जातो. (अंक ६)

सहाव्या अंकातील या घटना निःसंशय मनोहर झाल्या आहेत. भवभूतीलाही त्याबद्दल धन्यता वाटली होती हे मागे दिलेल्या कलहंसाच्या उद्गारावरून स्पष्ट दिसते. लवङ्गिकेच्या जागी उभा राहिलेल्या माधवाने मालतीला उद्देशून म्हटलेले दोन श्लोक संस्कृत आणि शौरसेनी प्राकृत भाषेत तत्सम शब्दात रचलेले असे समान आहेत. तत्समत्वादेतेषां शब्दानां प्राकृतसंस्कृतयोः समानं रूपम्। असे टीकाकार म्हणतात.[1] लवङ्गिका नेहमी प्राकृतात बोलणारी. तिची जागा घेणारा माधव संस्कृतात बोलला तर मालतीला संशय येऊन पुढील प्रसग—मालतीने बकुलमाला माधवाच्या गळ्यात घालण्याचा—संभवनीय होणार नाही. म्हणून भवभूतीने या दोन श्लोकात तत्सम शब्दांचाच उपयोग केला आहे. डॉ. रामकृष्णपंत

---

१. भोजाने आपल्या 'सरस्वतीकण्ठाभरणा'त 'सरले साहसरागम्' इत्यादि 'संस्कृतप्राकृताच्या साधारणीभावे'चे उदाहरण म्हणून दिले आहे. (परिच्छेद २, कारिका १७).

नंतर मकरन्द मालतीला 'विवाहकंकणाने युक्त असा आपला हात माधवाच्या हातात देऊन त्याला चिरकालीन सुख दे' असे सुचवितो. त्यावर लवङ्गिका म्हणते, 'महाभाग, हिने स्वतःचे हृदय आपण होऊन देण्याचे साहस केले आहे. ती काय करग्रहणाच्या बाबतीत अडखळेल ?'

तेव्हा मालती उद्गारते, 'लवङ्गिका कन्याजनाला अयोग्य असे काही तरी सुचवीत आहे.' इतक्यात कामन्दकी प्रवेश करते. तिला पाहताच मालती कापत कापत तिला मिठी मारते. तेव्हा कामन्दकी म्हणते—

पुरश्चक्षूरागस्तदनु मनसोऽनन्यपरता
तनुग्लानिर्यस्य त्वयि समभवद्यत्र च तव ।
युवा सोऽयं प्रेयानिह सुवदने मुञ्च जडतां
विधातुर्वैदग्ध्यं विलसतु सकामोऽस्तु मदनः ।।

(मा. मा., ६)

(प्रथम दृष्टादृष्ट होताच ज्याच्यावर तुझे प्रेम बसले, नंतर तुझे मन अनन्यपरवश झाले आणि शरीराला ग्लानि आली. तसेच ज्याचीही तुजविषयी अशीच अवस्था झाली, तो हा तुझा प्रियकर युवक तुझ्यापुढे उभा आहे. तेव्हा, हे सुवदने, शैथिल्य टाकून दे. विधात्याचे कौशल्य व्यक्त होवो आणि मदनही कृतकृत्य होवो !)

नंतर कामन्दकी डोळ्यात आलेले अश्रु आपल्या चीवराने पुसत माधवाला म्हणते—'अनेक सामन्त आपल्या मस्तकावरील पुष्पमालातील परागानी ज्याच्या चरणाङ्गुलींना रक्तवर्ण करतात त्या अमात्य भूरिवसूची ही एकुलती एक कन्या अनुरूप वधूवर-संयोगात आनन्दित होणारा मदन आणि मीही तुला देत आहे.' नंतर ती त्या उभयताना उद्देशून म्हणते—

प्रेयो मित्रं बन्धुता वा समग्रा
सर्वे कामाः शेवधिर्जीवितं वा ।
स्त्रीणां भर्ता धर्मदाराश्च पुंसा-
मित्यन्योन्यं वत्सयोर्ज्ञातमस्तु ।।

(मा. मा., ६, १८)

(स्त्रियाना पति हे प्रियमित्र, समग्र नातलग, सर्व इच्छा, धनदौलत किंबहुना जीवितही होत. तसेच पतींना धर्मपत्न्याही तशाच असतात. हे माझ्या प्रिय वत्सानी ध्यानात असू द्यावे.)

नंतर ती मकरन्दाला मालतीकरिता आणलेले वस्त्रालंकार अंगावर घालून विवाहाकरिता जाण्याचे सुचविते. तेव्हा तसे करणे आपल्या मित्राला अनर्थावह आणि संकट-

कारक होईल, अशी शंका माधवाने व्यक्त करताच कामन्दकी म्हणते, 'तुला त्याची काळजी कशाला ? ते मी पाहून घेईन.' नंतर ती मालती व माधव याना सांगते, 'या झाडीतून तुम्ही दीर्घिकेजवळच्या उद्यानात विवाहमंगलाकरिता जावे. तेथ अवलोकितेने विवाहाची सर्व सामग्री तयार ठेवली आहे. तेथील उद्यानाचे ती वर्णन करते -

गाढोत्कण्ठकठोरकेरलवधूगण्डावपाण्डुच्छदै-
स्ताम्बूलीपटलैः पिनद्धफलितव्यानम्रपूगद्रुमाः ।
कक्कोलीफलजग्धिमुग्धविकिरव्याहारिणस्तद्भुवो
भागाः प्रेङ्खितमातुलुङ्गवृतयः प्रेयो विधास्यन्ति वाम् ॥
(मा. मा., ६, १९)

(उत्कट अशा उत्कंठेने प्रौढ केरल स्त्रियांच्या गालाप्रमाणे पांढरट पानवेलींनी वेष्टिलेल्या आणि सुपारीच्या माराने वाकलेल्या पोफळी जेथ आहेत, जेथ कंकोळीची फळे खाऊन आनंदित झालेले पक्षी चिवचिव करीत आहेत, जेथ वाऱ्याने हलणाऱ्या महाळुंगाच्या वृक्षाची कुंपणे घातली आहेत, असे त्या उद्यानातील भाग तुम्हाला आनंद देतील.)

'तेथ तुम्ही मदयन्तिका व मकरन्द येतील तोपर्यंत थांबावे.' हे ऐकल्यावर ही ही आपल्याला इष्ट अशी गोष्ट होणार याबद्दल माधवाला आनंद झाला. नंतर कामन्दकी लवङ्गिका व मालतीवेषधारी मकरन्द यासह जाते. माधवही मालतीचा हात धरून उद्यानाकडे जातो. (अंक ६)

सहाव्या अंकातील या घटना निःसंशय मनोहर झाल्या आहेत. भवभूतीलाही त्याबद्दल धन्यता वाटली होती हे मागे दिलेल्या कलहंसाच्या उद्गारावरून स्पष्ट दिसते. लवङ्गिकेच्या जागी उभा राहिलेल्या माधवाने मालतीला उद्देशून म्हटलेले दोन श्लोक संस्कृत आणि शौरसेनी प्राकृत भाषेत तत्सम शब्दात रचलेले असे समान आहेत. तत्समत्वादेवैषां शब्दानां प्राकृतसंस्कृतयोः समानं रूपम्। असे टीकाकार म्हणतात.[1] लवङ्गिका नेहमी प्राकृतात बोलणारी. तिची जागा घेणारा माधव संस्कृतात बोलला तर मालतीला संशय येऊन पुढील प्रसंग—मालतीने बकुलमाला माधवाच्या गळ्यात घालण्याचा—संभवनीय होणार नाही. म्हणून भवभूतीने या दोन श्लोकात तत्सम शब्दांचाच उपयोग केला आहे. डॉ. रामकृष्णपंत

१. भोजाने आपल्या 'सरस्वतीकण्ठाभरणा'त 'सरले साहसरागम्' इत्यादि 'संस्कृतप्राकृतांच्या साधारणीभावे'चे उदाहरण म्हणून दिले आहे. (परिच्छेद २, कारिका १७).

तर आम्हाला उलटा टोमणा मारलास ? ' त्यावर तिची सखी बुद्धरक्षिता तटस्थपणाचा आव आणून म्हणते, ' टोमणा उलटा असेल किंवा नसेलही. पति आपल्या पाया पडला असता त्याचा हिने मान राखला नाही याबद्दल ती दोषी आहे खरी. पण, नववधूच्या बाबतीत दांडगाईचे वर्तन सफल झाले नाही म्हणून रागावून तुझ्या भावाने अभद्र शब्द उच्चारणे हा तुमचा दोष. कारण कामसूत्रकारांनी म्हटले आहे, ' पुष्पा-सारख्या स्त्रियांशी सुकुमारपणाने वागले पाहिजे. त्यांचा विश्वास संपादन न करता दांडगाईने त्यांच्याशी वर्तन केले तर त्या समागमद्वेषी होतात. ' लवङ्गिकेने त्याला दुजोरा दिला. ती म्हणाली, ' घरोघरी कुलकन्यकांचे विवाह होतात. परंतु कोणी अरेरावीने लज्जापरवश कुलीन कन्यकांवर शब्दांनी आग पाखडीत नाहीत. त्यामुळे काळजाला घरे पडून मुली सासरी राहण्याला नाखूष होतात. आणि म्हणूनच मुलगी जन्माला आली की बापवाना वाईट वाटते. ' लवङ्गिकेला इतके वाईट वाटायला मोठेच कारण झाले असले पाहिजे, असे वाटून मदयन्तिका त्याबद्दल बुद्धरक्षितेला विचारते. तेव्हा ती म्हणते, " तुझे दादा ' अशा कुमारकुलटेशी मला आता काही कर्तव्य नाही ' अशी शपथ घेऊन अंतःपुरातून निघून गेले, असे आम्ही ऐकले आहे." तेव्हा मदयन्तिकेला आपल्या भावाच्या दुर्वर्तनाबद्दल वाईट वाटते. पण ती म्हणते, ' मालतीचे प्रेम माधवावर बसले आहे हे सर्व लोकांना माहीत झाले आहे. आम्हालाही ते माहीत आहे. माधवाने गुंफिलेल्या आणि मालतीने स्वतःच्या गळ्यात घातलेल्या बकुलमालेमुळेच ती जिवंत राहिली आहे. त्या दोघांचेही शरीर मदनव्यथेने फिकट झाले आहे. त्या दिवशी वसन्तोद्यानामध्ये त्यांनी परस्पराकडे टाकलेले कटाक्ष मी पाहिले आहेत. मालती माझ्या दादाला दिली असे समजताच तिचे आणि माधवाचे हृदय जणु काय पिळवटून निघाले होते असे दिसले. शिवाय त्या दिवशी माझे वाघाच्या तावडीतून रक्षण करणारा तो महाभाग शुद्धीवर आला त्या प्रसंगी भगवती कामन्द-कीच्या खुबीच्या सूचनेवरून माधवाने मालतीला आपले हृदय व जीवित अर्पण केले हेही मी पाहिले आहे. लवङ्गिके, त्यावेळी तूच माधवाला म्हणाली नाहीस काय ' माझ्या सखीने हा प्रसाद स्वीकारला आहे ' असे ? "

त्यावर ' कोण ग तो महाभाग ? मला तर, बाई, आठवत नाही ' असे लवङ्गिकेने म्हणताच मदयन्तिका त्या दिवशी त्या युवकाने वाघाशी झुंज खेळून आणि स्वतः जखमी होऊन आपणाला त्याच्या जबड्यातून सोडविल्याचे रसभरित वर्णन करते. ' हां, ध्यात आले. तो मकरन्द ! ' असे लवङ्गिकेने म्हणताच मदयन्तिकेचे अंग पुलकित होते. तेव्हा लवङ्गिका संस्कृतांत म्हणते–

वयं तथा नाम यथात्थ किं वदा–
म्ययं त्वकस्माद्विकलः कथान्तरे ।

कदम्बगोलाकृतिमाश्रित: कथं
विशुद्धमुग्धः कुलकन्यकाजन: ।।
( मा. मा., ७, १ )

( तू म्हणतेस तशा आम्ही आहोत खऱ्या. पण ही तू शुद्ध चारित्र्याची, साधी भोळी कुलकन्यका तो प्रसंग वर्णन करता करताच एकदम कदम्बवृक्षासारखी रोमाञ्चित कशी झालीस ? ' )

नंतर ' आम्ही जाणावयाचे ते जाणले आहे. पण आजकाल तुझा वेळ कसा जातो ? ' असे लवङ्गिकेने विचारताच मदयन्तिका दीर्घसमासयुक्त प्राकृत भाषेत आपण कल्पनेने अनुभविलेल्या मकरन्दाच्या समागमसुखाचे सविस्तर रसभरित वर्णन करते आणि म्हणते ' हे सर्व अनुभविल्यावर एकदम जागी झालेल्या मला सर्व जीवलोक शून्य अरण्याप्रमाणे भासतो. ' त्यावर लवङ्गिका खट्याळपणे विचारते, ' सखे मदयन्तिके, खरे सांग. अशा प्रसंगी सुदरक्षितेच्या स्नेहयुक्त स्मिताने विस्फारिलेल्या दृष्टीने सूचित केलेले तुझे नितम्बमूल परिजनापासून लपविण्यासाठी बिछान्यावरील चादरीने वेष्टित करावे लागते की नाही ? '[1] '

याप्रमाणे गुजगोष्टी चालल्या असताना लवङ्गिका विचारते, ' मदनपरवश होऊन कृष्णाने पूर्वी रुक्मिणीचे साहसाने हरण केले तसे तुझे करण्याचा प्रयत्न मकरन्दाने केला तर तुला कसे वाटेल ? ' तेव्हा मदयन्तिका म्हणते, ' मला मृत्यूच्या जबड्यातून सोडविल्यामुळे त्या महाभागाच्या झालेल्या या शरीरावर माझी सत्ता आहे कोठे ? ' इतक्यात रात्रीचा दुसरा प्रहर झाला असे सुचविणारा नगाऱ्याचा आवाज होतो. नंतर ' मी दादाची कानउघाडणी करून किंवा पाया पडून त्याला मालतीविषयी अनुकूल करते ' असे म्हणून मदयन्तिका जावयास निघते तेव्हा तोंडावरचे पांघरूण काढून मकरन्द उठतो आणि या आकस्मिक प्रकाराने आनन्दित पण भयभीत झालेल्या मदयन्तिकेला म्हणतो—

रम्भोरु सहर भय क्षमते विसोढु—
मुत्कम्पितं स्तनभरस्य न मध्यभागः ।
इत्थं स्वयंव कथितप्रणयप्रसादः
संकल्पनिर्वृतिषु संस्तुत एष दासः ।। ( मा. मा., ७, २ )

---

१. सखि मदयन्तिके स्फुटमाख्याहि । अथ तस्मिन्नवसरे स्नेहविभ्रमोन्मिश्रहासविकसद्बुद्धरक्षितालोचननिरूपितं परिजनाद् गोपनीयं ते नितम्बस्य मूलं शयनीयप्रच्छदपटापवारितं भवति वा न वेति ।

( हे रम्भोरु, भीति सोडून दे. ही तुझी कमर तुझ्या स्तनभाराचा कंप सहन करण्यास असमर्थ आहे. संकल्पसुखामध्ये तुला परिचित झालेला आणि ज्याच्यावरील आपला प्रेमप्रसाद तूच (आता) वर्णिला आहेस असा हा तुझा दास तुझ्याजवळ उभा आहे. )

तेव्हा बुद्धरक्षिता मदयन्तिकेला सुचविते, 'आता अमात्याच्या (नन्दनाच्या) वाड्यातील लोक झोपले आहेत. गाढ अंधकार पसरला आहे. तेव्हा तू नूपुर काढून घे. आणि आपण मालती गेली तेथे जाऊ.' तेव्हा मालतीनेही तसेच साहस केल्याचे मदयन्तिकेला समजते. नंतर ते सर्व पाठीमागील दाराने निघून जातात. राजमार्गावर आल्यावर मकरन्द म्हणतो--

प्रासादानामुपरि वलभीतुङ्गवातायनेषु
भ्रान्त्वावृत्तः परिणतसुरागन्धसंस्कारगर्भः ।
माल्यामोदी मुहुरुपचितस्फारकर्पूरवासो
वायुर्यूनामभिनववधूसंनिधानं व्यनक्ति ॥

( मा. मा., ७, ५ )

( मोठमोठ्या वाड्याच्या वरच्या दालनातील उंच खिडक्यात पसरुन परत आलेला, पुष्पाच्या सुगंधाने युक्त आणि कापराने सुवासित असा हा मदिरेच्या गन्धाने युक्त वायु युवकांना नववधूसमागम व्यक्त करीत आहे. ) ( अंक ७ )

आठव्या अंकाच्या आरंभी एक अगदी लहानसा प्रवेशक घातला आहे. त्यात अवलोकिता म्हणते, 'नन्दनाच्या वाड्यातून परत आलेल्या भगवती कामन्दकीला वन्दन करून मी आले आहे. आता ग्रीष्म ऋतूतील सायंकाळी स्नान करून या दीर्घिके-जवळच्या शिलातलावर बसलेल्या मालतीमाधवांकडे मी जाते.'

नंतरच्या मुख्य प्रवेशात माधव प्रिय मातलाच्या वियोगाने खिन्न झालेल्या व स्तब्ध बसलेल्या मालतीचा अनुनय करताना दिसतो. तो तिला म्हणतो–

दग्धं चिराय मलयानिलचन्द्रपादै–
र्निर्वापितं तु परिरम्य वपुर्न नाम ।
आमत्तकोकिलरुतव्यथिता तु हृद्या–
मद्य श्रुतिः पिबतु किंनरकण्ठि वाचम् ॥

( मा. मा., ८, ४ )

( मलय पर्वतावरुन येणारा वारा आणि चन्द्राचे किरण यानी दीर्घकाल दग्ध झालेले माझे शरीर तू आलिंगनाने शांत केले नाहीस. ते एक असो. पण हे किंनरकण्ठि, मत्त

तेव्हा मालतीला काही बोलावयाला लावण्याच्या उद्देशाने अवलोकिता म्हणते, 'पहा बरे, ही तुझी लाडकी बकुलमाला दुसऱ्याची होईल.' इतक्यात कलहंस दुरून दिसतो. तेव्हा मकरन्दाला मदयन्तिका मिळालीच असली पाहिजे, असे अनुमान करून मालती माधवाला एकदम म्हणते, 'मदयन्तिकेच्या लाभाबद्दल मी आपले अभिनन्दन करते.' तेव्हा माधव ती बकुलमाला मालतीच्या गळ्यात घालतो.

नंतर कलहंसाबरोबरच बुद्धरक्षिता, लवङ्गिका आणि मदयन्तिका धावऱ्या धावऱ्या प्रवेश करितात. त्या सांगतात की 'मकरन्दाबरोबर आम्ही येत असता वाटेत मकरन्दाचा नगररक्षापुरुषांशी खटका उडला. तेव्हा तितक्यात आम्हाला शोधत तेथे आलेल्या कलहंसाबरोबर आम्हाला पाठवून तो त्यांच्याबरोबर लढू लागला. आम्ही इकडे येत असता मोठा कोलाहल ऐकला. तेव्हा आणखीही सैन्य येऊन घुमश्चक्री चालली असावी.' हे ऐकून मालती आणि अवलोकिता यांना एकाच वेळी हर्ष आणि उद्वेग यांचा अनुभव येतो. माधव मदयन्तिकेचे स्वागत करतो आणि 'मकरन्द एकटा त्या सर्वांना भारी आहे' असे सांगून त्यांना धीर देतो. तो स्वतःही लागलीच कलहंसासह मकरन्दाच्या साहाय्यास जातो.

तो गेल्यावर हा सर्व वृत्तान्त कामन्दकीला कळविण्याकरिता मालती बुद्धरक्षिता आणि अवलोकिता यांना पाठविते. तसेच 'आमच्याकरिता तरी आपण काळजी-पूर्वक वागावे' असा निरोप माधवाला कळविण्याकरिता लवङ्गिकेला सांगते. तेव्हा तेथे मालती आणि मदयन्तिका एवढ्याच मागे राहतात. काही वेळाने लवङ्गिकेला इतका का वेळ लागला म्हणून पाहण्याकरिता मालती थोडी पुढे होते. तितक्यात ती एकटी आहे असे पाहून कपालकुण्डला तेथे अकस्मात् येऊन तिला म्हणते—

कोकिलाच्या गाण्याने पीडित झालेल्या माझ्या कर्णांना तरी आज तुझे शब्द उत्सुकतेने ऐकू दे.)

तेव्हा अवलोकिता म्हणते, " अग, घटकाभर माधव जवळ नसले तर तू म्हणतेस 'आर्यपुत्राना जाऊन फार वेळ झाला. त्याना मी केव्हा पाहीन असे झाले आहे. ते भेटले की मी त्यांना अनिमेष दृष्टीने पाहत म्हणेन, मी तुमचा दुष्पट आलिंगनाने सन्मान करीन.' " 'अवलोकिता म्हणते ते खरे आहे का ग? तुला लवङ्गिका आणि अवलोकिता यांची शपथ आहे, खरे सांग,' असे माधवाने म्हणताच मालती लाजेने चूर होऊन म्हणते, 'मला नाही माहीत!' माधवाच्या भाषणातील लवङ्गिकेचा उल्लेख ऐकून तिला आपल्या प्रिय सखीची आठवण होऊन तिच्या गालावर अश्रु ओघळतात. ते पाहून माधव म्हणतो—

बाष्पाम्भसा मृगदृशो विमल कपोल.
प्रक्षाल्यते सपदि राजत एव यस्मिन् ।
गण्डूषपेयमिव कान्त्यमृत पिपासु-
रिन्दुर्निवेशितमयूखमृणालदण्डः ॥

(मा. मा., ८, ५)

(या मृगाक्षीचे निर्मल गाल अश्रूंनी धुतले गेले आहेत. त्यावरील कान्तिरूपी अमृताचे घोट घेण्याकरिता या चन्द्राने आपले किरणरूपी (पोकळ) कमलनाल लावले आहेत.)

मालती लवङ्गिकेच्या वियोगाने दुःखित झाली आहे असे समजताच माधव म्हणतो 'मी नन्दनाच्या वाड्यातील बातमी काढण्याकरिता अगोदरच कलहंसाला पाठविले आहे.' त्यावर बुद्धरक्षिता विचारते, 'मकरन्दाला दमयन्तिका मिळाल्याचे सांगणाऱ्यास आपण काय बक्षीस द्याल?' तेव्हा माधव म्हणतो, 'त्याला मी ही बकुलमाला देईन.

प्रेम्णा मदग्रथितेति या प्रियसखीहस्तोपनीतानया
विस्तारिस्तनकुम्भकुड्मलभरोत्सङ्गेन सम्भाविता ।
सम्प्राप्ते त्वय पाणिपीडनविधौ मां प्रत्यपेताशया
या मय्येव लवङ्गिकेत्यवगते सर्वस्वतायीकृता ॥'

(*मालतीने या बकुलमालेचा ती मी गुंफिली म्हणून प्रियसखीने आणली असता* आपल्या विस्तार पावणाऱ्या कुचकुम्भावर घालून आदर केला होता. तिचा नन्दनाशी पाणिग्रहणविधि जवळ आला तेव्हा माझ्याविषयी निराश होऊन तिने मला लवङ्गिका समजून आपले सर्वस्व म्हणून ती माझ्या स्वाधीन केली होती.)

तेव्हा मालतीला काही बोलावयाला लावण्याच्या उद्देशाने अवलोकिता म्हणते, ' पहा बरे, ही तुझी लाडकी वकुलमाला दुसऱ्याची होईल. ' इतक्यात कलहंस दुरून दिसतो. तेव्हा मकरन्दाला मदयन्तिका मिळालीच असली पाहिजे, असे अनुमान करून मालती माधवाला एकदम म्हणते, ' मदयन्तिकेच्या लाभाबद्दल मी आपले अभिनन्दन करते. ' तेव्हा माधव ती वकुलमाला मालतीच्या गळ्यात घालतो.

नंतर कलहंसाबरोबरच बुद्धरक्षिता, लवङ्गिका आणि मदयन्तिका धावऱ्या घाबऱ्या प्रवेश करितात. त्या सांगतात की ' मकरन्दाबरोबर आम्ही येत असता वाटेत मकरन्दाचा नगररक्षापुरुषाशी खटका उडला. तेव्हा तितक्यात आम्हाला शोधत तेथे आलेल्या कलहंसाबरोबर आम्हाला पाठवून तो त्यांच्याबरोबर लढू लागला. आम्ही इकडे येत असता मोठा कोलाहल ऐकला. तेव्हा आणखीही सैन्य येऊन धुमश्चक्री चालली असावी. ' ते ऐकून मालती आणि अवलोकिता यांना एकाच वेळी हर्ष आणि उद्वेग याचा अनुभव येतो. माधव मदयन्तिकेचे स्वागत करतो आणि ' मकरन्द एकटा त्या सर्वांना भारी आहे ' असे सांगून त्यांना धीर देतो. तो स्वतःही लागलीच कलहंसासह मकरन्दाच्या साहाय्यास जातो.

तो गेल्यावर हा सर्व वृत्तान्त कामन्दकीला कळविण्याकरिता मालती बुद्धरक्षिता आणि अवलोकिता यांना पाठविते. तसेच ' आमच्याकरिता तरी आपण काळजी-पूर्वक वागावे ' असा निरोप माधवाला कळविण्याकरिता लवङ्गिकेला सांगते. तेव्हा तेथे मालती आणि मदयन्तिका एवढयाच मागे राहतात. काही वेळाने लवङ्गिकेला इतका का वेळ लागला म्हणून पाहण्याकरिता मालती थोडी पुढे होते. तितक्यात ती एकटी आहे असे पाहून कपालकुण्डला तेथे अकस्मात् येऊन तिला म्हणते—

स्वद्वत्सल. क्व स तपस्विजनस्य हन्ता
कन्याविटः पतिरसौ परिरक्षतु त्वाम् ।
श्येनावपातचकिता वनवर्तिकेव
किं चेष्टसे ननु चिरात् कवलीकृतासि ॥

( मा. मा., ८, ८ )

( तुझा तो प्रियपति, तपस्विजनाला मारणारा कन्याविट कोठे आहे ? तो आता तुझे रक्षण करण्यास येवो ! ससाण्याच्या झडपेने घाबरलेल्या रानचिमणीप्रमाणे तू का फडफडत आहेस ? फार दिवसानी तू माझ्या जबड्यात सापडलीस. ) तिला पाहताच मालतीची दातखिळी बसते. कपालकुंडला म्हणते ' आता हिला श्रीपर्वतावर नेऊन आणि तुकडे तुकडे करून मी हिला अत्यंत दुःखाने मरण येईल असे करते. '

इतक्यात लवङ्गिका येऊन मदयन्तिकेला सांगते की ' सर्व नगरात माधव व मकरन्द याच्या शौर्यावर लुब्ध झालेल्या नागरिकांचे दु खोद्गार ऐकू येत आहेत. महाराजांना आपल्या दोन्ही मन्त्र्यांच्या मुलींना पळविल्याचे कळताच मत्सर आणि राग येऊन त्यांनी नगररक्षकांच्या साहाय्यास पुष्कळशी फौज पाठविली आहे आणि ते स्वतः आपल्या प्रासादाच्या गच्चीवरून चांदण्याच्या प्रकाशात तो झगडा पाहत राहिले आहेत.' नंतर लवङ्गिका व मदयन्तिका पाहतात तों तेथे मालती दिसत नाही. तेव्हा त्या तिला सगळीकडे शोधू लागतात.

तितक्यात कलहंस प्रवेश करून माधव मकरन्दांनी केलेल्या घोर युद्धाचे वर्णन समासप्रचुर प्राकृत भाषेत करतो. नतर तो म्हणतो की, "महाराज त्यांच्या शौर्याने खूप झाले. त्यांनी आपल्या प्रतीहारीला पाठवून माधव व मकरन्द याना बोलावून घेतले आणि त्यांच्या मुखचंद्राचे अवलोकन करून माझ्याकडून त्यांच्या कुलांची माहिती ऐकली. नतर त्यांनी भूरिवसु व नन्दन यांना 'काय तुम्हाला जगाला भूषणभूत आणि कुलीनत्वादिगुणांनी युक्त असे जामात मिळाल्याबद्दल आनंद झाला नाही ?' असे म्हणून गोड शब्दांनी त्यांची समजूत घालून नतर ते आत गेले. हे आता माधव व मकरन्द येत आहेत. मीही हा वृत्तांत भगवती कामन्दकीला कळविण्याकरिता जातो."

माधव व मकरन्द तेथे येतात, पण त्यांना कोणीच दिसत नाही. नंतर आलेल्या लवङ्गिका व मदयन्तिका यांच्याकडून मालती नाहीशी झाल्याचे त्याना कळते. तेव्हा त्यांना पराकाष्ठेचे दु ख होते. ती कदाचित् भगवती कामन्दकीकडे गेली असेल अशी शका येऊन ते सर्व तिकडे जाण्यास निघतात. जाताना मकरन्द स्वतःशीच म्हणतो—

यातां भवेद् भगवतीभवनं सखी नो
जीवन्त्युपैष्यति न वेत्यभिशङ्कितोऽस्मि ।
प्रायेण बान्धवसुहृत्प्रियसङ्गमादि
सौदामिनीस्फुरणचञ्चलमेव सौख्यम् ।।

( मा. मा., ८, १४ )

( मालती कदाचित् भगवतीच्या घरी गेली असेल. पण ती जिवंत सापडेल किंवा नाही याच्याबद्दल मला शंका वाटत आहे. बांधव, मित्र, प्रियजन यांच्या भेटीचे सौख्य प्रायः विद्युल्लतेच्या स्फुरणासारखे चंचल असते. )

सातव्या व आठव्या अंकात अनेक घटना घडून कथानकाची प्रगति बरीच झाली आहे. सातव्या अंकातील लवङ्गिका आणि मदयन्तिका यांची भाषणे मनोरम साधली आहेत. नन्दनाच्या अतःपुरात घडलेल्या घटना कामन्दकीच्या योजनेनुसार होत्या,

पण पुढील प्रसंग मात्र यदृच्छेने घडून आलेले दिसतात. माधव व मकरन्द यानी त्यांना आपल्या शौर्याने अनुकूल करून घेतले ही गोष्ट वेगळी. पण यान्या पुढे कामन्दकीची बुद्धि चालत नाही. मालतीच्या अदर्शनाने इतरांप्रमाणे तीही हतबुद्ध होते. मालतीची शालीनता आणि मदयन्तिकेचा तडफदार स्वभाव यांची चित्रे सुंदर निघाली आहेत. पूर्वीच्या अंकातल्याप्रमाणे याही अंकातील शृंगार व वीररसाची प्राकृत भाषणे समासप्राचुर्याने दुर्बोध झाली आहेत. पण संस्कृत भाषणातील श्लोक सुंदर आहेत.

नवव्या अंकाच्या आरंभीच्या विष्कंभकात सौदामिनी श्रीपर्वताहून पद्मावतीस आकाशमार्गाने आल्याचे दाखविले आहे. पद्मावतीतील प्रदेश मालतीची दु:खदायक आठवण करून देणारे असल्यामुळे माधव आपल्या मित्रवर्गासह जवळच्या मोठाल्या पर्वत, दऱ्या व अरण्ये असलेल्या प्रदेशात गेला असल्याचे समजल्यावरून सौदामिनी तिकडे जाण्याचे ठरवते. प्रथम ती पद्मावतीतील पारा, सिन्धु व लवणा या नद्या, सिन्धु नदीचा धबधबा, सुवर्णबिन्दु नामक भगवान् शंकराचे मधुमती आणि सिन्धु नदीच्या संगमावरील देवालय इत्यादिकाचे आकाशमार्गाने येत असता दिसल्याप्रमाणे वर्णन करते. ही सर्व दृश्ये आजही पदमपवाया गावाच्या परिसरात दृष्टीस पडतात हे मागे भवभूतीचे जीवनचरित वर्णिताना आम्ही दाखविले आहे. आणि तद्वर्णनपर श्लोक देऊन त्याचा अर्थही दिला आहे. त्याची पुनरुक्ति करण्याची जरूरी नाही. या विष्कंभकातील 'दधति कुहरभाजाम्' इत्यादि श्लोक भवभूतीने 'उत्तररामचरिता-' करिता रचला होता आणि मागाहून तो त्याने विष्कंभकात सौदामिनीच्या तोंडी घातला असे दिसते. तो श्लोक आणि त्याचा अर्थ 'उत्तररामचरिता'चे विवेचन करताना देऊ. विष्कंभकाच्या शेवटी सौदामिनी म्हणते, 'आता मध्याह्न झाला आहे. तेव्हा माधव व मकरन्द याना शोधून आपले कार्य करावे.'

नंतरच्या मुख्य प्रवेशात माधव व मकरन्द मालतीबद्दल शोक करताना दिसतात. माधव मालतीला उद्देशून म्हणतो—

> प्रियमाधवे किमसि मय्यवत्सला
> ननु सोऽहमेव यमनन्दयपुरा ।
> स्वयमागृहीतकमनीयकंकण-
> स्तव मूर्तिमानिव महोत्सवः करः ॥
>
> (मा. मा., ९, ९)

(हे माधवाला प्रिय मानणाऱ्या मालती ! तू माझ्यावर अशी रुष्ट का झालीस ? तोच मी नव्हे काय, ज्याला पूर्वी तू स्वतः सुंदर कंकण धारण केलेल्या तुझा कर जणू काय मूर्तिमंत महोत्सव असा आनंद देत होता.)

भवभूतीच्या ' मालतीमाधवा 'त आणि ' उत्तररामचरिता 'त अनेक श्लोक अगदी समान आहेत, तर काही किंचित्फरकाने आले आहेत. प्रस्तुत श्लोक उत्तररामचरिताच्या पहिल्या अंकात चित्रदर्शनप्रसंगी राम पूर्वी केलेल्या सीतेच्या करग्रहणाचे वर्णन करीत आहे तेथे प्रथमार्धाच्या पुढील फरकाने आला आहे–

समयः स वर्तत इवैष यत्र मां
समनन्दयत्सुमुखि गौतमार्पितः ।

( उ. रा. च. १, )

त्यावेळी रामाच्या विवाहाला चौदा वर्षांपेक्षा जास्त काळ झाला होता, म्हणून त्या वेळच्या स्थितीचे यात योग्य वर्णन आहे. पण ' मालतीमाधवा 'च्या वर उद्धृत केलेल्या श्लोकात ' पुरा ' शब्दाचा प्रयोग ठीक दिसत नाही. कारण तेव्हा मालती व माधव यांच्या विवाहाला चार-पाच दिवसच झाले होते. शिवाय *' स्वयमागृहीत '* इत्यादि वर्णनही मालतीच्या शालीनत्वामुळे बरोबर दिसत नाही. तेव्हा कवीने हा श्लोक ' उत्तररामचरिता 'करिता प्रथम रचून नंतर तो ' मालतीमाधवा 'त घातलेला दिसतो. काही ठिकाणी याच्या उलटही प्रकार झाल्याचे पुढे दाखविले आहे. पुढे दुःखाचा आवेग दुःसह होऊन माधव म्हणतो–

दलति हृदयं गाढोद्वेगं द्विधा न तु भिद्यते
वहति विकलः कायो मोहं न मुञ्चति चेतनाम् ।
ज्वलयति तनूमन्तर्दाहः करोति न भस्मसात्
प्रहरति विधिर्मर्मच्छेदी न कृन्तति जीवितम् ।।

( मा. मा., ९, १२ )

( पराकाष्ठेच्या दुःखामुळे माझे हृदय फुटते आहे, पण त्याचे दोन तुकडे होत नाहीत. विकल झालेला माझा देह मोह पावतो आहे, पण त्याचे चैतन्य नष्ट होत नाही. माझ्या शरीरात शोकाग्नि पेटला आहे, पण तो त्याला भस्मसात करीत नाही. दुर्दैव माझ्या मर्मावर आघात करीत आहे, पण माझा प्राण घेत नाही. )

हा श्लोक अगदी याच शब्दात ' उत्तररामचरिता 'त आला आहे. बारा वर्षे सीतावियोगाचे दारुण दुःख सहन करणाऱ्या रामाच्या बाबतीत त्यातील वर्णन योग्य आहे. *चार-पाच दिवसानंतर पत्नीवियोग झालेल्या माधवाच्या बाबतीत ते अतिशयोक्त वाटते.* हा श्लोकही ' उत्तररामचरिता 'करिता प्रथम रचला असावा.

मकरन्दही माधवाजवळच शोक करीत होता. माधवाचे मन दुसरीकडे वळवून त्याला किंचित् विरंगुळा आणण्यासाठी तो त्याला समोरच्या तळ्यातील कमलयुक्त भाग पाहण्याची विनंती करतो–

एतस्मिन्मदकलमल्लिकाक्षपक्ष–
व्याधूतस्फुरदुरुदण्डपुण्डरीकाः ।
बाष्पाम्भःपरिपततोद्गमान्तराले
दृश्यन्तामविरहितश्रियो विभागाः ।।

( मा. मा., ९, १४ )

( निळी चोच आणि पाय असलेल्या मदमत्त मल्लिकाक्ष पक्ष्यांनी ज्यातील विशाल दंडांची शुभ्र कमळे हलविली जात आहेत असे या वनातील सुंदर प्रदेश डोळ्यातील अश्रु खाली पडल्यावर पुनः ते उत्पन्न होण्याच्या मधल्या अल्प अवधीत पाहा. )

हाच श्लोक 'उत्तररामचरिता'च्या पहिल्या अंकात पम्पासरोवरातील शुभ्र कमळे मल्लिकाक्षपक्ष्यांच्या योगाने आपणाला डोळ्यातील अश्रुमुळे निळी कशी भासली हे वर्णन करताना रामाच्या भाषणात आला आहे. तेथे या श्लोकाचा चतुर्थ चरण 'सन्दृष्टाः कुवलयिनो भुवो विभागाः' असा आहे. व त्यामुळे तेथे रमणीय भ्रान्तिमान् अलंकार झाला आहे. भवभूतीला त्यानी कल्पना 'मालतीमाधवा'तील प्रस्तुत श्लोक रचून झाल्यावर सुचलेली दिसते.

माधव दुःखावेगाने मूर्च्छित होतो हे पाहून मकरन्दाचे हृदय कळवळून येते. तो म्हणतो–

मातर्मातर्दलति हृदयं ध्वंसते देहबन्धः
शून्यं मन्ये जगदविरतज्वालमन्तर्ज्वलामि ।
सीदन्नन्धे तमसि विधुरो मज्जतीवान्तरात्मा
विष्वङ्मोहः स्थगयति कथं मन्दभाग्यः करोमि ।।

( मा. मा., ९, २० )

हाच श्लोक 'उत्तररामचरिता'त ( ३, ३८ ) पहिले शब्द 'हा हा देवि स्फुटति' असे बदलून आला आहे. तो तेथे जास्त अनुरूप आहे. त्याचा अर्थ तेथे दिला आहे.

नंतर माधवाला आकाशात प्रथमच आलेला मेघ दिसतो. त्याला हात जोडून तो म्हणतो—

कच्चित्सौम्य प्रियसहचरो विद्युदालिङ्गति त्वा·
माविर्भूतप्रणयसुमुखाश्चातका वा भजन्ते ।
पौरस्त्यो वा सुखयति मरुत्साधुसंवाहनाभि-
र्विष्वग्विभ्रत्सुरपतिधनुर्लक्ष्म लक्ष्मीं तनोति ।।

( मा. मा., ९, २५ )

( हे मित्रा, तुझी ही प्रियसहचरी विद्युत् तुला आलिंगन देत आहेना ? प्रेमाने प्रसन्न झालेले चातक तुझ्याकडे येत आहेत ना ? पूर्व दिशेकडून येणारा वारा तुझे अंग मर्दन करून तुला आनन्द देतो ना ? आणि सर्वत्र सुंदर दिसणारे इन्द्रधनुष्य तुझे लक्षण होत आहे ना ? ) यातील काही कल्पना व शब्दप्रयोग कालिदासाच्या ग्रंथातून घुचल्याचे मागे पहिल्या प्रकरणात दाखविले आहे.

मेघाने गर्जना करून आपणास उत्तर दिले असे वाटून माधव त्यास खालील प्रार्थना करतो —

दैवात्पश्येर्जगति विचरन्निच्छया मत्प्रियां चे-
दाश्वास्यादौ तदनु कथयेर्माधवीयामवस्थाम् ।
आशातन्तुं न च कथयतात्यन्तमुच्छेदनीयः
प्राणत्राणं कथमपि करोत्यायताक्ष्याः स एकः ॥

( मा. मा., ९, २६ )

( या जगात स्वैर हिंडत असता सुदैवाने तुला माझी प्रिया दिसल्यास तिला प्रथम धीर देऊन नंतर माझी अवस्था वर्णन कर. तसे करताना तिचा आशातन्तु पूर्णपणे तोडू नको; कारण तोच एक त्या सुंदरीच्या प्राणाचे रक्षण करीत असेल. )

यातील कल्पनाही कालिदासाच्या ' मेघदूता 'वरून ( श्लो. १०, ९८ इ. ) सुचली असावी. पुढे माधवाला आपली प्रिया त्या वनातील लता, वृक्ष, पशु वगैरेंनी मारून तिच्या अंगचे गुण लुटले असावे, असा भ्रम होतो. तो म्हणतो—

नवेषु लोध्रप्रसवेषु कान्ति-
र्दृशः कुरङ्गेषु गतं गजेषु ।
लतासु नम्रत्वमिति प्रमथ्य
व्यक्तं विभक्ता विपिने प्रिया मे ॥ ( मा. मा., ९, २७ )

( या अरण्यात तिला मारून तिची कांति नव्या लोध्र पुष्पांनी, डोळे हरिणांनी, गति हत्तींनी आणि नम्रता लतांनी घेतली हे स्पष्ट दिसते. )

हीच कल्पना जरा निराळ्या प्रकाराने 'श्यामास्वङ्गं चकितहरिणीप्रेक्षणे दृष्टिपातम्' इत्यादि ' मेघदूता 'तील श्लोकात ( क्र. १०१ ) आली आहे.

नंतर माधव पशुपक्ष्यांना मालतीची वार्ता विचारीत हिंडतो. पण कोणीही त्याच्याकडे लक्ष देत नाही. कारण—

केकाभिर्नीलकण्ठस्तिरयति वचनं ताण्डवादुच्छिखण्डः
कान्तामन्तःप्रमोदादभिसरति मदभ्रान्ततारश्चकोरः ।

गोलाङ्गूलः कपोलं छुरयति रजसा कौसुमेन प्रियायाः
कं याचे यत्र तत्र ध्रुवमनवसरग्रस्त एवाभिभावः ॥

(मा. मा., ९, ३०)

( हा मोर आपला तुरा वर करुन नाचत असता आपल्या केकानी माझे शब्द बुडवून टाकतो. हा चकोर मदमत्त अवस्थेत डोळे फिरवीत आनंदाने आपल्या प्रियेकडे जात आहे. हा वानर आपल्या प्रियेच्या गालाला पुष्पांचा पराग लावत आहे. मी कोणाला प्रार्थना करू ? खरोखर याचकाची प्रार्थना ऐकण्याला कोणालाच फुरसत नाही ! )

पुढे होतो तो एक हत्ती आपल्या प्रियेचा अनुनय करताना त्याला दिसतो. त्याचे वर्णन त्याच शब्दात 'उत्तररामचरिता'त ( ३, १६ ) आले आहे. तेथे ते जास्त योग्य वाटते.

माधवाची ही उन्मादावस्था पाहून मकरन्दालाही दारुण दुःख होते. तो त्याला मिठी मारुन म्हणतो—'आता एक मुहूर्तभरही मकरन्द जिवत राहू इच्छित नाही. कारण—

आ जन्मनः सह निवासितया मयैव
मातुः पयोधरपयोऽपि सम निपीय ।
त्वं पुण्डरीकमुख बन्धुतया निरस्त-
मेको निवापसलिलं पिबसीत्ययुक्तम् ॥

(मा. मा., ९, ४०)

( हे पुण्डरीकसदृश मुखाच्या[१] माधवा, जन्मापासून तुझ्या बरोबर मी असल्यामुळे तू आपल्या मातेचे दूध माझ्या बरोबर प्याला आहेस. तेव्हा आता आपल्या बान्धवानी दिलेली तिलांजलि तू एकटा पिणार हे अयोग्य आहे. )'

असे म्हणून तो पर्वताच्या कड्यावरुन पाटलावती नदीत उडी घेऊन आत्महत्या करणार इतक्यात सौदामिनी त्याला त्या साहसापासून परावृत्त करते. आपण योगिनी असून मालतीची खूण पटविणारी बकुलमाला आणली आहे असे सांगून ती त्याची खात्री करते. नंतर ती दोघे माधवाकडे जातात. माधव उन्मादावस्थेत वायूला उद्देशून म्हणतो—

विकसत्कदम्बनिकुरम्बपांसुना
सह जीवित घटय मे प्रिया यतः ।

---

१. माधव सावळ्या वर्णाचा होता. त्याच्या मुखाला पुंडरीकाची किंवा श्वेत कमलाची येथे दिलेली उपमा योग्य नाही.

अथवा तदङ्गपरिवासशीतलं
मयि किञ्चिदर्पय भवांस्तु मे गतिः ॥
( मा. मा., ९, ४३ )

( माझ्या प्राणाचे कदम्ब परागाशी मिश्रण करून माझी प्रिया असेल तेथे मला ने. किंवा तिच्या देहाच्या स्पर्शाने शीतल झालेली एखादी वस्तु मला दे. तूच माझा रक्षणकर्ता आहेस. )

' ही वेळ खुणेची वस्तु देण्यास योग्य आहे ' असे म्हणून सौदामिनी त्याच्याकडे बकुलमाला टाकते. ती पाहून त्याला आश्चर्य वाटते व आनंद होतो. तिला उद्देशून तो म्हणतो—

निष्प्रत्यूहाः प्रियसखि यदा दुःसहाः संबभूवु-
र्देहोद्दाहव्यसनगुरवो मन्मथोन्मादवेगाः ।
तस्मिन् काले कुवलयदृशस्त्वत्समाश्लेष एव
प्राणत्राणं प्रगुणमभवन्मत्परिष्वङ्गकल्पः ॥
( मा. मा., ९, ४७ )

( हे प्रिय सखे, जेव्हा देहाचा दाह करणारे मन्मथोन्माद ( मालतीला ) अगदी दुःसह झाले तेव्हा तुझा स्पर्शच माझ्या आलिंगनाप्रमाणे त्या कुवलयनेत्रेचे प्राण रक्षण करण्याचे उत्कृष्ट साधन झाला. )

नंतर सौदामिनी त्याला सांगते की ' कपालकुण्डला मालतीला श्रीपर्वतावर नेऊन ठार मारणार होती. पण मी तिला तसे करू दिले नाही.' नंतर ती म्हणते—

गुरुचर्यातपस्तन्त्रमन्त्रयोगाभियोगजाम् ।
इमामाक्षेपिणीं सिद्धिमातनोमि शिवाय वः ॥
( मा. मा., ९, ५० )

( गुरुची सेवा, तपश्चर्या, तन्त्र, मन्त्र आणि योग यांच्या योगे मला प्राप्त झालेल्या आक्षेपिणी सिद्धीचा मी तुमच्या कल्याणाकरिता उपयोग करते. )

असे म्हणून ती माधवास घेऊन निघून जाते. तेव्हा मकरन्द इतर जनांसह त्या वनात आलेल्या कामन्दकीला तो वृत्तान्त सांगण्याकरिता जातो. ( अंक ९ ).

दहाव्या अंकाच्या आरंभी कामन्दकी, मदयन्तिका आणि लवङ्गिका मालतीबद्दल शोक करताना दिसतात. मालतीचे लहानपणचे रूप आठवून कामन्दकी म्हणते—

अनियतरुदितस्मितं विराज-
त्कतिपयकोमलदन्तकुड्मलाग्रम् ।
वदनकमलकं शिशोः स्मरामि
स्खलदसमञ्जसमुग्धजल्पितं ते ।।
( मा. मा., १०, २ )

( लहानपणचे ते तुझे मुखकमल-केव्हा रडणारे तर केव्हा हसणारे, ज्यामध्ये थोड्याशा कोमल दन्तकळ्यांचे अग्रभाग दिसत असत, आणि जे अडखळत, अर्थहीन आणि गोड बोलत असे ते-मला अद्यापि स्मरते. )

हा श्लोक अगदी याच शब्दात 'उत्तररामचरिता'त ( ४,४ ) सीतेविषयी जनकाच्या शोकात आला आहे. यौवनात आलेल्या किंवा मध्यम वयाच्या मुलींवर गुदरलेल्या आपत्तीचा शोक करताना तिच्या प्रियजनास व नातलगांस तिच्या तत्कालीन स्वरूपाची आठवण व्हावी; पण येथे मालतीच्या तान्हेपणाचे वर्णन आले आहे ते जरा चमत्कारिक वाटते. कालिदासाच्या 'शाकुंतला'त लहानग्या सर्वदमनाला पाहताच दुष्यन्ताला असे विचार सुचावेत हे स्वाभाविक आहे. त्याचा पुढील श्लोक रसिकांस अत्यंत प्रिय झाला आहे—

आलक्ष्यदन्तमुकुलाननिमित्तहासै-
रव्यक्तवर्णरमणीयवचःप्रवृत्तीन् ।
अङ्काश्रयप्रणयिनस्तनयान्वहन्तो
धन्यास्तदङ्गरजसा मलिनीभवन्ति ।। ( शाकुं. ७, १७ )

(काही कारण नसताही हसताना ज्यांचे कळ्यासारखे दात किंचित् दिसत आहेत, ज्यांचे बोबडे बोल चित्ताकर्षक वाटतात, पित्याच्या मांडीवर बसण्यासाठी जे अतिशय उत्सुक असतात, अशा धुळीने माखलेल्या बालकांना घेऊन जे मलिन होतात ते धन्य होत ! )

वरील दोन्ही श्लोकांतील साम्य अगदी स्पष्ट आहे. भवभूतीच्या एकाही नाटकात लहान बालकाचे पात्र नाही. म्हणून त्याने कामन्दकी व जनक यांच्या शोकात अशा बालकाचे वर्णन करणारा श्लोक घातलेला दिसतो.

पुढे मालतीला उद्देशून कामन्दकी म्हणते—'माझ्या कंथेच्या उबेतच तू वाढली.

स्तन्यत्यागात्प्रभृति सुमुखी दन्तपाञ्चालिकेव
क्रीडायोगं तदनु विनयं प्रापिता वर्धिता च ।
लोकश्रेष्ठे गुणवति वरे स्थापिता त्वं मयैव
स्नेहो मातुर्मयि समधिकस्तेन युक्तस्तवापि ।। (मा. मा.,१०, ५)

( स्तनपान सुटल्यापासून तुला मी हस्तिदंताच्या बाहुलीप्रमाणे खेळविले, शिकविले आणि वाढविले. तसेच मीच तुझा विवाह श्रेष्ठ आणि गुणवान् वराशी जुळवून आणला. त्यामुळे साहजिकच तुलाही माझ्याविषयी आपल्या आईपेक्षाही जास्त ममता वाटत असे. )'

लवङ्गिका ही मालतीची अत्यंत जिवाभावाची सखी. तिला शोक अनिवार होऊन ती म्हणते--' भगवती, मी आता या कड्यावरून उडी घेऊन आपल्या जीविताचा अंत करणार. पुढील जन्मात तरी मला माझ्या प्रिय सखीचे दर्शन होईल असा आशीर्वाद द्या. ' त्यावर कामन्दकी उत्तरते–

संगमः कर्मणां भेदाद्यदि न स्यान्न नाम स. ।
प्राणाना तु परित्यागे सन्तापोपशमः फलम् ।।

( मा. मा., १०, ७ )

( प्राणपरित्याग केल्यावर कर्मांच्या भिन्नत्वामुळे आपल्या प्रियजनाची भेट न झाली तर न होवो ! पण तसे केल्याने दुःख थांबते हा फायदा काही कमी नाही. )

नंतर त्या मधुमती नदीच्या पवित्र प्रवाहाने वेष्टिलेल्या पर्वतावरून उडी घेणार तोच अंधकार आणि विद्युत्प्रकाश यांच्या भयंकर मिश्रणाने क्षणभर डोळे दिपवून घात होणारे दृश्य त्यांच्यापुढे उत्पन्न होते; त्यावरून योगेश्वरी सौदामिनी तेथे आल्याचे त्यास समजते. इतक्यात अमात्य भूरिवसु मालतीच्या नाशामुळे शोकाकुल होऊन अग्नीत उडी घेऊन प्राण देण्याकरिता सुवर्णबिन्दु नामक शिवालयाकडे जात असल्याचे समजते. तोच मालतीने आपल्या पित्याला उद्देशून फोडलेली आर्त किंकाळी दुरून ऐकू येते, आणि लागलीच मूर्छित झालेल्या मालतीला घेऊन आलेला माधव प्रवेश करतो. तो म्हणतो—' ही मालती मोठ्या कष्टाने श्रीपर्वतापासूनचा प्रवास करून येथे आली आणि आता विनाकारण मूर्छित झाली. '

को नाम पाकाभिमुखस्य जन्तो–
र्द्वाराणि दैवस्य पिधातुमीष्टे ।।

( मा. मा., १०, १३ )

( प्राण्याचे दैव आपले फळ देऊ लागले असता त्याला प्रतिबंध करणे कोणास शक्य आहे ? )

इतक्यात सौदामिनीचे पुढील शब्द दुरून ऐकू येतात –' नन्दनासहित राजा पाया पडला तरी अग्निकाष्ठे भक्षण करण्याच्या निश्चयापासून न ढळलेला भूरिवसु माझ्या शब्दांनी आश्चर्यचकित आणि आनन्दित होऊन परत फिरला आहे. '

नंतर सावध झालेल्या मालतीला मिठी मारून आणि तिचे डोके हुंगून कामन्दकी म्हणते–

> जीव जीवितसमाय जीवितं
> देहि जीवतु सुहृज्जनश्च ते ।
> अङ्गकैस्तुहिनसङ्गशीतलैः
> पुत्रि मां प्रियसखीं च जीवय ॥
>
> ( मा. मा., १०, १८ )

[ हे कन्ये, स्वतः जिवंत राहून आपल्या प्राणप्रियाचे जीवित वाचव. तुझा मित्रगणही जिवंत राहू दे. आपल्या हिमाधारख्या शीतल, कोमल अवयवांनी ( मिठी मारून ) मला आणि या तुझ्या ( लवङ्गिका ) प्रिय सखीला जीवन दे. ]

नंतर सौदामिनीने मोठ्या प्रयत्नाने कपालकुण्डलारूप आपत्तीतून आपणास वाचविले असल्याचे माधव व मकरन्द हे कामन्दकीला सांगतात. तितक्यात सौदामिनी येऊन ' ही आपली पुष्कळ दिवसांपूर्वीची शिष्या आपणास प्रणाम करते ' असे म्हणून कामन्दकीच्या पाया पडते. तेव्हा कामन्दकी म्हणते—

> वन्द्या त्वमेव जगतः स्पृहणीयसिद्धि-
> रेवंविधैर्विलसितैरतिबोधिसत्त्वैः ।
> यस्याः पुरा परिचयप्रतिबद्धबीज-
> मुद्भूतभूरिफलशालि विजृम्भितं ते ॥
>
> ( मा. मा., १०, २१ )

( जिला जगाला स्पृहणीय वाटणारी सिद्धि प्राप्त झाली आहे अशी तू बोधिसत्वाच्याही पेक्षा उपकारक अशा या कृत्यांनी वन्द्य झाली आहेस. पूर्वीच्या तुझ्या परिचयाच्या बीजाला ही विपुल फळे आली आहेत. )

नंतर सौदामिनी नन्दनाने आनन्दित होऊन अभिनन्दन केल्यावर राजाने भूरिवसुसमक्ष माधवाला लिहिलेले पत्र देते–

त्यात राजा म्हणतो–

> श्लाघ्यानां गुणिनां धुरि स्थितवति श्रेष्ठान्वये च त्वयि
> प्रत्यस्तव्यसने महीयसि परं प्रीतोऽस्मि जामातरि ।
> तेनेयं मदयन्तिकापि भवतः प्रीत्यै तव प्रेयसे
> मित्राय प्रथमानुरागघटिताप्यस्माभिरुत्सृज्यते ॥
>
> ( मा. मा., १०, २३ )

[ प्रशंसनीय अशा गुणिजनांमध्ये अग्रेसर आणि श्रेष्ठ वंशात जन्मलेला असा तू, आमचा थोर जामात, संकटातून मुक्त झालास याचा आम्हाला आनंद झाला आहे. म्हणून तुझ्या आनंदाकरिता या तुझ्या जिवलग ( मकरन्द ) मित्राला पूर्वीच आपल्या अनुरागाने प्राप्त झालेली मदयन्तिका आम्ही देत आहो. ]

तितक्यात अवलोकिता, बुद्धरक्षिता आणि कलहंस येतात आणि सर्वांसमक्ष विविध प्रकारचे नृत्य करतात.

नंतर सौदामिनी म्हणते, ' अमात्य भूरिवसु आणि देवरात याचा आपल्या अपत्याचा विवाह करण्याचा संकल्प दीर्घकाळाने का होईना पूर्ण झाला हे उत्तम झाले.' हे ऐकून भूरिवसूची आपणाविषयी पूर्वीची वृत्ति माहीत असलेल्या माधव व मकरन्द याला आश्चर्य वाटले. तेव्हा कामन्दकी सांगते की, 'बालकावस्थेत माझ्यासमोर त्यांनी अशी प्रतिज्ञा केली होती, पण राजाला कोप येऊ नये म्हणून भूरिवसूला तसे वागावे लागले.' नंतर कामन्दकीने विचारल्यावरून माधव भरतवाक्यात पुढील मागणे मागतो—

सन्तः सन्तु निरन्तरं सुकृतिनो विध्वस्तपापोदया
राजानः परिपालयन्तु वसुधां धर्मे स्थिताः सर्वदा ।
काले सततवर्षिणो जलमुचः सन्तु क्षितौ पुण्यतो
मोदन्तां घनबन्धुबान्धवसुहृद्गोष्ठीप्रमोदाः प्रजाः ।।

( मा. मा., १०, २५. )

( सज्जन लोक, त्यांचे पाप नष्ट झाल्यामुळे, सदोदित धार्मिक असोत; राजे लोक सर्वदा धर्माप्रमाणे पृथ्वीचे पालन करोत; लोकांच्या पुण्याईने मेघ योग्य काळी पृथ्वीवर संतत जलवृष्टि करोत; आणि सर्व लोक आपले विविध बांधव आणि मित्र यांच्या संगतीच्या निर्भर आनंदात रममाण होवोत ! )

## 'मालतीमाधवा'तील घटनांचा काळ

भवभूतीने मालतीमाधवातील विविध घटना केव्हा घडल्या याविषयी मधून मधून कालाचे उल्लेख घातले आहेत. त्याचा आता साकल्याने विचार करू.

प्रस्तुत नाटकात उल्लेखिलेली पहिली घटना पद्मावतीच्या महिलासमाजाने साजरा *केलेल्या मदनोत्सवात मालती आणि माधव यांची पहिली दृष्टादृष्ट ही होय.* याच उत्सवात वसन्तसेनेने चारुदत्ताला प्रथम पाहिले असल्याचा उल्लेख ' मृच्छकटिका 'त आला आहे. वात्स्यायनाने आपल्या 'कामसूत्रा'त या मदनोत्सवाचा उल्लेख केला आहे. 'कामसूत्रा'चा टीकाकार यशोधर या उत्सवात मदनाच्या मूर्तीचे पूजन केले

जाते अशी माहिती देतो. हा उत्सव कोणत्या महिन्यात होत असे हे त्याने सांगितले नाही. पण इतर ग्रंथांतील उल्लेखावरून तो चैत्र शुक्ल त्रयोदशीस होई असे दिसते.[1] या प्रसंगी नगराच्या बाहेरील उद्यानात मदनाच्या मूर्तीची पूजा होऊन मोठा उत्सव होत असे. या उत्सवात माधवाने मालतीला प्रथम पाहिले. यापूर्वी कित्येक दिवस आपल्या वाड्याच्या वलमीत बसलेली मालती समोरच्या रस्त्याने जाणाऱ्या माधवाला पाहून प्रेमपरवश झाली होती. मदनोत्सवांतील या घटनेनंतर काही तासांनी[2] पहिल्या अंकातील माधव व मकरन्द यांची भेट झाली असावी. तोपर्यंत माधव मालतीविषयक प्रेमाने अत्यंत व्यथित झाला होता. मालतीने मनोविनोदनार्थ माधवाचे चित्र काढलेला फलक कलहंसांच्या हाती पडून तो तो घेऊन त्याच दिवशी मदनोद्यानात जातो. त्यावेळी माधव व मकरन्द तेथे बोलत बसले होते. तेथे माधव त्याच फलकावर मालतीचे चित्र काढून त्याच्या खाली आपल्या मनःस्थितीचे वर्णन करणारा श्लोक लिहितो. त्या सुमारास मध्याह्न झाल्यामुळे नंतर ते दोघे स्वगृही जातात. त्याच दिवशी मकरन्दाकडून मदनोद्यानातील वृत्तान्त कळल्यावर कामन्दकी संध्याकाळी मालतीला भेटावयास जाते आणि बोलण्याच्या ओघात नन्दनाची निंदा करून माधवाच्या कुलाचे आणि गुणाचे सविस्तर वर्णन करते आणि मालतीच्या मनातील तद्विषयक प्रेम वृद्धिंगत करते. ( अंक २ ). यानंतर काही दिवस गेल्यावर कृष्ण चतुर्दशीस घडलेल्या घटना तिसऱ्या आणि चौथ्या अंकात वर्णिल्या आहेत. ही कृष्ण चतुर्दशी कोणत्या महिन्याची याचा निर्देश प्रस्तुत नाटकात नाही. पण ती बहुधा वैशाखातील असावी. त्या तिथीला शंकरपुरातील भगवान् शंकराच्या देवळात पद्मावतीचे लोक दर्शन घेण्याकरिता व पूजा करण्याकरिता जात असत. त्या दिवशीच राजाने नन्दनाकरिता मालतीला मागणी घातली आणि भूरिवसूने ती स्वीकारली असा प्रवाद पसरला होता. शंकरपुरच्या देवळाजवळ मदयन्तिकेवर वाघ हल्ला करणार तोच मकरन्द मध्ये पडून तिला सोडवतो व रक्तस्रावाने मूर्छित होतो. त्याअगोदर कामन्दकी मालती व लवंगिका यासह कुसुमाकरोद्यानात गेली होती आणि तिच्या संदेशानुसार माधवही तेथे पोचला होता. तेथे त्याना नंदनाचा सेवक राजाने नंदनाला मालती दिल्याचे सांगतो. तेव्हा माधव

---

१. 'वात्स्यायन-कामसूत्रा'चे काशी संस्कृत सीरीजमधील आवृत्तीचे संपादक ही तिथि चैत्र शुक्ल चतुर्दशी देतात. पृ. ४९, टिप्पणी ४ पाहा. पण चैत्र शुक्ल त्रयोदशीला 'मदनत्रयोदशी' असे नाव होते.

२. तरीही माधव 'माझा संताप हिमसरोवरात किंवा चांदण्यात नाहीसा होत नाही' असे म्हणतो. न मतापच्छेदो हिमसरसि वा चन्द्रमसि वा ।

( मा. मा. १, ३१ )

निराश होऊन महामासविक्रय करण्याचे ठरवितो. नंतर माधव व मकरन्द पारा व सिन्धु नद्यांच्या संगमावर स्नान करून नगरात प्रवेश करतात. ह्या तिसऱ्या व चौथ्या अंकातील घटना वैशाख कृष्ण चतुर्दशीस घडल्या असे दिसते.

वैशाख अमावस्येस पाचव्या अंकातील घटना—माधवाचे महामास विक्रयाकरिता स्मशानात हिंडणे, अघोरघंटाने मालतीला करालादेवीला अर्पण करणे, माधवाकडून तो मारला जाणे इत्यादि—घडलेल्या दिसतात. भवभूतीने 'मालतीमाधव' उत्तरभारतात पद्मावती येथे लिहिले असे दिसते. तेव्हा त्याने सामान्यतः उत्तरभारतात प्रचलित असलेल्या पूर्णिमान्त मासगणनापद्धतीचा उपयोग केला असावा असे वाटण्याचा संभव आहे. पण पुढे नवव्या व दहाव्या अंकात नूतन मेघदर्शनाचा उल्लेख आला आहे. त्यावरून त्याने विदर्भातील अमान्त मासगणनापद्धतिच अनुसरलेली दिसते. यानंतर सुमारे अठरा एकोणीस दिवसांनी ज्येष्ठ महिन्याच्या कृष्ण पक्षाच्या आरंभी सहाव्या अंकातील घटना घडल्या असाव्या. इतका काळ करालादेवीच्या देवळात घडलेल्या प्रकारानंतर मालतीच्या मनाला स्वस्थता वाटण्याकरिता आवश्यक दिसतो. ज्येष्ठ शुक्ल चतुर्थीस मालतीचा माधवाशी विवाह ठरला होता असे दिसते. त्या दिवशी मालती नगरदेवतेच्या दर्शनाकरिता गेली असता देवळात तिची माधवाशी गाठ पडते आणि तेथून ती दोघे अंधारातून कामन्दकीच्या विहाराजवळच्या उद्यानात विवाहाकरिता निघून जातात. त्या दिवशी रात्री मालतीवेषधारी मकरन्दाचा नन्दनाशी विवाह होतो. उत्तरभारतात विवाहकृत्ये रात्रीच होतात. बाणाच्या 'हर्षचरिता'त राज्यश्रीच्या विवाहाचे तसे वर्णन आहे आणि अद्यापिही उत्तरभारतात तीच पद्धति प्रचलित आहे. असो.

चार दिवस मुरविसुव्या घरी विवाह सोहळा झाल्यावर त्याही मंडळींसह मालती-वेषधारी मकरन्द नन्दनाच्या घरी ज्येष्ठ कृष्ण अष्टमीस येतो. त्या दिवशी प्रदोषसमयी नन्दन व मकरन्द यांची झटापट होऊन नन्दन रागाने निघून जातो. नंतर मालती-वेषधारी मकरन्दाची समजूत घालण्याकरिता मदयन्तिका येते. तिच्या लवङ्गिका व बुद्धरक्षिता ह्यांच्याशी गुजगोष्टी होऊन मदयन्तिका जावयास निघते तो दुसऱ्या प्रहराचा (मध्यरात्रीचा) नगारा वाजतो. तेव्हा मकरन्द आपले अवगुंठन फेकून देऊन प्रकट होतो आणि गाढ अंधकारातून मदयन्तिका वगैरेसह मालती व माधव जेथे होते त्या विहारोद्यानात जाण्यास निघतो. तो दिवस ग्रीष्म ऋतूतील असल्यामुळे मालती व माधव सायंकाळी स्नान करून दीर्घिकेच्या तीरी शिलातलावर बसले होते. (अंक ८).

त्या दिवशी मध्यरात्रीनंतर काही काळाने चंद्रोदय झाला होता. त्यापूर्वी मदय-न्तिकावगैरेंसह जात असता मकरन्दाची नगररक्षकांशी झटापट होते. पुढे तेथे काही

सैनिकही पाठविले जातात. माधवही आपल्या मित्राच्या साहाय्यास धावतो. त्यांचे युद्ध चालले असता चन्द्रोदय होतो. तेव्हा राजा आपल्या प्रासादाच्या गच्चीवरून ते पाहतो. ही परिस्थिति ज्येष्ठ कृष्ण अष्टमीची दिसते. त्या दिवशीच्या मध्यरात्रीच्या अंधकारात कपालकुण्डला मालतीला उचलून घेऊन श्रीपर्वतास जाते. तेव्हा सातव्या व आठव्या अंकातील घटना ज्येष्ठ कृष्ण अष्टमीस घडल्या असाव्या.

नवव्या व दहाव्या अंकातील घटना ज्येष्ठ कृष्ण नवमीस घडल्या असे दिसते. नवमीस मालतीला शोधत शोधत माधव व मकरंद पद्मावतीपासून थोडे दूर असलेल्या अरण्यात जातात. इकडे सौदामिनी मालतीला कपालकुंडलेच्या तावडीतून सोडवून पद्मावतीस आकाशमार्गाने येते तोपर्यंत नवमीचा मध्याह्न झालेला असतो. ( अं. ९, श्लो. ७ ). नंतर ती माधव व मकरंद यांना भेटून आणि माधवाला बकुलमाला दाखवून श्रीपर्वतात आपणाबरोबर घेऊन जाते आणि नंतर पुनः मालती व माधव यास पद्मावतीस पोचवून भूरिवसु, कामन्दकी व इतर मंडळी यास आत्महत्येपासून निवृत्त करते. या घटना बहुधा नवमीस सायंकाळी घडल्या असाव्या. तेव्हा 'मालती-माधवा'त उल्लेखिलेल्या घटनांचा काळ चैत्र शुक्ल त्रयोदशी ते ज्येष्ठ कृष्ण नवमी असा जवळ जवळ अडीच महिन्याचा असावा.

मालती नाहीशी झाल्यावर माधव शोकपरवश होऊन वनातील पशुपक्ष्यांना तिची वार्ता विचारीत हिंडू लागतो, त्यावेळी त्याला एक नवा मेघ दिसल्याचे वर्णन आहे. अर्थात् त्यावेळी वर्षाकाल अगदी जवळ आला होता. कालिदासाच्या काळी वर्षाऋतूचा आरंभ आषाढ शुक्ल प्रतिपदेच्या सुमारास होत असे, असे 'मेघदूता'वरून दिसते.[1] भवभूति त्याच्या नंतर तीन-साडे तीनशे वर्षांनी झाल्याने तसेच अयनचलनामुळे वर्षाकाल थोडा अगोदर ज्येष्ठ कृष्ण नवमीच्या सुमारास होऊ लागला असल्यास आश्चर्य नाही.

## 'मालतीमाधव' हे प्रकरण आहे

संस्कृत नाट्यशास्त्रकारांनी रूपकाचे (नाटकाचे) नाटक, प्रकरण, व्यायोग, भाण, समवकार, वीथी, अंक, प्रहसन, डिम आणि ईहामृग असे दहा प्रकार मानले आहेत. त्यामध्ये नाटक आणि प्रकरण हे मुख्य आहेत. या दोन प्रकारांमध्ये साम्य अनेकविध आहे, पण मुख्य फरक हा की नाटकामध्ये संविधानक राजर्षीच्या किंवा दिव्य कोटीतील नायकाच्या चरित्राविषयी असते, तर प्रकरणात ते कविकल्पित असते.

---

१. 'विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक १९६६' मधील 'मेघदूतातील एक वादग्रस्त पाठ' हा आमचा लेख पहा.

त्यामध्ये एखादा ब्राह्मण, वाणी, सचिव, पुरोहित, अमात्य, सार्थवाह ( व्यापारी ) यासारखा नायक असतो. त्याची नायिका वेश्या किंवा कुलस्त्री असते. त्याचे अंक पाच ते दहा आणि रस विविध असतात. या लक्षणावरून प्रकरण दोन प्रकाराचे असते हे ध्यानात येईल. एका प्रकारात नायिका वेश्या असते. त्याचे उदाहरण शूद्रकाचे ' मृच्छकटिक '. दुसऱ्यात नायिका कुलस्त्री असते. त्याचे उदाहरण प्रस्तुत ' मालती-माधव ' होय. ' नाटक ' प्रकाराचे संविधानक विख्यात असे राजचरित किंवा देवचरित असते. कालिदासाची ' मालविकाग्निमित्र ', ' विक्रमोर्वशीय ' आणि ' शाकुन्तल ', तसेच भवभूतीची ' महावीरचरित 'व ' उत्तररामचरित ' ही नाटकाची उदाहरणे होत. प्रकरणाचे संविधानक सामान्यजनविषयक असते. तेव्हा त्याला social play ( सामाजिक नाटक ) म्हणण्यास हरकत नाही. ते संविधानक कविकल्पित असावे लागते. ' मृच्छकटिका 'चे संविधानक तसे आहे. ' मालतीमाधवा 'त पद्मावतीच्या राजाचा उल्लेख आला असला तरी त्याचे संविधानक राजचरितविषयक नसून मालती व माधव या ब्राह्मण युवक-युवतींच्या चरित्राविषयी आहे. तथापि ते सर्वस्वी कवि-कल्पनामूलक नसून ते रचताना भवभूतीला प्राचीन वाङ्मयाचा थोडाफार आधार लाभला होता असे दिसते.

## संविधानकाचे आधार

संस्कृत वाङ्मयातील दोन आर्ष काव्ये जी रामायण व महाभारत, त्यातील कथावर अनेक नाटके रचली आहेत. या दोन काव्याप्रमाणेच ' बृहत्कथा ' नामक ग्रंथानेही काही संस्कृत नाटकांना कथानके पुरविली आहेत. ही ' बृहत्कथा ' सुप्रतिष्ठित किंवा सुप्रतिष्ठ नगरातील[1] गुणाढ्य नामक कवीने पैशाची या प्राकृत भाषेत रचली होती. या कवीला प्रथम प्रतिष्ठानच्या तत्कालीन सातवाहन राजाचा आश्रय होता, पण पुढे तो राहिला नाही, अशी आख्यायिका आहे. ' बृहत्कथे 'चा काळ निश्चितपणे माहीत नाही तरी ती खिस्ती शकाच्या आरंभापूर्वी रचली असावी असा तर्क आहे. पैशाची प्राकृतात रचलेली ही ' बृहत्कथा ' सध्या उपलब्ध नाही, पण खिस्तोत्तर अकराव्या शतकात काश्मीरी कवि क्षेमेन्द्र आणि सोमदेव यानी केलेली तिची संस्कृत रूपान्तरे अनुक्रमे ' बृहत्कथामंजरी ' आणि ' कथासरित्सागर ' या नावाने प्रसिद्ध आहेत. त्यात काही किरकोळ फरक असले तरी त्याच कथा दिल्या आहेत. त्यातील एका कथेचे भवभूतीला ' मालतीमाधवा 'चे संविधानक रचताना

---

१. सुप्रतिष्ठ हे गुणाढ्याचे जन्मस्थान होते असे दिसते. या नावाच्या विभागाचा उल्लेख वाकाटकाच्या ताम्रपटात येतो. संशोधनमुक्तावलि, सर १, पृ. १२४-१३०.

काही साहाय्य झाले असावे. ' कथासरित्सागरा 'च्या मदिरावती नामक तेराव्या लम्बकात खालील कथा आली आहे—

" कलिंग देशामध्ये शोभावती नामक नगरी आहे. तेथे यशस्कर नावाचा ब्राह्मण आणि मेखला नामक त्याची पत्नी राहत होती. त्यांना एक पुत्र झाला. याचे नाव ' कथासरित्सागरा 'त दिले नाही. पण ' बृहत्कथामंजरी 'त ते सद्‌भाव म्हणून आले आहे. एकदा कलिंग देशात दुर्भिक्ष झाल्यामुळे हे ब्राह्मण कुटुंब विशाला नगरीत राहावयास जाते. तेथ सद्भावाची विजयसेन नामक क्षत्रिय कुमाराशी ओळख होते. विजयसेनाची मदिरावती नामक भगिनी आणि सद्भाव याची दृष्टादृष्ट होऊन त्यांचे एकमेकांवर प्रेम बसते. एकदा मदिरावतीची दाई सद्भावाकडे येऊन मदिरावतीने गुंफलेली मालती ( चमेली ) पुष्पाची माला त्याला देते. तो ती गळ्यात घालत असे. एकदा उज्जयिनीहून आलेल्या क्षत्रिय कुमाराला मदिरावती देऊ करून तिचा बाप लग्नाचा दिवस ठरवतो. तेव्हा निराश होऊन सद्भाव ज्या मार्गाने विवाहापूर्वी मदिरावती कामदेवायतनास जाणार होती त्या मार्गावरच्या वटवृक्षावर चढून आपल्या गळ्यास फास बाधून घेतो. पण तितक्यात दुसरा एक ब्राह्मण कुमार तेथे येऊन त्याचा फास तोडून त्याला वाचवतो. त्याचेही नाव ' कथासरित्सागरा 'त आले नाही, पण ' बृहत्कथामंजरी 'त ते ' कुमारक ' असे दिले आहे. नंतर तो सद्भावाला आपला वृत्तांत सांगतो—' मी एकदा हिंडत असता येथून जवळच असलेल्या शंखपुर नामक नगरातील तळ्याजवळ फुले गोळा करणारी युवती पाहिली. आम्ही दोघे परस्पराकडे आकृष्ट झालो. तितक्यात एक मत्त हत्ती सैरावैरा धावत तेथे येऊन लोकांची दाणादाण करू लागला. त्या गडबडीत माझी प्रेयसी दिसेनाशी झाली. तिच्या शोधार्थ मी फिरत आहे. '

नंतर कुमारकाच्या सूचनेप्रमाणे ते दोघे त्या मदनाच्या देवळात मूर्तीच्या मागे लपून बसतात. मदिरावती तेथे येऊन ' मी एकटीच कामदेवाची प्रार्थना करून इष्ट वर मागणार आहे; तेव्हा तुम्ही बाहेर राहा ' असे सांगून आपल्या परिजनास बाहेर सोडून गाभाऱ्यात जाते आणि तेथे सद्भावाविषयी आपल्या प्रेमाचा उल्लेख करून गळफास लावून घेते. तेव्हा ते दोन ब्राह्मणकुमार पुढे होऊन तिला वाचवतात. नंतर कुमारकाने सुचविल्याप्रमाणे सद्भाव मदिरावतीला घेऊन गाभाऱ्याच्या दुसऱ्या दरवाज्यातून पसार होतो. कुमारक मदिरावतीची वस्त्रे व अलंकार धारण करून तिच्या घरी जातो. तेथे त्याची प्रेयसी येते आणि मदिरावतीशी विस्रंभकथा करण्याकरिता इतरांना बाहेर घालवून दाराला कडी घालते. पुढे कुमारक तेथे मदिरावतीचा वेष घेऊन आला आहे असे समजताच ती त्याला पश्चद्वाराने निसटण्याचे सुचविते.

त्याप्रमाणे ती दोघे तेथून निसटून एका गावात जातात आणि तेथे कुमारक तिचे पाणिग्रहण करतो."

या कथेत आणि 'मालतीमाधवा'च्या संविधानकात बरेच साम्य आहे. दोन्हींत दोन दोन प्रणयकथा जोडल्या आहेत. देवळाच्या गाभाऱ्यात देवाच्या मूर्तीमागे लपून बसून नतर ओळख पटल्यावर एका जोडप्याने पार्श्वद्वाराने पसार होणे, दुसऱ्या जोडप्यापैकी युवकाने स्त्रीचा वेष घेऊन विवाह समारंभास उभे राहणे, ह्या घटना दोन्ही कथात समान आहेत. 'कथासरित्सागरा'तील कथेत प्रियकर आपल्या प्रेयसीने गुंफलेली मालतीमाला गळ्यात घालतो तर मालतीमाधवात प्रेयसी ( मालती ) आपल्या प्रियकराने गुंफलेल्या बकुलमालेला अत्यंत प्रिय मानते. दुसऱ्या जोडप्याच्या जीवनाला कलाटणी देणारा पशु 'कथासरित्सागरा'त मत्त हत्ती आहे तर 'मालतीमाधवा'त तो हिंस्र व्याघ्र आहे, एवढाच फरक. तेव्हा 'मालतीमाधव' रचताना पैशाची 'बृहत्कथे'-तील या कथेने भवभूतीला काही मालमसाला पुरविला असावा.

'मालतीमाधवा'त मालती आणि माधव यांची आणि मकरन्द व मदयन्तिका यांची—अशा दोन प्रणयकथा आहेत. त्यापैकी पहिली आधिकारिक किंवा मुख्य आणि दुसरी पताका किंवा प्रासङ्गिक आहे. या दोन कथांचा सांधा ज्या एका प्रसंगाने जोडला आहे तो म्हणजे मकरन्दाने मालतीचा वेष घेऊन देवळातून घरी जाणे आणि नन्दनाशी विवाह करून घेणे हा होय. ही सर्व युक्ति कामन्दकी या पाताळयंत्री बौद्ध भिक्षुणीची. कालिदासाच्या 'मालविकाग्निमित्रा'त अशीच एक परिव्राजिका नायक-नायिकांच्या प्रेमाची वृद्धि करण्यात गुंतलेली पहिल्या अंकात आढळते, पण पुढे तिचे काही कारस्थान दिसत नाही. 'मालतीमाधवा'तील कामन्दकी मात्र मोठी कारस्थानी व चतुर आहे. ती आरंभापासून या प्रणयकारस्थानात सक्रिय भाग घेते. काही आकस्मिक रीतीने घडून आलेल्या घटनांनी—उदाहरणार्थ, मालतीला बळी देण्याच्या वेळी माधवाने स्मशानात असणे, शंकरपुरात वाघाने मांडलेल्या धुमाकुळातून ऐनवेळी येऊन मकरन्दाने मदयन्तिकेला सोडविणे, या सारख्यांनी तिच्या कारस्थानाला साहाय्य केले आहे. अशा घटनांना भवभूतीने स्वतःच एके ठिकाणी 'काकतालीय' म्हटले आहे.

## संविधानकातील गुणदोष

एकंदरीत 'मालतीमाधवा'चे कथानक बरेच कौशल्याने रचले आहे. त्यातील प्रसंगांची जुळणी चांगली झाली आहे. काही प्रसंग मात्र अस्वाभाविक वाटतात. उदाहरणार्थ, पहिल्या अंकात माधव व मकरन्द बोलत बसले असता माधवाचा सेवक कलहंस तेथे येतो आणि मालतीने माधवाचे चित्र काढलेला फलक त्यास दाखवितो. तेव्हा मकरन्दाच्या सूचनेवरून माधव त्यावर मालतीचे चित्र काढून त्या खाली स्वतः

रचलेला श्लोकही लिहितो. पण असे करण्याकरिता आवश्यक ते वर्तिकादि साहाय्य त्याला कसे मिळाले याचा त्या प्रवेशात उल्लेख नाही. या उलट त्या 'शाकुन्तला'तील सहाव्या अंकात शकुन्तलेचे चित्र पूर्ण करण्याकरिता दुष्यन्त आपल्या दासीला वर्तिका आणण्यास पाठवितो. तेव्हा यासारख्या प्रसंगानी भवभूतीचा संविधानकरचनेत क्वचित् झालेला निष्काळजीपणा व्यक्त होतो.

संविधानकातील दुसरा दोष पाल्हाळाचा. नवव्या अंकातील माधवाच्या शोकाचा पाल्हाळ प्रेक्षकांस कंटाळवाणा वाटतो. संविधानकरचनेविषयी डॉ. रामकृष्णपंत भांडारकर म्हणतात, 'मालतीमाधवाचे संविधानक मौलिक असले तरी त्यातील प्रसंगांच्या जुळणीत आणि शेवटच्या निर्वहणात 'मृच्छकटिका'च्या किंवा 'मुद्राराक्षसा'च्याही कर्त्याने दाखविलेले कौशल्य दिसत नाही. स्मशानातील प्रवेशानंतरच्या नाटकाच्या भागाचा संविधानकाशी घनिष्ठ संबंध नाही. कपालकुण्डलेने मालतीला उचलून नेले तो प्रसंग कवीला विरही नायकाच्या मनःस्थितीचे वर्णन करता यावे म्हणून आणलेला दिसतो. मागील कथानकातून तो स्वाभाविकपणे उद्भूत झालेला दिसत नाही.' प्रस्तुत नाटक आठव्या अंकात राजाने माधव आणि मकरन्द यांच्या शौर्याने प्रसन्न होऊन त्यांना बहुमान केला आणि भूरिवसु आणि नन्दन यांची समजावणी केली, असे दाखवून तेथेच संपविता आले असते.

याप्रमाणे मालतीमाधवाच्या संविधानकात काही दोष असले तरी स्वभावचित्रणात हे नाटक उच्च कोटीचे आहे. यामध्ये माधव आणि मकरन्द ही पुरुषपात्रे आणि कामन्दकी, मालती, मदयन्तिका, लवङ्गिका, बुद्धरक्षिता आणि सौदामिनी ही स्त्रीपात्रे प्रमुख आहेत. त्या सर्वांचे स्वभावचित्रण भवभूतीने मोठ्या कौशल्याने केले आहे.

## पात्रांचे स्वभावचित्रण

माधव हा विदर्भाधिपतीच्या देवरात नामक मन्त्र्याचा मुलगा. तो आन्वीक्षिकी (अध्यात्म) विद्येच्या अध्ययनाकरिता विदर्भातून दूरवर असलेल्या पद्मावती नगरात येतो. तो वर्णाने सावळा (दूर्वाश्यामल), पण रूपाने मदनासारखा सुंदर आहे. मालती म्हणते 'ज्या स्त्रियांनी त्याला पाहिले नाही किंवा पाहूनही ज्यांना आपल्या हृदयावर ताबा ठेवता येतो त्या धन्य होत!' रूपाप्रमाणे तो गुणानेही सुंदर दिसत कलावान् आहे. तो थोड्याच वेळात मालतीचे हुबेहूब चित्र काढून त्या खाली उत्तम स्वरचित संस्कृत श्लोक लिहितो.

राजाने नन्दनाला दिली असे समजल्यावर निराश होऊन तो महामांसविक्रय करून स्मशानातील भूतवेतालाच्या साहाय्याने आपली प्रेयसी मिळविण्याचा प्रयत्न करतो. तो जसा कलावान् तसा शूरही आहे. तो कापालिक अघोरघंटाला यमसदनास पाठवतो. तसेच मकरन्दाला नगररक्षकांशी आणि सैनिकांशी युद्ध करण्यात मदत करून त्याचा धुव्वा उडवतो.

माधवाचे मकरन्दावर सख्या भावाप्रमाणे प्रेम आहे. वाघाच्या तावडीतून मदयन्तिकेला सोडविताना घायाळ होऊन मकरन्दाला मूर्छा येते, हे पाहून तोही मूर्छित होतो. मालतीचा वेश घेऊन मकरन्द नन्दनाशी विवाह करण्यास जातो त्या प्रसंगी त्याच्या सुरक्षिततेविषयी त्याला फार काळजी वाटते. कामन्दकीच्या चातुर्यावर त्याचा पूर्ण विश्वास असल्यामुळेच तो त्याच्या त्या साहसाला संमति देतो.

माधव अत्यंत हळव्या मनाचा आहे. मालती नाहिशी झाल्यावर तो दुःखाने वेडा होतो आणि वनातील पशु, पक्षी आणि सृष्टीतील वायु, मेघ इत्यादिकांना तिची वार्ता विचारीत हिंडतो. माधवाच्या रूपाने भवभूतीने एका मध्यमवर्गीय सुरूप, विद्वान्, कलानिपुण आणि प्रेमळ युवकाचे चित्र काढले आहे.

मकरन्द हा माधवाचा मित्र. त्याची माता लहानपणीच वारल्यामुळे माधवाच्या आईनेच त्याचे पालन पोषण केलेले. त्यामुळे त्याचे माधवावर निरतिशय प्रेम आहे. तो सदैव त्याच्या सहवासात राहून त्याची काळजी वाहतो, त्याला हरएक प्रकारचे साहाय्य करतो, त्याच्याकरिता स्वतःचा जीव धोक्यात घालण्यास तयार होतो. तो मोठा साहसी आणि शूर आहे. पिंजऱ्यातून सुटलेल्या भयंकर अक्राळविक्राळ वाघाला तो एकटा काबूत आणतो. मालतीचा वेष घेऊन आपल्या मित्राकरिता स्वतःचा जीव धोक्यात घालण्याची त्याची तयारी आहे. आपल्या प्रसंगावधानाने व चातुर्याने तो त्या प्रसंगातून सहीसलामत बाहेर पडतो. तसाच तो शूरही आहे. मदयन्तिकेला घेऊन जात असताना मध्ये अडविणाऱ्या नगररक्षकांशी व सैनिकांशी तो एकटा सामना देतो. तो एकटा असला तरी अनेकांना भारी आहे, याची माधवाला खात्री वाटते. ( एकाकिनोऽपि बहुभिरभियोग इति यत्किञ्चिदेतद्वयस्यस्य । अं. ८ ) मालती नाहीशी झाल्यावर माधवाचे दुःख पाहून त्याचे हृदय कळवळून येते आणि तो कड्यावरून उडी टाकून आत्महत्या करण्यास तयार होतो. त्याच्या रूपाने भवभूतीने एका शूर, धाडसी आणि प्रेमळ मित्राचे सुंदर चित्र रंगविले आहे.

भवभूतीने पुरुषापेक्षा स्त्रियांची पात्रे अधिक कुशलतेने वर्णिली आहेत. त्यात कामन्दकी मुख्य आहे. संस्कृतात 'कामन्दकीयनीतिसार' म्हणून अर्थशास्त्रावरील ग्रंथ प्रसिद्ध आहे. त्यावरून भवभूतीला या स्त्रीपात्राचे नाव सुचले असावे. कामन्दकी

लहानपणी देवरात आणि भूरिवसु यांच्यासह एकत्र विद्याभ्यास करीत होती. पुढे तिने बौद्ध धर्म स्वीकारला आणि ती भिक्षुणी झाली. अर्थातच तिला सर्व सांसारिक मोह दूर करावे लागले. तरीही मित्रप्रेमाने ती मालती आणि माधव यांचा वैवाहिक संबंध जुळवून आणण्यास सर्व प्रकारची मदत करते. देवराताने तर यानिषयी तिला सांगून ठेवले होते आणि त्याकरिता आपल्या मुलाला–माधवाला–पद्मावतीस पाठविले होते. भूरिवसुही याला आतून अनुकूल होता. त्याच्या घरी तिचे जाणे येणे असल्यामुळे मालतीला तिने लहानपणापासून अंगाखांद्यावर हस्तीदंताच्या बाहुलीप्रमाणे खेळवले होते. त्यामुळे तिला तिचा स्नेहाही लागला होता. तेव्हा हर प्रयत्नाने हा संबंध जुळवून आणावयाचा तिने निश्चय केला. या कामगिरीला आवश्यक ते सर्व गुण–शास्त्रपांडित्य, चातुर्य, धीटपणा, वाक्कौशल्य, समयसूचकता आणि प्रतिभा हे–तिच्या अंगी होते ( मा. मा. ३, ११ ). तिने आपली शिष्या अवलोकिता हिला आपल्या साहाय्यार्थ घेतले होते. ती कामन्दकीच्या सूचनेप्रमाणे माधव व मकरन्द यांना सांगून त्यांच्याकडून त्या त्या गोष्टी करवून घेत असे. माधवाचा प्रिय मित्र मकरन्द याचा विवाह मदयन्तिकेशी व्हावा म्हणूनही कामन्दकी खटपट करते. तिने आपली मैत्रीण बुद्धरक्षिता हिच्याकडून मकरन्दाचे गुणवर्णन करून मदयन्तिकेच्या मनात तद्विषयक अनुरागाचे बीजारोपण केले होते. स्वतः मालतीला भेटून ती तिच्या मनात वृद्ध व कुरूप नन्दनाविषयी तिरस्कार आणि आपल्या लोभी पित्याच्या हेतूविषयी संशय उत्पन्न करते. तसेच माधवाच्या कुलाविषयी आणि गुणाविषयी सविस्तर माहिती देऊन मालतीच्या मनातील तद्विषयक प्रेमाला वृद्धिगत करते. गांधर्वविवाहाची प्राचीन उदाहरणे सांगून मालतीनेही तसेच करावे असे सुचविते. नंतर मालती आणि माधव यांची भेटही घडवून आणते. मध्यंतरी मालती अदृश्य झाली, तेव्हा कराल-कुण्डलेने तिला कराला देवीपुढे बळी देण्याकरिता नेले असावे असे अनुमान करून ती भूरिवसूच्या लोकांकडून त्या देवळाला गराडा घालविते.

मालती सापडली तरी तिचा नन्दनाशी ठरलेला विवाह रद्द नाही असे पाहिल्यावर ती माधव व मकरन्द यांना आपल्या विश्वासात घेऊन त्यांना नगरदेवतेच्या गर्भगृहात लपून राहाण्यास सांगते. विवाहापूर्वी देवळात जाऊन वधूने देवीचे दर्शन घेण्याची आवश्यकता पटवून नन्दनाकडून आलेली वधूची वस्त्रे व आभरणे तेथे पाठविण्याची तजवीज करते. शेवटी आपल्या समक्ष माधवमालतीचे पाणिग्रहण करवून त्यांना वैवाहिक जीवनविषयक बहुमोल उपदेश करते आणि तेथून त्यांना आपल्या विहारात पाठवून तेथे अगोदरच तयार ठेवलेल्या सामग्रीने त्यांचा विवाह यथाविधि घडवून आणते.

मकरन्दाने मालतीचा वेश घेऊन विवाहवेदीवर उभे राहण्यातील धोका माधवाने व्यक्त करताच ती त्याला सांगते, 'तू काळजी करू नको. ते मी पाहून घेईन.' भूरिवसूच्या घरी चार दिवसांच्या विवाहसमारंभात मकरन्दाचे बिंग कसे फुटले नाही हे भवभूतीने सांगितले नाही; पण ते चार दिवस कामन्दकी मुद्दाम तेथे राहिली होती. नंतर वरपक्षाची मंडळी आपल्या घरी गेली तेव्हाच कामन्दकी नन्दनाला धाडून आपल्या विहाराकडे गेली, असे भवभूतीने दाखविले आहे. तेव्हा याही प्रसंगी कामन्दकीचे बहुमोल साहाय्य झाले असावे असे मानण्यास हरकत नाही.

माधव आणि मालती तसेच मकरन्द आणि मदयन्तिका यांचा संयोग घडून आल्यानंतर मात्र कारस्थानाची सूत्रे तिच्या हातातून निसटतात. मकरन्द मदयन्तिका, लवङ्गिका वगैरेंसह नन्दनाच्या वाड्यातून अंधारात गुप्तपणे जाताना नगररक्षकाकडून अडविला जाईल याची तिला कल्पना नसावी. तसेच माधव व मकरन्द यांनी नन्दनाला फसविलेले राजाला कळल्यावर त्याची भूरिवसूवर मर्जी खप्पा होईल, त्यावर काय उपाय योजावयाचे तिने ठरविले होते याचाही मागमूस नाटकात लागत नाही. यासंबंधी डॉ. बेलवलकरांचे पुढील विधान मान्य होण्यासारखे आहे—'समुद्रात तारू लोटून दिले आहे. आपण शक्य ती सावधगिरी ठेवलीच आहे; प्रयत्नही अदळ आहे; आज जरी पैलतीर दिसत नाही तरी काही तरी होईल आणि आपण इच्छित स्थल गाठू, अशा प्रकारच्या आशावादाची कामन्दकीच्या कारस्थानात झाक मारते व त्याच्यामुळे तिच्या सूत्रधारित्वाला थोडासा कमीपणा येतो.'

मालती दुसऱ्यांदा नाहीशी झाल्यावर मात्र कामन्दकी हतबुद्ध होते. तिला लहानपणापासूनच्या गोष्टी आठवून पराकाष्ठेचा शोक होतो. 'पुढल्या जन्मात तरी मला माझी प्रियसखी दिसेल असा आशीर्वाद द्यावा' म्हणून लवङ्गिका तिला विनविते, तेव्हा ती म्हणते, 'आमच्यापैकी प्रत्येकाची कर्मे भिन्न भिन्न असल्यामुळे आपली मालतीशी भेट होईल की नाही हे माहीत नाही; पण प्राणत्याग केल्याने सध्याच्या दुःखाची शांति होईल हा लाभ काही लहान नाही.' असे म्हणून ती कड्यावरून उडी घेण्यास तयार होते. पण तितक्यात तिची आद्य शिष्या सौदामिनी तेथे आल्याने तो प्रसंग टळतो.

कामन्दकीच्या रूपाने भवभूतीने एका चतुर, कारस्थानी, पण परोपकारी आणि प्रेमळ संन्यासिनीचे सुंदर चित्र रेखाटले आहे.

मालती आणि मदयन्तिका या दोघीही अनुक्रमे मुख्य आणि गौण कथानकाच्या नायिका होत. पण भवभूतीने त्यांचा स्वभाव भिन्न दाखविला आहे. मालती ही अत्यंत शालीन अशी कुलीन कन्यका आहे. माधवाला आपल्या वाड्याच्या समोरच्या रस्त्याने

जाताना पाहून पाहून तिच्या मनात त्याच्याविषयी अनुराग उत्पन्न होतो. तो कालान्तराने वाढत जातो आणि तिची अवस्था अनुकंपनीय करतो. पण ती आपला मनोविकार कह्यात ठेवण्याचा प्रयत्न करते आणि आतल्या आत झुरते. माधवाने गुंफलेली बकुलमाला आणि त्याने काढलेले स्वतःचे चित्र यावर ती कसेतरी आपले मनोविनोदन करते. तिची प्रियसखी लवङ्गिका जेव्हा तिला स्वतः होऊन वल्लभसमागम करावा असे सुचविते, तेव्हा ती म्हणते, ' मदन माझा प्राण घेतो, पण माझे थोर बाबा, उज्ज्वल कुलातील आई आणि माझे निष्कलंक कुल यांना दोष लागेल असे मी काही करणार नाही. त्याच्यापुढे मला माझ्या प्रियकराची किंवा प्राणाचीही किंमत नाही. ' कामन्दकीच्या भाषणावरून तिला आपल्या पित्याच्या हेतूविषयी संशय वाटतो. ती त्याला एकदा ' कापालिक 'ही म्हणते (अंक ४,). पण तिचे पितृप्रेम कमी होत नाही. नगरदेवतेच्या देवालयाच्या गाभाऱ्यात जेव्हा लवङ्गिका तिला माधवाला आपले पाणिग्रहण करू देण्याविषयी सुचविते तेव्हा ती म्हणते—' हा धिक्, कन्यकाजनविरुद्धं किमप्युपन्यस्यति । ' ( धिक्कार असो ! ही लवङ्गिका अविवाहित कन्येने न करण्यासारखे काही सुचवीत आहे. )

मालतीचे माधवावर गाढ प्रेम आहे. आपणाकरिता माधवाला स्मशानात हिंडून महामांसविक्रयासारखी कृत्ये करावी लागतात याचा तिला विषाद वाटतो. अघोरघंटासारख्या साहसिकाशी लढताना आपण फार काळजी घ्यावी, असे ती त्याला विनविते. नगरदेवीच्या गाभाऱ्यात ती लवंगिकेला म्हणते, ' मी आता आपल्या जिवाचे बरेवाईट करून घेणार आहे. पण त्यायोगे माझे प्रियकर माधव आपले लोकव्यवहार शिथिल करणार नाहीत असे कर. '

मालतीचे लवङ्गिकेवरही अत्यंत प्रेम आहे. माधवाशी विवाह झाला तरी लवङ्गिका जवळ नसल्यामुळे अत्यंत दुःखित होऊन ती त्याच्याशीही नीट बोलत नाही. विवाहानंतरही ती पूर्वीप्रमाणेच अत्यंत शालीन, अबोल आणि आत्मनिग्रही राहिली आहे.

याच्या उलट मदयन्तिकेचा स्वभाव आहे. ती धीट, खेळकर आणि मोकळ्या स्वभावाची आहे. बुद्धरक्षितेने मकरन्दाचे गुणवर्णन करून तिच्या मनात तद्विषयक प्रेमाचे बीज रुजविले होते. मकरन्दाने आपला जीव धोक्यात घालून तिला वाघाच्या जबड्यातून वाचविल्यावर तिचे त्याच्यावरचे प्रेम उत्कट होऊन ती कल्पनेने त्याचे समागमसुख अनुभवू लागली होती. मालतीने नन्दनाला झिडकारल्याचे समजताच बन्धुप्रेमामुळे तिला साहजिकपणे मालतीचा राग येतो. पण नन्दनाने मालतीला अपशब्द बोलले असे समजताच ती म्हणते, ' काय हा प्रमाद ! लवङ्गिके मी आता तुला तोंड कशी दाखवू ? ' तथापि आपल्या भावाचा मालतीविषयी वाग

समज कसा झाला असावा हेही ती आडपडदा न ठेवता सांगते. पण त्या प्रसंगाने मकरन्दाने आपणास वाचविल्याचे स्मरण होऊन तिचे अंग पुलकित होते आणि तिला मालतीच्या मनोव्यथेची कल्पना येते. नंतर जेव्हा लवङ्गिका तिला विचारते, ' समज, जर मकरन्द येथे येऊन कृष्णाने पूर्वी रुक्मिणीचे बलात्काराने हरण केले तसे तुझे करू लागला तर तुला काय वाटेल ? ' तेव्हा ती मालतीसारखी आपल्या नातलगाच्या संमतीची अट न घालता त्याला आपली संमति सूचित करते.

मकरन्दाशी तिचा संयोग होतो तोच तिच्यावर अनेक आपत्ति येतात. नगररक्षक मकरन्दाला अडवतात आणि त्याच्याशी झगडा करतात. त्यातून मकरन्द सुटतो तों मालती नाहीशी होते. मदयन्तिकेचे मालतीवर समानशीलत्वाने प्रेम जडते. ती तिच्या वियोगाने व्याकुळ होते आणि प्राणत्याग करण्यासही तयार होते.

लवङ्गिका ही मालतीची जीवश्च कण्ठश्च मैत्रीण. ती तिच्या दाईची मुलगी. भवभूतीच्या काळी वेश्यांना थोरामोठ्यांच्या कुटुंबात प्रवेश मिळत असल्याने माधवाने तिला वारयोषित् म्हटले आहे ( अ. १ ). ती बोलण्यात मोठी चतुर आहे. मालतीला माधव हाच योग्य पति अशी खात्री झाल्याने ती कामन्दकीला तिच्या कारस्थानात हरप्रकारची मदत करते. मालतीवेषधारी मकरन्दाबरोबर सदैव राहून त्याला त्याच्या गौप्यस्फोटातून वाचवते. मालती अत्यंत शालीन असल्यामुळे माधवाच्या प्रेमाविषयी विचारलेल्या प्रश्नांना ती स्वतःच तिच्या तर्फे उत्तर देते. तिचेही मालतीवर निःसीम प्रेम आहे. मालती एकदम नाहीशी झालेली पाहून ती दुःखावेगाने प्राणत्याग करण्यास तयार होते.

कामन्दकीची शिष्या अवलोकिता आणि तिची मैत्रीण बुद्धरक्षिता याचेही स्वभाव-रेखन भवभूतीने मोठ्या कुशलतेने केले आहे. ह्या दोन्ही कामन्दकीच्या कारस्थानात विविध प्रकारे मदत करतात. ह्या बोलण्यात मोठ्या चतुर आहेत. माधव अवलोकितेच्या भाषणाची मुक्तकंठाने स्तुति करतो. नंदनाच्या वाड्यात मदयन्तिका मालतीला हटवादीपणाबद्दल दोष देते तेव्हा बुद्धरक्षिता वरकरणी तटस्थपणाचा आव आणून दोघांचेही दोष दाखविते. ' मालतीने आपल्या पतीला लज्जादोषाने झिडकारले खरे, पण नंदन तिला लागेल असे बोलला तेही अयोग्य ' असे ती म्हणते. या दोघींच्यामुळे कथानकाला नाट्याचा रंग चढला आहे.

सौदामिनी ही कामन्दकीची आद्य शिष्या. पुढे तिने बौद्धधर्म सोडून योगमार्ग स्वीकारला, आणि गुरुसेवा, तपश्चर्या, तंत्र, मंत्रसाधना इत्यादिकांच्या साहाय्याने आश्चर्यकारक आक्षेपिणी सिद्धि प्राप्त करून घेतली. ती योगेश्वरी झाली आहे. कपाल-

# प्रकरण सातवे

# उत्तररामचरित

**उत्तरे रामचरिते भवभूतिर्विशिष्यते ।**

—सुभाषित

उत्तररामचरिताची नान्दी पूर्वीच्या नाटकाच्या नान्दीहून भिन्न प्रकारची आहे. तीत परब्रह्माचे किंवा कोणा देवतेचे स्तवन नसून परमेश्वराची अमृतकलाच अशी दैवी वाक् आपणास प्राप्त व्हावी अशी कवीने पूर्वसूरींना प्रार्थना केली आहे.

**इदं कविभ्यः पूर्वेभ्यो नमोवाकं प्रशास्महे ।**
**विन्देम देवतां वाचममृतामात्मनः कलाम् ।।**

(उ. च. १, १)

नंतर सूत्रधार म्हणतो, 'भगवान् कालप्रियनाथाच्या या यात्रेच्या प्रसंगी जमलेल्या सज्जनांना मी सविनय निवेदन करतो की काश्यपगोत्री श्रीकण्ठपदवीने विभूषित असा जातूकर्णीपुत्र पदवाक्यप्रमाणज्ञ भवभूति याच्या उत्तररामचरित नाटकाचा प्रयोग आम्ही आज करणार आहो.' हे नाटक लिहिण्याच्या वेळी भवभूतीची चांगली प्रसिद्धि झाली असल्यामुळे पूर्वीच्या नाटकांवल्याप्रमाणे आपल्या कुलाविषयी सविस्तर माहिती देणे त्याला आवश्यक वाटले नसावे.

नंतर सूत्रधाराच्या आणि एका नटाच्या संभाषणावरून आपणास समजते की रामचंद्राच्या अभिषेकसमारंभाकरिता आलेले लंकेच्या युद्धातील साहाय्यक वानर व राक्षस, तसेच अनेक देशातील ब्रह्मर्षि आणि राजर्षि हे समारंभ संपल्यानंतर परत

गेले आहेत, तसेच दशरथकन्या शान्ता हिचा पति ऋष्यशृंग ऋषि याने बारा वर्षे चालणारे सत्र आरंभिले असल्यामुळे त्याला उपस्थित राहण्याकरिता कौसल्यादि राजमाता आणि अरुधती यासह वसिष्ठ ऋषि त्याच्या आश्रमास गेले आहेत. सीतेची प्रसूति जवळ आली असल्यामुळे तिला मात्र त्यांनी आपल्या बरोबर नेले नाही. रामचन्द्राच्या अभिनन्दनार्थ आलेला जनक राजा अभिषेकसमारंभ संपेपर्यंत अयोध्येत राहिला होता तोही आज आपल्या विदेहदेशास परत गेला आहे. त्याच्या वियोगामुळे खिन्न झालेल्या सीतेचे सान्त्वन करण्याकरिता राजकार्य आटोपल्याबरोबर राम अन्तःपुरात गेला आहे. याच प्रस्तावनेवरून आपणास कळते की अयोध्येतील काही लोक रावणाच्या घरी राहिलेल्या सीतेच्या चारित्र्याविषयी साशंक आहेत; कारण सीतेने लंकेत केलेल्या अग्निशुद्धीवर त्यांचा विश्वास नाही.

या प्रस्तावनेत भवभूतीने आपल्या टीकाकारासही कोपरखळी मारली आहे. सूत्रधार म्हणतो—

सर्वथा व्यवहर्तव्यं कुतो ह्यवचनीयता ।
यथा स्त्रीणां तथा वाचां साधुत्वे दुर्जनो जनः ।।

( उ. च., १, ५ )

( काही झाले तरी कामकाज केलेच पाहिजे. दोष काढले जाणारच नाहीत याचा काय भरवसा ? स्त्रियांच्या तसे वाणीच्याही शुद्धतेविषयी लोक नेहमी दुःशित असतात.)

या श्लोकाचा उद्देश पुढील मुख्य प्रवेशातील जनप्रवाद सूचित करण्याचा आहे. पण त्याचबरोबर आपल्या टीकाकारांना त्यांच्या अकारण कुत्सितपणाबद्दल भवभूतीने टोमणा मारलेला दिसतो.

मुख्य प्रवेशात राम जनकाच्या स्वदेशी परत जाण्यामुळे खिन्न झालेल्या सीतेचे सांत्वन करतो. इतक्यात कञ्चुकी येऊन म्हणतो 'रामभद्रा–', पण तितक्यात रामाला आता पूर्वीप्रमाणे संबोधणे योग्य होणार नाही अशी जाणीव होऊन तो 'महाराज !' असे संबोधून आपली चूक दुरुस्त करतो. तेव्हा राम म्हणतो, "माझ्या वडिलांच्या परिजनांनी मला 'रामभद्र' असेच संबोधणे योग्य आहे. तेव्हा तुम्हाला सवय आहे त्याप्रमाणेच मला संबोधित जावे." या प्रसंगाने कवीने रामाचा निरभिमानी स्वभाव कुशलतेने सूचित केला आहे. नंतर ऋष्यशृंगाच्या आश्रमातून आलेला अष्टावक्र सीतेला 'तू वीरमाता हो' असा वसिष्ठ ऋषींचा आशीर्वाद कळवतो. तेव्हा राम म्हणतो–

लौकिकानां हि साधूनामर्थं वागनुवर्तते ।
ऋषीणां पुनराद्यानां वाचमर्थोऽनुधावति ।।

( उ. च., १, १० )

( सामान्य साधु अर्थाला उद्देशून शब्दाचा उपयोग करतात. पण वसिष्ठांसारख्या श्रेष्ठ महर्षींच्या शब्दामागे अर्थ धावत येतो. अर्थात् ते जे बोलतात ते खरे होते. )

नंतर अष्टावक्र रामाला अरुन्धती, राजमाता आणि शान्ता यांनी पुनः पुनः सांगितलेला संदेश कळवतो की ' सीतेला जे जे डोहाळे लागतील ते ते तू पुरे करावे. ' तसेच तो वसिष्ठ ऋषींचा पुढील संदेश सांगतो–

जामातृयज्ञेन वयं निरुद्धास्त्वं बाल एवासि नवं च राज्यम् ।
युक्तः प्रजानामनुरञ्जने स्यास्तस्माद्यशो यत्परमं धनं वः ।।
(उ. च., १, ११)

( ' आम्ही येथे ऋष्यशृंग जामात्याच्या यज्ञात गुंतलो आहो. तू अजून लहान आहेस. तू राज्याची सूत्रे नुकतीच हाती घेतली आहेस, तेव्हा प्रजाजनांना संतुष्ट राखण्यात दक्ष राहा. कारण त्यापासून उत्पन्न होणारी कीर्ति हेच तुमचे श्रेष्ठ धन होय. )

तेव्हा राम उत्तर करतो–

स्नेहं दयां च सौख्यं च यदि वा जानकीमपि ।
आराधनाय लोकानां मुञ्चतो नास्ति मे व्यथा ।।
( उ. च., १, १२ )

( प्रेम, दया, सुख यांचा—किंबहुना सीतेचाही—प्रजाजनांस संतुष्ट ठेवण्याकरिता त्याग करावा लागल्यास मला दुःख होणार नाही. ) सीतेलाही हे रामाचे उद्गार आवडतात. ती म्हणते—अतएव राघवकुलधुरंधर आर्यपुत्रः ( म्हणूनच माझ्या आर्यपुत्रांना रघुकुलातील श्रेष्ठ म्हणतात. )

नंतर नातलगांच्या विरहामुळे उदास झालेल्या सीतादेवीच्या मनाची करमणूक करण्याकरिता लक्ष्मण राम व सीता यांस चित्रकाराने भिंतीवर काढलेली रामचरित्रातील लंकेतील सीताशुद्धीपर्यंतची विविध प्रसंगांची चित्रे दाखवितो. त्याच्या भाषणात सीताशुद्धीचा उल्लेख येताच रामाला अत्यंत दुःख होते आणि तो म्हणतो–

कष्टं जनः कुलजनैरनुरञ्जनीय–
स्तन्नो यदुक्तमशिवं न हि तत्क्षमं ते ।
नैसर्गिकी सुरभिणः कुसुमस्य सिद्धा
मूर्ध्नि स्थितिर्न चरणैरवताडनानि ।। (उ. च. १, १४)

( कुलीन जनांना लोकांचे अनुरंजन करावयास लागावे ही मोठी दुःखाची गोष्ट होय. म्हणून तुला त्या वेळी मी जी दुरुत्तरे बोललो ती अनुचित होती. सुगंधि पुष्पाने मस्तकी राहणे हेच स्वाभाविक. त्याला पायदळी तुडविणे योग्य नव्हे. )

विश्वामित्रांनी आपणाला दिलेल्या जृंभकास्त्राचे चित्र पाहताना राम सीतेला म्हणतो— सर्वथेदानीं त्वत्प्रसूतिमुपस्थास्यन्ति । (आता ही अस्त्रे निःसंशय तुझ्या प्रसूतीला लाभतील.)

नंतर लक्ष्मण रामादिकांच्या विवाहप्रसंगाची चित्रे दाखविताना म्हणतो, 'ही आर्या सीता, ही आर्या (भरतपत्नी) माण्डवी आणि ही सूनबाई (शत्रुघ्नपत्नी) श्रुतकीर्ति.' लक्ष्मण आपली पत्नी उर्मिला हिचे चित्र न दाखविताच पुढे गेला असे पाहून सीता त्याला म्हणते, 'भाऊजी, पण ही कोण हो!' त्यावर लक्ष्मण सलज्ज स्मित करतो. येथील विनोद नाजूक रीतीने साधला आहे.

पुढे परशुरामदमनाचे चित्र होते. लक्ष्मण त्या प्रसंगाचा उल्लेख करू लागतो तोंच राम त्याला म्हणतो, 'अरे, अजून पुष्कळ पाहावयाचे आहे. पुढे चल.' रामाचा हा विनय पाहून सीतेला त्याच्याविषयी आस्तव आदर वाटतो. पुढे अयोध्येला आल्यावर दशरथाच्या हयातीतील आपल्या सुखी जीवनाचे वर्णन करताना राम म्हणतो—

जीवत्सु तातपादेषु नवे दारपरिग्रहे ।
मातृभिश्चिन्त्यमानानां ते हि नो दिवसा गताः ॥

(उ. च., १, १९)

(आमचे पूज्य वडील जिवंत होते, आमचा विवाह नुकताच झाला होता, आमच्या मातुःश्री आमची काळजी वाहत होत्या. तेव्हाचे ते आमचे सुखी दिवस गेले ते गेले!) 'ते हि नो दिवसा गताः' हे पूर्वीच्या सुखी जीवनाविषयीचे उद्गार अद्यापि लोकांच्या तोंडून ऐकू येतात.

पुढे लक्ष्मण मंथरेचे चित्र दाखवून कैकेयीच्या वराचा निर्देश करणार तोंच राम त्याला पुढील चित्राकडे नेतो, आणि अशा रीतीने त्या अप्रिय घटनेचा उल्लेख टाळतो. अशा प्रसंगांनी रामाच्या उदात्त स्वभावातील कोमल छटा भवभूतीने सूचित केल्या आहेत. पुढे वनवासाकरिता जाताना राम, लक्ष्मण व सीता यांना गंगा नदी पार करावी लागते, त्या प्रसंगाचे चित्र पाहत असताना राम गंगेला उद्देशून म्हणतो, 'माते भागीरथी, तू या तुझ्या स्नुषेच्या—सीतेच्या—कल्याणाची सदैव काळजी वाहा.' नंतर दण्डकारण्यातील जनस्थान प्रदेशात गोदावरीच्या परिसरात आपण घालविलेल्या काळाचे वर्णन करताना राम म्हणतो—

**किमपि किमपि मन्दं मन्दमासत्तियोगा-**
**दविरलितकपोलं जल्पतोरक्रमेण ।**

अशिथिलपरिरम्भव्यापृतैकैकदोष्णो-
रविदितगतयामा रात्रिरेव व्यरंसीत् ।।
(उ. च., १, २७)

या श्लोकाचा अर्थ, त्यातील 'रात्रिरेव' या पाठाचे औचित्य आणि तद्विषयक आख्यायिका मागे चौथ्या प्रकरणात दिली आहे ती पाहावी.

पुढे शूर्पणखेचे चित्र पाहताच रामाला जनस्थानातील घटनांची आठवण होते. लक्ष्मणही त्या वेळचा रामाचा शोक पुढील प्रमाणे वर्णन करतो—

अथेदं रक्षोभिः कनकहरिणच्छद्मविधिना
तथा वृत्तं पापैर्व्यथयति यथा क्षालितमपि ।
जनस्थाने शून्ये विकलकरणैरार्यचरितै-
रपि ग्रावा रोदित्यपि दलति वज्रस्य हृदयम् ।।
(उ. च., १, २८)

(*नतर त्या नीच राक्षसांनी सुवर्ण हरिणाचे कपट करून असे काही घडवून आणले* की त्याचे क्षालन केले असले तरी ते अद्यापि दुःख देत आहे. त्या निर्जन जनस्थानामध्ये दादाच्या त्या विव्हल आणि करुण अवस्थेने पाषाणालाही शोकाने पाझर फुटला आणि वज्राचेही हृदय विदीर्ण झाले.)

पाषाणालाही शोकाने पाझर फुटला, ही कल्पना रसिकांना फारच हृदयंगम वाटली. तिच्याविषयी एका कवीने म्हटले आहे—

भवभूतेः सम्बन्धाद्भूधरभूरेव भारती भाति ।
एतत्कृतकारुण्ये किमन्यथा रोदिति ग्रावा ।।

(भवभूतीचा संबंध आल्यामुळे सरस्वती ही पर्वताचीच कन्या झाली होती असे वाटते. तसे नसते तर त्याच्या करुणरसाने पाषाणाला कसा पाझर फुटला असता ?)

त्यानंतर लक्ष्मणाने त्यांना जटायुवध, कबन्धाने व्यापलेला दण्डकारण्याचा प्रदेश, मतंग ऋषीचा आश्रम, शबरीची भेट, पम्पासरोवर इत्यादिकांची चित्रे दाखविली. पम्पासरोवराचे वर्णन करताना राम म्हणतो—

एतस्मिन्मदकलमल्लिकाक्षपक्ष-
व्याधूतस्फुरदुरुदण्डपुण्डरीकाः ।
बाष्पाम्भःपरिपतनोद्गमान्तराले
सन्दृष्टाः कुवलयिनो भुवो विभागाः ।।
(उ. च., १, ३१)

( ह्या सरोवरामध्ये निळी चोच आणि पाय असलेल्या मदमत्त मल्लिकाक्ष पक्ष्यांनी ज्यातील विशाल दण्डांची शुभ्र कमळे हलविली जात होती असे प्रदेश डोळ्यातील अश्रु खाली पडल्यावर पुनः ते उत्पन्न होण्याच्या मधल्या अल्प अवधीत नीलकमलांनी युक्त असे भासले. )

हा श्लोक 'मालतीमाधवा'च्या नवव्या अंकातही आला आहे. पण त्यात चौथ्या चरणातील रम्य कल्पना आली नाही. कदाचित् भवभूतीला ती कल्पना ( डोळ्यातील अश्रूंमुळे मल्लिकाक्ष पक्ष्यांच्या निळ्या चोचींनी आणि पायांनी पांढरी कमळे निळी भासणे ही ) मागाहून सुचली असावी.

चित्रे पाहता पाहता सीता थकून जाते. म्हणून लक्ष्मण चित्रे दाखविणे समाप्त करतो. तेव्हा सीता म्हणते, ही 'चित्रे पाहून प्रसन्न आणि दाट अशा वनराजीतून हिंडावे आणि पवित्र, निर्मल आणि शीतल अशा भागीरथीच्या प्रवाहात स्नान करावे अशी मला इच्छा झाली आहे.' सीतेचे डोहाळे लागलीच पुरवावे म्हणून नुकताच गुरुजनांनी रामाला संदेश पाठविला होता. म्हणून राम लक्ष्मणाला रथ सज्ज करून आणण्यास सांगतो. तेव्हा सीता म्हणते 'आपणही मजबरोबर आले पाहिजे.' तेव्हा राम उत्तरतो, 'हे काय सांगावयास पाहिजे?' नंतर सीता रामाच्या बाहूवर टेकून झोपी जाते. तेव्हा राम सीतेच्या प्रेमाची महती वर्णन करताना म्हणतो--

अद्वैतं सुखदुःखयोरनुगुणं सर्वास्ववस्थासु य-
द्विश्रामो हृदयस्य यत्र जरसा यस्मिन्नहार्यो रसः ।
कालेनावरणात्ययात्परिणते यत्स्नेहसारे स्थितं
भद्रं तस्य सुमानुषस्य कथमप्येकं हि तत्प्राप्यते ॥
( उ. च., १, ३९ )

( सुखामध्ये तसेच दुःखामध्ये जे एकरूप असते, सर्व अवस्थामध्ये जे तसेच अनुकूल राहते; ज्याच्या योगे हृदयाला विश्रांति मिळते; वार्धक्यामुळे ज्याची गोडी कमी होत नाही; कालान्तराने सर्व ( लज्जा, भय इत्यादि ) पडदे नाहीसे झाल्यावर जे पूर्ण स्नेहरूपाने अवशिष्ट राहते--असे ते कल्याणकारक अनुपम प्रेम ज्याला प्राप्त होते तोच खरा भाग्यवान्! )

इतक्यात अन्तःपुरातील सेवक दुर्मुख येऊन रामाच्या कानात सीतेविषयी जनप्रवाद सांगतो. ते ऐकताच वज्राघात झाल्याप्रमाणे रामाला मूर्च्छा येते. शुद्धीवर आल्यावर तो म्हणतो,

सता केनापि कार्येण लोकस्याराधनं व्रतम्
यत्पूरितं हि तातेन मां च प्राणांश्च मुञ्चता ॥ ( उ. च., १, ४१ )

( काही झाले तरी लोकांना संतुष्ट करणे हे सज्जनांचे व्रत होय. माझ्या वडिलांनी माझा आणि त्याचबरोबर आपल्या प्राणाचाही त्याग करून त्या व्रताचे पालन केले होते. )

नंतर तो दुर्मुखाला म्हणतो, 'जा, लक्ष्मणाला सांग. हा नुकताच गादीवर आलेला राजा राम तुला ही आज्ञा करीत आहे.' असे म्हणून दुर्मुखाच्या कानात आपली आज्ञा सांगतो.

ते ऐकून दुर्मुखालाही दुःख होते. तो म्हणतो, 'अग्नीमध्ये शुद्ध झालेल्या आणि गरोदर असलेल्या देवीला दुर्जनांच्या वचनावरून महाराज टाकतात हे काय?' त्यावर राम उत्तर करतो, 'लोकांना दुर्जन म्हणू नको—

इक्ष्वाकुवंशोऽभिमतः प्रजानां जातं च दैवाद्वचनीयबीजम् ।
यच्चाद्भुतं कर्म विशुद्धिकाले प्रत्येतु कस्तद्यदि दूरवृत्तम् ।।
( उ. च., १, ४४ )

( इक्ष्वाकुवंश हा प्रजेला अत्यंत प्रिय आहे. माझ्या दुर्दैवाने आता त्याच्यावरील लोकप्रवादास कारण उत्पन्न झाले आहे. अग्निशुद्धीच्या वेळी जी अद्भुत गोष्ट घडून आली तिच्यावर येथील लोकांचा विश्वास कसा बसावा? कारण ती फार दूरच्या प्रदेशात घडली होती. )

दुर्मुख निघून गेल्यावर राम स्वतःशी म्हणतो—मी अत्यंत दुष्ट कृत्य करीत आहे. कारण,

शैशवात्प्रभृति पोषितां प्रियैः
सौहृदादपृथगाश्रयामिमाम् ।
छद्मना परिददामि मृत्यवे
सौनिको गृहशकुन्तिकामिव ।। ( उ. च., १, ४५ )

( जिचे बाल्यापासून मी प्रिय वस्तूंनी लालनपालन केले, जी प्रेमामुळे माझ्यापासून कधीही दूर राहिली नाही अशा हिला, एखाद्या खाटिकाने घरी पाळलेल्या मैनेची मान मुरगाळावी त्याप्रमाणे, मी कपटाने मृत्यूच्या स्वाधीन करीत आहे! )

नंतर निद्रित सीतेचे डोके खाली ठेवून राम म्हणतो, 'आजपासून हा रामाला जगण्याचे प्रयोजन राहिले नाही. आता हा संसार असार झाला आहे. अथवा,

दुःखसंवेदनायैव रामे चैतन्यमाहितम् ।
मर्मोपघातिभिः प्राणैर्वज्रकीलायितं हृदि ।। '
( उ. च., १, ४७ )

( सदैव दुःख सहन करण्याकरिताच हा राम जन्माला आला आहे. मर्मावर आघात करणारा हा माझा प्राण जाता जात नाही. तो वज्राच्या खिळ्याप्रमाणे हृदयात घट्ट रुतून बसला आहे. )

रामाचे हे उद्गार प्रेक्षकाच्या हृदयाला पीळ पाडतात. रामाने चौदा वर्षे वनवासात काढली, अनेक हालअपेष्टा सहन केल्या, प्रिय पत्नीच्या वियोगामुळे दीर्घकाल दुःख सहन केले आणि बलाढ्य शत्रूशी लढून त्याला ठार केले. नंतर कोठे सुखाचे दिवस यावयाचे. तेव्हाच हा पत्नीवियोगाचा दुसरा दुर्धर प्रसंग ओढवला. त्यामुळे आपले आयुष्य हे सदैव दुःख भोगण्याकरिताच आहे असे त्यास वाटावे हे अत्यंत साहजिक आहे. रामाच्या या आर्त उद्गारात कारुण्याची परमावधि झाली आहे.

नंतर सीतेच्या पायाला नमस्कार करून राम म्हणतो, 'देवी, तुझ्या पदकमलाना रामाच्या मस्तकाचा हा शेवटचा स्पर्श.'

इतक्यात 'रामा, लवणासुराने पीडा दिलेला यमुनातीरस्थ ऋषींचा समुदाय तुला शरण आला आहे,' अशी पडद्यातून ऋषींची आर्त हाक ऐकू येते. तेव्हा राम त्याच्या उच्छेदाकरिता शत्रुघ्नाला पाठविण्यासाठी जातो. जाताना तो पृथ्वीदेवीला आपल्या सुशील कन्येवर—सीतेवर—कृपादृष्टि ठेवण्याची विनंती करतो.

नंतर सीता जागी होते. राम आपणाला एकटीच टाकून गेल्याबद्दल तिला वाईट वाटते. ती म्हणते, 'आता ते भेटल्यावर माझा स्वतःवर ताबा राहिल्यास मी त्याच्यावर रागावेन.' इतक्यात 'रथ तयार आहे. आपण त्यात बसावे' असा लक्ष्मणाचा निरोप येतो, तेव्हा सीता कुलदेवता, ऋषि आणि रामाची पदकमले याना नमस्कार करून रथात बसण्यास जाते. ( अंक १ )

हा अंक उत्तम साधला आहे. नाट्यपरिणामाकरिता भवभूतीने सीतात्यागाचा प्रसंग रामाच्या राज्याभिषेकानंतर लागलीच घातला आहे आणि तरीही त्यात सीता त्यावेळी कठोरगर्भा होती असे दाखविले आहे. यात त्याची भयंकर चूक झाली आहे. तिची चर्चा पुढे करू. तसेच रामाने सीतेबरोबर भागीरथीतीरी वनविहार करण्याकरिता जाण्याचे अभिवचन दिले असताही तो आला नाही, याबद्दल सीता लक्ष्मणाला विचारीत नाही हेही अस्वाभाविक वाटते. असे काही दोष सोडले तर हा अंक मनोहर झाला आहे. चित्रदर्शनाचा प्रसंग अप्रतिम साधला आहे. त्यात राम व सीता यांच्या परस्पर प्रेमाचे आणि वनवासातही अनुभविलेल्या सुखी जीवनाचे रम्य चित्र काढले आहे. ते वर्णन वाचताना आपण जणू काय सीतारामाच्या जीवनाचा चलच्चित्रपट पाहत आहो असे वाटते. या अंकातील अनेक प्रसंगानी रामाच्या स्वभावाच्या विविध छटा—त्याचा निरभिमानीपणा, विनय, सीतेविषयी निरतिशय प्रेम,

विच्या वियोगामुळे झालेले दुःख, इतर जनांच्या दृष्टिकोणाविषयी आदर ह्या—चौथ्याने दाखविल्या आहेत.

यानंतर बारा वर्षांनी दुसऱ्या अंकातील घटनांस सुरवात होते. आरंभी एक विष्कंभक घातला आहे. त्यावरून या मध्यंतराच्या कालातील घटनाविषयी माहिती मिळते. उत्तरेतील वाल्मीकीच्या आश्रमातून दण्डकारण्यात आलेल्या आत्रेयी नामक प्रौढ विद्यार्थिनीचे तेथील वनदेवता वासंती स्वागत करते. तेव्हा आत्रेयी म्हणते—

प्रियप्राया वृत्तिर्विनयमधुरो वाचि नियमः
प्रकृत्या कल्याणी मतिरनवगीतः परिचयः ।
पुरो वा पश्चाद्वा तदिदमविपर्यासितरसं
रहस्यं साधूनामनुपधि विशुद्धं विजयते ।।

(उ. च., २, २)

(प्रेमपूर्ण आचरण, विनयाने मधुर झालेले मित भाषण, आत्यंत कल्याणकारक स्वभाव, निर्दोष परिचय, आरंभापासून अखेरपर्यंत ज्यातील आनंद तसाच टिकतो असे हे सज्जनाच्या निष्कपट आणि विशुद्ध अशा आचरणातील रहस्य विजयी होते!)

या श्लोकात सज्जनांच्या गोड स्वभावाचे सुंदर चित्र काढले आहे.

'आपण कोठल्या आणि या दण्डकारण्यात का आला' या वासन्तीच्या प्रश्नाला आत्रेयी खालील उत्तर देते — "मी वाल्मीकींच्या आश्रमातून येथील आश्रमातील अगस्त्यादि ऋषींजवळ वेदान्तविद्येचा अभ्यास करण्याकरिता आले आहे. अनेक ऋषि भगवान् वाल्मीकींजवळ त्या विद्येच्या अध्ययनाकरिता येत असत हे खरे. पण आता तेथील अध्ययनात एक मोठे विघ्न उपस्थित झाले आहे; म्हणून मी हा लांबचा प्रवास अंगीकारला आहे. बारा वर्षांपूर्वी एका देवतेने त्यांचे स्तनपान नुकतेच सुटले आहे अशी दोन मुले भगवान वाल्मीकींच्या स्वाधीन केली आणि कुश आणि लव अशी त्यांची नावेही सांगितली. त्या मुलांनी ऋषींचीच नव्हे तर चराचर सृष्टीची अंतःकरणे आकृष्ट केली आहेत. त्यांना जन्मापासून जृंभकास्त्रे प्राप्त झाली आहेत. वाल्मीकिऋषींनी दाईपणाने त्यांच पालनपोषण करून आणि चौलकर्मादि संस्कार करून त्यांना वेदांखेरीज इतर तीन विद्या प्रथम शिकविल्या. नंतर ते अकरा वर्षांचे झाले तेव्हा त्यांचे क्षात्रविधीने उपनयन करून त्यांना वेदविद्याही शिकविली. मी त्यांच्याबरोबर शिकत असे पण त्यांच्यासारख्या अत्यंत कुशाग्र बुद्धि व दृढ धारणाशक्ति असलेल्या विद्यार्थ्यांबरोबर अध्ययन करणे माझ्यासारख्यास जमत नाही. कारण—

वितरति गुरुः प्राज्ञे विद्यां यथैव तथा जडे
न तु खलु तयोर्ज्ञाने शक्तिं करोत्यपहन्ति वा ।
भवति तु पुनर्भूयान्भेदः फलं प्रति तद्यथा
प्रभवति शुचिर्बिम्बोद्ग्राहे मणिर्न मृदां चयः ॥
(उ. च., २, ४)

( विद्यार्थी कुशाग्र बुद्धीचा असो किंवा मंद बुद्धीचा असो गुरुजी दोघानाही तसेच शिकवितात. एकाची ज्ञानशक्ति वाढवतात आणि दुसऱ्याची कमी करतात असे नाही. पण त्यांनी शिकविलेल्या विद्येचे फल त्या दोघात भिन्न भिन्न आढळून येते. शुद्ध स्फटिकांत जसे प्रतिबिंब पडते तसे मातीच्या गोळ्यात पडत नाही. )

आता दुसरेही एक विघ्न उपस्थित झाले आहे. एकदा वाल्मीकि ऋषि माध्यन्दिन सवनाकरिता तमसा नदीच्या तीरी गेले असता एका पारध्याने क्रौञ्च पक्ष्यांच्या जोडप्यातून एकाला बाण मारून घायाळ केले. तेव्हा त्या ऋषीच्या तोंडून एकदम वैदिक छंदाहून भिन्न अशा अनुष्टुभ् छंदातील हा श्लोक बाहेर पडला--

मा निषाद प्रतिष्ठां त्वमगमः शाश्वतीः समाः ।
यत्क्रौञ्चमिथुनादेकमवधीः काममोहितम् ॥ (उ. च., २, ५)

( हे निषादा, तुला कधीही ( जगात ) प्रतिष्ठा प्राप्त न होवो, कारण तू काममोहित अशा क्रौंच पक्ष्याच्या जोडप्यातून एकाला ठार मारले आहेस. )

तेव्हा ब्रह्मदेव एकदम तेथे प्रकट होऊन म्हणाले, ' हे ऋषे, तुला शब्दरूपी ब्रह्माचा साक्षात्कार झाला आहे. तेव्हा तू आता रामचरित्र वर्णन कर. तुझी दिव्य प्रतिभारूपी दृष्टि सर्वत्र अव्याहत राहील. तू आद्य कवि आहेस. ' तेव्हा ते ऋषि शब्दब्रह्माचे रूपच असे रामायण नामक इतिहास लिहीत आहेत. यामुळेही माझ्या सारख्याच्या अध्ययनात विघ्न उत्पन्न झाले आहे. "

नंतर तिने विचारल्यावरून वासंती तिला अगस्त्याश्रमाचा मार्ग सांगते. त्यावरून आपण गोदावरीतीरी पंचवटीच्या परिसरात बोलत आहो असे आत्रेयीच्या ध्यानात येते. वाल्मीकींच्या आश्रमात कथाप्रसंगाने या प्रदेशाबद्दल व वासंतीबद्दल तिने ऐकले होते. तेव्हा सीतेची दुःखद स्मृति होऊन ती म्हणते--

स एव ते वल्लभबन्धुवर्गः
प्रासङ्गिकीनां विषयः कथानाम् ।
त्वां नामधेयामपि दृश्यमानः
प्रत्यक्षदृष्टामिव नः करोति ॥

(हे तुझे प्रिय सम्बन्धी, ज्यांच्याविषयी प्रासंगिक गोष्टी होत असत. त्यांना पाहिल्यावर तू नामशेष झाली असलीस तरी तू जणू काय माझ्यासमोर उभी आहेस असे वाटते.)

आत्रेयीच्या भाषणावरून सीता आता जिवंत नाही असे वासंतीला प्रथमत कळते. तेव्हा ती विचारते, 'काय सीतादेवींवर काही संकट ओढवले काय ?' त्यावर आत्रेयी म्हणते, 'संकट ओढवले एवढेच नाही, तर तिच्याविषयी अपवादही पसरला आहे.' असे म्हणून ती वासन्तीच्या कानात घडलेले वृत्त सांगते. तेव्हा वासंतीला दुःखाचा धक्का बसून मूर्च्छा येते.

पुढे आत्रेयीकडून वासंतीला कळते की ऋष्यशृंगाचे बारा वर्षांचे सत्र पूर्ण झाले असून सीतेसहित अयोध्येला परत जाणे बरे न वाटल्यामुळे वसिष्ठाच्या सूचनेवरून त्यांच्यासह अरुन्धती व राजमाता वाल्मीकींच्या आश्रमात येणार आहेत. पुढे वासन्तीने 'आता तो राजा काय करतो आहे' असे विचारल्यावरून आत्रेयी सांगते, 'त्यांनी अश्वमेध यज्ञाला आरंभ केला आहे.' तेव्हा वासंती विचारते, 'काय त्यांनं विवाहही केला आहे ?' तेव्हा आत्रेयी सांगते 'नाही. त्यांनी सीतेची सुवर्णप्रतिमा करून यज्ञाला आरंभ केला आहे.' तेव्हा वासंती उद्गारते,—

> वज्रादपि कठोराणि मृदूनि कुसुमादपि ।
> लोकोत्तराणां चेतांसि को नु विज्ञातुमर्हति ॥
>
> (उ. च., २, ७)

(वज्राहूनही कठोर आणि पुष्पाहूनही कोमल अशी लोकोत्तर पुरुषाची मने कोण बरे जाणू शकेल ?)

पुढे आत्रेयी सांगते, 'वामदेवऋषींनी अभिमन्त्रित करून अश्वमेधाचा घोडा सोडला आहे, आणि लक्ष्मणाचा पुत्र चन्द्रकेतु याला चतुरंग सेना बरोबर देऊन त्या अश्वाचा रक्षक नेमले आहे. तिकडच्यात एका ब्राह्मणाचा अल्पायुषी पुत्र मृत्यु पावल्यावर आकाशवाणीवरुन रामास समजले की 'शम्बूक नावाचा शूद्र तपश्चर्या करून अधर्म करीत आहे. हा ब्राह्मणपुत्राचा अपमृत्यु त्याचा परिणाम आहे.' म्हणून त्यास शासन करण्याकरिता राम पुष्पक विमानातून त्याच्या शोधार्थ हिंडत आहेत.' तेव्हा वासंती म्हणते, 'शम्बूक येथेच तपश्चर्या करीत आहे. तेव्हा रामचन्द्र या स्थानाला भेट देतील.'

नंतर आत्रेयी अगस्त्याश्रमास जावयास निघते वासंती त्या वेळेच्या मध्याह्नाचे वर्णन पुढील प्रमाणे करते—

कण्डूलद्विपगण्डपिण्डकषणोत्कम्पेन संपातिभि-
र्घर्मस्रंसितबन्धनैः स्वकुसुमैरर्चन्ति गोदावरीम् ।
छायापस्किरमाणविष्किरमुखव्याकृष्टकीटत्वचः
कूजत्क्लान्तकपोतकुक्कुटकुलाः कूले कुलायद्रुमाः ।।
(उ. च., २, ९)

(गोदावरीच्या काठचे, पक्ष्यांची घरटी ज्यांवर आहेत असे हे वृक्ष उन्हाने देठ शिथिल झालेल्या आणि म्हणून हत्तींनी खाज सुटलेल्या आपल्या गंडस्थलांच्या घर्षणाने हलविल्यामुळे पडणाऱ्या आपल्या पुष्पांनी त्या नदीची (जणू काय) पूजा करीत आहेत. त्यांच्या छायेत जमीन उकरणारे पक्षी त्या वृक्षांच्या खालीखाली लपलेले किडे बाहेर काढत आहेत आणि त्यांच्या जवळ उन्हाने त्रस्त झालेले हे कबूतराचे व कोंबड्याचे समूह चिवचिव करीत आहेत.)

नंतरच्या मुख्य प्रवेशात पुष्पक विमानात बसलेला राम येतो आणि मोठ्या कष्टाने शम्बूकाचा शिरच्छेद करून म्हणतो, 'रामाला साजेल असे हे कृत्य झाले! आता तरी तो ब्राह्मणाचा पुत्र जिवंत होईल काय?' तितक्यात शम्बूकाला दिव्य रूप प्राप्त होऊन तो रामाला सांगतो, 'तो ब्राह्मणपुत्र जिवंत झाला असून मलाही हे दिव्य रूप प्राप्त झाले आहे.' तेव्हा राम त्याला पुढील आशीर्वाद देतो—

यत्रानन्दाश्च मोदाश्च यत्र पुण्याश्च सम्पदः ।
वैराजा नाम ते लोकास्तैजसाः सन्तु ते शिवाः ।।
(उ. च., २, १२)

(ज्यामध्ये आत्मानुभवाचा आनंद आणि दिव्य विषयोपभोगाची सुखे प्राप्त होतात आणि जेथील ऐश्वर्य पुण्यकारक असते असे ते तेजोयुक्त मंगल ब्रह्मलोक तुला लाभोत!)

त्याच्याकडून रामास कळते की सभोवतालचा प्रदेश दंडकारण्यातील होय. रामालाही त्याची ओळख पटते. तो म्हणतो—

स्निग्धश्यामाः क्वचिदपरतो भीषणाभोगरूक्षाः
स्थाने स्थाने मुखरककुभो झाङ्कृतैर्निर्झराणाम् ।
एते तीर्थाश्रमगिरिसरिद्गर्तकान्तारमिश्राः
सन्दृश्यन्ते परिचितभुवो दण्डकारण्यभागाः ।।
(उ. च., २, १४)

(कोठे स्निग्ध व काळेभोर तर कोठे भयंकर आणि रुक्ष; ठिकठिकाणी झऱ्यांच्या

झंकाराने ज्यातील दिशा निनादित झाल्या आहेत; असे तीर्थे, आश्रम, पर्वत, नद्या, खोरी, अरण्ये यानी व्यापलेले हे दण्डकारण्यातील परिचित असलेले भूभाग मला दिसत आहेत. )

पुढे शम्बूकाकडून रामास कळते की ते दण्डकारण्यातील जनस्थानातच बोलत आहेत. शम्बूक जनस्थानापर्यंत दक्षिणेस पसरलेल्या अरण्याचे वर्णन पुढीलप्रमाणे करतो—

निष्कूजस्तिमिताः क्वचित्क्वचिदपि प्रोच्चण्डसत्त्वस्वनाः
स्वेच्छासुप्तगभीरघोरभुजगश्वासप्रदीप्ताग्नयः ।
सीमानः प्रदरोदरेषु विलसत्स्वल्पाम्भसो यास्वयं
तृष्यद्भिः प्रतिसूर्यकैरजगरस्वेदद्रवः पीयते ।।[1]

( उ. च. २, १६ )

त्या अरण्याना पाहून रामाला वनवासातील सीतेच्या मनोवृत्तीची आठवण होते. तो म्हणतो—

त्वया सह निवत्स्यामि वनेषु मधुगन्धिषु ।
इतीहारमतेवासौ स्नेहस्तस्याः स तादृशः ।।
न किंचिदपि कुर्वाणः सौख्यैर्दुःखान्यपोहति ।
तत्तस्य किमपि द्रव्यं यो हि यस्य प्रियो जनः ।।

( उ. च. २, १८-१९ )

( सीता ही राजकन्या होती. वनवासात अनेक कष्ट भोगावे लागत, तरीही तिला पतीच्या सहवासात वनात राहण्याची आवड होती. *'आपणाबरोबर मधाचा सुगन्ध ज्यामध्ये दरवळत आहे अशा वनामध्ये मी राहीन'* या कल्पनेनेच तिला या अरण्यात आनंद होत असे. अशी तिची माझ्याविषयी प्रीति होती. प्रियजनाने काही जरी केले नाही तरी केवळ त्याच्या सहवासाने सुख प्राप्त होते आणि दुःखाचा निरास होतो. तेव्हा प्रियजन हा मनुष्याचा अमूल्य असा निधि आहे. )

नतर शंबूक दण्डकारण्यातील मध्यमभागाचे पुढील रम्य वर्णन करतो—

इह समदशकुन्ताक्रान्तवानीरवीरुत्-
प्रसवसुरभिशीतस्वच्छतोया वहन्ति ।
फलभरपरिणामश्यामजम्बूनिकुञ्ज-
स्खलनमुखरभूरिस्रोतसो निर्झरिण्यः ।। ( उ. च., २, २० )

---

१. या श्लोकाचे भाषांतर मागे पृ. ४१ वर दिले आहे.

( येथील मत्त पक्ष्यानी आक्रमण केल्यामुळे वेतस व्रताच्या गळलेल्या फुलांनी ज्याचे शीतल आणि स्वच्छ जल सुगन्धित केले आहे अश्या या पर्वतातील नद्या वाहत आहेत. त्यांचे अनेक प्रवाह पक्व फलांनी ओथंबलेल्या आणि म्हणून श्यामवर्ण दिसणाऱ्या जांभळींच्या कुंजात खळखळत मोठा आवाज करीत आहेत. )

दधति कुहरभाजामत्र भल्लूकयूना-
मनुरसितगुरूणि स्त्यानमम्बूकृतानि ।
शिशिरकटुकषायः स्त्यायते शल्लकीना-
मिभदलितविकीर्णग्रन्थिनिष्यन्दगन्धः ॥

( उ. च., २, २१ )

( येथे गिरिगव्हरात तरुण अस्वलाच्या गर्जना प्रतिध्वनि झाल्यामुळे घुमत आहेत. आणि हत्तींनी मोडून टाकलेल्या शल्लकीच्या पेरातून गळणाऱ्या स्रावाचा शीतल, कटु आणि उग्र असा गंध पसरत आहे. )

हे दोन्ही श्लोक ' महावीरचरिता 'च्या पाचव्या अंकात तसेच ' मालतीमाधवा 'च्या नवव्या अंकात आले आहेत. ते दण्डकारण्याच्या वर्णनात जास्त अनुरूप वाटतात.

नंतर तो दिव्यरूपधारी शम्बूक अगस्त्य ऋषींच्या पादवंदनाकरिता जातो. दंडकारण्यातील तो भाग पाहत असताना पूर्वी आपल्या प्रियेबरोबर घडलेल्या अनेक विस्रंभप्रसंगांची आणि वनदेवता वासंतीचीही रामाला आठवण होते आणि त्याचे दुःख दुःसह होते. तो आपल्या अवस्थेचे पुढील वर्णन करतो—

चिरोद्वेगारम्भी प्रसृत इव तीव्रो विषरसः
कुतश्चित्संवेगाच्चलित इव शल्यस्य शकलः ।
व्रणो रूढग्रन्थिः स्फुटित इव हृन्मर्मणि पुन-
र्घनीभूतः शोको विकलयति मां नूतन इव ॥

( उ. च., २, २६ )

( चिरकाल उद्वेग उत्पन्न करणारा तीव्र विषरस जणू काय माझ्या सर्वांगात पसरत आहे; माझ्या अंगात घुसलेल्या बाणाच्या शल्याचा भाग कोठून तरी धक्का लागल्यामुळे जणू काय लसत आहे; माझ्या हृदयाच्या मर्मावरील व्रणाची गाठ जणू काय फुटून वाहत आहे; माझा हा तीव्र शोक जणू काय आताच उत्पन्न झाला असा मला विह्वल करीत आहे ! )

तथापि पूर्वपरिचित असे प्रदेश पुनः पाहावे म्हणून तो इकडे तिकडे फिरतो, तो त्यात विलक्षण फेरफार झालेला त्यास दिसतो. तो म्हणतो—

पुरा यत्र स्रोतः पुलिनमधुना तत्र सरितां
विपर्यासं यातो घनविरलभावः क्षितिरुहाम् ।
बहोर्दृष्टं कालादपरमिव मन्ये वनमिदं
निवेशः शैलानां तदिदमिति बुद्धिं द्रढयति ।।
(उ. च., २, २७)

(पूर्वी जेथे नद्यांचा प्रवाह होता तेथे आता वाळवंटे झाली आहेत. दाट झाडी होती तेथ ती विरळ झाली आहे आणि विरळ होती तेथ दाट झाली आहे. पुष्कळ काळानंतर हे अरण्य पाहिल्यामुळे ते निराळेच दिसत आहे. जवळच्या पर्वतावरून मात्र तेच हे अरण्य याची जाणीव होत आहे.)

पुष्कळ काळानंतर फार फेरबदल झालेले ठिकाण पुनः पाहताना आपल्याही तोंडून असेच उद्गार निघतील!

इतक्यात दिव्यरूपधारी शम्बूक परत येऊन रामाला अगस्त्य ऋषींचा संदेश कळवतो की, 'तुमचे विमान उतरेल तेव्हा त्याला ओवाळावे म्हणून वत्सल लोपामुद्रेने सर्व तयारी केली आहे आणि ती तसेच सर्व महर्षिही तुमची वाट पहात आहेत. तेव्हा तुम्ही आश्रमास भेट द्यावी. नंतर वेगवान पुष्पक विमानाने तुम्हाला अश्वमेधाच्या तयारीकरिता स्वदेशी जाता येईल.' तेव्हा राम तिकडे जाण्यास निघतो. जाताना शम्बूक गोदावरीच्या तेथील नदीसंगमाचे पुढील सुंदर वर्णन करतो—

एते ते कुहरेषु गद्गदनदद्गोदावरीवारयो
मेघालम्बितमौलिनीलशिखराः क्षोणीभृतो दक्षिणाः ।
अन्योन्यप्रतिघातसंकुलचलत्कल्लोलकोलाहलै-
रुत्तालास्त इमे गभीरपयसः पुण्याः सरित्संगमाः ।।
(उ. च., २, ३०)

(हे ते दक्षिण दिशेचे पर्वत, ज्यांच्या निळ्या शिखरावर मेघ लोंबत आहेत आणि ज्यांच्या गव्हरात गोदावरीचा प्रवाह खळखळत आहे. तसेच हे तिचे इतर नद्यांशी झालेले खोल पाण्याचे पवित्र संगम, जे एकमेकावर आदळून मिसळणाऱ्या लाटांच्या कोलाहलाने अत्यंत निनादित झाले आहेत.) (अंक २)

हा अंकही रम्य झाला आहे. आरंभीच्या विष्कम्भकात भवभूतीने बारा वर्षांत वाल्मीकीच्या आश्रमात तसेच अयोध्येत घडलेल्या घटना संक्षेपाने सांगून मागील अंकाशी त्याचा सांधा जोडला आहे. दंडकारण्याचे वर्णन पाल्हाळाचे झाले असले तरी त्यावरून त्याच्या विविध भागांची चांगली कल्पना येते. या वर्णनावरून भवभूतीला या प्रदेशाची चांगली माहिती होती याचा प्रत्यय येतो.

तिसऱ्या अंकाच्या आरंभी तमसा आणि मुरला या नदीदेवतांच्या संभाषणाचा विष्कंभक घातला आहे. तमसा ही वाल्मीकीच्या आश्रमाजवळ भागीरथीला मिळणारी नदी आणि मुरला ही अगस्त्याश्रमाजवळ गोदावरीला मिळणारी नदी. या दोन नद्यांच्या आभिमानिक देवतांचा हा प्रवेश आहे. तमसा वाल्मीकीच्या आश्रमात घडलेल्या घटनांची तसेच अयोध्येजवळ वाहणाऱ्या आणि गंगेला मिळणाऱ्या सरयू नदीकडून समजलेल्या इतर काही घटनांची माहिती देत आहे, तर मुरला अगस्त्यपत्नी लोपामुद्रेचा निरोप गोदावरीला कळविण्याकरिता जात आहे.

मुरला म्हणते, 'लोपामुद्रेने गोदावरीला पुढील उद्देश कळविण्याकरिता मला सांगितले आहे. सीतापरित्यागानंतर आपले दुःख बाहेर दाखविता न आल्यामुळे रामाची मोठी दयनीय अवस्था झाली आहे—

अनिर्भिन्नो गभीरत्वादन्तर्गूढघनव्यथः ।
पुटपाकप्रतीकाशो रामस्य करुणो रसः ॥

(उ. च., ३, १)

(गंभीर स्वभावामुळे रामाची दारुण मनोव्यथा बाहेर दिसत नाही. त्यामुळे त्याचे दुःख औषधीच्या पुटपाकाप्रमाणे आतल्या आत पिचत आहे.)

रामभद्र आता दीर्घशोकाने अत्यंत क्षीण झाला आहे. त्याला पाहून माझ्या हृदयाचा थरकाप झाला. अयोध्येला परत जाण्यापूर्वी तो पंचवटीतील सीतेसह पूर्वी अनुभविलेल्या प्रेमप्रसंगांची स्थळे पाहण्यास अवश्य जाईल. तो स्वतः गंभीर स्वभावाचा असला तरी ती स्थळे पाहताना त्याचा शोकावेग अनावर होऊन वारंवार काळजी करण्यासारखे प्रसंग उत्पन्न होतील. अशा वेळी तो मूर्च्छित झाल्यास आपल्या लाटांवरून वाहणाऱ्या शीतल आणि सुगंधी वाऱ्याने त्याला सावध कर.'

त्यावर तमसा म्हणते, 'भागीरथीच्याही मनात तीच शंका येऊन तिने गोदावरीच्या भेटीकरिता येताना सीतेला आपल्या बरोबर येथे आणले आहे. पूर्वी वाल्मीकीच्या आश्रमाजवळ सीतेला सोडून लक्ष्मण परत गेल्यावर प्रसूतीचे दुःख असह्य होऊन तिने गंगेच्या प्रवाहात उडी घेतली. तेथे तिला दोन पुत्र झाले. नंतर गंगा व पृथ्वी यांनी तिला पाताळात नेले. तिच्या मुलांचे स्तनपान सुटल्यावर गंगादेवीने त्यांना वाल्मीकीच्या स्वाधीन केले. अलीकडे सरयूकडून तिला समजले की शम्बूकवधार्थ राम दण्डकारण्यात जाणार आहेत. तेव्हा ते जनस्थानाला भेट देतील. त्या प्रसंगी रामाच्या शोकोद्रेकाविषयी गोदावरीप्रमाणे गंगेच्याही मनात भीति उत्पन्न होऊन ती काही गृहाचाराच्या निमित्ताने गोदावरीस भेटण्याकरिता येथे आली आहे आणि येताना तिने सीतेला आपणाबरोबर आणले आहे. तिने सीतेला सांगितले आहे की, 'आज तुझ्या मुलांचा

बारावा वाढदिवस आहे. तेव्हा तू स्वतः वेचलेल्या फुलांनी आपल्या कुलाचा मूळपुरुष भगवान् सूर्यदेव याची पूजा कर. आमच्या प्रभावाने तू वनदेवतांनाही अदृश्य होशील. तेव्हा मर्त्य तुला पाहू शकणार नाहीत हे सांगावयास नकोच.' मलाही भगवती गंगेने सांगितले आहे, 'तमसे, सीतेचे तुझ्यावर अत्यंत प्रेम आहे. म्हणून तूच तिच्या जवळ राहा.' नंतर मुरला हा वृत्तांत लोपामुद्रेला कळविण्याकरिता जाते. तितक्यात गोदावरीतून स्नान करून आलेल्या सीतेचे तमसा पुढीलप्रमाणे वर्णन करते—

परिपाण्डुदुर्बलकपोलसुन्दरं
दधती विलोलकबरीकमाननम् ।
करुणस्य मूर्तिरथवा शरीरिणी
विरहव्यथेव वनमेति जानकी ॥

(उ. च., ३, ४)

(फिकट आणि कृश अशा गालामुळे जिच्या मुखाला विशेष शोभा आली आहे आणि जिची वेणी लडबडत आहे अशी कारुण्याची जणू मूर्ति किंवा शरीर धारण करणारी जणू विरहव्यथाच अशी ही सीता या वनात प्रवेश करीत आहे.)

नंतरच्या मुख्य प्रवेशात सीतेने वाढविलेल्या हत्तीच्या छाव्यावर दुसऱ्या एका मत्त हत्तीने केलेल्या हल्ल्याचे वर्णन करणारे वनदेवता वासंतीचे पुढील शब्द पडद्यातून ऐकू येतात—

सीतादेव्या स्वकरकलितैः शल्लकीपल्लवाग्रै-
रग्रे लोलः करिकलभकः यः पुरा वर्धितोऽभूत् ।
वध्वा सार्धं पयसि विहरन्सोऽयमन्येन दर्पा-
दुद्दामेन द्विरदपतिना सन्निपत्याभियुक्तः ॥

(उ. च., ३, ६)

(पूर्वी सीतादेवीने आपल्या हातांनी गोळा केलेल्या शल्लकीच्या कोमल पल्लवांनी आपल्या पुढे डोलणाऱ्या ज्या हत्तीच्या छाव्याला वाढवले होते तो आपल्या हत्तिणीबरोबर जलक्रीडा करीत असता हा दुसरा उद्दाम गजपति त्याच्यावर चाल करून हल्ला करीत आहे.)

तेव्हा भान न राहून सीता 'आर्यपुत्रा, याचे रक्षण करा' असे म्हणते. तितक्यात राम तेथे विमानाला थांबण्यास सांगतो. त्याचे शब्द ऐकून सीता उत्कंठित होते. तेव्हा तमसा तिला राम शम्बूकाला शिक्षा करण्याकरिता जनस्थानात आल्याचे आपण ऐकल्याचे सांगते. तेव्हा सीता म्हणते— दिट्ठिआ अपरिहीणराजधम्मो क्खु सो राजा । (तो राजा आपला राजधर्म पाळीत आहे ही अभिनंदनीय गोष्ट आहे.) या उद्गारात

सीतेने रामाला उद्देशून 'राजा' शब्दाचा उपयोग एखाद्या त्रयस्थासारखा केला आहे. तिच्या मनात रामाने आपला निष्कारण परित्याग केला हे शल्य सलत होते हे त्यावरून उघड आहे. सीतेच्या वृत्तीत या अंकात वर्णिलेल्या प्रसंगानी हळू हळू कसा बदल झाला हे भवभूतीने मोठ्या कुशलतेने पुढे दाखविले आहे.

पंचवटी पाहताच पूर्वीच्या प्रसंगाची आठवण होऊन आपली काय अवस्था झाली आहे ते राम पुढील श्लोकात वर्णन करतो–

अन्तर्लीनस्य दुःखाग्नेरद्योद्दामं ज्वलिष्यतः ।
उत्पीड इव धूमस्य मोहः प्रागावृणोति माम् ।।

( उ. च., ३, ९ )

( आतापर्यंत आत धुमसत असलेला दुःखाग्नि आज भडकणार आहे. म्हणूनच जणू काय मोहरूपी धुराचा लोट मला अगोदर व्यापून टाकीत आहे. )

नंतर तो मूर्छित होतो, तेव्हा सीता तमसेला त्याला सावध करण्याविषयी विनविते. त्यावर तमसा म्हणते, 'तूच त्याना सावध कर. तुझ्या हाताचा स्पर्श त्याना प्रिय आहे. त्यावरच सर्व अवलंबून आहे.'

सीतेने स्पर्श केल्याबरोबर राम शुद्धीवर येतो आणि त्या स्पर्शामुळे आपण अनुभविलेला आनंद वर्णन करतो—

प्रश्च्योतन नु हरिचन्दनपल्लवाना
निष्पीडितेन्दुकरकन्दलजो नु सेकः
आतप्तजीवितपुनःपरितर्पणो मे
सजीवनौषधिरसो नु हृदि प्रसक्तः ।।

( उ. च., ३, ११ )

( ही काय हरिचन्दनाच्या पल्लवाची उटी किंवा चंद्रकिरणरूपी कंद वाटून त्याच्या रसाची वृष्टि ! माझ्या संतप्त जीविताला पुनः आनन्दित करणारा हा संजीवनी औषधीचा रसच जणू काय माझ्या हृदयावर सिंचन केला जात आहे ! )

रामाची ती अवस्था पाहून सीतेचे हृदय कळवळून येते. ती म्हणते 'मला मन्दभागिनीला उद्देशून शोक करणाऱ्या आर्यपुत्रांवर मी कशी निर्दय होऊ ? मी त्यांचे हृदय जाणते आणि ते माझे हृदय जाणतात.' नंतर ती तमसेला म्हणते, 'माझा निष्कारण परित्याग केला असला तरी त्याना शोक करताना पाहून माझ्या हृदयाची कशी अवस्था झाली ग ?' तेव्हा तमसा तिच्या हृदयातील विविध भावनाचे पुढील वर्णन करते —

तटस्थं नैराश्यादपि च कलुषं विप्रियवशा-
द्वियोगे दीर्घेऽस्मिञ्झटिति घटनोत्तम्भितमिव ।
प्रसन्नं सौजन्याद्दयितकरुणैर्गाढकरुणं
द्रवीभूतं प्रेम्णा तव हृदयमस्मिन्क्षण इव ॥

(उ. च., ३, १३)

( तुझे हृदय निराशेमुळे उदासीन, अप्रिय कृत्यामुळे कलुषित, दीर्घ वियोगामुळे एकदम समागमाविषयी उत्सुक, सौजन्याने प्रसन्न, प्रिय पतीच्या शोकामुळे अत्यंत करुणार्द्र आणि प्रेमाने पाझरलेले, असे या क्षणी जणू झाले आहे.) इतक्यात गजपतीने सीतेला प्रिय असलेल्या हत्तींच्या छाव्यावर हल्ला केल्याबद्दल वनदेवता वासन्तीचा आक्रोश त्याना ऐकू येतो. तो ऐकून त्याच्या रक्षणार्थ राम पुढे होतो. तितक्यात वासन्ती प्रवेश करुन त्या छाव्याने बलाढ्य हत्तीवर विजय मिळविल्याचे सांगते. नंतर ते सर्व गोदावरीतीराकडे जातात. त्या विजयी हत्तीच्या छाव्याने आपल्या प्रेयसीचा केलेला अनुनय राम वर्णन करतो—

लीलोत्खातमृणालकाण्डकवलच्छेदेषु सम्पादिताः
पुष्यत्पुष्करवासितस्य पयसो गण्डूषसंक्रान्तयः ।
सेकः शीकरिणा करेण विहितः कामं विरामे पुन-
र्यत्स्नेहादनरालनालनलिनीपत्रातपत्रं धृतम् ॥

(उ. च., ३, १६)

( लीलेने उपटलेल्या कमलाचे या हत्तीने दिलेले देठ चावून झाल्यावर त्याने तिला आपल्या सोंडेने उमलेल्या कमळाच्या परागाने सुवासित झालेले पाण्याचे घोट पाजले आहेत, तसेच सोंडेने पाणी शिंपडून तिला स्नान घातले आहे आणि ते झाल्यावर तिच्या वर प्रेमाने सरळ देठाच्या कमलिनीपत्राची छत्री धरली आहे. )

आपण पाळलेला हत्ती एवढा मोठा झालेला पाहून सीतेला आपल्या पुत्राची आठवण होते आणि ती म्हणते, 'मी प्रसूत होऊन काय मिळविले ? कारण माझ्या लहानग्या मुलांची निर्मल मुखकमले आर्यपुत्रानी चुंबिली नाहीत !' त्यावर तमसा म्हणते 'खरे आहे. मुले म्हणजे मातापित्यांची अंतःकरणे जोडण्याचे साधन होय !

अन्तःकरणतत्त्वस्य दम्पत्योः स्नेहसंश्रयात् ।
आनन्दग्रन्थिरेकोऽयमपत्यमिति बध्यते ॥

(उ. च., ३, १७)

( अपत्य म्हणजे स्त्रीपुरुषाच्या अंतःकरणाची प्रेमाने बांधलेली एक आनंदरूपी गाठच होय. )

नंतर वासन्ती रामाला सीतेने लहानपणापासून वाढलेला मोर कदम्बवृक्षावर आपल्या प्रेयसीसह बसलेला दाखविते. तेव्हा सीता त्याला पूर्वी कशी नाचवीत असे त्याची आठवण रामाला होते. तो म्हणतो—

भ्रमिषु कृतपुटान्तर्मण्डलावृत्ति चक्षुः
प्रचलितचतुरभ्रूताण्डवैर्मण्डयन्त्या ।
करकिसलयतालैर्मुग्धया नर्त्यमानं
सुतमिव मनसा त्वां वत्सलेन स्मरामि ॥

(उ. च., ३, १९)

(तू नाचत असताना सीता आपले डोळे मंडलाकार फिरवीत असे आणि त्यांना आपल्या चंचल भुवया हलवून शोभिवंत करीत असे. त्या वेळी ती सुंदरी आपल्या कोमल हातांनी टाळ्या वाजवून तुला आपल्या मुलाप्रमाणे नाचवीत असे. त्या प्रसंगाची आठवण माझ्या प्रेमळ मनात अद्यापि ताजी आहे.)

नंतर वासन्ती रामाला एका शिलातलावर बसावयास सांगून म्हणते—

एतत्तदेव कदलीवनमध्यवर्ति
कान्तासखस्य शयनीयशिलातलं ते ।
अत्र स्थिता तृणमदाद्बहुशो यदेभ्यः
सीता ततो हरिणकैर्न विमुच्यते स्म ॥

(उ. च., ३, २१)

(हेच केळींच्या वनामध्ये असलेले शिलातल, ज्यावर आपण सीतेसह शयन करीत होता. या ठिकाणी बसून सीता छोट्या हरणांना पुष्कळदा चारा घालत असे. म्हणून ती तिला कधीही सोडत नसत.)

पुढे ती रामाला विचारते- 'महाराज, अपि कुशलं कुमारलक्ष्मणस्य ।' (महाराज, कुमार लक्ष्मण खुशाल आहे ना ?) तेव्हा तिने आपणाला 'महाराज' या स्नेहशून्य शब्दाने संबोधिले आणि सीतेचा उल्लेख न करता केवळ लक्ष्मणाच्या कुशलाची चौकशी केली त्यावरुन तिला सीतावृत्तान्ताची माहिती असावी असे अनुमान राम करतो आणि 'होय, कुमार लक्ष्मण खुशाल आहे, असे सांगतो'. तेव्हा वासन्ती म्हणते—

त्वं जीवितं त्वमसि मे हृदयं द्वितीयं
त्वं कौमुदी नयनयोरमृतं त्वमङ्गे ।
इत्यादिभिः प्रियशतैरनुरुध्य मुग्धां
तामेव शान्तमथवा किमिहोत्तरेण ॥ (उ. च., ३, २६)

नंतर रामाच्या दुःखात विरंगुळा पाडण्याकरिता वासन्ती त्याला पूर्वपरिचित स्थले दाखवते. एका लतागृहाजवळ जाऊन ती म्हणते—

अस्मिन्नेव लतागृहे त्वमभवस्तन्मार्गदत्तेक्षणः
सा हंसैः कृतकौतुका चिरमभूद्गोदावरीसैकते ।
आयान्त्या परिदुर्मनायितमिव त्वां वीक्ष्य बद्धस्तया
कातर्यादरविन्दकुड्मलनिभो मुग्धः प्रणामाञ्जलिः ॥

(उ. च., ३, ३७)

(हे रामा, याच लतागृहात तू तिच्या वाटेकडे डोळे लावून बसला होतास. गोदावरी तीरावरील हंसांची मजा पाहत असल्यामुळे तिला विलंब झाला. परत येताना तुला नाखुश झाल्यासारखे पाहून तिने घाबरून तुझ्यापुढे कमलाच्या कळीसारखी सुंदर प्रणामांजलि केली.)

पण या पूर्व स्मृतींनी रामाने दुःख अधिकच वाढते. सीताही म्हणते, 'वासन्ती, तूच दारुण आहेस! तू आमच्या हृदयाच्या मर्मभागी घुसलेले शल्य पुनः पुनः हलवून मला आणि आर्यपुत्राना दुःख देत आहेस!' रामाचेही दुःख अनावर होऊन तो म्हणतो,

हा हा देवि स्फुटति हृदयं ध्वंसते देहबन्धः
शून्यं मन्ये जगदविरलज्वालमन्तर्ज्वलामि ।
सीदन्नन्धे तमसि विधुरो मज्जतीवान्तरात्मा
विष्वङ् मोहः स्थगयति कथं मन्दभाग्यः करोमि ॥

(उ. च., ३, ३८)

(हाय! हाय! देवी! माझे हृदय भग्न होत आहे. शरीर नष्ट होत आहे. सारे जगत् शून्य भासत आहे. शरीरात ज्वाला सारख्या भडकून मी जळतो आहे. माझा अन्तरात्मा असहाय होऊन निबिड अंधकारात मग्न होत आहे. चहूकडून मला मोहाने वेढले आहे. आता मी मंदभाग्याने काय करावे?)

हा श्लोक पहिले तीन शब्द बदलून 'मालतीमाधवा'त आला आहे. पण तो बहुधा 'उत्तररामचरिता'करिता प्रथम रचला असून नंतर 'मालतीमाधवा'त घातला असावा. या श्लोकातील रामाचे उद्गार हृदय पिळवटून काढणारे आहेत. राम पुनः मूर्च्छित होतो. तेव्हा सीता त्याच्या हृदयावर व कपाळावर स्पर्श करून त्याला सावध करते. तेव्हा राम तिचा हात धरून ठेवतो आणि वासन्तीला म्हणतो, 'ही पहा जानकी मला पुनः सापडली. हा मी तिचा हात धरला आहे.

( तू माझे प्राण आहेस, तू माझे दुसरे हृदयच आहेस, तू माझ्या नेत्राना चन्द्रिका आहेस, तू माझ्या शरीराला (आनंदविणारे) अमृत आहेस— अशा प्रकारच्या शेकडो प्रिय वचनानी त्या भोळ्या स्त्रीचे मन रमवून तिलाच— हाय, आता पुढे बोलण्याचा काय उपयोग ! )

असे म्हणता म्हणताच वासन्तीला मूर्छा येते. सावध झाल्यावर ती रामाला 'ही अनुचित गोष्ट आपण का केली' असे विचारते. 'लोकाना खपेना म्हणून' असे रामाने उत्तर देताच वासन्ती कळवळून म्हणते,

अयि कठोर यशः किल ते प्रियं
किमयशो ननु घोरमतः परम् ।
किमभवद्विपिने हरिणीदृशः
कथय नाथ कथं बत मन्यसे ।।

(उ. च., ३, २७)

( हे निर्दय रामा, तुला कीर्ति प्रिय आहे असे म्हणतात, पण यापेक्षा घोर अशी अपकीर्ति कोणती ? त्या हरिणाक्षीचे अरण्यात काय झाले सांग. तुला याबद्दल काय वाटते ? )

राम त्यावर म्हणतो, 'क्रूर हिंस्र पशूंनी तिचा ठार केले असेल' आणि दुःख दुःसह होऊन तो ओक्साबोक्शी रोदन करतो. तेव्हा तमसा म्हणते—

पूरोत्पीडे तडागस्य परीवाहः प्रतिक्रिया ।
शोकक्षोभे च हृदयं प्रलापैरेव धार्यते ।।

(उ. च., ३, २९)

( तलावात पाणी तुडुंब भरले म्हणजे त्या पाण्याला वाहण्याला वाट काढून देणे हाच तो तलाव वाचविण्याचा उपाय. हृदय शोकाने क्षुब्ध झाले म्हणजे रोदन करूनच त्याला वाचवावे लागते. )

वासन्ती रामाला झाल्या गोष्टीबद्दल शोक न करता धैर्याचा अवलंब करण्याविषयी सुचविते. तेव्हा राम म्हणतो—

नंतर रामाच्या दुःखात विरंगुळा पाडण्याकरिता वासन्ती त्याला पूर्वपरिचित स्थले दाखवते. एका लतागृहाजवळ जाऊन ती म्हणते—

> अस्मिन्नेव लतागृहे त्वमभवस्तन्मार्गदत्तेक्षणः
> सा हंसैः कृतकौतुका चिरमभूद्गोदावरीसैकते ।
> आयान्त्या परिदुर्मनायितमिव त्वां वीक्ष्य बद्धस्तया
> कातर्यादरविन्दकुड्मलनिभो मुग्धः प्रणामाञ्जलिः ।।
>
> (उ. च., ३, ३७)

(हे रामा, याच लतागृहात तू तिच्या वाटेकडे डोळे लावून बसला होतास. गोदावरी तीरावरील हंसांची मजा पाहत असल्यामुळे तिला विलंब झाला. परत येताना तुला नाखुश झाल्यासारखे पाहून तिने घाबरून तुझ्यापुढे कमलाच्या कळीसारखी सुंदर प्रणामाञ्जलि केली.)

पण या पूर्व स्मृतींनी रामाचे दुःख अधिकच वाढते. सीताही म्हणते, 'वासन्ती, तूच दारुण आहेस! तू आमच्या हृदयाच्या मर्मभागी घुसलेले शल्य पुनः पुनः हलवून मला आणि आर्यपुत्राला दुःख देत आहेस!' रामाचेही दुःख अनावर होऊन तो म्हणतो,

> हा हा देवि स्फुटति हृदयं ध्वंसते देहबन्धः
> शून्यं मन्ये जगदविरलज्वालमन्तर्ज्वलामि ।
> सीदन्नन्धे तमसि विधुरो मज्जतीवान्तरात्मा
> विष्वङ् मोहः स्थगयति कथं मन्दभाग्यः करोमि ।।
>
> (उ. च., ३, ३८)

(हाय! हाय! देवी! माझे हृदय भग्न होत आहे. शरीर नष्ट होत आहे. सारे जगत् शून्य भासत आहे. शरीरात ज्वाला सारख्या भडकून मी जळतो आहे. माझा अन्तरात्मा असहाय होऊन निबिड अंधकारात मग्न होत आहे. चहूकडून मला मोहाने वेढले आहे. आता मी मंदभाग्याने काय करावे?)

हा श्लोक पहिले तीन शब्द बदलून 'मालतीमाधवा'त आला आहे. पण तो बहुधा 'उत्तररामचरिता'करिता प्रथम रचला असून नंतर 'मालतीमाधवा'त घातला असावा. या श्लोकातील रामाचे उद्गार हृदय पिळवटून काढणारे आहेत. राम पुनः मूर्च्छित होतो. तेव्हा सीता त्याच्या हृदयावर व कपाळावर स्पर्श करून त्याला सावध करते. तेव्हा राम तिचा हात धरून ठेवतो आणि वासन्तीला म्हणतो, 'ही पहा जानकी मला पुनः सापडली. हा मी तिचा हात धरला आहे.

( तू माझे प्राण आहेस, तू माझे दुसरे हृदयच आहेस, तू माझ्या नेत्रांना चन्द्रिका आहेस, तू माझ्या शरीराला ( आनंदविणारे ) अमृत आहेस— अशा प्रकारच्या शेकडो प्रिय वचनांनी त्या भोळ्या स्त्रीचे मन रमवून तिलाच— हाय, आता पुढे बोलण्याचा काय उपयोग ! )

असे म्हणता म्हणताच वासन्तीला मूर्छा येते. सावध झाल्यावर ती रामाला 'ही अनुचित गोष्ट आपण का केली ' असे विचारते. ' लोकांना खपेना म्हणून ' असे रामाने उत्तर देताच वासन्ती कळवळून म्हणते,

अयि कठोर यशः किल ते प्रियं
किमयशो ननु घोरमतः परम् ।
किमभवद्विपिने हरिणीदृशः
कथय नाथ कथं बत मन्यसे ।।

(उ. च., ३, २७)

( हे निर्दय रामा, तुला कीर्ति प्रिय आहे असे म्हणतात, पण यापेक्षा घोर अशी अपकीर्ति कोणती ! त्या हरिणाक्षीचे अरण्यात काय झाले सांग. तुला याबद्दल काय वाटते ! )

राम त्यावर म्हणतो, ' क्रूर हिंस्र पशूंनी तिला ठार केले असेल ' आणि दु:ख दुःसह होऊन तो ओक्साबोक्शी रोदन करतो. तेव्हा तमसा म्हणते—

पूरोत्पीडे तडागस्य परीवाहः प्रतिक्रिया ।
शोकक्षोभे च हृदयं प्रलापैरेव धार्यते ।।

(उ. च., ३, २९)

( तलावात पाणी तुडुंब भरले म्हणजे त्या पाण्याला वाहण्याला वाट काढून देणे हाच तो तलाव वाचविण्याचा उपाय. हृदय शोकाने क्षुब्ध झाले म्हणजे रोदन करूनच त्याला वाचवावे लागते. )

वासन्ती रामाला झाल्या गोष्टीबद्दल शोक न करता धैर्याचा अवलंब करण्याविषयी सुचविते. तेव्हा राम म्हणतो—

देव्या शून्यस्य जगतः द्वादशः परिवत्सरः ।
प्रणष्टमिव नामापि न च रामो न जीवति ।।

(उ. च., ३, ३३)

( सीतादेवी नष्ट झाल्याला आज बारा वर्षे झाली. तिचे नावमुद्धा जगातून नाहीसे झाले. पण राम जिवंत राहिला नाही असे नाही. )

नंतर रामाच्या दुःखात विरंगुळा पाडण्याकरिता वासन्ती त्याला पूर्वपरिचित स्थळे दाखवते. एका लतागृहाजवळ जाऊन ती म्हणते—

अस्मिन्नेव लतागृहे त्वमभवस्तन्मार्गदत्तेक्षणः
सा हंसैः कृतकौतुका चिरमभूद्गोदावरीसैकते ।
आयान्त्या परिदुर्मनायितमिव त्वां वीक्ष्य बद्धस्तया
कातर्यादरविन्दकुड्मलनिभो मुग्धः प्रणामाञ्जलिः ॥

(उ. च., ३, ३७)

(हे रामा, याच लतागृहात तू तिच्या वाटेकडे डोळे लावून बसला होतास. गोदावरी तीरावरील हंसांची मजा पाहत असल्यामुळे तिला विलंब झाला. परत येताना तुला नाखुश झाल्यासारखे पाहून तिने घाबरून तुझ्यापुढे कमलाच्या कळीसारखी सुंदर प्रणामाञ्जलि केली.)

पण या पूर्व स्मृतींनी रामाचे दुःख अधिकच वाढते. सीताही म्हणते, 'वासन्ती, तूच दारुण आहेस! तू आमच्या हृदयाच्या मर्मभागी घुसलेले शल्य पुनः पुनः हलवून मला आणि आर्यपुत्राला दुःख देत आहेस!' रामाचेही दुःख अनावर होऊन तो म्हणतो,

हा हा देवि स्फुटति हृदयं ध्वंसते देहबन्धः
शून्यं मन्ये जगदविरलज्वालमन्तर्ज्वलामि ।
सीदन्नन्धे तमसि विधुरो मज्जतीवान्तरात्मा
विष्वङ्‌ मोहः स्थगयति कथं मन्दभाग्यः करोमि ॥

(उ. च., ३, ३८)

(हाय! हाय! देवी! माझे हृदय भग्न होत आहे. शरीर नष्ट होत आहे. सारे जगत् शून्य भासत आहे. शरीरात ज्वाला सारख्या भडकून मी जळतो आहे. माझा अन्तरात्मा असहाय होऊन निबिड अंधकारात मग्न होत आहे. चहूकडून मला मोहाने वेढले आहे. आता मी मंदभाग्याने काय करावे!)

हा श्लोक पहिले तीन शब्द बदलून 'माल्तीमाधवा'त आला आहे. पण तो बहुधा 'उत्तररामचरिता'करिता प्रथम रचला असून नंतर 'माल्तीमाधवा'त घातला असावा. या श्लोकातील रामाचे उद्‌गार हृदय पिळवटून काढणारे आहेत. राम पुनः मूर्च्छित होतो. तेव्हा सीता त्याच्या हृदयावर व कपाळावर स्पर्श करून त्याला सावध करते. तेव्हा राम तिचा हात धरून ठेवतो आणि वासन्तीला म्हणतो, 'ही पहा जानकी मला पुनः सापडली. हा मी तिचा हात धरला आहे.

गृहीतो यः पूर्वं परिणयविधौ कङ्कणधर-
श्चिरं स्वेच्छास्पर्शैरमृतशिशिरैर्यः परिचितः ।
स एवायं तस्यास्तुहिननिकरौपम्यसुभगो
मया लब्धः पाणिर्ललितलवलीकन्दलनिभः ॥'

(उ. च., ३, ४०)

(पूर्वी विवाहाच्या प्रसंगी जो कंकणयुक्त हात मी धरला होता, ज्याचा अमृतासारखा शीतल स्पर्श मला हवा तेव्हा अनुभवण्यास मिळाल्यामुळे माझ्या चांगला परिचयाचा झाला होता, ज्याची सौंदर्यात हिमसमूहाशीच तुलना होऊ शकेल, असा तिचा लवलीलतेच्या कंदासारखा हा हात मला आता मिळाला आहे.)

तेव्हा सीता आपला हात सोडवून घेते. रामालाही वाटते हा मोहच असावा; नाही तर वासन्तीलाही सीता कशी दिसली नसती ! शेवटी वासन्तीचा निरोप घेताना राम म्हणतो, आता मी परत गेल्यावर माझ्या सहधर्मचारिणीला—सीतेच्या सुवर्ण-प्रतिमेला—पाहत पाहत आपल्या मनाची करमणूक करीन.' ते ऐकून आपणाविषयी रामाचे प्रेम अढळ आहे अशी सीतेची खात्री होते आणि ती म्हणते, 'आर्यपुत्र, इदानीमसि त्वम् । अहो उत्खातमिदानीं मे परित्यागशल्यमार्यपुत्रेण ।' [आर्यपुत्र, आता आपण पूर्वीचे झाला ! अहाहा, आता मात्र (माझ्या हृदयात सलणारे) परित्यागरूपी शल्य आर्यपुत्रानी काढून टाकले !]

नंतर राम अयोध्येस जाण्यास निघतो. तमसाही सीतेसह कुशलवांचा वाढदिवस साजरा करण्याकरिता गंगेकडे जाण्यास निघते. जाताना तमसा म्हणते, 'काय हे आश्चर्यकारक संविधानक !

एको रसः करुण एव निमित्तभेदा-
द्भिन्नः पृथक् पृथगिवाश्रयते विवर्तान् ।
आवर्तबुद्बुदतरङ्गमयान्विकारा-
नम्भो यथा सलिलमेव तु तत्समग्रम् ॥'

(उ. च., ३, ४७)

(एकच करुणरस भिन्न भिन्न निमित्तामुळे निरनिराळी रूपे धारण करतो. भोवरे, बुडबुडे, लाटा अशी निरनिराळी रूपे दिसली तरी त्याच्या मुळाशी तेच पाणी असते. तसेच हे आहे.)

जाताना तमसा व वासन्ती त्याच श्लोकात सीता व राम यांना उद्देशून म्हणतात की, 'भगवती पृथ्वी, गंगा, आद्य कवि वाल्मीकि आणि अरुन्धतीसह वसिष्ठ, हे सर्व आमच्या सारख्यासह तुमचे मंगल्याप्तीकरिता कल्याण करोत !' (अंक ३).

प्रस्तुत अंकाचा मुख्य उद्देश सीतेच्या मनात निष्कारण परित्यागामुळे उत्पन्न झालेली अढी दूर करून तिजविषयी रामाच्या मनात असलेल्या अढळ प्रेमाबद्दल तिची खात्री पटविणे हा आहे आणि तो उत्तम रीतीने सिद्ध झाला आहे. आरंभी सीता रामास 'आर्यपुत्र' या शब्दाने न संबोधता 'राजा' म्हणते. पण रामाचे दर्शन होताच त्याचे क्षीण, फिकट व दुर्बल शरीर पाहताच त्याच्या दीर्घकालीन शोकाची तिला कल्पना येते. पुढे वासन्ती पंचवटीच्या परिसरातील पूर्वपरिचित स्थळे, पशु व पक्षी दाखविते तेव्हा रामाचा शोक कसा उचंबळून येतो हे ती समक्ष पाहते. रामाने आपला त्याग केला तो प्रजाजनांच्या प्रवादावरून हे तिला समजते. आपणास हिंस्र श्वापदांनी ठार केले अशी रामाची समजूत असल्यामुळे त्याचे हृदयद्रावक आर्त विलाप ती ऐकते. शेवटी आपल्या परित्यागानंतर रामाने दुसरा विवाह केला नसून आपलीच सुवर्णप्रतिमा अश्वमेध यज्ञातील सहधर्मचारिणी म्हणून मानली आहे हे ऐकल्यावर तर तिच्या मनातील शल्य पूर्णपणे नाहीसे होते. अशा रीतीने सीतेच्या मनोवृत्तीत होणारे विविध बदल भवभूतीने मोठ्या कुशलतेने रेखाटले आहेत. करुण-रसाची तर यात परमावधि झाली आहे आणि त्यामुळे 'कारुण्यं भवभूतिरेव तनुते।' (करुणरसाचा आविष्कार करावा तर भवभूतीनेच!) ही उक्ति सर्वसंमत झाली आहे. 'शाकुन्तला'तील जसा चौथा अंक तसा 'उत्तररामचरिता'तील हा तिसरा अंक अत्यंत रम्य मानला गेला आहे.[1]

चौथ्या अंकाच्या आरंभी एक मिश्रविष्कंभक आहे. त्यात वाल्मीकीच्या आश्रमातील भाण्डायन आणि सौधातकि या दोन विद्यार्थ्यांचा संवाद घातला आहे. त्यांपैकी भांडायन हा प्रौढ विद्यार्थी असून त्याने स्मृतिग्रंथांचे अध्ययन केले आहे.

---

१. पं. रंगाचार्य रड्डी यांनी 'शाकुन्तला'विषयी प्रचलित असलेल्या श्लोका-सारखा पुढील श्लोक रचला आहे—

काव्येषु नाटकं रम्यं तत्रोत्तरचरित्रकम्।
तत्रापि च तृतीयोऽङ्कस्तत्र श्लोकचतुष्टयम्॥

'उत्तररामचरिता'च्या तिसऱ्या अंकातून असे चार उत्कृष्ट श्लोक त्यांनी पुढील-प्रमाणे निवडले आहेत—

(१) एतत्तदेव कदलीवनमध्यवर्ति। (३, २१)
(२) त्वं जीवितं त्वमसि मे हृदयं द्वितीयम्। (३, २६)
(३) अयि कठोर यशः किल ते प्रियम्। (३, २७)
(४) अस्मिन्नेव लतागृहे त्वमभवस्तन्मार्गदत्तेक्षणः। (३, ३७)
पं. रड्डी यांचा लेखसंग्रह, पृ. ८१.

त्याला जास्त माहिती असून तो संस्कृतात बोलतो. सौधातकि हा त्याच्याहून लहान आणि खट्याळ आहे. त्याचे भाषण प्राकृतात आणि विनोदी आहे. आरंभीच तो म्हणतो, ' आज सुट्टी मिळण्याचे कारण झालेल्या या अनेकविध विरळलेल्या दाढीवाल्या बुड्ढ्या लोकांचे स्वागत असो ! ' पुढे तो विचारतो, ' भांडायना, म्हाताऱ्या लोकांच्या या मोठ्या ताड्याचा म्होरक्या म्हणून जो अतिथि आला आहे तो कोण रे ? ' भाण्डायनाने ते महर्षि वसिष्ठ असून ऋष्यशृंगाच्या आश्रमातून अरुन्धती आणि दशरथ महाराजांच्या राण्या यांना घेऊन आले आहेत, असे सांगताच सौधातकि म्हणतो, ' असे काय ? मला तर वाटले तो कोणी वाघोबा किंवा लांडगोबा असावा. कारण त्याने आल्याबरोबर आमची ती कालवड गट्ट केली ! ' तेव्हा भांडायन सांगतो की ' मधुपर्क समांस असावा ' या वेदवाक्याचा आदर करण्याकरिता गृहस्थाश्रमी लोक जेव्हा एखादा वेदवेत्ता आपल्या घरी येतो तेव्हा त्याच्यासाठी एखादी कालवड, बैल किंवा मेंढा मारून त्याचे मांस त्याला अर्पण करतात. याला धर्मसूत्रकारांचीही मान्यता आहे. ' त्यावर सौधातकि म्हणतो, ' तरा पकडला गेलास ! वसिष्ठ ऋषि आले तेव्हा कालवड मारली गेली; पण आजच राजर्षि जनक आले तेव्हा भगवान् वाल्मीकींनी दही आणि मध यांनीच त्यांचा मधुपर्क केला आणि कालवड सोडून दिली हे कसे ? ' तेव्हा भांडायन सांगतो, ' मी जो समांस मधुपर्काचा विधि सांगितला तो जे मांसाहारी आहेत त्यांच्या बाबतीत करावयाचा. राजर्षि जनक यांनी मांसाशन वर्ज्य केले आहे. सीतादेवीवर ते दुर्दैवाचे संकट ओढवलेले ऐकताच त्यांनी वैखानस व्रत स्वीकारून चद्रद्वीपात कित्येक वर्षे तपश्चर्येत घालविली. आज ते आपले मित्र वाल्मीकि ऋषि यांना भेटण्याकरिता आले आहेत. कौसल्यादेवीने त्यांना जाऊन भेटावे, असे सांगण्याकरिता वसिष्ठ ऋषींनी अरुन्धतीला पाठविले आहे. ' त्यावर सौधातकि म्हणतो, ' जसे हे बुड्ढे लोक एकत्र येऊन गोष्टी करणार आहेत तसे आपणही आजची अध्ययनाची सुट्टी खेळात घालवूया. '

यानंतरच्या मुख्य प्रवेशात सीताशोकाने अत्यंत विह्वल झालेला जनक म्हणतो—

अपत्ये यत्तादृग्दुरितमभवत्तेन महता
विषक्तस्तीव्रेण व्रणितहृदयेन व्यथयता ।
पटुर्धारावाही नव इव चिरेणापि हि न मे
निकृन्तन्मर्माणि क्रकच इव मन्युर्विरमति ।।

(उ. च., ४, ३)

( माझ्या कन्येवर जो दुर्दैवाचा घाला आला तो अत्यंत प्रचंड, तीव्र, हृदयाला घरे पाडणारा आणि व्यथा उत्पन्न करणारा होता. त्याने उत्पन्न झालेला आणि तेव्हापासून

सतत अनुभविलेला माझा दुःखसंताप दीर्घ कालानन्तरही अगदी आरंभी होता तसाच तीव्र असून एखाद्या करवताप्रमाणे माझ्या मर्मस्थानाला कापीत आहे आणि शांत होत नाही. )

पुढे तो म्हणतो, 'माझे हे दग्धशरीर वार्द्धक्याने आणि दुःसह दुःखाने जर्जर झाले आहे. मी पराक, सांतपन इत्यादि अनेक प्रकारच्या तपश्चरणानी ते शोषविले आहे. तरी ते पतन पावत नाही. आत्महत्या करावी तर ऋषि सांगतात की आत्मघात्यांना सूर्यरहित दाट अंधाराच्या लोकात गति मिळते. अनेक वर्षे झाली तरी हा माझा दारुण दुःखावेग शांत होत नाही. यज्ञभूमीतून उत्पन्न झालेल्या सीते, तुझे हे असे दुर्दैव की लज्जेस्तव मला रडण्याचीही चोरी झाली आहे. तुझे ते बाल्पण मला अजून आठवते.

अनियतरुदितस्मितं विराज-
  त्कतिपयकोमलदन्तकुड्मलाग्रम् ।
वदनकमलकं शिशोः स्मरामि
  स्खलदसमञ्जसमुग्धजल्पितं ते ।।'

(उ. च., ४, ४)

(लहानपणचे तुझे ते मुखकमल—केव्हा रडणारे तर केव्हा हसणारे, ज्यामध्ये थोड्याशा कोमल कळ्यासारख्या दातांचे अग्रभाग दिसत असत, आणि जे अडखळत, अर्थहीन आणि गोड बोलत असे ते—मला अद्यापि स्मरते. )

इतक्यात अरुन्धती आणि कौसल्या यांना घेऊन कन्चुकी येतो. सीतेवर आपल्या मुलाने केलेल्या अन्यायामुळे कौसल्येला जनकाची भेट घेणे कठीण जाते. ती म्हणते, 'या प्रसंगी सर्व दुःखे एकदम उद्भवली आहेत. माझे हृदय आपली बन्धने जणू तटातट तोडून बाहेर निघत आहे. ते स्थिर करणे मला शक्य होत नाही.' त्यावर अरुन्धती म्हणते—

सन्तानवाहीन्यपि मानुषाणां
  दुःखानि सद्बन्धुवियोगजानि ।
दृष्टे जने प्रेयसि दुःसहानि
  स्रोतःसहस्रैरिव सप्लवन्ते ।।

(उ. च., ४, ८)

(आपल्या सच्छील नातलगांच्या वियोगापासून उत्पन्न झालेले दुःख सतत भासत असले तरी एखाद्या मायेच्या प्रिय जनाची गाठ पडली असता हजारो प्रवाहांनी वाहत असते. )

अरुन्धतीला पाहताच जनक तिला वन्दन करताना म्हणतो—

यया पूतंमन्यो निधिरपि पवित्रस्य महसः
पतिस्ते पूर्वेषामपि खलु गुरूणां गुरुतमः ।
त्रिलोकीमङ्गल्यामवनितललीनेन शिरसा
जगद्वन्द्यां देवीमुषसमिव वन्दे भगवतीम् ।।
(उ. च., ४, १०)

(स्वतः पवित्र तेजाचा निधि असूनही तो सर्व प्राचीन आचार्यांचाही आद्य गुरु असा तुझा पति जिच्यामुळे स्वतःला पावन समजतो त्या देवी उषेप्रमाणे तिन्ही लोकांना मंगलकारक आणि सर्व जगाला वन्द्य अशा भगवती तुला मी जमिनीवर मस्तक ठेवून वन्दन करतो.)

नंतर तो स्वतः कौसल्येला कुशल न विचारता कञ्चुकीला प्रश्न करतो, 'आर्य गृष्ट, प्रजापालकाच्या या मातेचे कुशल आहे ना?' त्याच्या प्रश्नातील खोच कञ्चुकीच्या लक्षात येते. तो म्हणतो, 'राजर्षे, रागाने जिने रामभद्राचे तोंड पाहण्याचे दीर्घकाल सोडून दिले आहे त्या अगोदरच अत्यंत दुःखित असलेल्या, कौसल्या-देवीला अधिक दुःखी करू नका. रामभद्राचाही हा दैवदुर्विपाक आहे. पौरजानपदांचा अग्निशुद्धीवर विश्वास नसल्याने त्याला हे दारुण कृत्य करावे लागले.'

त्यावर जनक चवताळून म्हणतो, 'कोण हा अग्नि माझ्या कन्येची शुद्धि करणारा?' अरुन्धतीही सीतेविषयी म्हणते—

शिशुर्वा शिष्या वा यदसि मम तत्तिष्ठतु तथा
विशुद्धेरुत्कर्षस्त्वयि तु मम भक्तिं द्रढयति ।
शिशुत्वं स्त्रैणं वा भवतु ननु वन्द्यासि जगतां
गुणाः पूजास्थानं गुणिषु न च लिङ्गं न च वयः ।।
(उ. च., ४, ११)

(तू मला कन्येप्रमाणे होतीस आणि माझी शिष्या होतीस. ते कसेही असो, पण तुझ्या ठिकाणच्या उत्कृष्ट शीलाने तुझ्याविषयी माझी भक्ति दृढ झाली होती. तू वयाने लहान आणि जन्माने स्त्री असलीस तरी सर्व जगाला वन्दनीय आहेस. गुणी जनांचे गुण हेच आदराचे कारण असते. त्यांचे लिंग आणि वय कोणी विचारात घेत नाही.)

इतक्यात दुःखावेगाने कौसल्येला मूर्छा येते. तेव्हा अरुन्धती म्हणते—

स राजा तत्सौख्यं स च शिशुजनस्ते च दिवसाः
स्मृतावाविर्भूतं त्वयि सुहृदि दृष्टे तदखिलम् ।

विपाके घोरेऽस्मिन्नथ खलु विमूढा तव सखी
पुरन्ध्रीणां चित्तं कुसुमसुकुमारं हि भवति ।।
(उ. च., ४, १२)

(तो दशरथ राजा, ते सौख्य, ती लहान मुले, ते सुखाचे दिवस—हे सर्व तुला – आपल्या मित्राला – पाहवाच दिला आठवले. या दारुण विपत्तीत ही तुझी मैत्रीण साहजिकपणे मूर्च्छित झाली आहे. कारण प्रौढ स्त्रियांचे अंतःकरण फुलाप्रमाणे कोमल असते.)

जनकालाही आपण कौसल्येच्या मनाला लागेल असे बोलल्याबद्दल पश्चात्ताप होतो. तो तिला आपल्या कमण्डलूतील पाणी शिंपडून सावध करतो. 'दशरथ राजाला पाच अपत्ये असली तरी त्यामध्ये रामावर त्याचे विशेष प्रेम होते आणि सर्व सुनांमध्ये सीता त्याला आपल्या शान्ता कन्येपेक्षाही प्रिय होती' असे कन्चुकीने म्हणताच जनक म्हणतो, 'खरे आहे ते. महाराज दशरथ मला सर्व प्रकारे अत्यंत प्रिय होते.

कन्यायाः किल पूजयन्ति पितरो जामातुराप्तं जनं
सम्बन्धे विपरीतमेव तदभूदाराधनं ते मयि ।
त्वं कालेन तथाविधोऽप्यपहृतः सम्बन्धबीजं च तद्
घोरेऽस्मिन्मम जीवलोकनरके पापस्य धिग्जीवितम् ।।'
(उ. च., ४, १७)

[मुलीच्या पित्याने जावयाच्या आप्तेष्टांची संभावना करण्याची पद्धत आहे असे म्हणतात. पण तुमच्या आमच्या संबंधात याच्या उलट तुम्हीच माझी मर्जी सांभाळली. अशा तुम्हाला कालाने हिरावून नेले. ते आपणातले संबंधाचे (सीतारूपी) बीजही नष्ट झाले. या घोर जीवलोकरूपी नरकातील पापी जो मी त्याच्या जीविताला धिक्कार असो!]

कौसल्येचे सांत्वन करताना अरुन्धती म्हणते, 'तो कुलगुरु (वसिष्ठ) ऋष्यशृंगाच्या आश्रमात म्हणाले होते ते तू विसरलीस काय? ते म्हणाले होते, असे असे घडेल; पण त्याचा शेवट कल्याणकारक होईल.' कौसल्येचा त्यावर विश्वास बसत नाही. ती म्हणते, 'मनोरथाच्याही पलीकडची ही गोष्ट कोठली घडायला?' तेव्हा अरुन्धती उत्तर देते, 'तू काय म्हणतेस त्यांचे म्हणणे खोटे होईल? नाही. ते घडणारच!

आविर्भूतज्योतिषां ब्राह्मणानां
ये व्याहारास्तेषु मा संशयोऽभूत् ।

भद्रा ह्येषां वाचि लक्ष्मीर्निषक्ता
नैते वाचं विप्लुतां व्याहरन्ति ॥ (उ. च., ४, १८)

( दिव्य तेजाचा ज्याना साक्षात्कार झाला आहे त्या ब्राह्मणांच्या वचनाविषयी संशय असू नये. त्यांच्या वाणीत कल्याणकारक लक्ष्मी वास करते. ते कधीही असत्य बोलत नसतात.' )

इतक्यात पडद्यातून गलबला ऐकू येतो. ते पाहतात तों वेष खेळणाऱ्या मुलामध्ये रामासारख्या अंगकांतीचा एक मुलगा त्याची दृष्टि आकृष्ट करतो. भागीरथीने सांगितल्याप्रमाणे तो रामाच्या दोन मुलांपैकी असावा असे अरुन्धतीला वाटते, पण कुश की लव हे समजत नाही. तो क्षत्रियब्रह्मचारी असावा असे त्याच्या वेषावरुन जनक अनुमान करतो—

चूडाचुम्बितकङ्कपत्रमभितस्तूणीद्वयं पृष्ठतो
भस्मस्तोमपवित्रलाञ्छनमुरो धत्ते त्वचं रौरवीम् ।
मौर्व्या मेखलया नियन्त्रितमधोवासश्च माञ्जिष्ठकं
पाणौ कार्मुकमक्षसूत्रवलयं दण्डोऽपरः पैप्पलः ॥
(उ. च., ४, २०)

( याच्या पाठीवर दोन भाते आहेत. त्यांच्यातील बाणांना लावलेल्या कंक पक्ष्याच्या पिसांना याची शिखा स्पर्श करीत आहे. भस्माचे पवित्र पट्टे ओढलेल्या याच्या वक्षःस्थलावर रुरु हरणाचे चर्म दिसत आहे. याने नेसलेले अधोवस्त्र मंजिष्ठेच्या रंगाने रंगविलेले असून ते मौर्वी मेखलेने आवळलेले आहे. याने हातात धनुष्य, रुद्राक्षाचे वलय आणि पिंपळाचा दंड धारण केला आहे. )

नंतर तो अरुन्धतीला विचारतो, 'हा कोणाचा मुलगा आहे असे तुम्हाला वाटते बरं ?' अरुन्धती त्या प्रश्नाचे उत्तर देण्याचे टाळते आणि म्हणते, 'आम्हीही आजच आलो.' तेव्हा जनक कञ्चुकीला त्याविषयी वाल्मीकीला विचारावयास आणि त्या कुमाराला आपल्याकडे पाठविण्यास सांगतो. जनकाचा निरोप ऐकताच लव आपल्या सोबत्यास जाण्यास सांगून त्यांच्याकडे येतो. ते सर्व पूज्य असले तरी त्यांची नावे, पौर्वापर्यक्रम व कुळे माहीत नसल्यामुळे त्यांना कोणत्या क्रमाने व कसा नमस्कार करावा हा प्रश्न त्याच्यापुढे उभा राहतो. पण तो 'एष वो लवस्य प्रणामपर्यायः ।' (हा आपणास ह्या लवाचा यथाक्रम नमस्कार) असे म्हणून तो प्रश्न सोडवतो. अरुन्धती त्याला मांडीवर घेते. नंतर कौसल्याही त्याला घेते. तेव्हा त्याची आगलद, आवाज व शरीरस्पर्श हा रामासारखा आणि त्याचा तोंडावळा सीतेसारखा असल्याचे तिच्या लक्ष्यात येते. जनकही म्हणतो—

वत्सायाश्च रघूद्वहस्य च शिशावस्मिन्नभिव्यज्यते
सम्पूर्णप्रतिबिम्बितेव निखिला सैवाकृतिः सा द्युतिः ।
सा वाणी विनयः स एव सहजः पुण्यानुभावोऽप्यसौ
हा हा दैव किमुत्पथैर्मम मनः पारिप्लवं धावति ।।
(उ. च., ४, २२)

(माझ्या कन्येची आणि रामभद्राची सबंध आकृति आणि कांति या मुलामध्ये पूर्णपणे प्रतिबिम्बित झालेली दिसते. तीच वाणी, तोच स्वाभाविक विनय आणि तोच पावन प्रभाव ! हाय ! हाय ! देवा ! माझे चंचल मन भलत्याच मार्गांनी का बरे धावत आहे ?)

मग ते त्याला त्याच्या आईबापाविषयी विचारतात. पण त्याला त्याची माहिती नसते. 'मग तू कोणाचा ?' असा त्यांनी प्रश्न करताच 'मी भगवान् वाल्मीकींचा' असे तो उत्तर देतो.

इतक्यात 'कोणीही आश्रमाच्या परिसरात भ्रमण करू नये' अशी कुमार चन्द्रकेतूची सैनिकाना दिलेली आज्ञा पडद्यातून ऐकू येते. तेव्हा 'हा चन्द्रकेतु कोण ?' असे लव विचारतो. तो लक्ष्मणाचा पुत्र असे जनकाने सांगताच लव त्याच्या उर्मिला मातेचे व मातामह जनकाचे नाव सांगून आपले रामायणाचे ज्ञान प्रकट करतो. तेव्हा जनक त्याला विचारतो, 'तुला इतकी माहिती आहे तर दशरथाच्या पुत्रांना कोण-कोणत्या स्त्रियांपासून किती मुले झाली व त्यांची नावे काय हे सांग.' त्यावर लव म्हणतो, 'हा रामायणाचा भाग वाल्मीकींनी रचला आहे, पण तो अद्यापि प्रकाशित केला नाही. त्यांना तो फार महत्त्वाचा वाटतो. त्याच्या एका प्रकरणाला नाटकाचे रूप देऊन त्यांनी तो आपल्या शिष्याकरवी भरतमुनींकडे पाठविला आहे आणि त्याच्या रक्षणार्थ माझा थोरला कुळा भाऊ कुश धनुष्य घेऊन गेला आहे.' नंतर 'भगवान् वाल्मीकींनी कोठपर्यंत रामायण रचलेले तुला माहीत आहे ?' असे जनकाने विचार-ताच लव सांगतो, 'पौरजनाच्या मिथ्या अपवादाने उद्विग्न होऊन रामाने त्याग केलेल्या व प्रसूति जवळ आलेल्या सीतेला अरण्यात एकटी सोडून लक्ष्मण परत गेला तेथपर्यंत.' ते ऐकताच जनकाला पौरजन आणि राम यांच्याविषयी क्रोध उफाळून येतो आणि तो म्हणतो—

एतद्वैशसवज्रघोरपतनं शश्वन्ममोत्पश्यतः
क्रोधस्य ज्वलितुं झटित्यवसरश्चापेन शापेन वा ।

(या सीतात्यागरूपी घोर वज्राघाताचे सदैव चिंतन करणाऱ्या माझ्या क्रोध चापाने किंवा शापाने एकदम प्रज्वलित होण्याचा हा समय आला आहे.)

हे ऐकताच कौसल्येचा भयाने थरकाप होतो आणि ती अरुन्धतीला जनकाचा क्रोध शांत करण्याविषयी विनविते. तेव्हा अरुन्धती त्याला म्हणते, ' राजा, राम हा तुझाच मुलगा आहे आणि दीन प्रजेचे तर तू रक्षण केले पाहिजे. ' तेव्हा जनक म्हणतो—

शान्तं वा रघुनन्दने तदुभयं तत्पुत्रभाण्डं हि मे
भूयिष्ठद्विजबालवृद्धविकलस्त्रैणश्च पौरो जनः ॥

( उ. च., ४, २५ )

( पण येथे चाप आणि शाप ही दोन्हींचा उपयोग करणे योग्य नाही. कारण राम हे माझे पुत्रधन आहे आणि पौरजनामध्ये बहुतांशी द्विज, बाल, वृद्ध, पंगू आणि स्त्रिया आहेत. )

इतक्यात काही बटु गडबडीने प्रवेश करून त्याला सांगतात, ' आपल्या देशात घोडा म्हणून कोणी प्राणी आहे असे म्हणतात; तो आम्ही आज प्रत्यक्ष पाहिला. त्याचे वर्णन ऐका—

पश्चात्पुच्छं वहति विपुलं तच्च धूनोत्यजस्रं
दीर्घग्रीवः स भवति खुरास्तस्य चत्वार एव ।
शष्पाण्यत्ति प्रकिरति शकृत्पिण्डकानाम्रमात्रान्
किं व्याख्यातैर्व्रजति स पुनर्दूरमेह्येहि यामः ॥

( उ. च., ४, २६ )

( त्याला पाठीमागे मोठे शेपूट आहे. ते तो सारखा हलवीत असतो. त्याची मान लांब आहे. त्याला चारच खूर आहेत. तो गवत खातो आणि आंब्याएवढे शेणाचे गोळे टाकतो. सांगून काय उपयोग ? तो दूर चालला पाहा; चल, आम्ही तर चाललो. )

असे म्हणून ते त्याला ओढून नेतात. इतक्यात कंचुकी येऊन जनकादिकांना सांगतो, ' भगवान् वाल्मीकींनी सांगितले आहे की योग्य वेळी तुम्हाला सर्व समजेल. ' तेव्हा ते सर्व वाल्मीकीला त्याविषयी विचारण्यास जातात.

घोड्याला पाहताच तो अश्वमेधाचा आहे असे लवाला समजते. बटूंनी त्याबद्दल विचारताच तो त्यांना म्हणतो, ' मूर्खांनो, तुम्हांला त्या काडात पडलेले आठवत नाही काय ? अश्वमेधाच्या रक्षणाकरिता शंभर शंभर कवच धारण केलेले, दण्डधारी, भातेवाले असे सैनिक असावे. त्यासारखेच हे सैन्य दिसते ' इतक्यात पडद्यातून एका सैनिकाची घोषणा ऐकू येते—

योऽयमश्वः पताकेयमथवा वीरघोषणा ।
सप्तलोकैकवीरस्य दशकण्ठकुलद्विषः ॥ ( उ. च., ४, २७ )

( हा अश्व म्हणजे सप्त लोकांतील अनुपम वीर आणि रावणाच्या कुलाचा संहार करणारे रामचंद्र यांची पताका किंवा वीरघोषणा आहे.)

ते ऐकून त्याचा अभिमान डिवचला जातो. तो म्हणतो, ' काय पृथ्वीवरील सर्व क्षत्रिय नाहीसे झाले म्हणून तुम्ही ही घोषणा करीत आहा ? ' त्यावर तो सैनिक पश्चात्तापून म्हणतो ' अरे आमच्या महाराजांसमोर कुठले क्षत्रिय ? ' तेव्हा लव उत्तरतो —

यदि ते सन्ति सन्त्येव केयमद्य विभीषिका ।
किमुक्तैरेभिरधुना तां पताकां हरामि वः ॥
( उ. च. ४, २८ )

( क्षत्रिय असतील तर ते आपला प्रभाव दाखवतीलच. आज ही धमकावणी कशाला ? तुम्हाला बोलून काय उपयोग ? हा पाहा मी तुमची ही अश्वरूपी पताका आताच हरण करतो. )

असे म्हणून लव त्या बटूंना घोड्याला ढेकळे मारून हरणांच्या मध्ये चरण्याकरिता नेण्यास सांगतो, तोंच एक सैनिक प्रवेश करून म्हणतो ' आमचे सैनिक मोठे कडवे आहेत. ते पोरानेही उद्धट शब्द ऐकून घेणार नाहीत. राजपुत्र चन्द्रकेतु अरण्य पाहण्यात गुंतला आहे. तो येत नाही तोपर्यंत या झाडीतून पळून जा. ' त्याबरोबरचे बटु त्याला तसे करण्यास सुचवितात. पण लव म्हणतो—

ज्याजिह्वया वलयितोत्कटकोटिदंष्ट्र-
मुद्गारिघोरघनघर्घरघोषमेतत् ।
ग्रासप्रसक्तहसदन्तकवक्त्रयन्त्र-
जृम्भाविडम्बि विकटोदरमस्तु चापम् ॥
(उ. च., ४, २९)

( हे माझे धनुष्य— ज्याच्या मोठ्या अग्ररूपी दाढाना दोरीरूपी जिव्हेने वेष्टिले आहे, जे भयंकर घर्घर असा आवाज करीत आहे, ते-(दोरी लावल्यामुळे) हसत हसत घासावर घास घेणाऱ्या यमाच्या उघड्या जबड्याचे अनुकरण करणारे विशालोदर असे होऊ द्या.) (अंक ४).

हा अंकही उत्तम साधला आहे. तिसऱ्या अंकातील करुण रसाच्या उत्कर्षानंतर प्रेक्षकांच्या मनास थोडी विश्रांति मिळणे जरूर होते. ती या अंकाच्या आरंभीच्या विष्कंभकातील विनोदाने साध्य झाली आहे. पण विनोद हाच केवळ त्या विष्कंभकाचा उद्देश नाही. तो विनोद संविधानकाशी संबद्ध आहे. त्यावरून जनकाच्या मन:स्थिती-

वर प्रकाश पडतो. मुख्य प्रवेशातील सीतेच्या सापवाद नाशामुळे दुःखातिरेकाने आपल्या जीविताला कटाळलेला जनक, त्याच्यासारखीच दुःखी पण आपल्या मुलानेच निष्कारण पत्नीत्यागाचा अपराध केल्यामुळे जनकास कसे भेटावे या विवंचनेत असणारी कौसल्या, त्या दोघांची भेट होण्याकरिता मध्यस्थी करणारी अरुन्धती यांची शब्दचित्रे मनोरम उतरली आहेत. अंकाच्या शेवटी येणारा लव आपल्या विनयाने, सौजन्याने, ज्ञानाने आणि वीरोचित अभिमानाने प्रेक्षकांचे मन आकृष्ट करतो. आश्रमातील बटूंचे अज्ञान व मिस्रेपणा यांयोगे लवाचे गुण विशेष उठून दिसतात. वाल्मीकींच्या आश्रमात वसिष्ठादिकांच्या आगमनाचे प्रस्तुत अंकातील वर्णन दुसऱ्या अंकातील आत्रेयीने दिलेल्या माहितीशी सुसंगत आहे काय या प्रश्नाची चर्चा पुढे करू.

पाचव्या अंकाच्या आरंभी पडद्यातून कोणा सैनिकाचे पुढील शब्द ऐकू येतात.
' हे सैनिकांनो, झाले आमचे रक्षण !

नन्वेद त्वरितसुमन्त्रनुद्यमान-
व्यावल्गत्प्रजवितवाजिना रथेन ।
उत्खातप्रचलितकोविदारकेतु.
श्रुत्वा नः प्रधनमुपैति चन्द्रकेतुः ॥ '

(उ. च., ५, १)

[ सुमन्त्राने त्वरा करून हाकल्यामुळे ज्याचे वेगवान् घोडे दौडत आहेत आणि उंच-सखल भूमीवर ज्याचा कोविदार ध्वज खालीवर होत आहे अशा रथाने चन्द्रकेतु आमच्या युद्धाविषयी ऐकताच (त्वरेने) इकडे येत आहे.]

नंतर आश्चर्य, हर्ष आणि संभ्रम यांनी युक्त असा धनुर्धारी चन्द्रकेतु सुमन्त्र सारथ्यासह रथात बसलेला असा प्रवेश करतो. लवाला युद्ध करताना पाहून तो म्हणतो—

किरति कलितकिञ्चित्कोपरज्यन्मुखश्री-
रविरतगुणगुञ्जत्कोटिना कार्मुकेण ।
समरशिरसि चञ्चत्पञ्चचूडश्चमूना-
मुपरि शरतुषारं कोऽप्ययं वीरपोतः ॥

(उ. च, ५, २)

(ज्याचे सुंदर मुख किंचित् कोपाने आरक्त झाले आहे आणि ज्याच्या मस्तकावरची पाच झुल्पे हलत आहेत असा हा कोणी वीरकुमार, ज्याची प्रत्यंचा एकसारखा आवाज करीत आहे, अशा आपल्या धनुष्याने रणांगणाच्या अग्रभागी शरवृष्टि

करीत आहे ). त्याला पाहताच सुमन्त्राला विश्वामित्राच्या यज्ञाच्या रक्षणार्थ राक्षसांशी युद्ध करणाऱ्या धनुर्धारी रामचंद्राची आठवण होते.[1]

पाहता पाहता लव चन्द्रकेतूच्या सेन्याचा भयंकर संहार करतो. चन्द्रकेतु त्याचे पुढील वर्णन करतो–

आगर्जद्गिरिकुञ्जकुञ्जरघटाविस्तीर्णकर्णज्वरं
ज्यानिर्घोषममन्ददुन्दुभिरवैराध्मातमुज्जृम्भयन् ।
वेल्लद्भैरवरुण्डमुण्डनिकरैर्वीरो विधत्ते भुवं
तृप्यत्कालकरालवक्त्रविघसव्याकीर्यमाणामिव ।।

(उ. च, ५, ६)

[ दुन्दुभीच्या प्रचंड घोषात आपल्या प्रत्यंचेच्या टणत्काराची भर घालून हा वीर गिरिगव्हरात गर्जना करणाऱ्या हत्तींच्या कळपाचा कर्णज्वर वाढवीत आहे; ( मृत सैनिकांची ) लोळणारी भयंकर कबंधे व मस्तके यांनी आच्छादिलेली रणभूमि जणू कार तृप्त झालेल्या काळाच्या भीषण मुखातून गळलेल्या घासांनी भरून गेली आहे].

नतर चन्द्रकेतूचे सैन्य पराभूत होऊन माघार घेते. तेव्हा तो पुढे होऊन लवास म्हणतो–

भो भो लव महाबाहो किमेभिस्तव सैनिकैः ।
एषोऽहमेहि मामेव तेजस्तेजसि शाम्यतु ।।

(उ. च, ५–७)

( हे महावीर लवा ! या सैनिकांशी तुला काय करावयाचे आहे ? हा मी येथे आहे. माझ्याशीच युद्ध कर. तेज तेजात शांत होवो ! ) लवाला त्याचे आव्हान ऐकून आनंद होतो. तो म्हणतो, 'तू खरा इक्ष्वाकुवंशी आहेस. हा मी आलोच.'

पण त्याची पाठ फिरताच सैनिक त्याच्यावर हल्ला करण्याकरिता पुढे सरसा-वतात. तेव्हा तो पुनः त्यांच्याकडे वळतो. ही त्याची द्विधा वृत्ति चन्द्रकेतु खालील श्लोकात वर्णन करतो–

१. विश्वामित्रावरोबर राम व लक्ष्मण पायी गेले होते. त्यांना क्षुधा, श्रम भासू नयेत म्हणून विश्वामित्राने त्यांना बला व अतिबला या विद्या दिल्या असे 'रामायणा'त वर्णन आहे (रामायण, बालकाण्ड, २१, ६–१७). कालिदासानेही असेच वर्णन केले आहे (रघु. ११, ९). तेव्हा रथ आणि सारथि सुमन्त्र त्यांच्या-बरोबर नव्हते. म्हणून सुमन्त्राला रामाने त्या प्रसंगी राक्षसांशी केलेल्या युद्धाचे स्मरण होणे शक्य नाही. येथे भवभूतीची अनवधानाने चूक झालेली दिसते.

दर्पेण कौतुकवता मयि बद्धलक्ष्यः
पश्चाद्बलैरनुसृतोऽप्यमुदीर्णधन्वा ।
द्वेधा समुद्धतमरुत्तरलस्य धत्ते
मेघस्य माघवतचापधरस्य लक्ष्मीम् ॥ (उ. च., ५, ११)

(कुतूहलयुक्त गर्वाने हा माझ्याकडे पाहत आहे. तितक्यात मागून सैनिक चाल करून आल्यामुळे त्याच्याशी युद्ध करण्यासाठी याने आपले धनुष्य उचलून धरले आहे. म्हणून हा दोन्ही दिशांनी वाहणाऱ्या वाऱ्यात सापडलेल्या इन्द्रधनुष्ययुक्त मेघाची शोभा धारण करीत आहे.)

येथे सुंदर निदर्शना अलंकार साधला आहे.

तेव्हा चन्द्रकेतूशी बोलण्याकरिता सैनिकांची गडबड थांबवणे जरूर होते. म्हणून लव जृम्भकास्त्राचा त्यांच्यावर प्रयोग करतो. त्याबरोबर ते निद्रावश होऊन त्यांचा गलबला शांत होतो. याला जृंभकास्त्रे कशी प्राप्त झाली याचे सुमन्त्राला आश्चर्य वाटते. कारण ती विश्वामित्राकडून फक्त रामचंद्रालाच मिळाली होती. पण इतरही मन्त्रद्रष्ट्या ऋषींना त्याचे ज्ञान झाले असेल असे सांगून चन्द्रकेतु सुमन्त्राच्या शंकेचे निराकरण करतो. लवाला पाहताच तो सीतेचा पुत्र असावा असे सुमन्त्राला वाटते, पण ' लतायां पूर्वलूनायां प्रसवस्योद्भवः कुतः । ' (लताच पूर्वी छेदिली असल्यामुळे तिच्यापासून फुले कशी मिळतील ? ) असे म्हणून तो ती कल्पना असंभवनीय मानतो. आपण रथात बसून पादचारी लवाशी युद्ध करणे हे धर्मयुद्धाच्या नियमाविरुद्ध आहे असे वाटून चन्द्रकेतु रथातून खाली उतरतो. त्याला पाहून लवाच्या मनात विरुद्ध भावनांचा कल्लोळ उठतो. तो म्हणतो—

यथेन्दावानन्दं व्रजति समुपोढे कमलिनी
तथैवास्मिन् दृष्टिर्मम कलहकामः पुनरयम् ।
रणत्कारक्रूरक्वणितगुणगुञ्जद्गुरुधनु-
र्धृतप्रेमा बाहुर्विकचविकरालोल्बणरसः ॥
(उ. च., ५, २६)

( चन्द्र उगवला असता जसा कमलिनीला आनंद होतो तसा या चन्द्रकेतूला पाहिल्यावर माझ्या दृष्टीला झाला आहे. पण टणत्काराच्या भयंकर आवाज करणाऱ्या प्रत्यंचेने निनादित असे हे मोठे धनुष्य धारण करण्याची ज्याला आवड आहे तो भीषण वीररसाने युक्त असा माझा बाहु कलहाची इच्छा करीत आहे. )

या श्लोकाच्या पूर्वार्धात चंद्रकेतूला पाहून लवाला होणाऱ्या आनंदाचे वर्णन असल्यामुळे त्यात वैदर्भी रीतीतल्या प्रमाणे कोमल वर्णांच्या शब्दांची योजना करून

समास टाळले आहेत, पण उत्तरार्धांत वीररसाचे वर्णन असल्यामुळे तो कठोरवर्णयुक्त समासप्रचुर गौडी शैलीत रचला आहे.

रथातून उतरल्यावर चन्द्रकेतु आपला वृद्ध सारथी सुमन्त्र याला नमस्कार करतो. तोही 'महान् आदिवराह अनिष्टांचा पराजय करो' असा त्याला आशीर्वाद देतो. आपण पादचारी असल्यामुळे आपणाशी युद्ध करण्याकरिता चन्द्रकेतु रथातून उतरला आहे असे पाहताच लव त्याला रथात बसून युद्ध करण्यास सांगतो. तेव्हा चन्द्रकेतु म्हणतो, 'तर मग तूही दुसऱ्या रथात बसून युद्ध कर.' त्यावर लव म्हणतो, 'आम्ही अरण्यवासी! आम्हाला रथात बसण्याची सवय नाही.' त्याचे सौजन्य आणि गर्व यांनी युक्त असे आचरण पाहून सुमन्त्र म्हणतो, 'तुला रामभद्र राजांनी पाहिले असते तर त्यांचे हृदय उचंबळून आले असते.' त्यावर लव उत्तर करतो–

वयमपि न खल्वेवप्रायाः क्रतुप्रतिघातिनः
क इह न गुणैस्तं राजानं जनो बहु मन्यते ।
तदपि खलु मे स व्याहारस्तुरंगमरक्षिणां
विकृतिमखिलक्षत्राक्षेपप्रचण्डतयाऽकरोत् ।।

(उ. च., ५, २८)

('आम्ही सुद्धा प्रायः याप्रमाणे यज्ञात विघ्न उत्पन्न करीत नसतो. या आश्रमात कोणाला त्या राजाविषयी त्याच्या गुणांमुळे आदर वाटत नाही? तरीही त्या अश्वरक्षकाचे ते आव्हान सर्व क्षत्रियांचा उपमर्द करणारे आणि म्हणून भयंकर असल्यामुळे मला क्रोध आला.')

त्यावर लव विचारतो, 'काय? आमच्या ताताच्या (रामचंद्राच्या) प्रतापोत्कर्षामुळे तुला राग आला?' तेव्हा लव म्हणतो, 'राग आला असो वा नसो. पण मी विचारतो, 'राजा रामचंद्र हा स्वतः शांतवृत्तीचा आहे असे आम्ही ऐकतो. तो स्वतः गर्विष्ठ नाही आणि त्याची प्रजाही गर्विष्ठ होत नाही. असे असता त्याचे सेवक राक्षसी वाणी कशी उच्चारतात?

ऋषयो राक्षसीमाहुर्वाचमुन्मत्तदृप्तयोः ।
सा योनिः सर्ववैराणां सा हि लोकस्य निर्ऋतिः ।।

(उ. च., ५, २९)

(उन्मत्त आणि गर्विष्ठ यांच्या वाणीला ऋषि राक्षसी वाणी म्हणतात. तिच्यापासून सर्व वैर उद्भवते. तीच लोकाला अधोगतीला नेते.)' पुढे तो म्हणतो, ऋषि दुसऱ्या प्रकारच्या वाणीनी अशी स्तुति करतात—

कामान् दुग्धे विप्रकर्षत्यलक्ष्मीं
कीर्तिं सूते दुष्कृतं या हिनस्ति ।
तां चाप्येतां मातरं मङ्गलानां
धेनुं धीराः सूनृतां वाचमाहुः ।। (उ. च., ५, ३०)

( ती दुसरी वाणी इष्ट वस्तु देते, दारिद्र्य नाहीसे करते, कीर्ति उत्पन्न करते आणि पाप लयाला नेते. सर्व मंगलांची जननी अशी जी गोड वाणी तिला शहाणे लोक कामधेनु म्हणतात. )

लवाचे ते भाषण ऐकून सुमन्त्र म्हणतो 'हा भगवान् वाल्मीकीचा शिष्य वैदिक संस्काराने युक्त असे बोलतो.'

नंतर लव चन्द्रकेतूला म्हणतो, 'मवाशी तू म्हणालास, आमच्या ताताच्या प्रतापोत्कर्षामुळे तुला राग आला काय ? तर मी विचारतो क्षात्रधर्म विशिष्ट व्यक्तींच्या बाबतीतच योग्य होतो काय ?'

त्यावर सुमन्त्र म्हणतो, 'सैनिकाचा संहार करून तू आपला पराक्रम दाखविलास खरा. पण जामदग्न्याचे दमन करणाऱ्या रामचन्द्रांच्या विषयी तू असे बोलू नये.' तेव्हा लव हसून म्हणतो, 'यात प्रौढी ती कोणती ?

सिद्धं ह्येतद्वाचि वीर्यं द्विजानां
बाह्वोर्वीर्यं यत्तु तत्क्षत्रियाणाम् ।
शस्त्रग्राही ब्राह्मणो जामदग्न्य-
स्तस्मिन्दान्ते का स्तुतिस्तस्य राज्ञः ।।'

( उ. च., ५, ३२ )

( ही गोष्ट प्रसिद्धच आहे की ब्राह्मणाचे बल त्याच्या वाणीत असते. बाहूचे बल क्षत्रियाचेच. जामदग्न्य हा शस्त्रधारी असला तरी ब्राह्मणच. त्याचे दमन केले म्हणून त्या राजाची एवढी स्तुति कशाला ? ) त्यावर चन्द्रकेतु खवळून म्हणतो—

कोऽप्येष संप्रति नवः पुरुषावतारो
वीरो न यस्य भगवान् भृगुनन्दनोऽपि ।
पर्याप्तसप्तभुवनाभयदक्षिणानि
पुण्यानि तातचरितान्यपि यो न वेद ।।

(उ. च., ५, ३३ )

( हा कोणी नवीन वीरपुरुष पृथ्वीवर अवतरला पाहा—जो भगवान् परशुरामालाही वीर समजत नाही; आणि ज्याला सातही भुवनांना ज्याच्यामुळे अभय दक्षिणा मिळाली ती आमच्या ताताची पावन चरितेही माहीत नाहीत ! )

तेव्हा लव उपरोधिकपणे म्हणतो--रघुपति रामचंद्राचे चरित्र आणि महिमा कोणाला माहीत नाहीत ? पाहा —

वृद्धास्ते न विचारणीयचरितास्तिष्ठन्तु किं वर्ण्यते
सुन्दस्त्रीदमनेऽप्यकुण्ठयशसो लोके महान्तो हि ते ।
यानि त्रीण्यपराङ्मुखान्यपि पदान्यासन्खरायोधने
यद्वा कौशलमिन्द्रसूनुनिधने तत्राप्यभिज्ञो जनः ।।

(उ. च., ५, ३४)

(वृद्धांच्या चरित्राचा विचार करणे न लगे. त्यांच्याविषयी काय सांगावे ? सुन्दस्त्री ताटका हिचा वध त्यांनी केला तरी त्यांच्या कीर्तीत कमीपणा आला नाही. ते जगात थोरच गणले जातात. खर राक्षसाशी युद्ध करताना पराङ्मुख न होता त्यांनी जी तीन पावले (मागे) घेतली त्यांच्याविषयी आणि इंद्रपुत्र वाली याचा वध करताना जे कौशल्य दिसले त्याविषयीही लोकांना माहिती आहे.)

हे लवाचे उपरोधिक भाषण ऐकून चन्द्रकेतूचा क्रोध अनावर होतो. त्यालाही राग येतो. तेव्हा सुमन्त्र त्या दोघाचे वर्णन करतो–

चूडामण्डलबन्धनं तरलयत्याकूतजो वेपथुः
किंचित्कोकनदच्छदस्य सदृशे नेत्रे स्वयं रज्यतः ।
धत्ते कान्तिमकाण्डताण्डवितयोर्भङ्गेन वक्त्रं भ्रुवो-
श्चन्द्रस्योत्कटलाञ्छनस्य कमलस्योद्भ्रान्तभृङ्गस्य च ।।

(उ. च., ५, ३५)

(रागाने उत्पन्न झालेल्या कंपामुळे यांच्या शिखामंडलाची बन्धने हलत आहेत. याचे डोळे आपोआप लाल होऊन रक्तवर्ण कमलाच्या पाकळ्यासारखे दिसू लागले आहेत. भुवयाच्या आकस्मिक नाचण्याने याचे मुख ज्याच्यावरील कलंक स्पष्ट आहे अशा चन्द्राची आणि ज्याच्या आत भृंग फिरत आहे अशा कमलाची शोभा धारण करीत आहे.)

या श्लोकातही सुंदर निदर्शना अलंकार साधला आहे.

नंतर ते दोघेही युद्धाला योग्य अशा भूमीकडे जातात. (अंक ५)

हाही अंक चांगला झाला आहे. यामध्ये चन्द्रकेतु व लव यांचे शौर्य, परस्परांच्या बाबतीत सौजन्य, क्षत्रियोचित अभिमान इत्यादि गुण त्यांच्या भाषणातून स्पष्ट झाले आहेत. या अंकाच्या शेवटी लव न कळत प्रत्यक्ष आपल्या पित्याच्या कृत्यावर टीका करताना पाहून प्रेक्षकांस मौज वाटत असेल. या प्रसंगाच्या बाबतीत

क्षेमेन्द्राने औचित्यभंगाचा दोष दाखविला आहे. पण त्यात काही तथ्य नाही. नायक म्हटला म्हणजे त्याचे कोणत्याही बाबतीत वैगुण्य दाखवू नये असा नियम आधुनिक टीकाशास्त्रात तरी संमत होणे शक्य नाही. भवभूतीलाही त्यात काही वावगे दिसले नसावे.

सहाव्या अंकाच्या आरंभीही एक विष्कंभक घातला आहे. त्यात एक विद्याधर आणि त्याची पत्नी विद्याधरी विमानात असून लव आणि चन्द्रकेतु यांच्या युद्धाचे वर्णन करतात. या वर्णनाच्या गद्यात तसेच पद्यातही भवभूतीने समासप्रचुर गौडी शैलीचा उपयोग केला आहे. चन्द्रकेतु आणि लव यांच्या अद्‌भुत युद्धाने देव तसेच असुर यांच्यामध्ये खळबळ उडते. आकाशात दुंदुभी वाजविल्या जातात आणि दोन्ही कुमारांवर दिव्य पुष्पांची वृष्टि होते. चन्द्रकेतु प्रथम आग्नेय अस्त्राचा उपयोग करतो. तेव्हा विद्याधर सर्वत्र पसरणाऱ्या अग्नीचे वर्णन करतो—

अवदग्धकर्बुरितकेतुचामरैरपयातमेव हि विमानमण्डलैः ।
दधति ध्वजांशुकपटाञ्चलेष्विमाः क्षणकुङ्कुमच्छुरणविभ्रमं शिखाः ।।

(उ. च., ६, ४)

(ज्यांचे ध्वज व चवऱ्या किंचित् जळल्यामुळे काळसर झाल्या आहेत असे विमानांचे समूह दूर जात आहेत. त्यांच्या ध्वजांवर लावलेल्या पताकांच्या अग्रभागावर अग्नीच्या ज्वाला क्षणभर केसरी रंगाची शोभा धारण करीत आहेत.)

त्यावर लवाने वारुणास्त्र फेकून त्या आग्नेयास्त्राला शान्त केले, तेव्हा सर्व दिशा काळ्याकुट्ट मेघांनी व्यापल्या गेल्या. पण त्यामुळे प्रलयकाळ जवळ आल्यासारखा वाटू लागला. तेव्हा चन्द्रकेतूने वायव्यास्त्राचा प्रयोग केला आणि मग—

विद्याकल्पेन मरुता मेघानां भूयसामपि ।
ब्रह्मणीव विवर्तानां क्वापि विप्रलयः कृतः ।।

(उ. च., ६, ६)

(*सम्यग्ज्ञानाने ब्रह्माच्या ठिकाणी भासमान होणाऱ्या सृष्टीचा विलय व्हावा त्याप्रमाणे* त्या वायव्यास्त्राने उत्पन्न झालेल्या झञ्झावाताने ते मेघ कोठेच्या कोठे नाहीसे झाले.) या श्लोकात केवलाद्वैत वेदान्तातील विवर्तवादाचा उपमेकरिता उपयोग केला आहे.

इतक्यात दुरून ते युद्ध पाहून आपल्या मधुर शब्दांनी ते भावविन्यास सांगत शम्बूकवधानंतर परत येणारा राम त्या युद्ध करणाऱ्या कुमारांच्या मध्येच आपले विमान उतरवतो. तेव्हा लव शांत होतो आणि चन्द्रकेतु त्याला प्रणाम करतो. तेव्हा ते विद्याधर जोडपे निघून जाते. नंतरच्या मुख्य प्रवेशात राम पुष्पकविमानातून उतरून

चन्द्रकेतूला आलिंगतो. तेव्हा चन्द्रकेतु 'माझ्याप्रमाणेच किंबहुना माझ्यावरच्यापेक्षाही जास्त प्रेमाने या वीराला पाहावे' अशी विनंती रामाला करतो. रामाला लवाची मधुर आणि गम्भीर आकृति पाहून आश्चर्य वाटते. तो म्हणतो—

त्रातुं लोकानिव परिणतः कायवानस्त्रवेदः
क्षात्रो धर्मः श्रित इव तनुं ब्रह्मकोशस्य गुप्त्यै ।
सामर्थ्यानामिव समुदयः संचयो वा गुणाना-
माविर्भूय स्थित इव जगत्पुण्यनिर्माणराशिः ॥

(उ. च., ६, ९)

(हा जणू काय सर्व जगताच्या संरक्षणार्थ शरीर धारण केलेला धनुर्वेद, किंवा वेद-निधीच्या रक्षणार्थ अवतरलेला क्षात्रधर्म वाटतो. याच्या ठिकाणी सर्व सामर्थ्ये व अखिल गुण एकत्र आले आहेत. हा जणू काय जगाच्या पुण्याचा संचयच साक्षात् उभा आहे.)

लवही रामाला पाहून त्याच्या महानुभावत्वाने आकृष्ट होतो. तो म्हणतो—

विरोधो विश्रान्तः प्रसरति रसो निर्वृतिघन-
स्तदौद्धत्यं क्वापि व्रजति विनयः प्रह्वयति माम् ।
झटित्यस्मिन् दृष्टे किमिव परवानस्मि यदि वा
महार्घस्तीर्थानामिव हि महतां कोऽप्यतिशयः ॥

(उ. च., ६, ११)

(याला पाहताच माझा विरोध मावळला आहे. माझ्या सर्वांगांत आनंद पसरत आहे. माझ्या ठिकाणचा उद्दामपणा कोठल्या कोठे गेला आहे. विनयाने मी नम्र झालो आहे. यांना पाहताच मी असा पराधीन कसा बरे झालो? तीर्थांच्या प्रमाणे महात्म्यांचाही प्रभाव काही विलक्षण असतो!)

रामालाही त्याला पाहताच आनंदे दुःख नाहीसे होऊन त्याच्याविषयी आपल्या अंतःकरणात प्रेम उत्पन्न झाले याचे आश्चर्य वाटते. अथवा यात आश्चर्य कसले?

व्यतिषजति पदार्थानान्तरः कोऽपि हेतु-
र्न खलु बहिरुपाधीन्प्रीतयः संश्रयन्ते ।
विकसति हि पतङ्गस्योदये पुण्डरीकं
द्रवति च हिमरश्मावुद्गते चन्द्रकान्तः ॥

(उ. च., ६, १२)

लव चन्द्रकेतूला 'हे कोण?' म्हणून विचारतो. त्यावर चन्द्रकेतु म्हणतो, 'प्रिय

वयस्या, हे आमचे ज्येष्ठ पूज्य तात !' तेव्हा 'तू मला प्रिय वयस्य म्हणालास तेव्हा मलाही धर्मतः ते तसेच आहेत' असे म्हणून तो रामाला नमस्कार करताना म्हणतो, 'हे तात, हा वाल्मीकीचा शिष्य लव आपणास नमस्कार करीत आहे.' रामाला प्रेमाचे भरते येऊन तो त्याला आलिंगन देतो. तेव्हा लवाला आपण अश्वाच्या विरुद्ध शस्त्र उचलले याची लाज वाटून तो म्हणतो, 'तातानी या लवाला त्याच्या पोरकट कृत्याबद्दल क्षमा करावी.' 'सैनिकानी आपल्या प्रतापाची घोषणा केल्यावर लवाला राग येऊन त्याने वीरोचित वर्तन केले' असे चन्द्रकेतूने सांगताच राम म्हणतो—

न तेजस्तेजस्वी प्रसृतमपरेषां प्रसहते
स तस्य स्वो भावः प्रकृतिनियतत्वादकृतकः ।
मयूखैरश्रान्तं तपति यदि देवो दिनकरः
किमाग्नेयो ग्रावा निकृत इव तेजांसि वमति ॥

( उ. च., ६, १४ )

( तेजस्वी पुरुषाला दुसऱ्याचे तेज सहन होत नाही. तो त्याचा अकृत्रिम स्वाभाविक भाव आहे. सूर्यदेव आपल्या किरणानी एकसारखा तळपत असतो तेव्हा सूर्यकांत मणि, जणू काय स्वतःचा अपमान झाल्याप्रमाणे, आपले तेज का बाहेर फेकतो ? )

नंतर चंद्रकेतु लवाच्या जृंभकास्त्रानी स्तम्भित झालेले आपले सैन्य रामाला दाखवितो. रामाच्या सांगण्यावरून लव ती अस्त्रे मागे घेतो. लवाला जन्मापासून ती अस्त्रे प्राप्त झाल्याबद्दल रामाला आश्चर्य वाटते, पण कदाचित् पूर्वजन्मीच्या पुण्य-कृत्याचा तो परिणाम असेल असे तो स्वतःचे समाधान करतो. लवाकडून त्याच्या कुश नामक जुळ्या वडील भावाबद्दल रामाला माहिती मिळते. इतक्यात लवाच्या सैनिकाशी झालेल्या चकमकीने क्रुद्ध झालेला कुश प्रवेश करतो. त्याच्या ठिकाणचा पौरुषयुक्त आवेश राम पुढीलप्रमाणे वर्णन करतो—

दृष्टिस्तृणीकृतजगत्त्रयसत्त्वसारा
धीरोद्धता नमयतीव गतिर्धरित्रीम् ।
कौमारकेऽपि गिरिवद्गुरुतां दधानो
वीरो रसः किमयमेत्युत दर्प एव ॥

( उ. च., ६, १९ )

( आपल्या दृष्टीने हा त्रिभुवनातील सर्व पराक्रमी पुरुषाना तुच्छ लेखीत आहे. गाम्भीर्य आणि औद्धत्य यानी युक्त अशी याची पावले जणू काय पृथ्वीला नमवीत आहेत. हा वयाने लहान असला तरी याच्या ठिकाणी पर्वताचे गुरुत्व आहे. हा जणू काय साक्षात् वीररस किंवा उद्दामपणाच भासत आहे. )

नंतर लव त्याच्याजवळ जाऊन म्हणतो 'हे रामचंद्र आमच्यावर प्रेम करतात आणि तुमच्या सान्निध्याविषयी उत्सुक आहेत. हा चन्द्रकेतु मला आपला प्रिय वयस्य मानतो म्हणून हे राजर्षि धर्मतः आपलेही तातच आहेत.' 'तर मग हे क्षत्रिय असले तरी याच्याशी विनयाने वागणे हे दूषणीय होणार नाही' असे म्हणून कुश रामाला 'हा मी वाल्मीकीचा शिष्य आपणांस नमस्कार करतो' असे म्हणून नमस्कार करतो. त्याला आलिंगन देताना 'हा माझा मुलगा असेल काय?' अशी शंका रामाच्या मनात येते. कारण,

अङ्गादङ्गात्सृत इव निजस्नेहजो देहसारः
प्रादुर्भूय स्थित इव बहिश्चेतनाधातुरेव ।
सान्द्रानन्दक्षुभितहृदयप्रस्रवेणेव सृष्टो
गात्राश्लेषे यदमृतरसस्रोतसा सिञ्चतीव ।।

(उ. च., ६, २२)

(हा कुश म्हणजे जणू काय माझ्या प्रत्येक अवयवातून प्रेमाने बाहेर पडलेले देहसार आहे, किंवा जणू काय माझे चैतन्यच माझ्या देहातून बाहेर येऊन उभे राहिले आहे, किंवा आनन्दाने उचंबळलेल्या हृदयातून वाहणाऱ्या रसाने हा जणू काय माखून निघाला आहे असा मला भास होतो. याच्या आलिंगनाने माझ्यावर जणू काय अमृतरसाच्या प्रवाहाचे सिंचन होत आहे!)

लवकुशांना पाहिल्यावर त्यांच्या ठिकाणी रघुवंशातील कुमारांची खालील लक्षणे रामाला दिसतात.

कठोरपारावतकण्ठमेचकं वपुर्वृषस्कन्धसुबन्धुरांसकम् ।
प्रसन्नसिंहस्तिमितं च वीक्षितं ध्वनिश्च माङ्गल्यमृदङ्गमांसलः ।।

(उ. च., ६, २५)

(पूर्ण वाढ झालेल्या पारव्याच्या कंठाप्रमाणे श्यामवर्ण, बैलाच्या मानेप्रमाणे सुंदर दिसणारे खांदे, प्रसन्न सिंहाप्रमाणे गंभीर दृष्टि आणि मांगलिक मृदंगाप्रमाणे भरदार आवाज याच्या ठिकाणी दिसत आहेत.)

तसेच त्यांच्यामध्ये सीतेच्या मुखाचे खालील सादृश्यही त्याच्या लक्षात येते--

मुक्ताच्छदन्तच्छविसुन्दरेयं सैवोष्ठमुद्रा स च कर्णपाशः ।
नेत्रे पुनर्यद्यपि रक्तनीले तथापि सौभाग्यगुणः स एव ।।

(उ. च., ६, २७)

(मोत्यांप्रमाणे शुभ्र दन्तकांतीने सुन्दर दिसणारी तीच ओठाची ठेवण आणि तसेच

कान दिसत आहेत. जरी याचे नेत्र (सीतेच्याहून निराळे असे) किंचित् लाल आणि निळे दिसतात[२] तथापि त्याचे सौंदर्य सीतेच्या नेत्राच्या सारखेच आहे.)

नंतर रामाला आणखीही अनेक कारणास्तव कुश आणि लव हे आपलेच पुत्र असावेत असे वाटते. त्या वाल्मीकीच्या आश्रमाजवळच अरण्यात लक्ष्मणाने सीतेला सोडले होते. त्या कुमारांना जृम्भकास्त्रे स्वतः प्रकाशित झाली याचे कारण आपण चित्रप्रदर्शनप्रसंगी तसे वचन दिले होते हे असावे, तसेच ते जुळे भाऊ आहेत आणि आपणही पूर्वी सीतेच्या उदरात द्विधा गर्भग्रन्थि आहे हे स्पर्शाने तिच्याही लक्षात येण्यापूर्वी अनुमान केले होते. तेव्हा हे आपलेच पुत्र असावेत या विचाराने रामाच्या डोळ्यातून अश्रु वाहतात. तेव्हा लव त्याचे कारण विचारतो. त्यावर कुश उत्तर करतो–

विना सीतादेव्या किमिव न हि दुःखं रघुपतेः
प्रियानाशे कृत्स्नं किल जगदरण्यं हि भवति ।
स च स्नेहस्तावानयमपि वियोगो निरवधिः
किमेवं त्वं पृच्छस्यनधिगतरामायण इव ।।

(उ. च., ६, ३०)

(सीतादेवीच्या वियोगाने या रामचंद्राला कोणते बरे दुःख झाले नसेल ? प्रियेचा नाश झाला म्हणजे सर्व जग अरण्यासारखे भासते. या उभयतांचे ते (उत्कट) प्रेम आणि हा अन्त नसलेला वियोग ध्यानात घे. रामायण वाचले नसल्यासारखा तू हे काय विचारीत आहेस ?)

या उत्तरात कुशाने सीतेचा तटस्थाप्रमाणे उल्लेख केलेला पाहून रामाला कुश व लव हे आपले पुत्र असावेत ही कल्पना असंभवनीय वाटते. कुशाच्या भाषणात 'रामायणा'चा उल्लेख आला होता तेव्हा त्यातील काही भाग ऐकण्याची तो इच्छा दर्शवितो. तेव्हा कुश त्या काव्याच्या बालकाण्डाच्या अखेरचे दोन श्लोक म्हणून दाखवतो–

प्रकृत्यैव प्रिया सीता रामस्यासीन्महात्मनः ।
प्रियभावः स तु तया स्वगुणैरेव वर्धितः ।।
तथैव रामः सीतायाः प्राणेभ्योऽपि प्रियोऽभवत् ।
हृदयं त्वेव जानाति प्रीतियोगं परस्परम् ।।

(उ. च., ६, ३१-३२)

---

२. 'नीलरक्तान्तलोचनः' इति महापुरुषलक्षणम् । (घनश्याम) निळे आणि लाल डोळे असणे हे महापुरुषाचे लक्षण आहे.

(सीता स्वभावतःच राम महात्म्याना प्रिय असे आणि ते प्रेम तिने आपल्या गुणांनीच वाढविले होते. त्याप्रमाणेच रामही सीतेला स्वतःच्या प्राणापेक्षाही प्रिय असत. त्या दोघांनी हृदयेच परस्परांचे प्रेम जाणत असत.)

ते श्लोक ऐकल्यावर रामाला पूर्व स्मृति होऊन आपल्या मर्मावरच आघात झाला असे वाटते. नंतर लवही मंदाकिनीजवळच्या चित्रकूट पर्वतावर वनविहार करताना रामाने सीतादेवीला उद्देशून म्हटलेला खालील श्लोक म्हणून दाखवतो—

त्वदर्थमिव विन्यस्तः शिलापट्टोऽयमग्रतः ।
यस्यायमभितः पुष्पैः प्रवृष्ट इव केसरः ।। (उ. च., ६, ३६)

( ही पुढे असलेली शिला जणू काय तुझ्याकरिताच येथे मांडली आहे. तिच्यावर सभोवार या बकुल वृक्षाने आपल्या फुलांचा वर्षाव केला आहे. )

या श्लोकाचा उद्देश आपल्या उपभोगार्थ जणू काय येथे पुष्पशय्या रचली आहे असे सीतेला सूचित करण्याचा आहे. हा श्लोक 'रामायणा'च्या काही आवृत्तींत आढळतो, पण अयोध्याकांडाच्या चिकित्सक आवृत्तीचे संपादक डॉ. प. ल. वैद्य यांना तो त्या कांडात मागाहून घातला गेला असावा असे वाटते. या प्रश्नाची चर्चा पुढे करू.

लवाच्या ध्यानात या श्लोकाचा शृंगारिक अर्थ न आल्यामुळे तो तो श्लोक रामाला म्हणून दाखवतो. पण तो ऐकून रामाला लाजल्यासारखे होते आणि तो आपल्याशीच म्हणतो, 'मुलाचा स्वभाव फारच निरागस. त्यातून हा तर अरण्यात वाढलेला. तेव्हा त्याच्या लक्षात या श्लोकाचा व्यंग्यार्थ आला नाही तर आश्चर्य नाही.' त्या श्लोकामुळे रामाला पूर्वी त्या प्रदेशात आपण केलेल्या विहाराची आठवण होऊन तो म्हणतो—

श्रमाम्बुशिशिरीभवत्प्रसृतमन्दमन्दाकिनी-
मरुत्तरलितालकाकुलललाटचन्द्रद्युति ।
अकुङ्कुमकलङ्कितोज्ज्वलकपोलमुत्प्रेक्ष्यते
निराभरणसुन्दरश्रवणपाशसौम्यं मुखम् ।।
(उ. च., ६, ३७)

(तुझ्या त्या केशराची उटी न लावलेल्या, तरीही स्वभावतःच उज्ज्वल अशा कपोलांनी युक्त असलेल्या आणि अलंकार नसताही सुन्दर दिसणाऱ्या कर्णपाशांनी मनोहर वाटणाऱ्या मुखाची मला आठवण येते—ज्या मुखाने चन्द्रासारखे ललाट श्रमामुळे आलेल्या घर्मबिंदूंच्या योगे थंड वाटणाऱ्या मन्दाकिनी नदीच्या प्रवाहावरून वाहणाऱ्या मन्द झुळुकामुळे भुरभुर उडणाऱ्या केसांनी झाकून गेले होते.)

इतक्यात पडद्यातून कोणाचे तरी पुढील शब्द ऐकू येतात—'मुलाचे युद्ध चालले आहे असे ऐकल्यावरून भयभीत होऊन वसिष्ठ, वाल्मीकि, अरुन्धती आणि दशरथाच्या राण्या, लौकर येण्याविषयी उत्सुक असल्या तरी अंतर दूर असल्यामुळे वार्द्धक्याने थकलेल्या अशा पायानी हळूहळू येत आहेत.' आता वसिष्ठ, अरुन्धती आणि जनक याना या परिस्थितीत भेटावे लागणार म्हणून रामाला दुःख होते. 'सात्त्विक तेजामध्येच ज्याचे सुंदर शरीर अवशिष्ट आहे अशा रामाला पाहून प्रथम जनक मूर्छित झाला आणि तो सावध झाल्यावर रामाच्या मातानाही मूर्छा आली आहे' असे कोणाचे तरी शब्द पडद्यातून ऐकू येतात. तेव्हा अत्यंत दुःखित झालेला राम त्याना भेटण्याकरिता पुढे होतो. (अंक ६)

या अंकाच्या आरंभीच्या विष्कंभकात चन्द्रकेतु आणि लव यानी परस्परावर फेकलेल्या अस्त्राचे वर्णन व्यर्थ पाल्हाळाने आले आहे. त्यातील संस्कृत आणि प्राकृत भाषणातही दीर्घ समासाचा उपयोग केला आहे. पण पुढील मुख्य प्रवेशातील राम आणि कुश-लव याच्या भेटीचा प्रसंग बहारीचा साधला आहे. शाकुन्तलात जशी विविध प्रमाणानी सर्वदमन हा आपला पुत्र आहे अशी दुष्यन्ताची खात्री होते तसेच अनेक पुराव्यावरून कुश व लव हे रघुकुलोत्पन्न कुमार आणि सीतेचे पुत्र होत असे अनुमान राम करतो; पण कुशाने तपस्व्याप्रमाणे सीतेचा उल्लेख केल्यामुळे ते चूक असावे असा त्याचा ग्रह होतो. लवाने अर्थ ध्यानात न घेता म्हटलेल्या 'रामायणा'तील शृंगारिक श्लोकाने रामाला लाजल्यासारखे वाटते, तो प्रसंगही भवभूतीने अत्यंत कुशलतेने रेखाटला आहे.

सातव्या अंकातील प्रवेशाचे स्थल गंगातीर हे आहे. भगवान् वाल्मीकीने रामलक्ष्मणादि राजकुटुंबातील मंडळीसह सर्व पौरजानपद प्रजाना बोलावून आणले आहे. तसेच देव, असुर, पशु, पक्षी इत्यादिकाचे नायक आणि चराचर सृष्टीतील प्राणी यानाही एकत्र आणले आहे. गंगातीरी रंगभूमि तयार केली आहे. नंतर गर्भनाटकाला (नाटकातील नाटकाला) सुरवात होते. प्रथम सूत्रधार प्रवेश करून म्हणतो, 'भगवान् वाल्मीकि चराचर जगताला आज्ञा करतात की आम्ही आपल्या आर्ष चक्षूंनी पाहून जे पवित्र आणि करुण व अद्भुत रसानी युक्त असे नाटक रचले आहे ते तुम्ही पाहावे.'

राम प्रेक्षकामध्ये बसला आहे तो म्हणतो—*साक्षात्कृतधर्माण ऋषयः। तेषा-मृतंभराणि भगवता परोरजांसि प्रज्ञानानि न क्वचिद्व्याहन्यन्ते।* (ऋषींना धर्माचा साक्षात्कार झालेला असतो. त्याच्या सत्य स्वरूपाच्या आणि रजोगुणरहित ज्ञानाची गति कोठेही कुंठित होत नाही.)

इतक्यात पडद्यामागे खालील शब्द ऐकू येतात—' हाय ! आर्यपुत्रा, हाय ! लक्ष्मणा, प्रसववेदना सुरू झालेल्या मला ही श्वापदे खाऊ पाहत आहेत. म्हणून दुर्दैवी अशी मी गंगेत उडी घेत आहे.' तेव्हा सूत्रधार 'हे शब्द रामाने त्याग केलेल्या सीतेचे आहेत,' असे सांगून निघून जातो. नंतर एक एक मूल कडेवर घेतलेल्या पृथ्वी आणि गंगा देवता सीतेसह प्रवेश करतात. त्या सीतेला 'तुला दोन पुत्र झाले आहेत' असे सांगतात. तेव्हा तिला बरे वाटते, पण तितक्यात आपले पति रामचंद्र जवळ नाहीत याचे दुःख होते. नंतर पृथ्वी गंगेची आणि गंगा तिची सीतेला ओळख करून देते. सीतेला त्या अवस्थेत पाहून दोघानाही मूर्च्छा येते. सावध झाल्यावर पृथ्वी म्हणते—

**सोढश्चिर राक्षसमध्यवासस्त्यागो द्वितीयस्तु सुदुःसहोऽस्याः ।**

( सीतेने राक्षसाच्या मध्ये राहणे मी चिरकाल सहन केले. पण हे तिजवर आलेले दुसरे त्यागरूपी संकट सहन करणे अत्यंत कठीण आहे. )

त्यावर गंगा उत्तरते—

**को नाम पाकाभिमुखस्य जन्तुर्द्वाराणि दैवस्य पिधातुमीष्टे ।।**

( उ. च., ७, ४ )

(दैवच फळाला येऊ लागल्यावर कोण या कश्चित् प्राणी त्याला अडथळा करू शकेल ? )

रामाने सीतेला टाकावे याचा पृथ्वीला राग येतो, पण गंगा तिची समजूत घालते. पृथ्वीलाही सीतात्यागानंतर रामाला झालेल्या दुःखाची कल्पना असल्यामुळे तिचा क्रोध शांत होतो. सीता पृथ्वीला आपल्या पोटात जागा देण्याविषयी विनंविते; पण पृथ्वी तिला पुत्राच्या पालनपोषणाकरिता तसे करू नको म्हणून सांगते. इतक्यात मोठा आवाज आणि प्रकाश होऊन जृंभकास्त्रे प्रकट होतात आणि 'रामचंद्रांनी चित्रदर्शन-प्रसंगी आम्हांला तुझ्या पुत्रास प्राप्त होण्याविषयी सांगितल्याप्रमाणे आम्ही आलो आहो' असे सीतेस सांगतात. नंतर पृथ्वी सीतेला म्हणते, 'भगवान् वाल्मीकि या मुलांचे क्षत्रियोचित संस्कार करतील. त्यांचे स्तनपान सुटेपर्यंत तू त्याना सांभाळ.' नंतर पृथ्वी, गंगा आणि सीता जातात आणि हे एकांकी गर्भनाटक समाप्त होते.

तेव्हा सीता पाताळात लुप्त झाली असे समजून रामाला मूर्च्छा येते. इतक्यात पडद्यातून खालील शब्द ऐकू येतात —' हा वाद्यवृंद काढून घ्या आणि महर्षि वाल्मीकींनी अनुज्ञा दिलेले हे अद्भुत पाहा.' लक्ष्मण त्याचे पुढील वर्णन करतो—

**मन्थादिव क्षुभ्यति गाङ्गमम्भो व्याप्तं च देवर्षिभिरन्तरिक्षम् ।**
**आश्चर्यमार्या सह देवताभ्यां गङ्गामहीभ्यां सलिलादुदेति ।।**

( उ. च., ७, १६ )

( जणू काय मथन केल्यामुळे गंगेचे पाणी खवळले आहे. देव आणि ऋषि अंतरिक्षात जमले आहेत. काय हे आश्चर्य ! गंगा आणि पृथिवी यांच्यासह सीतावहिनी पाण्यातून बाहेर येत आहे. )

नंतर पडद्यातून खालील एकू शब्द ऐकू येतात–

अरुन्धति जगद्वन्द्ये गङ्गापृथ्व्यौ जुषस्व नौ ।
अर्पितेयं तवावाभ्यां सीता पुण्यव्रता वधूः ॥

( उ. च., ७, १७ )

( हे जगाला वन्द्य असणाऱ्या अरुन्धती ! आम्हा गंगापृथ्वीवर कृपा कर. आम्ही ही पुण्यशील वधू सीता तुझ्या स्वाधीन केली आहे. )

नंतर अरुन्धती आणि सीता प्रवेश करतात. रामाला मूर्छितावस्थेत पाहून अरुन्धती रामाला प्रिय असणाऱ्या आपल्या हाताच्या स्पर्शाने त्याला सावध करण्याविषयी सीतेला सांगते. सीतेने तसे केल्यावर राम सावध होतो. तेव्हा अरुन्धती रामाला गंगेची ओळख करून देते. गंगा पडद्यामागून म्हणते, ‘ रामभद्रा, तू चित्रदर्शन–प्रसंगी अरुन्धतीप्रमाणे सीतेच्या कल्याणाची काळजी वाहाण्याविषयी मला सांगितले होतेस, त्याचे स्मरण कर. त्या ऋणातून मी आज मुक्त झाले आहे. ’ नंतर अरुन्धती रामाला पृथ्वीची ओळख करून देते. तेव्हा पृथ्वी म्हणते, “ तू माझी कन्या सीता हिचा त्याग करताना मला म्हटले होतेस, ‘ भगवती वसुन्धरे, आपल्या सच्छील कन्येची काळजी घे.’ मी तुझ्या वचनाप्रमाणे केले आहे. ”

नंतर अरुन्धती पौरजानपद लोकांना म्हणते, ‘ पृथ्वी आणि गंगादेवी यांनी जिचे चारित्र्य प्रशंसिले आहे अशी ही सीता आताच माझ्या स्वाधीन केली आहे. पूर्वी भगवान् अग्नीने जिच्या पवित्र चारित्र्याची ग्वाही दिली होती, ब्रह्मादि देवांनी जिची स्तुति केली होती ती ही यज्ञभूमीतून उत्पन्न झालेली सीता स्वीकारावी असे त्यांचे सांगणे आहे. यावर तुमचे मत सांगा. ’

तेव्हा अरुन्धतीने याप्रमाणे निर्भर्त्सना केलेले पौरजानपद लोक सीतेला वंदन करतात आणि लोकपाल आणि सप्तर्षि तिच्यावर पुष्पवृष्टि करतात. नंतर अरुन्धती रामाला सीतेचा स्वीकार करण्यास सांगते. राम तसे आनंदाने करतो. सीतेलाही परमानंद होतो. नंतर वाल्मीकि कुशलवांची सीतेशी भेट करवतात. सीतेला आपला पिता जनक, कुलगुरु वसिष्ठ, आपल्या सर्व सासू, नणंद शान्ता आणि तिचा पति ऋष्यशृंग, तसेच पति रामचंद्र आणि पुत्र कुशलव हे सर्व भेटल्याने निरतिशय आनंद होतो.

तितक्यात लवणासुराचा उच्छेद करून मथुरापति शत्रुघ्न आल्याचे समजते. तेव्हा वाल्मीकींनी विचारल्यावरून राम पुढील मागणे मागतो–

पाप्मभ्यश्च पुनाति वर्धयति च श्रेयांसि येयं कथा
मङ्गल्या च मनोहरा च जगतो मातेव गङ्गेव च।
तामेतां परिभावयन्त्वभिनयैर्विन्यस्तरूपां बुधाः
शब्दब्रह्मविदः कवेः परिणतप्रज्ञस्य वाणीमिमाम् ॥

(उ. च., ७, २०)

[ ही कथा जगन्माता ( पृथ्वी ) आणि गंगा यांच्याप्रमाणे मंगलकारक आणि मनोहर असून ( सर्वांना ) पापापासून मुक्त करते आणि कल्याणाची वृद्धि करते. शब्दब्रह्माचे पूर्ण ज्ञान असलेल्या आणि परिणतप्रज्ञ अशा ( भवभूति ) कवीने त्या कथेला अभिनययोग्य रूप ज्यात दिले आहे त्या या ( उत्तररामचरित ) नाटकाचे सज्जन परिशीलन करोत. ] (अंक ७)

या अंकात सीतेच्या चारित्र्याविषयी पौरजानपद लोकांची खात्री पटवून सीतेने सर्व नातलगांची संमेलन घडवून आणले आहे. सीतात्यागानंतर ज्या घटना घडल्या त्यांचे प्रात्यक्षिक एकाकी गर्भनाटकात दाखविलेले आहे. हे नाटक सर्व भूतभविष्याचे ज्ञान असलेल्या भगवान् वाल्मीकीने रचले होते आणि त्याचा प्रयोग भरतमुनींनी अप्सराद्वारे गंगातीरी केला होता. त्या नाटकावरून सर्वांना पूर्वी घटलेल्या घटना माहीत झाल्या. मांग लङ्केत जसे एका अद्भुत घटनेने सीतेचे सच्छील सिद्ध झाले होते तसे ते प्रस्तुत अंकात गंगेच्या खवळलेल्या जलातून सीतेसह बाहेर आलेल्या पृथ्वी व गंगा यांच्या तिच्या सच्चारित्र्याविषयीच्या अद्भुत वचनांनी झाले आहे. शेवटी त्याच्याविषयी ग्वाही सर्व जनांना पूज्य असलेल्या अरुन्धतीने दिली आहे आणि अशा रीतीने सीतेचे सच्चारित्र्य भवभूतीने स्थापित केले आहे.

प्रस्तुत अंकाच्या शेवटी शत्रुघ्न लवणासुरावर विजय मिळवून आल्याचा उल्लेख आला आहे. नाटकाच्या शेवटी एखाद्या विजयाचा उल्लेख करण्याची प्रथा भासाच्या 'स्वप्नवासवदत्त' नाटकापासून पडली होती. ती नंतरच्या कालिदासकृत 'मालविकाग्निमित्र,' हर्षकृत 'रत्नावली' आणि 'प्रियदर्शिका', राजशेखरकृत 'विद्धशालभञ्जिका' इत्यादि नाटकात आढळते. त्या नाटकात विजयप्राप्तीचा त्यांच्या संविधानकाशी थोडाबहुत तरी संबंध आढळतो. आपल्या पूर्वीच्या नाटककारांचे अनुकरण करून भवभूतीने 'उत्तररामचरिता'त केलेल्या शत्रुघ्नाच्या लवणासुरावरील विजयाच्या उल्लेखाचा या सातव्या अंकातील कथानकाशी यत्किंचितही संबंध नाही. शत्रुघ्नाला लवणासुरावर पाठविल्याचा उल्लेख पहिल्या अंकाच्या अखेरीस येतो. तत्पूर्वी राम सीतापरित्यागाच्या कल्पनेने दुःखपरवश झाला होता. कालिदासाने 'अभिज्ञानशाकुन्तला'त शोकमग्न दुष्यन्ताला राग आणण्यासाठी मातलीने विदूषकाला कुकलल्याचा वृत्तान्त घातला आहे.

तशाच काहीशा उद्देशाने भवभूतीने रामाला सीतेपासून दूर करण्याकरिता लवणासुरावरील स्वारीचा उपयोग केलेला दिसतो. पण तो साधला नाही. पहिल्या अंकात लवणासुरावर शत्रुघ्नाला पाठविल्यानंतर शेवटच्या अंकातील त्याच्या विजयप्राप्तीपर्यंत बारा वर्षांचा दीर्घकाल लोटला होता, असे मानले पाहिजे. लवणासुर अयोध्येपासून फार दूर नसलेल्या मथुरेत राज्य करीत होता. त्याचा उच्छेद करण्यास शत्रुघ्नाला लागला इतका काळ रामाला बलाढ्य लंकाधिपति रावणाचा नाश करण्यासही लागला नव्हता. शिवाय या शत्रुघ्नकृत लवणासुरोच्छेदाचा प्रस्तुत नाटकाच्या संविधानकाशी यत्किंचित्ही संबंध नाही. यामुळे ही घटना अत्यंत अनावश्यक वाटते.[१]

## संविधानरचनेतील कौशल्य

'उत्तररामचरिता'चे संविधानक 'वाल्मीकि–रामायणा'च्या उत्तरकांडातून घेतले आहे. भवभूतीने 'रामायणा'चा चांगलाच अभ्यास केला होता. 'महावीरचरित' आणि 'उत्तररामचरित' या दोन नाटकांत भवभूतीने 'रामायणा'तून पाच उतारे घेतले आहेत. त्यांपैकी तीन 'उत्तररामचरिता'त आले आहेत. या नाटकाच्या सहाव्या अंकात कुश 'रामायणा'च्या बालचरितातून म्हणून 'प्रकृत्यैव प्रिया सीता' इत्यादि आणि 'तथैव रामः सीतायाः' इत्यादि असे दोन श्लोक पाठ म्हणून दाखवतो ते किंचित् पाठभेदानी 'रामायणा'च्या बालकांडाच्या चिकित्सक आवृत्तीत पुढील प्रमाणे आलेले आढळतात—

मनस्वी तद्‌गतमनास्तस्या हृदि समर्पितः ।
प्रिया तु सीता रामस्य दाराः पितृकृता इति ।।
गुणाद्रूपगुणाच्चापि प्रीतिर्भूयोऽभिवर्धते ।
तस्याश्च भर्ता द्विगुणं हृदये परिवर्तते ।
अन्तर्गतमपि व्यक्तमाख्याति हृदयं हृदा ।
तस्य भूयो विशेषेण मैथिली जनकात्मजा ।।

यातील एका श्लोकार्धाचा अनुवाद उत्तररामचरिताच्या तिसऱ्या अंकातील सीतेच्या पुढील वचनातही आला आहे--अहमेतस्य हृदयं जानामि ममाप्येषः । ( मी याचे हृदय जाणते आणि हेही माझे हृदय जाणतात. )

---

१. 'वाल्मीकि–रामायणात'ही शत्रुघ्न बारा वर्षांनी रामाच्या भेटीस आला, असे म्हटले आहे. पण तो या दीर्घकाळात केवळ लवणासुराशी युद्ध करीत नसून त्याच्या वधानंतर देशात शांतता प्रस्थापित करणे, त्याला ऐश्वर्यसंपन्न करणे इत्यादि कार्यात गुंतला होता असे म्हटले आहे. उत्तरकांड ( नि. प्र. ), ७०,५–१६, पाहा.

भवभूतीने ' उत्तररामचरित ' पश्चात्वतीच असताना रचले. तेव्हा त्याने ' रामायणा 'च्या उत्तरभारतीय पाठाचा उपयोग केला असला पाहिजे. आणि हे ' उत्तररामचरिता'त ' रामायणा 'तून उद्धृत केलेल्या एका श्लोकावरून सिद्ध करता येते. सहाव्या अंकात लव रामाने चित्रकूटावर वनविहार करीत असताना सीतादेवीला उद्देशून म्हटलेला खालील श्लोक म्हणून दाखवितो—

स्वदर्थमिव विन्यस्तः शिलापट्टोऽयमग्रतः
यस्यायमभितः पुष्पैः प्रवृष्ट इव केसरः ॥

हा श्लोक ' रामायणा 'च्या दक्षिणभारतीय प्रतीत दिसत नाही, पण तो उत्तरभारतीय प्रतीत किंचित् पाठभेदाने ( ' अस्य पार्श्वे तरुः पुष्पैः प्रवृष्ट इव केसरैः । ' किंवा ' यस्यायमग्रतः पुष्पैः प्रवृष्ट इव केसरः । ' ) आला आहे. तसेच त्यापुढील रामाच्या ' श्रमाम्बुशिशिरीभवत्प्रसृतमन्दमन्दाकिनी—' इत्यादि श्लोकातील श्रान्त सीतेचे वर्णन त्या संदर्भात आलेल्या खालील श्लोकास अनुलक्षून आहे—

अभिरम्य तदा तस्यां शिलायां रघुनन्दनः ।
अन्वीयमानो वैदेह्या देशमन्यं जगाम सः ॥
(चिकित्सक आवृत्ति, अयोध्याकाण्ड, परिशिष्ट १, क्र. २६)

हा सबंध सर्ग अत्यंत रम्य आहे, पण दक्षिणभारतीय पाठपरंपरेत त्याचा मागमूस नाही. ' रामायणाच्या ' निर्णयसागर प्रतीत ( पृ. ३०३–४ ) तो सर्ग प्रक्षिप्त म्हणून दिला आहे. भवभूतीने त्याचा उपयोग केला असल्यामुळे तो निदान खिस्तोत्तर आठव्या शतकाइतका प्राचीन आहे यात संशय नाही. पण तो मूळच्या 'रामायणा'त नसावा, कारण राम व सीता थोड्याच दिवसापूर्वी, अयोध्येतून वनवासार्थ तेथे आले होते, भरतही नुकताच चित्रकूटी येऊन रामाच्या पादुका घेऊन गेला होता. अशा परिस्थितीत त्या सर्गात वर्णिलेला शृंगार राम व सीता यांना सुचणे स्वाभाविक नाही असे अयोध्याकांडाच्या चिकित्सक आवृत्तीचे संपादक डॉ. प. ल. वैद्य यांचे मत आहे.[1] याच सर्गात पुढे सीतेला त्रास देणाऱ्या कावळ्यावर इषिकास्त्र सोडून रामाने त्याचा एक डोळा नाहीसा केल्याचे वर्णन आहे. ती एक हरदासी कथा आहे असे डॉ. वैद्य यास वाटते. पण तिचा उल्लेख कालिदासाने रघुवंशात ( १२, २२–२३ ) केला आहे. त्यावरून हा सर्ग उत्तरभारतीय पाठपरंपरेत निदान खिस्तोत्तर ४०० इतका प्राचीन दिसतो. भवभूतीने ' रामायणा 'च्या उत्तरभारतीय पाठाचे अनुकरण केले हे यावरून स्पष्ट आहे.

---

१. रामायण, अयोध्याकाड, प्रस्तावना, पृ. २३

भवभूतीच्या ' उत्तररामचरिता 'च्या संविधानकाची ' रामायणा 'च्या उत्तरकांडातील कथानकाशी तुलना केल्यास भवभूतीने रामचरितात केलेले अनेक फरक, ते करण्यात त्याचा उद्देश आणि संविधानकरचनेत त्याचे कौशल्य लक्षात येते.

पहिल्या अंकातील ऋष्यशृंगाच्या द्वादशवार्षिक सत्राचा उल्लेख व तन्निमित्त सर्व वडील मंडळीची अयोध्येतील अनुपस्थिति, सीतारामाचे चित्रदर्शन, व त्यातील विविध घटनांचे मनोरम वर्णन, दुसऱ्या अंकातील वनदेवता वासंती व वाल्मीकीच्या आश्रमातून आलेली प्रौढ विद्यार्थिनी आत्रेयी यांचा प्रवेश आणि नंतरचे दण्डकारण्यवर्णन ही मौलिक आहेत. रामायणात शम्बूकवधानंतर राम अगस्त्याश्रमात गेल्याचा उल्लेख आहे, पण तेथून पचवटीत गेल्यावर पूर्वीचे प्रदेश, पशु व पक्षी यांना पाहून रामाचे दुःख दुःसह होऊन तो मूर्छित होईल त्यावेळी त्याला सावध करण्याकरिता तेथे सीतेला आणण्याची कल्पना भवभूतीचीच. तिसऱ्या अंकातील सीतेच्या मनात सलणारे अकारण परित्यागाचे शल्य निघून जाऊन रामाचे आपणावर पूर्वीप्रमाणेच अढळ प्रेम आहे याबद्दल तिची खात्री पटते आणि दिलजमाई होते तो प्रसंगही अप्रतिम साधला आहे. चौथ्या अंकातील आपल्या कन्येवर निष्कारण परित्यागाने ओढवलेल्या प्रसंगामुळे अत्यंत दुःखी झालेला जनक आणि त्याला कसे भेटावे या विवंचनेत असलेली कौसल्या यांचा प्रवेश, पुढे त्याची त्यांशी भेट व त्यांचे आकर्षण, तसेच पाचव्या अंकातील लव व चंद्रकेतूचे परस्पराशी वीरोचित वर्तन व संभाषण, पुढे सहाव्या अंकातील त्यांचे युद्ध, रामाची व कुशलवांची भेट, व त्यांचे विविध प्रमाणांवरून प्रत्यभिज्ञान हीही भवभूतीच्या कल्पकतेची फळे होत. ' रामायणा'त रामाने अश्वमेध केल्याचा निर्देश आहे, पण त्या प्रसंगाने वाल्मीकीच्या आश्रमाजवळ लव व चंद्रकेतु यांचे युद्ध झाल्याचा उल्लेख नाही. शेवटच्या सातव्या अंकातील गर्भनाटकाची कल्पना व त्यानंतर पृथ्वी व भागीरथी यांचा सीतेसह गंगेच्या जलातून प्रादुर्भाव हीही मौलिक आहेत. ' रामायणा 'त सीता वाल्मीकीच्या आश्रमात प्रसूत होऊन तेथेच बारा वर्षे राहत होती असे वर्णिले आहे; पण ' उत्तररामचरिता 'त सीता पाताळात राहिल्याचे अभिप्रेत आहे. याप्रमाणे भवभूतीने ' उत्तररामचरिता 'च्या प्रत्येक अंकात आपल्या कल्पकतेने नवीन नवीन प्रवेश घालून ते नाटक सर्वांगसुंदर केले आहे असे दिसून येईल.

## संविधानकाचे आधार

यातील काही कल्पना भवभूतीला कालिदासाच्या ग्रंथांवरून सुचल्या असतील. उदाहरणार्थ, रघुवंश, १४, २५ मध्ये राज्याभिषेकानंतर राम व सीता यांनी काही दिवस सुखात गेले असे वर्णन करताना कालिदासाने राजवाड्यातील चित्रांचा उल्लेख केला आहे–

नास्त्रावरून सुचलेली दिसते. इन्दुमतीस्वयंवराकरिता अयोध्येहून कुंडिनपुरास जाताना अजाला नर्मदातीरी एका वन्य गजाला बाणाने घायाळ करावे लागले. त्याबरोबर त्यातून एक गन्धर्व प्रगट होऊन त्याने आपणास शापमुक्त केल्याबद्दल अजाला संमोहनास्त्र दिले. त्याच्या योगे शत्रूचा घात न करताही विजयप्राप्ति होत असे. 'प्रयोक्तुर्न चारिहिंसा विजयस्य हस्ते।' ( रघु. ५, ५७ ). पुढे स्वयंवरात मिळालेल्या इन्दुमतीसह अयोध्येला परत जात असता दिला पळवून नेण्याकरिता आपणावर हल्ला करणाऱ्या अनेक राजांशी युद्ध करताना अजाने या संमोहनास्त्राचा उपयोग करून आपल्या शत्रूंना व त्यांच्या सैनिकांना निद्रावश केले त्याचे सुंदर वर्णन 'रघुवंशा'त (७, ६२) झाले आहे. या संमोहनास्त्रावरून जृंभकास्त्राची कल्पना भवभूतीला सुचून त्याने तिचा कुमारप्रत्यभिज्ञानाकरिता कसा उपयोग केला आहे ते मागे दाखविले आहे.

'रामायणा'त भवभूतीने अनेक बदल केल्याचे मागे दाखविले आहे, पण त्यातील मुख्य बदल म्हणजे त्याने आपल्या नाटकाचे संविधानक आनंदपर्यवसायी केले आहे, हा होय. 'रामायणा'त रामाच्या समोर सीता खालील शपथ घेते—

यथाहं राघवादन्यं मनसापि न चिन्तये ।
तथा मे माधवी देवी विवरं दातुमर्हति ।।
( रामायण, नि. प्र., ७, ९७, १४ )

( मी रामाशिवाय अन्य पुरुषाचे मनातही चिन्तन केले नसेल तर ही पृथ्वी मला पोटात घेवो. ) तेव्हा जमीन दुभंगून पृथ्वी देवी वर येते आणि सीतेला आपल्या आसनावर बसवून पातालात जाते असे वर्णन 'रामायणा'त आले आहे. पण भवभूतीने या कथानकात बदल करून आपले नाटक आनन्दपर्यवसायी केले आहे. याविषयी डॉ. बेलवलकर म्हणतात--'लोकापवादास्तव टाकलेल्या सीतेचा रामाने पुन. अंगीकार केला व उभयतांनी अनेक वर्षे सुखाने राज्य केले अशा प्रकारची एक रामायणाची परंपरा भवभूतीस ठाऊक होती. वाल्मीकीच्या उत्तरकाण्डाच्या ऐवजी ही परंपरा आधारास घेऊन हे नाटक रचले असावे असे आम्हास वाटते.' पण अशा कल्पनेला काही आधार नाही. डॉ. बेलवलकरांनी त्याकरिता 'पद्मपुराणा'तील रामकथेचा हवाला दिला आहे. तेव्हा त्याचा थोडा विचार केला पाहिजे.

## 'उत्तररामचरित' आणि 'पद्मपुराण'

रामाची कथा 'पद्मपुराणा'च्या पातालखंडात वात्स्यायन मुनि आणि सहस्रफणाधारी शेष यांच्या संवादात आली आहे. रामाने अश्वमेध यज्ञाला आरंभ करून शत्रुघ्नाला यज्ञीय अश्वाचा संरक्षक नेमले ( १०, ५९ ). त्याला मदत करण्याकरिता भरतपुत्र पुष्कल, हनुमान्, सुग्रीव, जाम्बवान् इत्यादिकांसह मोठी सेना दिली

(११,५-१८). तो अश्व हिंडत हिंडत एकदा गंगातीरी असलेल्या वाल्मीकीच्या आश्रमाजवळ आला. सकाळी समिधा आणण्यास गेलेल्या लवानें त्याला पाहिलें. त्याच्या डोक्यावर लावलेले आह्वान वाचून त्याला क्रोध आला. त्याचे सैनिकाशी घनघोर युद्ध झाले. तेव्हा पुष्कल पुढे होऊन त्याने त्याला रथ देऊ करुन युद्धाचे आह्वान केले. पण लवाने त्याचाच रथ भग्न करून त्याला पादचारी केले आणि बाणाने खाली पाडले. पुढे त्याने हनुमान् वगैरेंचा पराभव केला. पण शत्रुघ्नाच्या एका बाणाने तो मूर्छित झाला. तेव्हा त्याला रथात घालून शत्रुघ्नादि जाऊ लागले. काही आश्रमबालकांनी ती वार्ता सीतेला सांगितली. इतक्यात कुश माघ कृष्ण चतुर्दशीस महाकालाच्या पूजेकरिता उज्जयिनीस गेला होता तो परत आला. सीतेकडून सर्व वृत्तान्त समजल्यावर त्याने त्या सेनेचा पाठलाग करुन लवास सोडविले. नंतर दोघांनी युद्ध करुन शत्रूचा पराजय केला. हनुमान् व सुग्रीव यांच्या शेपटांना धरुन कुश व लव ऋषिपुत्राना खेळणी म्हणून देण्याकरिता त्याना ओढत घेऊन गेले. पण सीतेने त्याना मुक्त केले. तसेच तिने आपल्या पातिव्रत्याची शपथ घेऊन सर्व मृत सैनिकाना जिवंत केले. नंतर शत्रुघ्न तो अश्व व सैन्य घेऊन अयोध्येस गेला. या युद्धाच्या वेळी कुश व लव सोळा वर्षांचे होते असे म्हटले आहे (६६, ७२). वाल्मीकीकडून ते आपले पुत्र आहेत असे नंतर रामाला समजलं. वाल्मीकीने सीतेच्या पावित्र्याची ग्वाही दिल्यावर रामाने तिला पुत्रासह आणण्याकरिता लक्ष्मणाला पाठवले. पण सीतेने स्वतः न जाता कुशलवाना जाण्यास सांगितले. त्यानी राज्यसभेत रामचरित सुस्वर गायिल्यावर रामाने त्यास प्रत्येकी लक्ष सुवर्णमुद्रा देऊ केल्या. 'पण क्षत्रिय दान घेत नसतात' असे म्हणून त्यानी त्या स्वीकारल्या नाहीत. रामाने वाल्मीकीच्या आज्ञेने कुशलवांचा स्वीकार केला. त्याने रामाशी सादृश्य पाहून सभेचीही खात्री झाली. पुनः रामाच्या आज्ञेने लक्ष्मणाने सीतेकडे येऊन अयोध्येला येण्याविषयी तिचे मन वळवले. तेव्हा त्याच्या रथातून सीता परत आली. नंतर रामाने आपला अश्वमेध यज्ञ पुरा केला (६७, १७).

'पद्मपुराणा'तील ही रामकथा वाचल्यावर ती भवभूतीच्या अगोदरची आहे असे वाटत नाही.[१] उलट 'पद्मपुराण'कर्त्याने 'वाल्मीकि-रामायण' आणि

१. 'पद्मपुराणा'तील कथेत एका रजकाने सीतेच्या चारित्र्यावर आक्षेप घेतला असे म्हटले आहे. 'मातर प्रत्युवाचाथ रजकः क्रोधसंयुतः। नाहं राम इव प्रेष्ठा गृह्णाम्यन्यगृहोषिताम् ॥' पद्मपुराण, पंचम (पाताल) खंड, अ. ५५ श्लो. ७०. कथेचं हे रूप नंतरचे असून ते प्रचलित भारतीय भाषांतल्या रामकथेत आले आहे.

भवभूतीचे ' उत्तररामचरित ' याच्यातील काही घटना घेऊन आणि त्यात आपल्या कल्पनेचा मालमसाला घालून ही ' पुरणपोळी ' बनविलेली दिसते. ' पद्मपुराणा 'तील शाकुन्तलोपाख्यानातही असाच प्रकार झाल्याचे आम्ही इतरत्र सविस्तर दाखविले आहे.[1] ' पद्मपुराण 'कर्त्याने शाकुन्तलातील काही प्रसंग आणि ' महाभारता 'तील ओजस्वी भाषण ही जोडून जशी आपली शाकुन्तलोपाख्यानाची कथा बनविली तसेच रामकथेच्या बाबतीतही केलेले दिसते.

## संविधानकरचनेतील दोष

भवभूतीने मूळ रामायणकथेत अनेक फेरफार करून ' उत्तररामचरिता 'चे कथानक कौशल्याने रचले आहे असे आम्ही मागे म्हटले आहे, पण त्यात त्याचे अनेक प्रमादही झाले आहेत. ते दाखविणे जरूर आहे. त्यातील महत्त्वाचा प्रमाद कै. पं. रंगाचार्य रड्डी यांनी दाखविला आहे तो त्यांच्याच शब्दांत देऊ.[2] " नाटकातील कथानकाचा आरंभ रामास राज्याभिषेक झाल्यावर आठपधरा दिवसातच झाला आहे हे या नाटकातील प्रस्तावनेवरून अगदी उघड होत आहे. रावणवधानंतर रामास राज्याभिषेक किती दिवसांनी झाला याचा खुलासा या नाटकात नाही. तेव्हा तो आपण ' रामायणा 'प्रमाणे घेऊन चालले पाहिजे. ' रामायणा 'वरून रावणवधानंतर आठपंधरा दिवसातच रामास राज्याभिषेक झाला असावा, असे अनुमान होते. कारण रावणवधानंतर कोठेही वेळ न मोडता राम अयोध्येस आला आहे व तेथे आल्यावर लगेच त्यास राज्याभिषेक झाला आहे. लंकेहून अयोध्येस येण्यास काय वेळ लागला तेवढाच काय तो रावणवध व राज्याभिषेक यांत काल गेला आहे. अर्थात् रावणवधानंतर पंधरा दिवस — तीन आठवड्यांनी रामास राज्याभिषेक झाला आहे. राज्याभिषेक झाल्यावर रामाचे समाजन करण्याकरिता आलेली आप्तेष्ट मंडळी गेल्यामुळे विमनस्क झालेल्या सीतेच्या सांत्वनाकरिता राम तिच्या महालात गेला आहे. म्हणजे ही गोष्ट रावणवधानंतर फार तर महिना — दोन महिन्यांच्या आत घडली असावी. या रामाच्या भेटीच्या वेळी सीतादेवीचा गर्भ परिपूर्ण झाल्याचे म्हणजे तिला नऊ मास झाल्याचे कवि स्पष्ट सुचवीत आहे. एवढेच नव्हे तर या भेटीनंतर पुढे दुसरे दिवशी म्हणजे लक्ष्मण तिला वनात टाकून गेल्यावर ती प्रसूत झाली असे सातव्या अंकातील कथानकावरून सिद्ध होत आहे. कवीला जो करुण रस वर्णन करावयाचा आहे त्याला सीतेची ही पूर्ण गर्भावस्था अनुकूल आहे. परंतु यामुळे लोकाप-

---

१. ' कालिदास ', द्वितीयावृत्ति, पृ २०३–५.

२. ' पं. रड्डी यांचा लेखसंग्रह, ' पृ. ७०.

वादास भलत्याच रीतीने दुजोरा मिळत आहे हे कवीच्या घ्यानात आल नाही. कारण अशा रीतीच्या वर्णनाने सीता ही लंकेहून येऊन दोन महिने झाले नाहीत तोच नवमास-परिपूर्ण गर्भवती आहे असे वर्णन केल्यासारखे होत आहे. तेव्हा कवीची ही मोठी चूक आहे. बरं, आता आपण अशी कल्पना करू की आपन्नसत्त्वा शकुन्तला पाहून दुष्यन्ताच्या मनात जशी शंका उत्पन्न झाली तशीच शंका सीतेविषयी पौरजानपदांच्या मनात उत्पन्न झाली आहे असे कवीस सुचवावयाचे आहे, तर तेही बरोबर नाही. कारण पुढे मग या शंकेचा निरास होणे अशक्य आहे. कारण सीताशुद्धीच्या कारणांची कितीही परंपरा लाविली तरी या प्रत्यक्ष अनुभवाचा निरास कशाने होणार ? तो जर न होईल तर राम व सीतादेवी यांच्या उज्ज्वल कीर्तीवर या कवीकडून वेडे-पणामुळे मोठाच घाला घातल्यासारखे होणार आहे. 'मूळ रामायणा'त राज्याभिषेक झाल्यावर सर्व मंडळी परत गेल्यावर राम व सीता यानी अयोध्येसमीप असणाऱ्या अशोकवनिकेत विविध विलास केले व नंतर सीतादेवी आपन्नसत्त्वा झाली असे सयु-क्तिक वर्णन केले आहे.[1] परंतु तो कथाभाग गाळून राज्याभिषेकानंतर सीतादेवीस पूर्ण गर्भवती म्हणून वर्णिल्यामुळे हा घोटाळा झाला आहे. या नाटकाचे मुख्य ध्येय जी सीताशुद्धि करुन दाखवावयाची त्यास या वर्णनाने मोठाच बाध येत असल्यामुळे हा नाटकात 'प्रथमग्रासे मक्षिकापातः' अशातला प्रकार झाला आहे."

प्रस्तुत नाटकाच्या संविधानकात आणखीही एक दोष पं. रड्डीशास्त्री यानी दाखविला आहे. तोही महत्त्वाचा आहे म्हणून त्यांच्याच शब्दात देतो.[2] "कवीने जृम्भ-कास्त्रांचा या संविधानकात जो वरचेवर उल्लेख केला आहे त्याचे प्रयोजन काय हे कळत नाही. तिसऱ्या व चौथ्या अंकावाचून प्रत्येक अंकात जृंमकास्त्रांचा उल्लेख आलेला आहे. त्यावरून असे वाटते की ही अस्त्रे पुढे या संविधानकात काही महत्त्वाचा उलगडा करुन दाखवितील. 'शाकुन्तला'त अंगुलीयकाने जे महत्त्वाचे कार्य केले तसे ही जृंमकास्त्रेही काही महत्त्वाचे कार्य करुन दाखवितील. परंतु अशा रीतीने पाहू लागावे तो त्यांचा संविधानकाला काही विशेष उपयोग असल्याचे दिसून

१. एव रामो मुदा युक्तः सीता सुरसुतोपमाम् ।
रमयामास वैदेहीमहन्यहनि देववत् ।।
तथा तयोर्विहरतोः सीताराघवयोश्चिरम् ।
अत्यक्रामच्छुभः कालः शैशिरो भोगदः सदा ।।
उत्तरकांड ( नि. प्र. ) ४२, २५-२७

२. प. रड्डी याचा लेखसंग्रह, पृ ७२.

येत नाही. रामचंद्राच्या वरावरून जृंभकास्त्राचा उपयोग एवढाच की कुश व लव हे सीतेचे मुलगे आहेत हे सिद्ध करावयाचे. परंतु कुश व लव हे सीतेचे मुलगे नव्हेत असा वाद आहे कोठे ? तो 'रामायणा 'त नाही आणि या नाटकातही नाही. तेव्हा ज्याबद्दल शंका नाही त्या शंकेच्या निवृत्तीबद्दल एवढा खटाटोप कशाला ? दुष्यन्ताला शकुन्तलेच्या विवाहाचीच शंका ! तेव्हा तिच्या गर्भाविषयीही शंका येणे साहजिकच आहे. तेव्हा त्या शंकेच्या निराकरणार्थ 'पुत्रमेवंगुणोपेतं चक्रवर्तिनमाप्नुहि' 'सर्वथा चक्रवर्तिन पुत्रमाप्नुहि' हा प्रथमांकातील वर व सातव्या अंकातील रक्षाकरंडककल्पना ही फार उपयुक्त आहेत. 'आईबापावाचून इतरांनी तो रक्षाकरंडक उचलला तर तो सर्प होऊन चावतो. हे त्याचे सामर्थ्य आम्ही पुष्कळ वेळा अनुभविले आहे' असे तापसीकडून तेथे कवीने स्पष्ट वदविले आहे. तेव्हा या दोन प्रमाणानी हा शकुन्तलेचा पुत्र आपलाच होय असे निःसंशय रीतीने राजास समजण्यास हरकत नाही. तेव्हा तो सर्व भाग उपयुक्त आहे परंतु प्रस्तुत जृंभकास्त्राचा असा उपयोग दाखविता येत नाही; कारण जृंभकास्त्रे सीतेच्या संततीला लाभतील (सर्वथेदानीं त्वत्प्रसूतिमुपस्थास्यन्ति) असा रामाचा अनुपयुक्त अर्थवट वर आहे. वाद सीतेच्या चारित्र्याचा परंतु सीतेचे चारित्र्य शुद्ध ठरविण्यास या अस्त्राचा काहीच उपयोग नाही."

कुश व लव हे रामाचे पुत्र होत हे ठरविण्यास भवभूतीने दिलेली इतर अनेक कारणे–उदाहरणार्थ, वाल्मीकीच्या आश्रमाजवळच सीतेला सोडले होते, त्या घटनेला बारा वर्षे झाली, या कुमाराचे वय बारा वर्षांचे आहे, सीतेच्या पोटातील गर्भ द्विरूपि होता–ही अशीच अनुपयुक्त आहेत. त्यांचा वर्ण, आवाज व चेहरा यात रामाशी सादृश्य हे मात्र उपयुक्त आहे आणि ते अनेकांच्या–जनक, कौसल्या, सुमंत्र इत्यादिकांच्या–ध्यानात येण्याइतके स्पष्ट आहे हे कवीने दाखविले आहे. पण ते एकटे विवाद गोष्ट सिद्ध करण्याइतके बलवत्तर नाही. तेव्हा हाही संविधानकातील दोष मानावा लागेल.

प्रस्तुत नाटकाच्या संविधानकातील तिसरा दोष आत्रेयी या प्रौढ विद्यार्थिनीची योजना हा होय. दुसऱ्या अंकातील वनदेवता वासंतीशी झालेल्या संभाषणावरून तिचा पूर्वी वासंतीशी परिचय नव्हता, फक्त तिच्या विषयी आणि सीतेला प्रिय असणाऱ्या दण्डकारण्यातील पशुपक्ष्यांविषयी तिने ऐकले होते असे दिसते. पण ते कोणाकडून याचा उल्लेख नाटकात नाही. तिच्या सीतेबरोबर गुजगोष्टी झाल्या असण्याची शक्यता नाही. कारण ती वाल्मीकीच्या आश्रमात निदान बारा वर्षे राहत होती आणि या किंवा पूर्वीच्या काळात सीता तिला तेथे भेटली असणे शक्य नाही. वाल्मीकीच्या आश्रमातील इतर व्यक्तींना दण्डकारण्यातील राम व सीता यांच्या विश्रंभप्रसंगाची माहिती

असणे शक्य नाही.' दुसरी गोष्ट ही की आत्रेयी वाल्मीकी आश्रमातून (गंगातीराहून) दक्षिणेत पंचवटीस (गोदावरीतीरी) येण्यास निघाली तेव्हा ऋष्यशृंगाचे द्वादशवार्षिक सत्र संपून राजमाता, अरुन्धती वगैरेंसह वसिष्ठ वाल्मीकीच्या आश्रमात येण्यास निघाले होते. पण आत्रेयी शेकडो मैलांचा प्रवास त्या काळातील परिस्थितीत करून पंचवटीस पोचते तरी वसिष्ठादि मंडळी वाल्मीकीच्या आश्रमास पोचलेली दिसत नाहीत. वासन्तीला भेटल्यावर राम पंचवटीतील विविध स्थलांस भेट देऊन विमानाने वाल्मीकीच्या आश्रमात लवचन्द्रकेतूंच्या युद्धाच्या धुमश्चक्रीत येऊन पोचतो, त्याच दिवशी काही तास अगोदर वसिष्ठादि मंडळी त्या आश्रमात आल्याचे भवभूतीने दाखविले आहे, हेही असंभाव्य वाटते. कारण वासंती पायी प्रवास करत होती. तिच्या जवळ रामासारखे विमान नव्हते. तेव्हा तिला वाल्मीकीच्या आश्रमातून पंचवटीस जाण्यास कित्येक महिने लागले असावे. इतका काळ वसिष्ठादिकांना ऋष्यशृंगाश्रमातून गंगातीराजवळ असलेल्या वाल्मीकीच्या आश्रमास पोचण्यास लागला असणे शक्य नाही.

संविधानकातील चौथा दोष हा की कुश व लव यांनी बारा वर्षांच्या वयात एवढा पराक्रम करणे असंभवनीय वाटते. भवभूतीने ऋष्यशृंगाचे सत्र बारा वर्षे चालले असे कल्पून कुशलवांचे वय बारा वर्षांचे होते असे दाखविले आहे. त्यांची बुद्धि शृंगारिक श्लोकाचा अर्थ समजण्याइतकी प्रगल्भ झाली नव्हती, पण ते आपल्या शौर्याने विशाल सेनेचा पराभव करू शकत होते. ते अलौकिकसामर्थ्यवान् होते असे मानले तरी त्याचा तुल्य भाऊ चन्द्रकेतु हाही त्यांच्याच वयाचा आणि तसाच शूर होता असे मानले पाहिजे. भारतीय इतिहासात राजकुमारांनी सोळा वर्षांच्या वयात पराक्रमाची कृत्ये केल्याची उदाहरणे आहेत. हर्ष गादीवर आला तेव्हा सोळा वर्षांचाच होता, पण त्याने सर्व जगाला युद्धाचे आव्हान दिले. 'उत्तररामचरिता'तील कुशलवांचे वय असंभवनीय वाटून 'पद्मपुराणा'तील रामकथेच्या कर्त्याने ते सोळा वर्षांचे होते असे सांगितले आहे. मूळ 'रामायणा'त कुशलवांचे वय बाराच वर्षे होते असे म्हटले आहे.[2] 'कुन्दमाला'कर्त्याने तर ते दहा वर्षांचे मानले आहे.[3] ही वये त्या

१. कदाचित् वाल्मीकीच्या आश्रमात 'रामायणा'चे अध्ययन होत असल्याने त्यावरून आत्रेयीला या चित्रप्रसंगाची माहिती मिळाली वगैरे असे म्हणणे शक्य आहे. पण त्या 'रामायणा'त वासन्तीचा उल्लेख नाही. शिवाय वाल्मीकींनी 'रामायण'रचनेस आरंभ केल्यावर लोकरच त्यांना अध्यापनास वेळ मिळत नसल्यामुळे आत्रेयी अगस्त्याश्रमाकडे निघून गेली असे भवभूतीने 'उत्तररामचरिता'च्या दुसऱ्या अंकात दाखविले आहे.

२. उत्तरकाण्ड (नि. प्र.), ७२, ११.

३. 'कुन्दमाला' (सं. कालीकुमार दत्त), पृ. ८१.

त्या प्रकरणात असंभवनीय वाटत नाहीत कारण त्या वयात कुशलवानी फक्त 'रामायण' पाठ म्हणून दाखविले आहे. ते अशक्य नाही.

दुसरी गोष्ट अशी की अश्वमेधीय अश्वाच्या रक्षणासारख्या महत्त्वाच्या कामावर रामानें चन्द्रकेतूसारख्या अल्पवयस्क कुमाराची योजना का केली हे कवीने कोठेही सांगितलें नाही. त्यावेळी शत्रुघ्न लवणासुराचा पराभव करुन शूरसेन देशात सुव्यवस्था स्थापन करण्यात गुंतला होता असे मानले तरी रामाजवळ लंकेच्या युद्धात नेत्रदीपक विजय मिळविणारा बंधु लक्ष्मण होता. भरताचा कोठेही उल्लेख आला नसला तरी तोही राजधानीतच असावा. अशा बंधूंना यज्ञीय अश्वाच्या रक्षणाचे काम न सांगता त्यावर चन्द्रकेतूसारख्या अल्पवयस्क कुमाराची योजना रामानें करावी हे चमत्कारिक वाटते.

याप्रमाणे 'उत्तररामचरिता'च्या संविधानकरचनेत काही दोष राहिले असले तरी एकंदरीत त्यामध्ये इतर दोन नाटकांच्या मानाने कार्यैक्याच्या बाबतीत भवभूति बराच यशस्वी झाला आहे असे म्हणण्यास हरकत नाही.

### स्वभावचित्रण

आता आपण स्वभावचित्रणाकडे वळूं. 'उत्तररामचरिता'त इतर दोन नाटकांच्या मानाने कमी पात्रे असली तरी त्यांचे स्वभावरेखन जास्त कौशल्याने केले आहे. त्यात राम, जनक, कुश, लव व चन्द्रकेतु ही पुरुषपात्रे आणि सीता, अरुन्धती, कौसल्या, वासन्ती आणि आत्रेयी ही स्त्रीपात्रे प्रमुख आहेत. याशिवाय संविधानकाच्या विकासाकरिता आवश्यक अशी लक्ष्मण, वाल्मीकि, सुमंत्र, दुर्मुख, भाण्डायन, सौधातकि इत्यादि गौण पात्रेही कवीने योजिली आहेत. या सर्वांत राम आणि सीता ही पात्रे श्रेष्ठ आहेत आणि त्यांच्या स्वभावरेखनात कवीने आपले कौशल्य विशेष रीतीने दाखविले आहे.

'महावीरचरिता'तल्या प्रमाणे प्रस्तुत नाटकातही राम हा आदर्श पुरुष दाखविला आहे. राजा, पति, पिता, गृहस्थ इत्यादि नात्यांनी प्राप्त झालेली कर्तव्ये तो कसोशीने पाळत असल्याचे दाखविले आहे. 'राजा प्रकृतिरञ्जनात्' राजाचे मुख्य कर्तव्य प्रजेला संतुष्ट राखणे हे होय, ही भारतीय परंपरा स्वतःच्या वर्तनाने कसोशीने पाळणारा रामासारखा राजा आजपर्यंत झाला नाही. म्हणून आदर्श शासनपद्धतीची 'रामराज्य' ही संज्ञा अद्यापि प्रचलित आहे.

राज्याभिषेकानंतर ऋष्यशृंगाच्या यज्ञाकरिता गेलेल्या कुलगुरु वसिष्ठाचा संदेश येतो की 'तू सदैव प्रजेला संतुष्ट राखण्यात प्रयत्नशील असावे; कारण त्यामुळे प्राप्त

होणारी कीर्ति हेच तुमचं श्रेष्ठ धन होय' (युक्तः प्रजानामनुरञ्जने स्यास्तस्माद्यशो यत्परमं धनं वः ।।१, ११) तेव्हा एका क्षणाचाहि विलंब न करता राम म्हणतो,

स्नेहं दयां च सौख्यं च यदि वा जानकीमपि ।
आराधनाय लोकानां मुञ्चतो नास्ति मे व्यथा ।।
(उ. च., १, १२)

(प्रजेच्या आराधनासाठी प्रेम, दया, सौख्य, किंबहुना माझी प्राणापेक्षाही प्रिय अशी पत्नी सीता, यांचा त्याग करताना माझ्या मनाला दुःख होणार नाही.)

दुर्दैवाने अशा कसोटीचा प्रसंग त्याच्यावर लौकरच येतो. पौरजानपदामध्ये सीतेच्या चारित्र्यासंबंधी प्रवाद पसरू लागत असल्याचे त्याला समजतं. अशा प्रसंगी त्याच्या ठिकाणी दुसरा एखादा राजा असता तर त्याने एखादी सोईची सबब सांगून आपणास पत्नीपरित्यागाच्या कटु कर्तव्यातून सोडवून घेण्याचा प्रयत्न केला असता. किंबहुना तो प्रवाद कळविणारा दुर्मुख नामक हेर तसे सुचवितोही. तो म्हणतो 'सीतादेवींनी अग्निशुद्धि करून आपलं पातिव्रत्य सिद्ध केलं आहे. ती गरोदर आहे. तेव्हा दुष्ट लोकांच्या प्रवादावरून महाराजांनी असे करण्याचे कसे मनात आणले?' पण राम प्रत्येक गोष्टीकडे दुसऱ्याच्याही दृष्टिकोणातून पाहत असल्यामुळे त्याला दुर्मुखाचं म्हणणे पटत नाही. प्रजाजनांना दुष्ट म्हटल्याबद्दल तो दुर्मुखास दोष देतो. सीताशुद्धीची घटना दूर लंकेत घडलेली. तिजवर अयोध्येतील लोकांचा विश्वास कसा बसावा? इक्ष्वाकु राजवंश हा प्रजेला अत्यंत प्रिय असल्यामुळे त्याच्यावर यत्किंचितही कलंक येऊ नये अशी तिची इच्छा या प्रवादावरून व्यक्त होत असल्याचे सांगून राम आपला सीतापरित्यागाचा निश्चय कायम करतो. या निर्णयाने त्याला आपल्या उत्कट पत्नीप्रेमाच्या विरुद्ध वागावे लागते. तसेच सीतेला निर्जन वनात एकटीला सोडावे लागत असल्यामुळे त्याला निर्दय बनावे लागते. प्रत्यक्ष सीताही त्याला निरनुक्रोश (निर्दय) म्हणते. तो स्वतः अत्यंत दुःखी होतो हे सांगणे नकोच. पण हे सर्व प्रजारंजनार्थ करण्यास तो सिद्ध होतो.

चौदा वर्षांच्या दीर्घ वनवासानंतर सौख्याचे दिवस येत आहेत असे दिसते तोच पत्नीत्यागाचा हा वज्राघात रामावर होतो. तेव्हा तो म्हणतो—

दुःखसंवेदनायैव रामे चैतन्यमाहितम् ।
मर्मोपघातिभिः प्राणैर्वज्रकीलायितं हृदि ।।
(उ. च., १, ४७)

( दुःख सहन करण्याकरिताच माझा जन्म आहे. माझ्या मर्मावर आघात होत असताही माझे प्राण वज्राच्या खिळ्यासारखे माझ्या हृदयात रुतून बसले आहेत. )

स्वतःच पत्नीचा त्याग केला असल्यामुळे लोकांसमोर रोदन करून आपले दुःख हलके करण्याचाही मार्ग त्याला मोकळा नाही. त्यामुळे औषधींच्या पुटपाकावल्याप्रमाणे त्याचे दुःख आतल्या आत पिचत राहते आणि तो अत्यंत कृश होतो. त्याला पाहून लोपामुद्रेचे हृदय अत्यन्त कळवळून येते. पञ्चवटीच्या परिसरात पूर्वपरिचित प्रदेश, पशु व पक्षी पाहत असता त्याचे दुःख अनावर होऊन अश्रु गळू लागतात तेव्हा तो पौरजनांना उद्देशून म्हणतो—

इदमशरणैरद्यास्माभिः प्रसीदत रुद्यते ॥ ( उ. च., ३, ३२ )

( बारा वर्षांनंतर आज हे चिरपरिचित प्रदेश पाहून मला रोदन केल्याशिवाय राहवत नाही. याची मला क्षमा करा. )

रामाचे सीतेवर निरतिशय प्रेम आहे. तिने सर्व सुखावर तिलांजलि देऊन आपणाबरोबर वनवास पत्करला याची त्याला सदैव जाणीव आहे म्हणून तो तिला 'दण्डकारण्यवासप्रियसखी' असे संबोधतो. ती चारित्र्याने अत्यंत पवित्र आहे याविषयी त्याला यत्किंचित्‌ही शंका नाही. त्यामुळे लंकेमध्ये दुरुत्तरे बोलून आपण तिला अग्निशुद्धि करावयास लावले याचा त्याला पश्चात्ताप होतो ( तन्मे यदुक्तमशिवं न हि तत्क्षमं ते । ). तिच्या सहवासात दण्डकारण्यात आपण अनुभविलेल्या निरतिशय आनंदाची त्याला सदैव आठवण असते. तिच्या वियोगाने पूर्वी त्याला तीव्र दुःख झाले होते तरी शत्रूवर सूड घेण्याच्या इच्छेमुळे ते त्याने सहन केले होते. तसेच दुसऱ्या पत्नीवियोगातील दुःख राजकार्यात आपले मन गुंतवून तो कसे बसे सहन करतो. पण त्या प्रसंगाची आठवण त्याच्या मर्मावर आघात करते.

सीतेच्या सहवासात रामाला दिव्य प्रेमाचा अनुभव येतो. त्याचे वर्णन त्याने 'अद्वैतं सुखदुःखयोः' इत्यादि श्लोकात केले आहे. असे प्रेम ज्याला लाभले तो धन्य होय ( भद्रं तस्य सुमानुषस्य कथमप्येकं हि तत्प्राप्यते । ) असे तो म्हणतो. असे निर्व्याज प्रेम करणाऱ्या प्रिय पत्नीच्या नाशाला आपण एखाद्या मेंढीची मान मुरगळणाऱ्या खाटकाप्रमाणे कारणीभूत होत आहो याचा अत्यंत खेद वाटून तो स्वतःचे 'अपूर्वकर्मचाण्डाल' असे वर्णन करतो. आपल्या प्रेमळ पत्नीचा हस्तस्पर्श त्याला अत्यंत आनंददायक वाटतो. तो त्याचे 'आश्च्योतितस्तरोः परिविर्णोऽयं सञ्जीवनौषधिरसो नु हृदि प्रसिक्तः ।' असे वर्णन करतो. आणि म्हणूनच त्या स्पर्शानेच तो मूर्च्छितावस्थेतून सावध होतो. सीतात्यागानंतर अश्वमेधयागाच्या अनुष्ठानाकरिता पत्नीची आवश्यकता उत्पन्न होते, तेव्हा तो सीतेची सुवर्णप्रतिमा करून

ती गरज भागवतो. ते ऐकल्यावर वासन्ती म्हणते–'वज्रादपि कठोराणि मृदूनि कुसुमादपि । लोकोत्तराणां चेतांसि को नु विज्ञातुमर्हति ।।'

रामाला लहान मुलांविषयी अत्यन्त प्रेम आहे. चन्द्रकेतूला पाहून त्याला आनंदाचे भरते येते. त्याच्या आलिंगनाने त्याचा चित्तदाह शांत होतो. लव व कुश यांना पाहताच त्याचे नैसर्गिक प्रेम हृदयात उचंबळून येते. त्याचे कारण न समजल्यामुळे तो म्हणतो—

व्यतिषजति पदार्थानान्तरः कोऽपि हेतु-
र्न खलु बहिरुपाधीन्प्रीतयः संश्रयन्ते । (उ. च., ६, १२)

(अज्ञात अशा कोणा तरी हेतूने पदार्थ आकर्षिले जातात. प्रेम हे बाह्य उपाधींवर अवलंबून नसते.)

रामाला गुरुजनांविषयी नितान्त आदर आहे. ऋषींना धर्माचा साक्षात्कार झालेला असतो, त्यांच्या रजोगुणरहित बुद्धीला सर्व गोष्टींचे अप्रतिहत ज्ञान होते याविषयी त्याला पक्का विश्वास आहे. म्हणून भगवान् वसिष्ठ, अरुन्धती, जनक यांच्याविषयी त्याला पराकाष्ठेचा पूज्य भाव वाटतो. वसिष्ठाचा लोकरञ्जनाविषयी आदेश तो प्राण.पेक्षाही प्रिय असलेल्या सीतेचाही त्याग करून पाळतो.

रामाच्या स्वभावातील सुंदर कोमल छटा भवभूतीने काही प्रसंगी दाखविल्या आहेत. राज्याभिषेकानंतर कंचुकी त्याला 'रामभद्र' असे अनवधानाने संबोधून नंतर 'महाराज' अशी आपली चूक दुरुस्त करतो, तेव्हा राम त्याला पूर्वीप्रमाणेच संबोधण्यास सांगतो. त्यायोगे त्याचे सौजन्य व्यक्त होते. चित्रदर्शनप्रसंगी परशुरामाच्या चित्राजवळ आल्यावर लक्ष्मण रामाने केलेल्या त्याच्या पराजयाचा उल्लेख करणार इतक्यात तो त्यास पुढील चित्र दाखविण्यास सांगतो. या प्रसंगाने त्याचा विनय प्रकट होतो. नंतर एक चित्र दाखवून लक्ष्मण कैकेयीच्या वर्तनाबद्दल काही बोलणार तोच तो पुढील चित्राकडे वळतो. यावरून त्याच्या मनाचे औदार्य व्यक्त होते. दुसऱ्याच्या दृष्टिकोणाबद्दल त्याला वाटत असलेल्या आदराचा उल्लेख मागे केला आहे.

तत्कालीन धार्मिक समजुतीप्रमाणे प्राप्त झालेली राजकर्तव्ये स्वतःच्या मनाविरुद्ध असली तरी राम ती पार पाडतो. शम्बूक नामक वृषलाला तपश्चर्या करण्याचा अधिकार नव्हता. त्याचा शिरच्छेद केल्याशिवाय अकाली मृत झालेला ब्राह्मणपुत्र जिवंत होणार नाही असे आकाशवाणीवरून समजल्यावर तो मोठ्या कष्टाने त्यावर वार करतो आणि दुःखाने म्हणतो 'कृतं रामसदृशं कर्म' (निर्दय रामाला उचित असे हे कृत्य मी केले!)

भवभूतीच्या काळी रामाची भगवान् विष्णूच्या अवतारात गणना झाली होती. त्याच्या पूर्वी तीनशे वर्षे होऊन गेलेल्या कालिदासाने आपल्या 'रघुवंश'त तसे वर्णन केले आहे आणि विदर्भात व इतरत्र तत्कालीन राममंदिराचे अवशेष सापडले आहेत. तथापि भवभूतीने सामान्यतः रामाचे दैवतरूपाने कोठेही वर्णन केले नाही. सामान्यतः म्हणण्याचे कारण दुसऱ्या अंकात शम्बूकाला दिव्यरूप प्राप्त झाल्यावर त्याने केलेल्या रामाच्या स्तुतीत तसा किंचित् भाव दिसतो. पण इतरत्र सर्व ठिकाणी भवभूतीने रामाला आपल्या विविध गुणानी आदर्श झालेला पुरुष असाच दाखविला आहे.

पण भवभूतीने वर्णिलेल्या सीतात्यागाच्या प्रसंगात रामाच्या शुद्ध चारित्र्यावर कलंक आल्याशिवाय राहत नाही. चित्रदर्शनप्रसंगी सीतेने प्रसन्न आणि दाट अशा वनराजीतून हिंडण्याची आणि भागीरथीच्या पवित्र आणि शीतल अशा प्रवाहात स्नान करण्याची इच्छा प्रकट केली. तिचे डोहाळे लागलीच पूर्ण करावे असा संदेश अरुन्धती, कौसल्यादि माता व भगिनी शान्ता या वडीलधाऱ्या मंडळींनीही पाठविला असल्यामुळे राम लक्ष्मणाला लगलीच रथ आणण्याकरिता सांगतो. 'आपणही माझ्याबरोबर आले पाहिजे' असे सीतेने म्हणताच तो उत्तरतो, 'हे काय सांगावयास पाहिजे?' असे असताही दुर्मुख चाराकडून सीतेच्या विषयी प्रवादाची माहिती मिळताच तो निद्रित सीतेला सोडून जातो आणि लक्ष्मणाला तिला वनात सोडण्याची आज्ञा करतो. तिचे काय झाले याची चौकशीही करीत नाही. हिंस्र पशूंनी तिला ठार केले असावे असे त्याला वाटते ( क्रव्याद्भिरङ्गलतिका नियतं विलुप्ता । ). या त्याच्या कृत्यात अविवेकीपणा दिसतो. जनकाने त्याच्या कृत्याला 'क्षिप्रकारिता' म्हटले आहे. असे वर्णन करण्यात भवभूतीचा उद्देश करुणरसाचा उत्कट परिपोष करण्याचा आहे हे उघड आहे. रामाने हे कृत्य अनुभवाभावी केले असे भवभूतीने दाखविले आहे. वसिष्ठांना त्याच्या हातून असा काही प्रमाद घडेल अशी शंका अगोदरच आली होती. म्हणून त्यांनी आपल्या संदेशात 'त्वं बाल एवासि नवं च राज्यम् ।' असे म्हटले आहे. आत्रेयीच्या भाषणातही याचा ध्वनि आहे. 'अरुन्धती, वसिष्ठासारखे गुरुजन आणि कौसल्यादि राजमाता अयोध्येत असताना असे कसे घडले?' असे वासन्तीने विचारताच आत्रेयी उत्तरते–'त्यावेळी सर्व वडील मंडळी ऋष्यशृंगाच्या आश्रमात गेली होती.' तेव्हा रामाच्या हातून हे अविवेकाचे कृत्य घडले असा भवभूतीचाही अभिप्राय दिसतो. अर्थातच त्याबद्दल रामाला अत्यंत पश्चात्ताप व दुःख झाले हे त्याने दाखविले आहेच.

पण असे करताना भवभूतीने रामावर अन्याय केला आहे. मूळ 'रामायणा'त रामाचा स्वभाव असा अविवेकी दाखविला नाही यासंबंधी कै. प. रङ्गीशास्त्रींचे

विचार कोणासही पटण्यासारखे आहेत.' 'रामाची सीतेच्या शुद्धतेविषयी खात्री होती. म्हणून त्याने तिला वानप्रस्थ धर्माने राहण्याकरिता भगवान् वाल्मीकीच्या पवित्र आश्रमात पोचती केली, असे 'रामायणा'त वर्णिले आहे. सीता धर्मशील आणि वनश्रीमध्ये रमणारी असल्यामुळे रामाने अशी योजना केली. यात लोकापवाद टळला आणि सीतेलाही वाईट रीतीने वागविले नाही. लोकमताला मान देऊन यापेक्षा सीतेविषयी त्याला अधिक चांगले काय करता आले असते ? रामाचे व्यक्तिदृष्टीने कसेही मत असले तरी नृपति या दृष्टीने त्याजवर सर्व समाजास योग्य वळण देण्याचे कर्तव्य फार महत्त्वाचे होते. सीतेस आपण घरी ठेवली तर 'अस्माकमपि दारेषु सहनीयं भविष्यति' (वा. रा., नि. प्र., उ. का., ४३, १९) याचा त्याला विशेष विचार कर्तव्य होता व त्या विचाराला जागून त्याने सीतेला वाल्मीकीच्या अरण्यात सोडली. रामाने सीतेस अरण्यात टाकली हे भवभूतींचे वर्णन आहे. ती वस्तुस्थिति नव्हे. त्याला अरण्यात टाकून सीतेचा घातच करावयाचा असता तर वाटेल त्या निर्जन प्रदेशी टाकता आले असते. तसे न करता वाल्मीकीच्या आश्रमापाशी त्याने तिला सोडली त्यावरून सीतेने कर्तव्यतत्परतेने तेथे दिवस काढावे, पुढे ती प्रसूत झाली म्हणजे तिच्या संततीवरून व वाल्मीकीला जो तिजविषयी अनुभव येईल तो त्याने लोकास सांगितल्यावर त्यावरून लोकांची समजूत होईल आणि आपणास तिचा स्वीकार करता येईल अशा भावनेनेच त्याने ही योजना केली असावी. तात्पर्य, सीतेचा त्याग काही काळपर्यंत आणि तोही जेथे तिचे हाल होणार नाहीत अशा स्थली, या गोष्टीचा विचार केला म्हणजे रामास कोणी निर्दय नावे ठेवणार नाहीत असे आम्हास वाटते.'[1] भवभूतीने मात्र करुणरसाच्या वृद्धीकरिता वाल्मीकीच्या आश्रमाचा उल्लेख टाळून सीतेने प्रसववेदना असह्य झाल्यामुळे भागीरथीत उडी घेतली असे कल्पिले आहे. पण त्यामुळे रामाच्या विमल चरित्रावर कलंक उत्पन्न झाला आहे.

प्रस्तुत नाटकात जनकाची व्यक्तिरेखाही स्पष्ट निघाली आहे. याज्ञवल्क्य ऋषीने त्याला ब्रह्मज्ञान सांगितल्याचे वर्णन 'बृहदारण्यकोपनिषदा' आले असल्याने भवभूति त्याचा उल्लेख अनेक ठिकाणी करतो. तो आपल्या पवित्र आचरणाने आणि ज्ञानाने राजर्षि आणि ब्रह्मवादी झाला होता. अशा इंद्रियनिग्रही आणि ज्ञानी पुरुषालाही अकारण आणि सापवाद सीतात्यागाचा भयंकर धक्का बसतो. तो त्यानंतर अनेक वर्षे चन्द्रद्वीपामध्ये तपश्चर्या करतो आणि विविध प्रकारच्या मायश्चित्तांनी देह शोषवितो. तरीही मृत्यु येत नाही याचा त्याला खेद होतो. आपल्या कन्येच्या चारित्र्याविषयी प्रवाद उत्पन्न झाल्यामुळे त्याला उघड शोकही करता येत नाही. आत्महत्या करावी तर निधनानंतर सूर्यरहित अंधकारमय लोकात काळ घालवावा

---

१. पं. रट्टी यांचा लेखसंग्रह, पृ. ७२.

लागेल असे जाणून तो त्या उपायाचा अवलंब करीत नाही. रामाने आपल्या कन्येचा निष्कारण परित्याग केला याबद्दलचा राग तो त्याच्या कौसल्या मातेचा उल्लेख ‘ प्रजापालकाची माता ’ या शब्दांनी करून व्यक्त करतो, पण त्या घटनेने तिलाही आपणाइतकेच दु ख झाले आहे असे समजताच आपण तिच्या मनाला लागेल असे बोलल्याबद्दल त्याला पश्चात्ताप होतो. त्याला दिवंगत दशरथ राजाबद्दल अत्यंत प्रेम वाटत असे आणि कौसल्येविषयी तिच्या पतीच्या मनात कधी काळी वितुष्ट उत्पन्न झाले तर तो आपल्या मध्यस्थीने ते दूर करीत असे. सीतेबद्दल त्याच्या मनात निरतिशय वात्सल्य आहे. तिच्या बालपणातील मुग्ध मुखकमलाची त्याला सदैव आठवण येते. प्रजेतील प्रवादामुळे रामाने सीतेचा त्याग केला म्हणून तो त्या दोषावर अत्यंत संतप्त होतो आणि शापाने किंवा चापाने त्याचा नाश करण्यास उद्युक्त होतो; पण अरुन्धतीने तसे करणे योग्य नाही असे दाखवून देताच तो आपला राग आवरतो. लवाला पाहताच त्याचे राम व सीता यांच्याशी आकृति, वाणी, विनय इत्यादिकांतील साद्दश्य त्याच्या ध्यानात येते आणि त्याच्या हृदयात वात्सल्याचा उमाळा येतो. भवभूतीने जनकाच्या रूपाने एका ज्ञानी, इन्द्रियनिग्रही आणि प्रेमळ कर्मयोगी गृहस्थाचे रम्य चित्र रेखाटले आहे.

कुश व लव या कुमारांचेही स्वभावरेखन थोडक्यात पण मनोवेधक झाले आहे. हे बारा वर्षांचे जुळे भाऊ, पण शरीराने भव्य आणि बुद्धीने तल्लख आहेत. बालपणातच वाल्मीकीने आन्वीक्षिकी, वार्ता व दण्डनीति या विद्या त्यांना शिकविल्या होत्या. उपनयनानंतर त्यांनी वेदविद्याही हस्तगत केली. तिचा प्रत्यय लवाने यज्ञीय अश्वाच्या रक्षणाकरिता विहित असलेल्या रक्षकांच्या संख्येविषयी ब्राह्मणग्रंथातून जी माहिती सांगितली तिजवरून येतो. वेदाध्ययनामुळे त्यांची वाणी आर्यसंस्कारयुक्त झाली आहे. त्यांना ‘ रामायण ’ पाठ आहे. त्यातून ते रामाला काही श्लोक म्हणून दाखवतात. आपली आकृति, वाणी आणि विनय यांनी ते सर्वांचे मन आकृष्ट करतात. त्यांच्या ठिकाणी क्षत्रियोचित स्वाभाविक अभिमान आहे. यज्ञीय अश्वाच्या रक्षकांनी केलेल्या घोषणेने लवाचा अभिमान डिवचला जातो आणि तो युद्धास तयार होतो. रामाच्या धीरगंभीर आकृतीने तो प्रभावित झाला तरी क्षत्रिय कोणापुढेही मान लववीत नसल्याने रामाला प्रणाम कसा करावा याचा त्याला पेच पडतो. शेवटी चन्द्रकेतु आपणाला प्रिय मित्र मानतो आणि राम हे त्याचे पूज्य तात. म्हणून धर्मतः ते आपलेही तसेच आहेत असे आपल्या मनाचे समाधान करून तो त्यांच्यापुढे नम्र होतो आणि याच कारणास्तव कुशालाही त्यांना नमस्कार करण्यास सांगतो.

कुश आणि लव सर्व शस्त्रास्त्रविद्येत प्रवीण आहेत. रामाच्या चित्रदर्शनप्रसंगी दिलेल्या वरानं त्यांना जन्मापासून जृंभकास्त्रांची प्राप्ति झाली आहे. लव त्या अस्त्रांचा

उपयोग करून चन्द्रकेतूच्या सैनिकांना स्तब्ध करतो. दोघेही स्वभावतः अभिमानी असले तरी त्यांना गुरुजनांविषयी आदर आहे आणि त्यांच्यासमोर ते विनयाने नम्र होतात. भवभूतीने कुश व लव यांच्या रूपाने शूर, शस्त्रास्त्रसंपन्न, बुद्धिमान्, स्वाभिमानी आणि विनयशील क्षत्रियकुमाराचे मनोवेधक चित्र काढले आहे.

लक्ष्मणपुत्र चन्द्रकेतु याचीही व्यक्तिरेखा कुशलवाप्रमाणे आकर्षक आहे. तो शूर, निर्भय, विनयसंपन्न आणि सौजन्यशील आहे. लव पादचारी असता आपण रथावर बसून त्याच्याशी युद्ध करणे हे धर्मयुद्ध नव्हे याची त्याला जाणीव आहे. म्हणून तो रथातून खाली उतरतो. त्याला रामाविषयी अत्यंत आदर आणि अभिमान आहे. म्हणून लवाने त्याच्या जीवनातील तथाकथित दोषाचा उल्लेख करताच त्याचा क्रोध अनावर होऊन तो त्याला युद्धाचे आह्वान देतो. रामाच्या मध्यस्थीने युद्ध संपल्यावर तो आपला प्रिय मित्र म्हणून रामाशी लवाची ओळख करून देतो.

त्रिकालज्ञानी, परमकारुणिक, आदिकवि वाल्मीकि, भ्रातृप्रेमी लक्ष्मण, आज्ञाधारक हेर दुर्मुख, विवेकी विद्यार्थी भाडायन आणि त्याचा खट्याळ पण विनोदी मित्र सौधातकि, यांचीही शब्दचित्रे कवीने थोडक्यात पण कुशलतेने काढली आहेत.

स्त्रीपात्रात सीता प्रमुख आहे. तिचे रामावर अत्यंत प्रेम आहे. त्यामुळे त्याच्या सहवासासाठी ती वनवासाचे कष्ट पत्करते. तिचे वृक्ष, पशु व पक्षी यांच्यावरही आपल्या पुत्राप्रमाणे वात्सल्ययुक्त प्रेम आहे. पन्चवटीच्या परिसरातील कदम्बवृक्ष तिने स्वतः पाणी घालून वाढविला होता. तेथे शिलाखंडावर बसून ती हरणांना गवताचा चारा घालत असे, मोरांना टाळ्या वाजवून व भ्रुकुटीभंग करून नाचवत असे, आपल्या पुढे डोलत उभा राहिलेल्या हत्तीच्या छाव्याला शल्लकीचे कोमल पल्लव भरवीत असे. या सर्वांची रम्यचित्रे भवभूतीने तिसऱ्या अंकात काढली आहेत. आपल्या पुत्रांचा जन्मल्यानंतर अल्पकालात विरह व्हावा याचे तिला अत्यंत दुःख होते. त्यातून आपल्या पतीला त्याच्या मुग्ध मधुर वदनकमलाचे चुम्बन घेता आले नाही याने तिचे दुःख दुणावते. ' अशा परिस्थितीत मी त्यांना जन्म दिला त्याचा काय उपयोग ! ' असे ती विचारते.

अशा प्रेमळ, पतिपरायण सीतेवर निष्कारण परित्यागाचा वज्राघात होतो. रामाने तिला विश्वासात घेऊन प्रजानुरंजनाकरिता मी तुझा त्याग करीत आहे असे सांगितले असते तर तिला त्याचे इतके वाईट वाटले नसते. वसिष्ठऋषींचा संदेश आल्यावर ' लोकाराधनेकरिता सीतेचाही त्याग करताना माझ्या मनाला व्यथा होणार नाही ' हे रामाचे उद्गार ऐकताच ती त्याच्या उदात्त मनोवृत्तीचे अभिनंदन करीत म्हणाली

होती– 'अत एव राघवकुलधुरंधर आर्यपुत्र'।' (म्हणूनच माझ्या आर्यपुत्रांना रघुकुलामध्ये श्रेष्ठ गणतात.) पण रामाने तिच्याबरोबर गंगातीरी जाण्याचे वचन देऊन तिला एकटीला वनात सोडले होते, याचा तिला राग येतो. हे निष्कारण परित्यागाचे शल्य तिच्या मनात बारा वर्षे सलत राहते. पञ्चवटीच्या परिसरातसूर्य-देवाच्या पूजेकरिता फुले वेचत असता जेव्हा तिला तमसेकडून कळते की राम शम्बूकाला दंड करण्याकरिता आले आहेत तेव्हा 'दिष्ट्या अपरिहीणधर्मा खलु स राजा' अशा एखाद्या तटस्थाप्रमाणे 'राजा' शब्दाने ती त्याचा उल्लेख करते. पण पुढे शोकाने फिक्कट झालेले त्याचे मुख आणि कृश झालेले त्याचे शरीर पाहिल्यावर ती दुःखाने मूर्च्छित होते. वासन्ती रामाला पूर्वीचे पंचवटीतील पशु, पक्षी आणि परिचित प्रदेश दाखविते त्यामुळे रामाचा शोक दुःसह होऊन तो मूर्च्छित होतो, तेव्हा ती आपल्या हस्तस्पर्शाने त्याला सावध करते. त्याचे दुःख आणि आपणावरचे निरतिशय प्रेम पाहून तिचे हृदय कळवळून येते. वासन्ती रामाला त्याने सीतेला केलेल्या अन्याया-बद्दल दारुण म्हणते, तेव्हा ती उद्गारते, 'वासन्ती तू स्वतःच दारुण आणि कठोर आहेस. कारण तू अगोदरच दुःखित असलेल्या आर्यपुत्राचा संताप वाढवीत आहेस.' शेवटी वासतीचा निरोप घेताना जेव्हा राम म्हणतो की, 'आता मी परत गेल्यावर माझ्या सहधर्मचारिणीला— सीतेच्या सुवर्णप्रतिमेला—पाहत पाहत आपले मनोविनोदन करीन' तेव्हा तर सीतेच्या हृदयातील निष्कारण परित्यागाचे शल्य पूर्णपणे निघून जाते. सीतेच्या रामविषयक मनोवृत्तीत हळू हळू झालेला हा फरक भवभूतीने हळुवारपणे दाखविला आहे.

भवभूतीने अरुन्धतीचेही स्वभावरेखन मोठ्या कुशलतेने केले आहे. कवीच्या मनात एकंदरीत स्त्रियांविषयी विशेष आदर आहे. त्यात अरुन्धती ही उषा देवते-प्रमाणे जगद्वंद्य; गुरूंचेही गुरु, तपोनिधि वसिष्ठ ऋषि यानाही तिच्या सानिध्यामुळे पवित्र वाटावे अशी तिची योग्यता. कालिदासाने 'कुमारसंभवा'त भगवान् शंकरानेही पार्वतीशी विवाह जुळविण्याकरिता साहाय्य करण्याची तिला विनंती केली होती असे वर्णन करुन तिचे माहात्म्य सूचित केले होते. भवभूतीनेही जनक आणि कौसल्या यांच्यामध्ये दिलजमाई घडवून आणण्याच्या नाजुक कामाकरिता तिची योजना केली आहे. ते काम ती अत्यंत कुशलतेने पार पाडते. सीतेचे दोन मुलगे वाल्मीकीच्या आश्र-मात आहेत हे तिला भागीरथीकडून कळते. पण योग्य वेळेच्या अगोदर रहस्यस्फोट न करण्याची ती काळजी घेते. लवाला पाहिल्यावर 'हा कोण असावा बरे?' या जनकाच्या प्रश्नाचे उत्तर देण्याचे टाळण्याकरिता ती म्हणते, 'आम्हीही आजच आलो!' सारांश अरुन्धतीच्या रूपाने भवभूतीने पोक्त, व्यवहारज्ञ, चतुर पुरन्ध्रीचे चित्र काढले आहे.

निष्कारण सीतात्यागाने दुःखित झालेली, आणि त्यामुळे रामाचे मुखही पाहण्याचे टाळणारी, स्वतःच्या मुलांनीच अपराध केला असल्याने त्यांना कसे भेटावे याच्या विवंचनेत असणारी कौसल्या, सीतेची दण्डकारण्यातील जिवलग मैत्रीण, तिचे परम विश्वासस्थान, तिच्या परित्यागास्तव रामाला कठोर वाक्ताडन करणारी वनदेवता वासंती, विद्येच्या प्रेमाने शेकडो मैलांचा प्रवास करणारी प्रौढ विद्यार्थिनी आत्रेयी यांचीही शब्दचित्रे थोडक्यात पण मनोवेधक रीतीने कवीने काढली आहेत.

## ' उत्तररामचरिता 'तील रस

उत्तररामचरितातील प्रधान रस करुण हा आहे. स्वतः कवीनेही हे खालील श्लोकात सांगितले आहे.

> एको रसः करुण एव निमित्तभेदा-
> द्भिन्नः पृथक् पृथगिवाश्रयते विवर्तान् ।
> आवर्तबुद्बुदतरङ्गमयान्विकारा-
> नम्भो यथा सलिलमेव तु तत्समग्रम् ॥

काही विद्वान् याचा अर्थ ' नाटकात ( किंवा जीवनात ) करुण हाच मुख्य रस गणला जावा, वीर, हास्य इत्यादि रस त्याला अंगभूत असावे ' असा करतात[1] पण तो बरोबर नाही. भवभूतीने आपल्या सर्व नाटकात करुण रसाला प्राधान्य दिलं नाही. ' महावीरचरिता 'त वीररस आणि ' मालतीमाधवा 'त शृंगाररस प्रधान आहे. वरील श्लोकाचा खरा अर्थ असा की ' उत्तररामचरिता 'त करुण हाच रस मुख्य आहे. पात्रभेदाने त्याची भिन्न भिन्न रुपे दिसतात, पण मूलतः त्या सर्वांचा स्थायिभाव एकच म्हणजे शोक हा आहे. ' उत्तररामचरिता 'त सीतेच्या अकारण परित्यागामुळे अनेकांना शोक झालेला दाखविला आहे. उदाहरणार्थ, रामाला पत्नीशोक, पृथ्वीदेवी आणि जनक यांना कन्याशोक, कौसल्येला स्नुषाशोक, वासन्ती व आत्रेयी यांना मैत्रिणीशोक, सुमन्त्राला राज्ञीशोक इत्यादि. पण त्या शोकाचे मूळ रूप एकच म्हणून त्याच्या शोकाने उद्रिक्त झालेला करुणरस भिन्न भिन्न भासला तरी त्याचे स्वरूप मूलतः एकच होय. जशी पाण्याची भोवरे, बुडबुडे, लाटा अशी विविध रुपे दिसली तरी ती सर्व मूलतः पाणीच होत, तसाच हा प्रकार आहे. कित्येक विद्वान् 'उत्तररामचरिता'तील मुख्य रस करुण न मानता विप्रलंभ शृंगार किंवा करुणविप्रलम्भ मानतात.[2]

---

१. R D Karmarkar, *Bhavabhūti*, p. 58.

२. S. A. Dange and S. S. Dange, *Critiques on Sanskrit Dramas*, pp. 1 f.

पण करुण आणि विप्रलंभशृंगार या दोन्हीत शोक असला तरी त्याचे स्वरूप निराळे असते. ते जगन्नाथ पंडिताने 'रसगंगाधरा'त स्पष्ट केले आहे. तो म्हणतो, 'स्त्री-पुरुषाचा जीवितावस्थेत वियोग झाला असता वैक्लव्याने (शोकाने) पुष्ट झालेल्या रतीचेच प्राधान्य असल्यामुळे तेथे विप्रलंभरस उत्पन्न होतो. त्या ठिकाणी वैक्लव्य संचारिभाव असतो. पण त्या दोघांपैकी कोणी मृत झाल्यास रतिपोषित वैक्लव्याला प्राधान्य मिळून तेथे करुण रस व्यक्त होतो. वरीलपैकी कोणी मृत झाला असला तरी देवादिकांच्या प्रसादाने तो जिवंत झाला (किंवा होणार) असे ज्ञान असल्यास तेथे आलम्बनविभाव पूर्णपणे नष्ट होत नसल्याने दीर्घ प्रवासातल्याप्रमाणे तेथील रस विप्रलंभच होय, करुण नव्हे. काही आलंकारिक अशा ठिकाणी करुणविप्रलम्भ नामक रस मानतात.[१]'

वरील दृष्टीने 'उत्तररामचरिता'चे निरीक्षण केल्यास त्या नाटकाच्या पहिल्या अंकात संभोग व विप्रलम्भ असा दोन्ही प्रकारचा शृंगार व्यक्त झाला आहे. राम ज्या श्लोकात (उदाहरणार्थ, क्र. १८, २४–२७) सीतेच्या सुखद सहवासाचे वर्णन करतो तेथे संभोगशृंगार आणि श्लो. २८ मध्ये व नंतर तिचा वियोग झाल्यामुळे रामाच्या हृदयद्रावक दुःखाचे जेथे वर्णन आले आहे तेथे विप्रलम्भशृंगार हे रस आहेत. पुढील पाच अंकात सीता मृत झाली अशीच सर्वांची समजूत झाली असल्याने राम, जनक, वासन्ती, आत्रेयी इत्यादिकांच्या शोकाच्या वर्णनाने उत्पन्न झालेला रस करुणच होय, विप्रलंभ किंवा करुणविप्रलंभ नव्हे. भवभूतीलाही हेच मत संमत होते हे त्याच्या पूर्वोक्त श्लोकादरून दिसून येईल.

प्रस्तुत नाटकातील प्रमुख रस करुण असला तरी इतर काही रसही गौणरूपाने त्यात आले आहेत. संभोग व विप्रलंभ शृंगाराचा निर्देश मागे केला आहेच. सौधातकि आणि भांडायन यांच्या संवादात हास्यरस, लव व चन्द्रकेतु यांच्या युद्धाच्या वर्णनात वीररस, जृंम्भकास्त्रांच्या आणि भागीरथी व पृथ्वीदेवी यांच्या जलातून झालेल्या आविर्भावाच्या वर्णनात अद्‌भुत रस, हे गौण रूपाने आले आहेत. भवभूतीने सर्वच रसांची अभिव्यक्ति कौशल्याने केली आहे.

### 'उत्तररामचरिता'तील रीति

प्रस्तुत नाटकातील प्रधान रस करुण असल्यामुळे भवभूतीने त्याला अनुरूप अशा कोमलवर्णयुक्त आणि समासरहित वैदर्भी रीतीचा उपयोग केला आहे. वीररसाच्या वर्णनात किंवा जेथे रसाचा साक्षात् संबंध येत नाही अशा अरण्यादिकांच्या वर्णनात

---

१. रसगंगाधर (नि. प्रे.), पृ. ३२.

दीर्घसमासयोजना केली आहे. भवभूति एकाच श्लोकात वर्ण्य रसाला अनुरूप अशी आपली शैली कशी बदलतो याचे उत्तम उदाहरण खालील श्लोकात दिसेल–

यथेन्दावानन्दं व्रजति समुपोढे कमलिनी
तथैवास्मिन्दृष्टिर्मम कलहकामः पुनरयम् ।
रणत्कारक्रूरक्वणितगुणगुञ्जद्गुरुधनु–
र्धृतप्रेमा बाहुर्विकचविकरालोल्वणरसः ।।

या श्लोकाच्या प्रथमार्धात लव चन्द्रकेतूला पाहून आनन्दित झालेल्या आपल्या दृष्टीचे वर्णन करीत आहे म्हणून त्यात वैदर्भी रीतीचा आणि द्वितीयार्धात त्याच्या झगडाळू बाहूचे वर्णन असल्यामुळे गौडी रीतीचा यथायोग्य उपयोग भवभूतीने केला आहे.

इतर नाटकातील प्राकृत भाषणात भवभूतीने दीर्घ समासाची योजना केली होती, पण या नाटकातील संस्कृत व प्राकृत भाषणेही सामान्यतः सुटसुटीत व प्रसादगुणयुक्त आहेत. क्वचित् (उ. सहाव्या अंकातील विद्याधरमिथुनानी केलेल्या युद्धवर्णनात) भवभूति पूर्वीच्या वळणावर गेला आहे.

---

## परिशिष्ट चौथे

# उत्तररामचरित आणि कुन्दमाला

### ' कुन्दमाले 'ची प्राप्ति आणि तिचा कर्ता

' कुन्दमाला ' हे नाटक पुढे दाखविल्याप्रमाणे बरेच प्राचीन आहे; तथापि ते मध्यंतरी दीर्घ काल अज्ञात होते. सन १९२३ मध्ये रामकृष्ण कवि आणि रामनाथशास्त्री यांनी ते ' दक्षिणभारतीसंस्कृतग्रंथमाले 'त प्रथम छापले. रामकृष्ण कवि यांचा अज्ञात संस्कृत ग्रंथ हुडकून काढण्यात हातखंडा होता. त्यांनी ' चतुर्भाणी ', ' अवन्तिसुन्दरी-कथा ', ' कौमुदीमहोत्सव ', ' तापसवत्सराज ' इत्यादि अनेक ग्रंथ रामनाथशास्त्र्यांच्या साहाय्याने दक्षिणभारतीसंस्कृतग्रंथमालेत प्रसिद्ध केले. ' कुन्दमाले 'ची त्यांची आवृत्ति तंजावरच्या सरस्वतीमहाल ग्रंथालयातील दोन हस्तलिखिते आणि म्हैसूर सरकारच्या प्राच्य ग्रंथालयातील दुसरी दोन हस्तलिखितें यांवरून तयार केली होती ही चारी हस्तलिखिते त्रुटित असून अशुद्ध रीतीने लिहिली आहेत. त्यामुळे या आवृत्तीत काही त्रुटी आहेत. शिवाय त्यांमध्ये नाटककर्त्याचे नाव भिन्न आहे. तंजावरीय हस्तलिखितात ते ' धीरनाग ' असे दिले आहे तर म्हैसूरीय हस्तलिखितात ते ' दिङ्नाग ' असे आढळते.[1] रामकृष्ण कवि आणि रामनाथ शास्त्री यांनी आपल्या आवृत्तीत ते ' दिङ्नाग ' असे दिले होते, पण पुढे त्यांचे मत बदललेले दिसते. कारण ' कौमुदीमहोत्सवा 'च्या शेवटच्या मलपृष्ठावर त्या नाटकाची जाहिरात देताना ते त्यांनी 'धीरनाग' असे दिलेले आढळते. 'कुन्दमाले'च्या कर्त्याच्या नावाविषयी तेव्हा-पासून विद्वानांत वाद माजून राहिला आहे. जयचन्द्र शास्त्री, शरणदास मानोत व वेदव्यास, कैलासनाथ भटनागर, कृष्णकुमार धावन इत्यादिकांनी संपादिलेल्या ' कुन्द-माले'च्या आवृत्तीत कर्त्यांचे नाव 'दिङ्नाग' असे दिले आहे. मानकड,[2] जागीरदार,[3] आणि वरदाचारी[4] यांनी आपल्या लेखात वा ग्रंथात ते ' दिङ्नाग ' असेच मानले

---

१ हे विधानही निरपवाद नाही आमचे ' स्टडीज् इन इंडॉलॉजी ' (द्वितीयावृत्ति, १९६८), पृ. ६५ पाहा.

२ ॲनल्स ऑफ दि भांडारकर इन्स्टिट्यूट, पु ९, पृ. ३३३-३४.

३. ड्रामा इन संस्कृत लिटरेचर, पृ. १५१.

४. हिस्टरी ऑफ संस्कृत लिटरेचर, पृ. ४०-४१.

आहे. सन १९२५ मध्ये पं. रंगाचार्य रड्डी व डॉ. रा. चिं. श्रीखंडे यांनी 'कुन्दमाले'चे मराठी भाषांतर प्रसिद्ध केले त्यात हे नाटक 'कविवर दिङ्नागाचे' असे म्हटले आहे. अलीकडे डॉ. कालीकुमार दत्त यांनी कलकत्ता संस्कृत कॉलेज संशोधनग्रंथमालेत 'कुन्दमाले'ची चिकित्सक आवृत्ति प्रकाशित केली आहे तीत आणि नुकटेच डॉ. ह. द. साकलिया यांनी बडोदा विद्यापीठाच्या प्राच्यविद्यासंस्थेच्या जर्नल (पु. १५, पृ. ३२२–३३४) मध्ये त्या नाटकाचा 'उत्तररामचरिता'शी संबंध या विषयी जो प्रदीर्घ लेख लिहिला आहे त्यातही दिङ्नाग यालाच त्या नाटकाचा कर्ता मानला आहे. याच्या उलट प्रो पी. पी. एस्. शास्त्री,[1] प्रो. सुब्रह्मण्यम् ऐयर,[2] डॉ. सुशीलकुमार दे,[3] कृष्णमाचारियर[4] इत्यादिकांनी त्या नाटकाच्या कर्त्याचे नाव 'धीरनाग' होते, असे ठरविले आहे. 'त्रिवेंद्रम ग्रंथमालेतील तेरा नाटके भासाची किंवा दुसऱ्या कोणाची?', 'चारुदत्त' व 'मृच्छकटिक' यांचा परस्परसंबंध कोणता?, 'कौमुदीमहोत्सवा'चे कथानक गुप्तकालीन किंवा काल्पनिक' या समस्यांप्रमाणे 'कुन्दमाले'च्या कर्त्याचे नावही एक कोडे झाले आहे. या बाबतीत अलीकडे आणखी थोडा पुरावा उपलब्ध झाला आहे. त्याच्या साहाय्याने या प्रश्नाची चर्चा येथे करावयाची आहे.

'उत्तररामचरित' आणि 'कुन्दमाला' या दोन्ही नाटकात रामाच्या राज्याभिषेकानंतर केलेल्या सीतापरित्यागापासून अश्वमेधयज्ञानंतरच्या सीतास्वीकारापर्यंतचे रामचरित हेच संविधानक असल्यामुळे या दोन नाटकांचे पौर्वापर्यही वादविषय झाले आहे. ते काही अंशी 'कुन्दमाले'च्या कर्त्याच्या नावाशी संबद्ध आहे. जे विद्वान् दिङ्नागाला 'कुन्दमाले'चा कर्ता मानतात ते ते नाटक 'उत्तररामचरिता'च्या पूर्वीचे मानतात; कारण (१) दिङ्नाग हा बहुधा सुप्रसिद्ध बौद्धतत्त्वज्ञ असावा. याच्या काही ग्रंथांची भाषांतरे परमार्थाने (इ. स. ५५७ ते ५६९) चिनी भाषेत केल्यामुळे तो पाचव्या शतकात होऊन गेला असावा. अर्थात् तो आठव्या शतकाच्या आरंभी झालेल्या भवभूतीच्या पूर्वी काही शतके होऊन गेला. (२) दिङ्नाग हा कालिदासाचा प्रतिस्पर्धी व दोषदर्शी होता असे 'मेघदूता'चे टीकाकार दक्षिणावर्तनाथ व मल्लिनाथ म्हणतात. तेव्हा तो भवभूतीपूर्वी होऊन गेला यात संशय नाही. पण ही दोन्ही प्रमाणे लेचीपेची आहेत. 'मेघदूता'च्या (श्लो. १४) 'दिङ्नागानां पथि

१. सरस्वती महाल ग्रंथालयातील हस्तलिखितांची सूची, पु. ३, पृ. ३३७३ ते ३३८५.

२. प्रोसीडिंग्ज ऑफ दि ओरिएंटल कॉन्फरन्स् १९३३, पृ. ९१–९७.

३. ॲ. भा. इ., पु. १६, पृ. १५८.

४. हिस्टरी ऑफ क्लासिकल संस्कृत लिटरेचर, पृ. ६०४, तळटीप.

परिहरन् स्थूलहस्तावलेपान्' या श्लोकार्धात कोणा दिङ्नागनामक तत्त्वज्ञाचा किंवा टीकाकाराचा उल्लेख आहे याला प्रमाण नाही. दक्षिणावर्तनाथाच्या पूर्वीच्या वल्लभदेव, स्थिरदेव इत्यादि टीकाकारांनी तसा श्लेष मानला नाही आणि असे श्लेष योजण्याकडे कालिदासाची प्रवृत्तिही नाही. सर्वांत बलवत्तर प्रमाण हे की कालिदासाला आपल्या प्रतिपक्षाचा श्लेषद्वारा उल्लेख करावयाचा असता तर तो 'दिङ्नागानाम्' अशा अनेकवचनान्त उपयोग करता ना ! शिवाय बौद्ध तत्त्वज्ञ दिङ्नाग हा दक्षिणेत कांची (हल्लींचे कांजीवरम्) येथे राहणारा. विदर्भातील रामगिरि (रामटेक) हून उत्तरेत अलकेला जाणाऱ्या[1] मेघाला आपल्या मार्गात तो भेटणार कसा आणि मेघ त्याच्या कालिदासदोषदर्शक स्थूल हाताना दूर सारणार तरी कसा ? आणखी असे की 'कुन्दमाले'चा कर्ता कालिदासाइतका प्राचीन (इ. स. ४०० च्या सुमारचा) दिसत नाही. कुन्दमालेच्या—

जम्भारिमौलिमन्दारमल्लिकामधुचुम्बिनः ।
पिबेयुरन्तरायाब्धिं हेरम्बपदपांसवः ।।

या नान्दी—श्लोकात गजाननाची प्रार्थना आहे. कालिदासाच्या कोणत्याही ग्रंथात गजाननाचा उल्लेख नाही. गजाननाची उपासना गुप्तकालाच्या उत्तरार्धात (सुमारे इ. स. ४५० ते ५०० या काळात) सुरू झाली असावी असे आम्ही इतरत्र दाखविले आहे.[2] तेव्हा 'मेघदूता'च्या वरील श्लोकात 'दिशादिशांत उभे असलेल्या दिग्गजाच्या स्थूल शुंडादंडाना दूर सारून तू उत्तरेत उड्डाण कर' एवढाच अर्थ कालिदासास विवक्षित आहे. अर्थातच 'कुन्दमाले'चा कर्ता दिङ्नाग असल्यास तो इ. स. ४०० इतका प्राचीन नाही.

दुसरी गोष्ट अशी की 'कुन्दमाले'चा कर्ता कोणी दिङ्नाग होता असे दिसत नाही. सुभाषितसंग्रहांत दिङ्नागाच्या नावावर श्लोक दिलेले आढळत नाहीत. याला अपवाद एकच. वल्लभदेवाच्या 'सुभाषितावली'त (श्लो. ३४३७) पुढील श्लोक दिङ्नागाच्या नावावर दिला आहे—

तर्कोऽप्रतिष्ठः श्रुतयो विभिन्ना
नासौ मुनिर्यस्य वचः प्रमाणम् ।
धर्मस्य मूलं निहितं गुहायां
महाजनो येन गतः स पन्थाः ।।

१. मिराशी, 'मेघदूतातील रामगिरि अर्थात् रामटेक', पृ. २६ ते ४५.

२. मिराशी, 'संशोधनमुक्तावलि', सर ५, पृ. ६३–९१.

पण हा श्लोक 'महाभारता'च्या वनपर्वातील (निर्णयसागर आवृत्ति, अध्याय ११३, श्लो. १७) आहे. तो दिङ्नागाचा असणे शक्य नाही.[1] याच्या उलट तंजावर-च्या हस्तलिखितात कुन्दमालेच्या कर्त्याचे नाव 'धीरनाग' असे दिलेले आढळते आणि तेच बरोबर दिसते. 'कुन्दमाले'तील नान्दीनंतरचा शिवस्तुतिपर पुढील मंगलश्लोक अनेक सुभाषितसंग्रहांत संगृहीत केला आहे—

> ज्वालेवोर्ध्वविसर्पिणी परिणतस्यान्तस्तपस्तेजसो
> गङ्गातुङ्गतरङ्गसर्पवरातिर्बल्मीकलक्ष्मीरिव ।
> सन्ध्येवार्द्रमृणालकोमलतनोरिन्दोः सहस्थायिनी
> पायाद्वस्तरुणारुणांशुकपिशा शम्भोर्जटासंततिः ॥

सध्या उपलब्ध असलेल्या सर्व सुभाषितसंग्रहांत प्राचीनतम अशा विद्याकराच्या 'सुभाषितरत्नकोशा'त (सुमारे इ. स. ११००) या श्लोकाच्या कवीचे नाव दिले नाही, पण ते इ. स. १२०५ च्या श्रीधरदासाच्या 'सदुक्तिकर्णामृता'त 'रविनाग' असे आले आहे. त्याच सुमारच्या 'प्रसन्नसाहित्यरत्नाकर' नामक दुसऱ्या अप्रकाशित सुभाषितसंग्रहात ते 'वीरनाग' असे आढळते.[2] ही दोन्ही लिहिणाऱ्याच्या किंवा वाचणाऱ्याच्या प्रमादाने झालेली 'धीरनाग' याची अपभ्रष्ट रूपे वाटतात. इ. स.च्या अकराव्या शतकापर्यंत नागरी लिपीत 'ध' आणि 'व' यांचा आकार सारखाच होता, फक्त 'व' ला लहानशी शिरोरेषा असे आणि 'ध' ला ती नसे. 'वा' आणि 'धा' यांत फरक दाखविण्याकरिता 'धा'च्या दोन उभ्या रेषांना मध्ये आडव्या रेषेने जोडले जाई. पुढे बाराव्या शतकात 'ध' ला डाव्या बाजूला शिंग

१. डॉ. कालीकुमारदत्त यांनी भांडारकर इन्स्टिट्यूटच्या 'महाभारता'च्या चिकित्सक आवृत्तीत हा श्लोक प्रक्षिप्त मानला आहे असे दाखविले आहे. तथापि त्यावरून तो दिङ्नागाचाच असे ठरत नाही. तो कोणा अज्ञात कवीने रचलेला आणि लोकोक्तीत प्रचलित असलेला दिसतो. त्याचा शेवटला चरण 'महाजनो येन गतः स पन्थाः ।' 'पंचतंत्रा'च्या पाचव्या तंत्रातील 'मूर्ख पंडिताच्या कथे'त आला आहे. 'पंचतंत्रा'चे पहलवी भाषांतर इ. स. ५७० मध्ये झाले होते, त्यावरून हा श्लोक बराच प्राचीन दिसतो. तो इतरत्र कोठेही दिङ्नागा-च्या नावावर दिलेला नाही.

२. कोसंबी आणि गोखले यांनी संपादिलेला 'सुभाषितरत्नकोश' (हारवर्ड ओरिएंटल सीरीज), श्लोक ५५.

जोडून 'व' पासून निराळे दाखविण्यात येऊ लागले.[1] तेव्हा 'धीरनाग' हे नाव 'वीरनाग' असे वाचले गेले असले तर त्यात आश्चर्य नाही. या बाबतीत संशयाला जागा नाही. कारण 'कुन्दमाले'तील आणखी एक श्लोक विद्याकराच्या 'सुभाषित-रत्नकोषा'त (श्लोक ७६४[2]) घेतला आहे तो हा—

> द्यूते पणः प्रणयकेलिषु कण्ठपाशः क्रीडापरिश्रमहरं व्यजनं रतान्ते ।
> शय्या निशीथकलहेषु मृगेक्षणायाः प्राप्तं मया विधिवशादिदमुत्तरीयम् ।।
>
> (कुन्दमाला, ४, २०)

या श्लोकातील कल्पना सुंदर असल्याने तो भोजाच्या 'शृंगारप्रकाशा'तही घेतला आहे. तेथे तो 'कुन्दमाले'तील म्हणून दिला आहे, पण कवीचे नाव दिले नाही. परंतु **विद्याकराच्या 'सुभाषितरत्नकोशात' त्याच्या कर्त्याचे नाव 'धीरनागस्य' असे स्पष्ट दिले आहे. याच्या उलट कोणत्याही सुभाषितसंग्रहात वा अलंकारग्रंथात 'कुन्दमाले'तील एकही श्लोक दिङ्नागाच्या नावावर दिला नाही.** 'कुन्दमाले'चा कर्ता दिङ्नाग नसून धीरनागच होता ह्याचे हे अत्यंत बलवत्तर असे प्रमाण आहे.

धीरनागाचे आणखी पाच श्लोक वल्लभदेवाच्या 'सुभाषितावली'त (इ. स. चे १५ वे शतक) त्याच्या नावावर दिले आहेत. (श्लोक क्रमांक १०६४, ११४२, ३३८७ ते ३३८९ पाहा.) यांपैकी चार श्लोकांच्या बाबतीत कवीचे नाव 'धीरनागस्य' असे दिले आहे. पण एका श्लोकाबरोबर (श्लो. ११४२) ते 'भदन्तधीरनागस्य' असे आढळते. त्यावरून या श्लोकाचा कर्ता कोणी बौद्ध भिक्षु असावा असा तर्क काहींनी केला आहे. 'कुन्दमाले'चा कर्ता धीरनाग हा बौद्ध नव्हता. त्या नाटकाच्या नान्दीश्लोकात गजाननाची प्रार्थना आहे. नंतरच्या मंगलश्लोकात भगवान् शंकराच्या जटासमूहाचे वर्णन असून त्याची कृपा प्रार्थिली आहे. त्या नाटकाचा विषय रामचरित

---

१ आमच्या 'इन्स्क्रिप्शन्स ऑफ दि कलचुरि-चेदि ईरा' या ग्रंथात त्या सवताच्या या कालातील कोरीव लेखाचे छाप व वाचन दिले आहे ते पाहावे. कलचुरि संवत् ८२३ (इ स. १०७२) मधील कलचुरि नृपति यश.कर्ण याच्या खैरा ताम्रपटात 'व' आणि 'ध' याच्या आकृति सारख्या दिसतात, पण त्या सवताच्या ९०२ (इ स ११५१) च्या गयाकर्णाच्या तेवरच्या शिलालेखात 'ध'ला सध्याचे रूप प्राप्त झालेले दिसेल

२ कोसंबी व गोखले संपादित आवृत्ति, पृ. १४१. या महत्त्वाच्या पुराव्या-कडे विद्वानांचे लक्ष गेलेले दिसत नाही.

आहे. तेव्हा त्याचा कर्ता बौद्धधर्मी असणे संभवनीय नाही. 'सुभाषितावली 'तील पाचही श्लोक मुक्तक स्वरूपाचे म्हणजे फुटकळ आहेत. ते कोणा ग्रंथातून घेतलेले दिसत नाहीत. त्यांपैकी चार श्लोकांच्या बाबतीत कर्त्यांच्या नावाला बौद्धधर्मदर्शक 'भदन्त' पद लावलेले नाही. पाचवा श्लोक (क्र. ११४२) हा–

मया बद्धा वेणी निवसितमशुक्लं च वसनं
श्रुताः शोचन्तीनां परिजनसखीनामपि गिरः ।
निवृत्तास्ते दृष्ट्वा गतमनुगता येऽस्य सुहृद–
स्तथाप्येते प्राणा दयितमनुयाता न कृपणाः ।।

या श्लोकाबरोबर 'भदन्तधीरनागस्य' असा कर्त्याचा उल्लेख आहे खरा. तथापि त्यातील वर्णन बौद्ध धर्मासंबंधी नाही तर विप्रलंभशृंगारात्मक आहे. तेव्हा त्याच्या कर्त्याला लावलेले 'भदन्त' हे उपपद लेखकाच्या प्रमादाने लावलेले दिसते.

'कुन्दमाले 'चा कर्ता धीरनाग होता याविषयी इतका भक्कम पुरावा असताना त्याचे नाव अप्रसिद्ध होते आणि त्याच्या मानाने दिङ्नागाचे नाव त्याच्या 'प्रमाण-समुच्चया 'दि शास्त्रीय ग्रंथांवरून लोकांस माहीत झाले होते, या एकाच कारणावरून अनेक संपादकांनी उपलब्ध पुराव्याकडे दुर्लक्ष करून दिङ्नागास कुन्दमालेचा कर्ता मानला आहे हे उघड आहे.

## 'कुन्दमाले 'चा काळ

'कुन्दमाले 'चे उल्लेख किंवा त्यातील श्लोक अनेक ग्रंथांत आढळतात. धाराधिपति भोज (इ. स. १०१५ ते १०५५) याच्या 'शृंगारप्रकाशा 'त 'द्यूते पणः' इत्यादि श्लोक 'कुन्दमाले 'तील म्हणून उद्धृत केला आहे. तो श्लोक 'हनुमन्नाटक' यातही आला आहे, पण त्या नाटकाचा काल अनिश्चित आहे. त्यानंतर सागरनन्दीच्या (सुमारे अकरावे शतक) 'नाटकलक्षणरत्नकोशा 'त रामचंद्र व गुणचंद्र (११०० ते ११७५) याच्या 'नाट्यदर्पणात', शारदातनयाच्या (सुमारे ११७५ ते १२५०) 'भावप्रकाशना 'त, तसेच विश्वनाथाच्या (सु. १३०० ते १३८०) 'साहित्यदर्पणा 'त 'कुन्दमाले 'चा नामनिर्देश आला आहे.[१] यांपैकी भोजाच्या 'शृंगारप्रकाशा 'तील उल्लेख सर्वांत प्राचीन आहे. त्यावरून 'कुन्दमाला ' इ. स. १००० च्या पूर्वी लिहिली गेली

१. या ग्रंथकारांचे येथे दिलेले काळ डॉ. काणे यांच्या 'साहित्यदर्पणा 'ला जोडलेल्या प्रस्तावनेतून घेतले आहेत.

असावी. ही झाली त्या नाटकाच्या कालाची उत्तरमर्यादा. त्याची पूर्वमर्यादा मात्र अनिश्चित आहे. त्याचा कर्ता दिङ्नाग नामक बौद्ध तत्त्वज्ञ नाही, हे उघड आहे. पण ते निदान भवभूतीच्या पूर्वीचे असावे असे काही विद्वान् मानतात त्याचा आता विचार करू.

## भवभूति आणि धीरनाग यांचे पौर्वापर्य

भवभूति आणि धीरनाग यांच्यामध्ये भवभूतीचे उल्लेख कालक्रमाने अगोदरचे आहेत. कल्हणाच्या 'राजतरंगिणी'त (इ. स. बारावे शतक) म्हटले आहे की भवभूति कनोजनृपति यशोवर्मा याच्या दरबारी राजकवि होता. त्याच राजसभेतील दुसरा कवि वाक्पतिराज याने आपल्या 'गउडवहो' (गौडवध) काव्यात भवभूतीचे ऋण मान्य केले आहे त्यावरून कल्हणाचे विधान बरोबर दिसते. 'गौडवध' काव्यातील कंकणाकृति सूर्यग्रहणाच्या वर्णनावरून त्या काव्याचा काल सुमारे इ. स. ७३५ असा ठरविला आहे. या काव्यातील भवभूतीचा उल्लेख सर्वांत अगोदरचा होय. त्यावरून भवभूति आठव्या शतकाच्या प्रथम पादात होऊन गेला असे डॉ. रामकृष्णपंत भांडारकरांनी निश्चित केले व तेच सर्वमान्य झाले आहे. धीरनागाच्या 'कुन्दमाले'चा कालक्रमदृष्ट्या पहिला उल्लेख भोजाच्या 'शृंगारप्रकाशा'त म्हणजे इ. स.च्या अकराव्या शतकाच्या प्रथमार्धातील होय. तेव्हा केवळ उल्लेखावरून पाहता 'कुन्दमाला' नाटक 'उत्तररामचरिता'नंतरचे दिसते. पण हे प्रमाण अर्थातच निर्णायक नाही. कारण इतर काही कारणावरून धीरनागाचे किंवा त्याच्या 'कुन्दमाले'चे उल्लेख अकराव्या शतकाच्या अगोदरच्या प्रथात आले नसतील, किंवा आले असल्यास ते आपणास आढळले नसतील.[1] काही विद्वानांनी 'कुन्दमाले'तील (अं. १) दशरथाच्या प्रतिमेच्या उल्लेखावरून ते नाटक ज्या काळी पूर्वजांच्या प्रतिमा उभारण्याचा प्रघात होता त्या काळी लिहिले गेले असावे असे अनुमान केले आहे. प्रतिमागृहाचा उल्लेख भासाच्या 'प्रतिमा' नाटकातच आढळतो. प्राचीन काळी कुशाण राजे कनिष्क व हुविष्क आणि त्यांचा क्षत्रप चष्टन यांच्या प्रतिमा मथुरेत उभारल्या होत्या. अर्थातच ही पद्धत इ. स. च्या दुसऱ्या तिसऱ्या शतकातील दिसते. भासाचा कालही सुमारे तिसरे शतक हा आहे. तो कालिदासाच्या (इ. स. ४००) पूर्वीचा. तेव्हा 'कुन्दमाला'

---

१. डॉ. कालीकुमार दत्त यांनी दाखविले आहे की, अश्वघोष ख्रिस्तोत्तर पहिल्या शतकाच्या अखेरीस होऊन गेला असला तरी त्याच्या श्लोकाचा उल्लेख प्रथम राजशेखराच्या 'काव्यमीमांसे'त (इ. स. चे दहावे शतक) आला आहे.

नाटकही अन्याच प्राचीन काळी (इ. स. च्या पाचव्या शतकात) लिहिलं असावे असा तर्क होतो.[1]

पण हा तर्कही बरोबर दिसत नाही. दिवंगत पूर्वजांच्या प्रतिमा उभारण्याची पद्धत भारतात खिस्तपूर्व दुसऱ्या शतकापासून आजतागायत प्रचलित आहे. खिस्तपूर्व दुसऱ्या शतकातील सातवाहन राजाराणींचे पुतळे जुन्नरजवळच्या नाणेघाटातील लेण्यात कोरले होते. ते आता नष्ट झाले असले तरी त्यावरील त्यांच्या नावांचे लेख अद्यापि वाचता येतात. अशा पुतळ्यांच्या स्तंभांना 'छायास्तंभ' म्हणत. अशा एका छायास्तंभावरील लेख अर्जुनीकंड भंडारा जिल्ह्यातील पौनी येथे सापडलेला आम्ही इतरत्र प्रसिद्ध केला आहे.[2] अशा छायास्तंभांचे उल्लेख कोरीव लेखात इ. स. च्या चौदाव्या शतकापर्यंत सापडले आहेत.[3] दिवंगत राजलोकांच्या छन्या उभारण्याची पद्धत आधुनिक काळापर्यंत प्रचलित होती. तेव्हा 'कुन्दमाले'तील दशरथाच्या प्रतिमेच्या उल्लेखावरून त्या नाटकाचा काळ ठरविणे अशक्य आहे.

काही विद्वानांनी 'कुन्दमाले'तील प्राकृत रूपावरून ते नाटक इ. स. च्या पाचव्या शतकातले किंवा त्यापूर्वीचे असावे असा तर्क केला आहे.[4] परंतु 'प्राकृतरूपावरून एखाद्या ग्रंथाचा काल ठरविणे शक्य नाही; कारण सध्याच्या हस्तलिखितातील प्राकृतभाषा मूळच्या ग्रंथकाराची नसून त्या हस्तलिखिताच्या लेखकाची किंवा संपादकाची आहे. अतएव ती पुरावा म्हणून विश्वसनीय नाही,' असे विंटरनिट्झ, सुक्थणकर, हरप्रसादशास्त्री, टर्नर, सुशीलकुमार दे इत्यादि विख्यात विद्वानांनी म्हटले आहे.[5] तेव्हा 'कुन्दमाले'च्या कालाची पूर्व मर्यादा ठरविण्यास अन्तःप्रमाण

---

१. याच 'कुन्दमाला' नावाचे दुसरे एक प्राचीन नाटक होते असे भोजाच्या 'शृंगारप्रकाशा'तील काही उल्लेखावरून दिसते. (राघवन्-भोजकृत 'शृंगारप्रकाश', पृ. ७७७ पाहा.) वर्नेटने नागय्यकृत 'कुन्दमाले'चा उल्लेख दाखविला आहे. तिचे फक्त पाचच अंक होते. तीच ही दुसरी 'कुन्दमाला' असावी (अॅ. भा. इ., पु १६, पृ. १५८ पाहा.)

२. विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक १९६५, पृ. १–७.

३. गंगनृपति तृतीय भानु याने आपला पिता तृतीय नरसिंह आणि सावत्र माता गंगांबिका यांचे छायास्तंभ श्रीकूर्म येथील देवालयात उभारल्याचा इ. स. १३५३ च्या लेखात उल्लेख आहे. (साउथ इंडियन इन्स्क्रिप्शन्स्, पु. ५, लेख क्रमांक १२०५ पाहा.)

४. डॉ. कालीकुमार दत्त–दिङ्नागाची कुन्दमाला, प्रकरण ४ पाहा.

५. पूर्वोक्त, पृ. १२२–१२५.

नाही. पण ' उत्तररामचरित ' व ' कुन्दमाला ' यांचा सूक्ष्म अभ्यास केल्यास त्याच्या पौर्वापर्याबद्दल अनुमान करणे शक्य व्हावे. म्हणून तसा प्रयत्न आता करूं.

## ' उत्तररामचरिता 'चे संविधानक

' उत्तररामचरिता 'चे संविधानक मागे दिले आहे, त्याची 'रामायणा'च्या उत्तरकांडातील कथानकाशी तुलना केल्यास भवभूतीने त्यात केलेले अनेक फरक, ते करण्यात त्याचा उद्देश आणि संविधानरचनेत त्याचे अप्रतिम कौशल्य लक्षात येते ते मागे सविस्तर दाखविले आहे ( पृ. २४८ ). ते या संबंधात अवश्य पाहावे. त्यावरून भवभूतीने ' उत्तररामचरिता 'च्या प्रत्येक अंकात आपल्या कल्पकतेने नवीन नवीन प्रवेश घालून ते नाटक सर्वांगसुंदर केले आहे असे दिसून येईल.

## ' कुन्दमाले 'चे संविधानक

आता आपण धीरनागाच्या ' कुन्दमाले 'चे संविधानक पाहू.

' कुन्दमाले 'चे सहा अंक आहेत. पहिल्या नान्दीश्लोकात गजाननाची प्रार्थना आहे. तो श्लोक मागे दिला आहे आणि नाटककाराचे नाव दिङ्नाग असले तरी तो कालिदासाइतका प्राचीन असणे शक्य नाही हेही दाखविले आहे. त्यानंतर ' ज्वालेवोर्ध्वविसर्पिणी ' इत्यादि भगवान् शंकराच्या जटासमूहाचे वर्णन करणारा मंगलश्लोक आला आहे तो एका प्राचीन सुभाषितसंग्रहात वीरनागाच्या ( म्हणजेच धीरनागाच्या ) नावावर दिला असल्याचे सांगितले आहे.

पहिल्या अंकात सीता आणि लक्ष्मण रथात बसून प्रवेश करतात. ते उतरतात तेथून जवळच भागीरथी आहे. तेथे लक्ष्मण मोठ्या कष्टाने रामाचा पुढील संदेश सीतेला सांगतो–

तुल्यान्वयेत्यनुगुणेति गुणोन्नतेति
दु:खे सुखे च सुचिरं सहवासिनीति ।
जानामि केवलमहं जनवादभीत्या
सीते त्यजामि भवतीं न तु भावदोषात् ॥

नंतर पुढे त्यानेच त्याचा आणखी संदेश सांगितला आहे–

त्वं देवि चित्तनिहिता गृहदेवता मे
स्वप्नागता शयनमध्यसखी त्वमेव ।
दारान्तराहरणनि:स्पृहमानसस्य
यागे तव प्रतिकृतिर्मम धर्मपत्नी ॥

यात सीतेची प्रतिमा करून यज्ञ करण्याचा आपला उद्देश रामाने सांगितला आहे तो अत्यंत अप्रासंगिक आहे. तशी कल्पना त्या प्रसंगी रामाच्या मनात येणे शक्य नाही. ' रामायणा 'त व ' उत्तररामचरिता 'तही रामाने सीतेची सुवर्णप्रतिमा केल्याचा उल्लेख आहे, पण तो सीतात्यागानंतर बारा वर्षांनी अश्वमेध यज्ञाच्या प्रसंगी. तसा उल्लेख प्रस्तुत प्रसंगी करणे अत्यंत अस्वाभाविक आहे.

नंतर सीताही रामाला कळविण्यासाठी आपला संदेश सांगते- ' तपोवनात राहणाऱ्या मला-मी गुणरहित असले तरी-आपल्या दीर्घ परिचयाची म्हणून व अनाथ म्हणून माझे स्मरण ठेवून अनुगृहीत करावे. ' नंतर लक्ष्मण भागीरथी, तेथील मुनिजन, वनदेवता, नद्या वगैरेंना सीतेचे रक्षण करण्याविषयी प्रार्थना करून परत जातो. पुढे तिचा विलाप ऐकलेल्या शिष्याकडून तिची वार्ता ऐकून वाल्मीकि ऋषि तेथे येतात आणि तिला ओळखून आपल्या आश्रमात घेऊन जातात. जाण्यापूर्वी सीता भागीरथीला नवस करते की जर माझी सुखप्रसूति होईल तर मी तुला रोज कुन्दपुष्पाची माला अर्पण करीन ( अंक १ ).

दुसऱ्या अंकाच्या आरंभी सीतेची सखी वेदवती व एक मुनिकन्या यांचा प्रवेश घातला आहे. त्यावरून आपणास समजते की सीतेला कुश व लव असे दोन पुत्र झाले असून ते आता वाल्मीकिप्रणीत ' रामायणा 'चे पठण करण्याइतके मोठे झाले आहेत. रामाने नैमिषारण्यात यज्ञाकरिता सर्व सामग्री जमविली असून तेथे वाल्मीकींनाही निमंत्रण केले आहे. पुढील प्रवेशात सीता म्हणते, ' आता माझे मुलगे मोठे झाले आहेत, वाल्मीकींचेही त्यांच्यावर लक्ष आहे. आता मला जगून काय करावयाचे आहे? पण मला माझ्या वेदवती या प्रियसखीला सांगून तिचा निरोप घेतला पाहिजे. ' नंतर वेदवती प्रवेश करते व संभाषणात सीतेला ' रामाचे तुझ्यावर प्रेम नाही ' म्हणून चिडविते. आता लौकरच रामाचा यज्ञदीक्षासमय प्राप्त होईल त्यावेळी त्याला अन्य सहधर्मचारिणीचे पाणिग्रहण करावे लागेल ' असे वेदवती म्हणते. तेव्हा वास्तविक सीतेने रामाच्या पूर्वीच्या संदेशाचा- ' यज्ञात तुझी प्रतिमाच माझी धर्मपत्नी राहील ' याचा-उल्लेख करावयास पाहिजे होता. पण ती म्हणते, 'आर्यपुत्राच्या हृदयावर माझी सत्ता आहे, हातावर नाही. ' यानंतरही पुढे कोठेही सीतेची सुवर्णप्रतिमा केल्याचा उल्लेख ' कुन्दमाले 'त नाही. सीता व वेदवती संभाषण करीत असता आश्रमातील घोषणा ऐकू येते की ' येथून जवळच महाक्रतु अश्वमेध सुरू होणार आहे. त्याकरिता वसिष्ठ, आत्रेयादि महर्षि आले आहेत. सर्व सामग्री जमविली आहे. केवळ वाल्मीकि न आल्यामुळे रामचंद्र दीक्षाग्रहण करीत नाहीत. त्यांच्या निमंत्रणाकरिता रामाचा दूत

आला आहे. तेव्हा सर्व मुनिकन्यकांनी पुढे व्हावे.' ही घोषणा ऐकून कुशलवांच्या प्रस्थानमंगलाकरिता सीता त्वरेने जावे (अंक २).[1]

तिसऱ्या अंकाच्या आरंभी एका तापसाचा प्रवेश आहे. त्यात तो 'शाकुन्तला'च्या दुसऱ्या अंकातील विदूषकाप्रमाणे प्रवासाने अतिशय थकल्यामुळे आपण एक पाऊलही पुढे टाकण्यास असमर्थ असल्याबद्दल कुरकुर करतो. तो म्हणतो 'माझ्या पायांच्या तळव्यांना फोड आले आहेत. सीता आता कुशलवांसह नैमिषारण्यात पोचली आहे. तेथे जाण्याचा मार्ग कोण बरे मला सांगेल? हा, हे रामलक्ष्मण नैमिषारण्यातच आले असावेत. मी त्यांच्या मागूनच जातो.' तेव्हा रामलक्ष्मणांचा पुढील प्रवेश नैमिषारण्यातीलच होय. वाल्मीकि आल्याचे कळल्यावरुन राम त्यांना भेटण्याकरिता गोमती तीरावरील त्यांच्या आश्रमाकडे चालला होता, पण पुढे तो तो आश्रम मागे टाकून अरण्याकडे वळतो. सीतात्यागामुळे तो अत्यंत दुःखित आहे आणि त्याला लक्ष्मण धीर देत आहे. इतक्यात त्यांना गोमतीच्या प्रवाहात वाहत वाहत एक कुन्दमाला रामाच्या पायाजवळ आलेली दिसते. तिच्यातील कुसुमग्रथनाचे कौशल्य पाहून ती सीतेनेच केली असावी असे रामाला वाटते. तेव्हा लक्ष्मण म्हणतो 'या गोमतीनदीच्या तीराने आपण प्रवाहाच्या विरुद्ध दिशेने जाऊ या. म्हणजे ही कुन्दमाला कोठून आली हे आपणास समजेल.' नंतर ते काही अंतर जातात तों राम विचारतो, 'काय हा भगवान् वाल्मीकींच्या आश्रमाचा प्रदेश आहे? कारण येथे यज्ञाचा धूर दिसत आहे, आणि सामगायनाचा नाद ऐकू येत आहे.' लक्ष्मणाला रामाचा तर्क पटतो. त्याला वाळवटांत काही पावले उमटलेली दिसतात. त्यावरील चिन्हांवरुन ती सीतेची अशी रामाला ओळखता येतात. इतक्यात सीता तेथे येते. ती म्हणते, 'मी स्नान करुन सन्ध्यार्चन केले आहे. भगवती भागीरथीला आपल्या हाताने गुंफलेली कुन्दमाला अर्पण केली आहे. आता अतिथींना अर्पिण्याकरिता मी फुले वेचते.' रामाचा मेघगंभीर आवाज ऐकून आनंदातिशयाने तिच्या अंगावर रोमाच उभे राहतात. रामाला ते अरण्य आणि तेथील समुद्रगामिनी नदी पाहून दंडकारण्याची आठवण होते व सीतेचे स्मरण होऊन तो व्याकुळ होतो. रामाचा शोक पाहून सीतेच्याही डोळ्यात अश्रू उभे राहतात. इतक्यात एक ऋषि प्रवेश करुन रामाला सांगतो की, 'भगवान् वाल्मीकींनी आपले आह्निक आटोपले असून ते तुमची वाट पहात आहेत.' नंतर ते सर्व तिकडे जातात (अंक ३).

---

१. नैमिषारण्य आणि वाल्मीकि आश्रम यांच्या स्थानाविषयी आमचे लेख पहा. *Studies in Indology* Vo. I (second ed.), pp. 276 f.; विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक १९६८, पृ. १ इ.

चौथ्या अंकाच्या आरंभी एक लहानसा विष्कंभक आहे. त्यातील यज्ञवती व वेदवती या दोन तापसींच्या भाषणावरून आपणास कळते की, रामाच्या हृदयात सीते-विषयी अनुकंपा आहे किंवा नाही हे जाणण्याच्या इच्छेने तिलोत्तमा नामक अप्सरा सीतेचे रूप घेऊन रामाकडे जाणार आहे. पण हे तिचे वेदवतीशी झालेले भाषण रामाचा मित्र कौशिक नामक विदूषक याने आडून ऐकल्यामुळे घोटाळा होईल अशी भीति त्या तापसीला वाटते म्हणून ती त्या अप्सरेला त्या साहसापासून परावृत्त करण्यास जाते.

नंतरच्या मुख्य प्रवेशात सीता व यज्ञवती येतात. पूर्वी चित्रकूटाहून दक्षिणापथाला जाताना तेथील मायावती नामक वनदेवतेने सीतेला चन्द्राप्रमाणे शुभ्र आणि सुगन्धित असे दिव्य उत्तरीय दिले होते. ते वनवासात सदैव वापरल्यामुळे सीता व राम याना अत्यंत प्रिय झाले होते. ते सीतेने या प्रसंगी धारण केले होते. रामाच्या आगमनामुळे आश्रमातील दीर्घिकेवर (पायऱ्या असलेल्या विहिरीवर) स्त्रीजनाना निःशंकपणे स्नान करता येणार नाही म्हणून वाल्मीकींनी आपल्या प्रभावाने अशी व्यवस्था केली आहे की त्या दीर्घिकेजवळ असणाऱ्या स्त्रिया पुरुषाना अदृश्य असतील. वाल्मीकीच्या आज्ञेप्रमाणे त्यांचा शिष्य कण्व मनोविनोदनाकरिता रामाला नैमिषारण्य दाखवीत त्याच दीर्घिकेजवळ येतो. त्या दीर्घिकेत सीतेचे प्रतिबिम्ब रामाला दिसते, पण सीता मात्र दिसत नाही. तेव्हा शोकावेगाने तो मूर्च्छित होतो. त्याला शुद्धीवर आणण्याकरिता सीता त्याला आलिंगन देते (परिष्वजते). 'उत्तररामचरित 'त अशाच प्रसंगी सीतेच्या हस्तस्पर्शाने राम शुद्धीवर आल्याचे दाखविले आहे. रंगभूमीवर सीतेने रामाला आलिंगन दिल्याचे दाखविणे सदभिरुचीस अनुरूप नाही.

रामाला सीता दिसत नाही. पण तिने पांघरलेले उत्तरीय दिसते. ते तो ओढून घेतो. ते पूर्वी चित्रकूट वनदेवता मायावती हिने दिलेलेच उत्तरीय होय हे रामाच्या लक्षात येते. तेव्हा तो मागे दिलेल्या ' धूते पणः ' इत्यादि श्लोकात त्याचे वर्णन करतो. त्या श्लोकातील उत्तरीयाचे वर्णन मनोरम असल्याने तो ' शृंगारप्रकाशा 'त आणि ' सुभाषितरत्नकोषा 'त संगृहीत केला असल्याचे मागे सांगितले आहे. विशेष उल्लेखनीय गोष्ट ही की ' सुभाषितरत्नकोषा 'त तो श्लोक धीरनागाच्या नावावर दिला आहे.

राम ते उत्तरीय पांघरतो, पण त्याचे पूर्वीचे उत्तरीय होतेच. दोन उत्तरीये धारण करणे विलक्षण दिसेल म्हणून तो आपले उत्तरीय ठेवून देतो. सीता ते उचलून घेते. ते सुवासित केलेले नसल्यामुळे त्यावरून तिला रामाच्या उदासीन जीवनाची कल्पना येते. तेव्हा ती म्हणते, ' सर्वथा सत्यसन्धा राघवाः । ' (खरोखर रघुकुलातील पुरुष

सत्यप्रतिज्ञ असतात. कारण, रामाने पुनः विवाह केला नाही हे या उत्तरीयावरून उघड आहे.) याच तऱ्हेचा, पण उलट्या प्रकारचा प्रसंग 'मृच्छकटिका'त आलेला बहुश्रुत वाचकास आठवेल. त्याविषयी चर्चा पुढे करू.

उत्तरीय पाहून रामाला चित्रकूटी असताना आपण फुले वेचण्याकरिता गेलेल्या सीतेच्या मागून कसे गेलो आणि सीतेचे उत्तरीय ओढताच तिने वेचलेली फुले जमिनीवर कशी विखुरली गेली याची आठवण येते. इतक्यात रामाचा प्रिय मित्र कौशिक विदूषक तेथे येतो आणि त्याला पाहून सीता निघून जाते. कौशिक सांगतो की 'तिलोत्तमा अप्सरा सीतेचे रूप धारण करून तुझी चेष्टा करण्यास येणार असल्याचे मी ऐकले आहे.' तेव्हा आपण पाहिले ते सीतेचे प्रतिबिम्ब नसून सीतेचे रूप घेतलेल्या तिलोत्तमेचे होते आणि तिने आपणास फसविले असे रामास वाटते (अंक ४).

पाचव्या अंकात सीतेची छाया व पावले पाहिल्यामुळे उद्विग्न झालेला राम प्रवेश करतो. तो विदूषकाला विचारतो, 'मी सीतेचा परित्याग केला तेव्हा तू माझा प्रतिषेध कसा केला नाहीस?' विदूषक उत्तर करतो, 'स्वामी प्रसन्न असेल तेव्हाही सेवकांना प्रार्थना करणे कठीण जाते. आपण तर तेव्हा रागाने लाल झाला होता.' यासारखाच प्रश्न 'शाकुन्तला'त दुष्यन्त विदूषकाला विचारतो हे बहुश्रुत वाचकास माहीत असेल. नंतर विदूषक कुश व लव या वाल्मीकींच्या शिष्यांना एका महापुरुषाच्या चरित्राचे गायन करण्याकरिता घेऊन येतो. त्यांना पाहताच साध्वस, हर्ष, शोक, अनुक्रोश इत्यादि मनोविकारांनी रामाच्या हृदयात कल्लोळ माजविल्यामुळे तो मूर्च्छित होतो. ते कुमारही रामाच्या धीरगंभीर आकृतीने प्रभावित होतात. राम त्यांना आलिंगन देऊन आपल्या मांडीवर घेतो, तेव्हा त्याला अननुभूत आनंदाची प्राप्ति होते. इतक्यात विदूषक ओरडतो, 'अरे, यांना सोड, सोड. मी साकेतनिवासी लोकांच्या तोंडून ऐकले आहे की जर रघुकुलातील पुरुषांशिवाय अन्य कोणी या सिंहासनावर बसेल तर त्याच्या मस्तकाच्या शेकडो चिंधड्या होतील.' 'शाकुन्तला'च्या सातव्या अंकातील सर्वदमनाच्या मनगटावर बांधलेल्या अपराजिता औषधीच्या ताइताची येथे आठवण होते. पुढे संभाषणावरून ते दोन्ही कुमार क्षत्रियवर्णाचे असून सूर्यवंशातील आहेत, ते जुळे भाऊ असून त्यांचे वय दहा वर्षांचे आहे, ते वाल्मीकीचे शिष्य आहेत, त्यांना आपल्या पित्याचे नाव माहीत नाही, कारण आश्रमात ते कोणीही घेत नाही, पण त्यांची माता त्यांनी काही खोडी केली असता त्यांना 'निरनुक्रोशाचे पुत्र' म्हणून रागे भरते, तपोवनातील लोक तिला देवी म्हणतात, पण भगवान् वाल्मीकि तिला वधू म्हणून संबोधतात, इत्यादि माहिती रामाला मिळते. शिवाय त्यांचे वयही सीतापरित्यागकालाशी जुळत होते. तेव्हा ते आपलेच पुत्र

असावेत अशी शंका येऊन रामाचे मन अस्वस्थ होते. इतक्यात 'वाल्मीकिप्रणीत पुराणपुरुषकथा रामापुढे गाऊन कुशलवांनी मध्याह्नीच्या सवनाकरिता आश्रमात यावे' असा त्यांना संदेश मिळतो. नंतर सर्व सुहृज्जन व सभासद यांच्यासह आपण ती अपूर्व कथा ऐकू इच्छितो; तेव्हा लक्ष्मणाला आपणाकडे पाठवा, अशी राम आज्ञा करतो (अंक ५).

सहाव्या अंकात पौरजानपदांच्या सभेत राजमाता, बन्धु इत्यादिकांसह राम कुशलवांच्या तोंडून 'रामायण'कथा ऐकतो. ती कथा लक्ष्मणाने सीतेला अरण्यात सोडली येथपर्यंत आल्यावर ते कुमार म्हणतात–

ततः प्राणैः परित्यक्ता निराशा जनकात्मजा ।
अप्रियाख्यानभीतेन कविना सहृता कथा ॥

पण वाल्मीकीची रामकथा तेथे संपत नाही. त्यापुढील भाग त्या कुमारांना माहीत नव्हता, पण वाल्मीकीचा शिष्य व रामाचा बालमित्र कण्व पुढील कथा गाऊन दाखवतो. त्यावरून सीता वाल्मीकीच्या आश्रमात प्रसूत होऊन तिला दोन पुत्र झाले तेच हे कुश व लव असे सर्वांस समजते. तेव्हा त्या अनपेक्षित वृत्तावाने राम, लक्ष्मण, कुश व लव मूर्च्छित होतात. इतक्यात सीतेसह वाल्मीकि प्रवेश करून त्यांना सावध करतात. नंतर सीतेचा त्याग केल्याबद्दल वाल्मीकि रामाला दोष देतात. त्याच्या आज्ञेवरून सीता 'जर मी राघवकुलनंदन रामाशिवाय दुसऱ्या कोणाला पतिव्रता-विरोधी भावनेने पाहिले असेल, त्याच्याशी बोलले असेल किंवा त्याला हृदयाने चिंतिले असेल तर दिव्यरूपधारिणी भगवती पृथ्वी माझ्या चित्तवृत्तीविषयी दक्ष राहो' असे म्हणते. तेव्हा पाताळातून आकाश व्यापणारा तुमुल नाद उत्पन्न होतो, पर्वत हादरतात, आणि समुद्र आनंदित होऊन उचलल्याप्रमाणे आपल्या लाटांनी सभोवतालची वने आक्रमण करू लागतो. नंतर पाताळातून पृथ्वी देवी वर येऊन सीतेच्या चारित्र्याविषयी साक्ष देते–

रामं दाशरथिं मुक्त्वा न जातु पुरुषान्तरम् ।
मनसाऽपि गता सीतेत्येवं विदितमस्तु वः ॥

तेव्हा सर्व जन हात जोडून सीतेचे शुद्धाचरण मान्य करतात. नंतर वाल्मीकीच्या आज्ञेने राम सीतेचे पाणिग्रहण करतो आणि पृथ्वी अन्तर्धान पावते. पुढे रामाच्या इच्छेप्रमाणे वाल्मीकि कुशाला साम्राज्याचा अधिपति म्हणून अभिषेक करतात. कुशाची अनुमति घेऊन राम लवाला युवराज म्हणून अभिषेक करतो आणि भगवान् वाल्मीकीच्या आशीर्वादाने नाटकाची समाप्ति होते (अंक ६).

## ' कुन्दमाले 'तील ' रामायणा 'चे अनुसरण

येथपर्यंत दिलेल्या ' कुन्दमाले 'च्या संक्षिप्त संविधानकावरून धीरनागाने त्यामध्ये बहुतांशी ' वाल्मीकि-रामायणा 'चे अनुसरण केल्याचे दिसून येईल. सीतेचा भागीरथीतीरावर त्याग, तिची वाल्मीकीच्या आश्रमात प्रसूति, तेथेच तिचे कित्येक वर्षे वास्तव्य, रामाचा नैमिषारण्यात अश्वमेध, त्याकरिता गोमतीतीरी वाल्मीकीचा आश्रम, कुशलवाच्या कडून ' रामायण 'गायन, सीतेचे रामाच्या समोर सत्यापन, पृथ्वीचा प्रादुर्भाव, सीताशुद्धि इत्यादि घटना ' रामायणा 'तून घेतल्या आहेत.

## ' कुन्दमाले 'तील मौलिक प्रसंगांची समीक्षा

धीरनागाने 'कुन्दमाले'त काही स्वतः कल्पिलेले प्रसंगही वाढले आहेत. उदाहरणार्थ वनदेवता मायावतीने दिलेले उत्तरीय, वाल्मीकीच्या प्रभावाने सीतेचे मानवाना अदृश्य असणे, 'रामायण'गायनापूर्वी विविध प्रमाणावरून ते आपले पुत्र असावेत असे रामाचे अनुमान इत्यादि. संस्कृत नाटकाचा शेवट दुःखात होऊ नये असा नियम असल्यामुळे भवभूतीप्रमाणे धीरनागानेही शेवटी सीतारामाचा संयोग घडवून आणला आहे. तथापि एकंदरीत धीरनागाने ' रामायण 'कथेत भवभूतीपेक्षा कमी फरक केले आहेत. त्यामुळे त्याचे संविधानक-रचनाकौशल्य फारसे दिसत नाही. किंबहुना काही प्रसंगी ' कुन्दमाले '-तील घटना व वर्णन अप्रासंगिक व अनुचित वाटतात. त्यांपैकी काहींचा उल्लेख मागे आला आहे. उदाहरणार्थ, सीतापरित्यागाच्या वेळी तिला पाठविलेल्या रामाच्या संदेशात भावी यशातील सीतेच्या प्रतिमेचा निर्देश, सीतेने मूर्छित रामाला आलिंगन देऊन सावध करणे इत्यादि. गोमती नदीतून वाहत आलेल्या कुन्दमालेची गोष्टही अतीव आहे. सीतेने कुन्दमाला दररोज वाहण्याचा नवस केला तो भागीरथीला, गोमतीला नव्हे. शिवाय भागीरथी गोमतीला मिळत नसून गोमतीच भागीरथीला मिळते. तेव्हा सीतेने भागीरथीला वाहिलेली कुन्दमाला गोमतीत कशी येईल? तेव्हा एका विद्वानाने गोमती हे भागीरथीचेच दुसरे नाव असावे असा तर्क केला आहे. पण रामाचा अश्वमेध नैमिषारण्यात होत होता असे वर्णन करण्यात धीरनाग ' वाल्मीकि रामायणा'चे अनुसरण करीत होता. त्या ' रामायणा 'त गोमती व गंगा भिन्न वर्णिल्या आहेत. सध्याही गोमतीला पूर्वीचेच नाव असून ती गाझीपूर जिल्ह्यात सय्यदपूर जवळ गंगेला मिळते. लखनौ शहर तिच्याच काठी आहे. ' कुन्दमाला ' नाटकात प्रमुख असलेल्या कुन्दमालेविषयीच असा घोटाळा असल्यामुळे डॉ. वूलनरनी म्हटले आहे की धीरनाग हा दाक्षिणात्य असल्यामुळे त्याला गंगेच्या खोऱ्याची माहिती नसावी आणि म्हणून त्याच्या हातून ही चूक घडली असावी.[1] दुसरी असंभवनीय

---

१. वूलनरकृत कुन्दमालेचे इंग्रजी भाषांतर, प्रस्तावना, पृ. ११, तळटीप.

गोष्ट रामाच्या सिंहासनाविषयी समजुतीची. राम कुश व लव यांना आपणाबरोबर सिंहासनावर बसवतो तेव्हा विदूषक ओरडून सांगतो, ' याना लौकर खाली उतरवा. मी साकेत ( अयोध्या ) येथील लोकांकडून ऐकले आहे की रघुकुलावाचून दुसरा कोणी या सिंहासनावर बसेल तर त्याच्या मस्तकाच्या चिथड्या होतील. ' वीरनागाने ह्या प्रसंगात ' शाकुन्तला 'तील सर्वदमनाच्या मनगटावर बांधलेल्या अपराजित वनस्पतीच्या ताइताचे अनुकरण केले आहे. पण ते त्यास साधले नाही. येथे साहजिकच अशी शंका उत्पन्न होते की हे खरे असेल तर रामाला ही गोष्ट माहीत कशी नाही ? तो यापूर्वी निदान दहा वर्षे साकेतातच त्या सिंहासनावर बसत होता. या शंकेला उत्तर नाही. तेव्हा ' कुन्दमाले 'च्या संविधानकात असे अनेक दोष असल्यामुळे त्या नाटकाचा कर्ता दुय्यम प्रतीचा नाटककार होता असेच मानावे लागते.

## या दोन नाटकांचे पौर्वापर्य

' उत्तररामचरित ' आणि ' कुन्दमाला ' या दोन्ही नाटकांचा विषय राज्याभिषेकानंतरचे रामचरित हाच असल्यामुळे त्यात काही घटना समान आहेत. एवढेच नाही तर त्याच्या वर्णनातील शब्दयोजनाही सारखी आहे. अशी अनेक स्थळे त्या नाटकाचे संपादक डॉ. कालीकुमार दत्त यानी पूर्वी आणि डॉ. ह. द. वाकलिया यांनी अलीकडे दाखविली आहेत. या दोघांच्याही मते भवभूतीने ' कुन्दमाले 'च्या कर्त्याचे अनुकरण केले आहे. याच्या उलट प्रो. सुब्रह्मण्यम् ऐयर, डॉ. वूल्नर, डॉ. सुशीलकुमार दे आणि जागीरदार यांच्या मते ' कुन्दमाले 'वरच ' उत्तररामचरिता 'चा प्रभाव पडला आहे. पण त्यानी या प्रश्नाचा सविस्तर विचार केला नाही. ' भिन्नरुचिर्हि लोकः ' या न्यायाने या बाबतीत सर्वसंमत निर्णय देणे कठीण आहे. तथापि पूर्वग्रह बाजूस सारून चिकित्सक दृष्टीने या प्रश्नाची समीक्षा केल्यास विचारी वाचकांचे ऐकमत्य होण्यास प्रत्यवाय नसावा. साम्याची काही स्थळे खाली चर्चिली आहेत.

हे साम्य दोन प्रकारचे आहे. (१) घटनासाम्य आणि (२) शब्दसाम्य. त्याचा यथाक्रम विचार करू.

(१) घटनासाम्य—दोन्ही नाटके ' रामायणा 'तील कथानकावरच आधारित असल्यामुळे त्यात काही घटना समान आहेत. त्याचा विचार येथे करावयाचा नाही. तर ज्या घटना रामायणात नसून नाटककाराने स्वतः कल्पिल्या आहेत त्यांची समीक्षा केली पाहिजे. अशा घटना 'उत्तररामचरिता'त अनेक आहेत हे मागे (पृ. २४८) दाखविले आहे. ' कुन्दमाले 'चे कथानक बहुतांशी ' रामायणा 'नुसारी असल्याने त्यात कविकल्पित घटना त्या मानाने थोड्या आहेत. पण या दोन नाटकांत समान असलेली मुख्य घटना म्हणजे सीतेने अदृश्य रूपाने रामाजवळ असणे आणि शोकावेगाने तो मूर्च्छित

झाला असता त्याला शुद्धीवर आणणे, ही होय. भवभूतीने रामाचा पञ्चवटीपरिसरांतील प्रवेश विशिष्ट हेतूने योजिला आहे. पतीने विनाकारण आपला परित्याग केल्याचे शल्य सीतेच्या मनात सलत होते. तिला रामाच्या हृदयातील तिच्याविषयीचे दृढ प्रेम आणि तिच्या वियोगामुळे त्याला झालेला दुःसह शोक दाखवून तिची चित्तवृत्ति औदासीन्यातून कारुण्ययुक्त प्रेमात परिवर्तित करावयाची होती. ' उत्तररामचरिता 'च्या तिसऱ्या अंकाचा मुख्य उद्देश हा आहे. पंचवटीच्या परिसरातील पूर्वपरिचित स्थळे व पशुपक्षी पाहिल्यावर रामाचे दुःख अनावर होऊन त्याला मूर्च्छा येईल अशी भीति साहजिकच वाटून गंगेने तमसेबरोबर सीतेला आपल्या बरोबर पंचवटीत आणले होते. तेव्हा ' उत्तररामचरिता 'तील हा प्रवेश सहेतुक असून तो उत्तम साधला आहे. याच्या उलट ' कुन्दमाले 'च्या चौथ्या अंकातील दाखविलेला सीतारामाचा प्रवेश यदृच्छेने घडून आलेला आहे. आश्रमातील यज्ञभूमाने त्रस्त झालेले डोळे पाण्याने धड करावे म्हणून राम दीर्घिकेत उतरतो, तेथे अदृश्य रूपाने असलेल्या सीतेचे प्रतिबिंब पाहतो; तिने विशकटलेले केस व निस्तेज मुख पाहून तिच्या दीर्घ वियोग-दुःखाची त्याला जाणीव होते आणि तो मूर्च्छित होतो. सीता त्याला आलिंगन देऊन शुद्धीवर आणते. ' कुन्दमाले 'तील या प्रवेशात विशिष्ट हेतु नसल्याने तो कृत्रिम भासतो. त्यात उत्तरीयाची अदलाबदल आहे खरी, पण नाटकाच्या प्रगतीच्या दृष्टीने तिला महत्त्व नाही.

' कुन्दमाले 'तील हा प्रवेश पाहून भवभूतीला ' उत्तररामचरिता 'च्या तिसऱ्या अंकातील प्रवेश सुचला असणे असंभवनीय आहे. भवभूतीची कल्पनाशक्ति दांडगी होती, हे उत्तररामचरितातील त्याने कल्पिलेल्या विविध प्रसंगावरून स्पष्ट आहे. त्याला प्रस्तुत प्रसंगाकरिता दुसऱ्याची उसनवारी करण्याची जरूरी भासली असणे असंभवनीय आहे. याच्या उलट धीरनागाचे कल्पनादारिद्र्य लक्षात घेता त्यानेच भवभूतीची उसनवारी केली असणे जास्त शक्य आहे.

नाही. ‘ छाया ’ शब्दाचे अनेक अर्थ होतात (१) सावली, (२) प्रतिबिंब, (३) प्रतिमा, (४) कांति, (५) सौंदर्य आणि (६) सादृश्य, याच्या बरोबर (७) भास, भ्रम, हा अर्थही कोशकारानी दिला आहे.[1] ‘ उत्तररामचरिता ’च्या तिसऱ्या अंकात रामाला पंचवटीच्या परिसरात सीतेचा भास होतो असा प्रसंग घातला आहे. म्हणून त्या अंकाला ‘ छाया अंक ’ असे नाव दिले असले तर ते योग्य आहे.

आता आपण दुसरा एक प्रसंग घेऊ. तो तितक्या दृष्टीने महत्त्वाचा नसला तरी प्रस्तुत चर्चेला उपयुक्त आहे.

‘ उत्तररामचरिता ’च्या पहिल्या अंकातील चित्रदर्शनप्रसंग घ्या. ताटकावधानंतर विश्वामित्राने रामास दिलेल्या जृंभकास्त्रांचे चित्र सीतेला दाखविल्यानंतर राम म्हणतो, ‘ ही अस्त्रे तुझ्या अपत्याना प्राप्त होतील. ’ पुढे वनवासाला जाताना वाटेत लाग-लेल्या भागीरथीचे चित्र पाहून राम तिला नमस्कार करतो, आणि ‘ अरुन्धतीप्रमाणे तू सीतेच्या कल्याणाची चिंता वहा ’ अशी तिला प्रार्थना करतो. शेवटी लक्ष्मणाला सीतेच्या त्यागाची आज्ञा करून निघून जाताना तो पृथ्वीला उद्देशून म्हणतो, ‘ भगवति वसुन्धरे, आपल्या सुशील कन्येचे रक्षण कर. ’ भवभूतीने या तिन्ही आवाहनांचे साभिप्रायत्व पुढील घटनात दाखविले आहे. कुश व लव याना जन्मतःच जृंभकास्त्रांचे ज्ञान होते व त्यावरून पुढे रामाला हे सीतेचे पुत्र असावेत असे वाटते. ‘ रामायणा ’त सीता वाल्मीकीच्या आश्रमात प्रसूत होऊन तेथेच बारा वर्षे राहिली होती असे वर्णिले आहे. पण अशा परिस्थितीत तिच्या मुलाना आपल्या पित्याचे ज्ञान नसणे, तसेच रामाला एवढ्या दीर्घकालात सीतेची माहिती न समजणे असंभवनीय आहे. म्हणून सीतेने प्रसूतीचे क्लेश असह्य झाल्याने गंगेत उडी घेतली. गंगेने तिला पातालात नेऊन पृथ्वीदेवीच्या साहाय्याने तिचे व तिच्या मुलांचे संगोपन केले, असे भवभूतीने

1. मॉनियर विल्यम्स्, आपटे आणि वैद्य यांचे संस्कृत कोश पाहा. ज. वि. ओक यानी ‘ गीर्वाण–लघुकोशा ’त छाया शब्दाचा ‘ भ्रम ’, ‘ भास ’ असा अर्थ दिला असून भागवतातील पुढील श्लोकाचा (स्कंद ८, अ. ३, श्लो. १४ ) संदर्भ दिला आहे–

सर्वेन्द्रियगुणद्रष्ट्रे सर्वप्रत्ययहेतवे ।
असताच्छाययोक्ताय सदाभासाय ते नमः ॥

यावरील श्रीधरी टीका–असता अहंकारादिप्रपंचेन छायया अतद्रूपया उक्ताय प्रतिबिम्बेन बिम्बमिव सूचिताय ।

भवभूतीच्या ‘ छाया अंक ’ या संज्ञेवरून ‘ कुन्दमाले ’तील सीतेच्या छायेचा ( सावलीचा ) प्रसंग सुचला असावा असेही उलट पक्षी म्हणता येईल.

कल्पिले आहे. शेवटच्या अंकात उदकातून भागीरथी व पृथ्वी देवता वर येतात आणि सीतेला अरुंधतीच्या स्वाधीन करून रामाला म्हणतात, 'तू आम्हाला सीतेच्या कल्याणाची काळजी वाहण्यासाठी प्रार्थना केली होतीस. आम्ही तुझ्या प्रार्थनेप्रमाणे केले आहे.' याप्रमाणे भवभूतीने चित्र दर्शनप्रसंगीचे आवाहन साभिप्राय दाखविले आहे.

याच्या उलट 'कुन्दमाले'त सीतेला भागीरथीच्या तीरी सोडून जाताना लक्ष्मण लोकपाल, भागीरथी, तपोवनातील ऋषि, वनदेवता, अरण्यातील हिंस्र व इतर पशु आणि नद्या या सर्वांना सीतेच्या रक्षणाविषयी प्रार्थना करतो, पण त्या प्रार्थनेचा पुढे नाट्यवस्तूकरिता उपयोग झालेला दिसत नाही. 'कुन्दमाले'तील लक्ष्मणाच्या प्रार्थनेवरुन चित्रदर्शन–प्रसंगातील जृंभकास्त्राचा प्राप्तिविषयक उल्लेख आणि भागीरथी-पृथ्वीचे अवाहन भवभूतीस सुचले असे कदापि म्हणता यावयाचे नाही. कारण मागे दाखविल्याप्रमाणे त्याचा नाट्यवस्तूशी घनिष्ठ संबंध आहे.

(२) **शब्दसाम्य.** आता आपण शब्दसाम्याचा विचार करू. याची अनेक उदाहरणे पूर्वीच संशोधकांनी दाखविली आहेत. त्यांपैकी काही चर्चेकरिता घेऊ.

१. (अ) 'उत्तररामचरित' (अंक १)–पंचवटीच्या परिसरात जेव्हा राम वासंतीला सांगतो की 'परत गेल्यावर सीतेची प्रतिमा पाहून मी आपले मनोनिवेदन करीन', तेव्हा सीता उद्‌गारते–'अम्महे, उत्खातं मे इदानीं परित्यागशल्यमार्यपुत्रेण.'

(ब) 'कुन्दमाला' (अंक १)–लक्ष्मण रामाचा निरोप सीतेला सांगतो की 'पुन्हा लग्न न करण्याचा माझा निश्चय असल्यामुळे भावी यज्ञात तुझी प्रतिमाच माझी धर्मपत्नी असेल,' तेव्हा सीता उत्तरते --

**'एवं सन्दिशता आर्यपुत्रेण परित्यागदु:खं मे निरवशेषमपनीतम् ।**

दोन्हीत तीच कल्पना जवळजवळ त्याच शब्दात आली आहे.

२. (अ) उ. च. (अंक ३)–पंचवटीत विमान उतरवताना 'अयि विमानराज, अत्रैव स्थीयताम् ।' हे रामाचे शब्द ऐकल्यावर रोमांचित होऊन सीता उद्‌गारते–**'अम्महे, मेघमन्थरस्तनितगम्भीरमांसलः कुतोन्वेष भारतीनिर्घोषो भरन् कर्णविवरं मामपि मन्दभागिनीं झटित्युत्सुकापयति ।'**

(ब) कु. मा. (अ. ३)–नैमिषारण्यात रामाचे लक्ष्मणास उद्देशून उच्चारलेले 'वत्स, वत्स' असे शब्द ऐकून जवळच दीर्घिकेच्या तीरी असलेली सीता म्हणते, **"कोन्वेष सजलजलदस्तनितगम्भीरेण स्वरविशेषेणात्यन्तदु:खभाजनमपि मे शरीरं रोमाञ्चयति ।**

दोन्ही उताऱ्यांत रामाचा आवाज जलयुक्त मेघाच्या गर्जनेसारखा आहे हीच कल्पना जवळजवळ त्याच शब्दांत आली आहे.

३. (अ) उ. च. (अं. ३, श्लोक १३) वियोगदुःखित रामाला पाहिल्यावर झालेली सीतेच्या हृदयाची अवस्था तमसा वर्णन करते—

तटस्थं नैराश्यादपि च कलुषं विप्रियवशा-
द्वियोगे दीर्घेऽस्मिञ्झटिति घटनोत्तम्भितमिव ।
प्रसन्नं सौजन्याद्दयितकरुणैर्गाढकरुण
द्रवीभूतं प्रेम्णा तव हृदयमस्मिन् क्षण इव ।।

(ब) कु. मा. (अं. ३)—नैमिषारण्यात रामाला पाहिल्यावर सीता स्वतःच्या अवस्थेचे वर्णन करते—

अहो दृष्ट इति परितोषः, चिरप्रवास इति मन्युः, परिक्षाम इत्युद्वेगः, निरनुक्रोश इत्यभिमानः, दर्शनीय इत्युत्कण्ठा, स्वामीति बहुमानः, कुशलवयोस्तात इति कुटुम्बिनीसद्भावः, अपराध प्रवेशितास्मीति लज्जा। न जानामि आर्यपुत्रदर्शनेन कीदृशीमवस्थामनुभवामीति।

दोन्ही उताऱ्यात सीतेच्या मनातील विविध भावनांचा कल्लोळ दशाच वर्णिला आहे.

(४) (अ) उ. च. (अं. १, श्लो. ४५)—सीतेचा परित्याग करताना राम म्हणतो—

शैशवात्प्रभृति पोषितां प्रियैः सौहृदादपृथगाश्रयामिमाम् ।
छद्मना परिददामि मृत्यवे सौनिको गृहशकुन्तिकामिव ।।

(ब) कु. मा. (अं. १)—रामाज्ञेप्रमाणे सीतेला वनात सोडण्यास निघालेला लक्ष्मण म्हणतो—

'तदहमपि स्वजनविस्रम्भनिर्विशङ्का देवीमावाय गृहहरिणीमिव वध्यभूमिं नयामि।

पहिल्या उताऱ्यात परित्यक्त सीतेची ठार मारण्यास नेमलेल्या घरातल्या पक्षिणीशी आणि दुसऱ्यात घरातल्या हरिणीशी तुलना केली आहे. दोन्हीतील कल्पना एकच आहे.

५. (अ) उ. च. (अं. ६, श्लो. १२)—त्याला पाहताच आपले दुःख नाहीसे झाले आणि त्याच्या विषयी प्रेम उत्पन्न झाले ह्याची मीमांसा करताना राम म्हणतो—

व्यतिषजति पदार्थानान्तरः कोऽपि हेतु-
न खलु बहिरुपाधीन् प्रीतयः संश्रयन्ते ।
विकसति हि पतङ्गस्योदये पुण्डरीकं
द्रवति च हिमरश्मावुद्गते चन्द्रकान्तः ॥

(ब) कु. मा. (अं. ५, श्लो. १०)-कुशलवांना पाहताच रामाचे डोळे अश्रूंनी भरून येतात. तेव्हा तो म्हणतो-

आपातमात्रेण कयापि युक्त्या सम्बन्धिनः सन्नमयन्ति चेतः ।
विमृश्य किं दोषगुणानभिज्ञश्चन्द्रोदये श्चोतति चन्द्रकान्तः ॥

दोन्ही श्लोकात काही अज्ञात कारणावरून हृदये आकृष्ट होतात ही कल्पना आहे. दोन्हींत चंद्र व चंद्रकांत मणि यांचा दृष्टांत दिला आहे.

६. (अ) उ. च. (अं. ३, श्लो. २७)-पंचवटीच्या परिसरात रामाशी संभाषण करताना ती सीतेला पूर्वी कसा मानीत असे ते वासंती वर्णन करते-

त्वं जीवितं त्वमसि मे हृदयं द्वितीयं
त्वं कौमुदी नयनयोरमृतं त्वमङ्गे ।
इत्यादिभिः प्रियशतैरनुरुध्य मुग्धां
तामेव शान्तमथवा किमिहोत्तरेण ॥

(ब) कु. मा. (अं. १. श्लोक. १४) लक्ष्मण सीतेस रामाचा संदेश सांगतो-

त्वं देवि चित्तनिहिता गृहदेवता मे
स्वप्नागता शयनमध्यगता त्वमेव ।

दोन्ही कल्पना एकच. फक्त शब्द भिन्न.

७. (अ) उ. च. (अं., श्लोक १२) चित्रदर्शनप्रसंगी लक्ष्मण रामाचे बालपणी असाधारण वर्णन करतो-

पुत्रसंक्रान्तलक्ष्मीकैर्यद्वृद्धेक्ष्वाकुभिर्धृतम् ।
धृतं बाल्ये तदार्येण पुण्यमारण्यकं व्रतम् ॥

(ब) कु. मा. (अं. ४, श्लो. ५) -कण्व रामाच्या नैमिषारण्याविषयी आदराची प्रशंसा करताना म्हणतो,

आनाकमेकधनुषा भुवनं विजित्य
पुण्यैर्दिवः क्रतुशतैर्विरचय्य मार्गम् ।

इक्ष्वाकवः सुतनिवेशितराज्यभारा
निःश्रेयसाय वनमेतदुपाश्रयन्ते ॥ '

दोन्हींत इक्ष्वाकुवंशी राजांना आयुष्याच्या अखेरचा जीवनक्रम तसाच वर्णिला आहे.

याशिवाय ' मालतीमाधव ' व ' कुन्दमाला ' यातील खालील उतारे पाहा–

८. (अ) मा. मा. (अं. ५)–स्मशानात बळी देण्यास नेलेली मालती माधवास उद्देशून म्हणते–

**हा देव माधव, परलोकगतोऽपि युष्माभिः स्मर्तव्योऽयं जनः। न खलु स उपरतो यस्य वल्लभो जनः स्मरति।**

(ब) कु. मा. (अं. ३, श्लोक १३) – ' मी शोचनीय अशा सीतेबद्दल का बरें शोक करू नये ' असे रामाने विचारतांच, अदृश्य असलेली सीता म्हणते–

' न खलु स जनः शोचनीयः य एवं वल्लभेन शोच्यते। '

दोन्ही उताऱ्यांतील कल्पना एकाच प्रकारची आहे.

## नाटककारांच्या शैलीवरून अनुमान

अशी शब्दसाम्याची इतरही अनेक उदाहरणे दाखविता येतील. वरील उताऱ्यांतील कल्पनासाम्य आणि काहींतील शब्दसाम्यही पाहता भवभूति व धीरनाग यांनी एकाने दुसऱ्याचे अनुकरण केले असावे असे स्पष्ट दिसते. पण ते कोणी कोणाचे केले हा प्रश्न वादग्रस्त झाला आहे. सर्वांना भवभूतीच्या वर्णनातील अधिक काव्यात्मता आणि सरसता मान्य आहे; पण काहींचे म्हणणे असे की ' कुन्दमाले 'तील शैली साधी, अकृत्रिम आणि समासरहित असल्याने तिचा कर्ता कल्पनारम्य, अलंकारप्रचुर आणि दीर्घसमासयुक्त अशा ' उत्तररामचरिता 'च्या कर्त्याहून प्राचीन असावा. संस्कृत वाङ्मयेतिहासात कवि जितका नंतरचा तितकी त्याची शैली अधिक कृत्रिम व समासप्रचुर दिसते. तेव्हा भवभूतीनेच धीरनागाचे अनुकरण केले असावे. या बाबतीत लक्षात घेण्यासारखी गोष्ट ही की शैली ही व्यक्तिनिष्ठ असते. हर्ष व बाण हे समकालीन. पण हर्षाच्या सर्व नाटकांत सामान्यतः समासरहित वैदर्भी रीतीचा उपयोग केला आहे. याच्या उलट बाणाच्या ग्रंथांत श्लेष व समास यांचा अतिरेक झालेला आढळतो. शिवाय ' कुन्दमाले 'त दीर्घसमास आढळतच नाहीत असे नाही. उदाहरणार्थ, त्या नाटकाच्या पाचव्या अंकातील विदूषकाच्या प्राकृत भाषणातील समासप्रचुर वाक्य पाहा. रामाच्या संस्कृत भाषणातही ' मूलस्वयोगसकलपुरुषार्थसंवेदिनी ज्ञाननिष्पत्तिः ' (अं. ५)

यासारखी समासप्रचुर व क्लिष्ट वाक्ये आढळतात. तेव्हा शैलीतील समासयोजनेवरून या दोन नाटककारांचे पौर्वापर्य आणि तन्मूलक अनुकारित्व ठरविणे योग्य नाही.

## पौर्वापर्य ठरविण्याचे एक साधन–'कुन्दमाले'त कालिदास आणि शूद्रक यांचे अनुकरण

### प्रसंगसाम्य

तर मग हा प्रश्न सोडवायचा कसा ? आम्हास वाटते की या दोन ग्रंथकारांच्या एकंदर प्रवृत्तीवरून त्यांच्या पौर्वापर्याविषयी अनुमान केले पाहिजे. आम्ही मागे दाखविले आहे की नाट्यवस्तूच्या किंवा संविधानकरचनेच्या बाबतीत भवभूति अधिक स्वतन्त्रप्रज्ञ आहे. याच्या उलट धीरनागाने संविधानकरचनेत वाल्मीकीचेच अनुकरण केले आहे असे नसून आपल्या पूर्वीच्या कालिदास व शूद्रक यांच्या नाटकातून काही घटना व कल्पना घेतल्या आहेत आणि शब्दयोजनेचेही अनुकरण केले आहे. याची काही उदाहरणे मागे 'कुन्दमाले'चे संविधानक संक्षेपाने देताना दिली आहेत. उदाहरणार्थ, 'कुन्दमाले'च्या तिसऱ्या अंकातील प्रवासी तापसाची ग्रीष्म ऋतूतील उन्हाविषयी आणि दीर्घप्रवासामुळे थकलेल्या आपल्या पायाविषयी कुरकुर 'शाकुन्तला'-च्या दुसऱ्या अंकातील विदूषकाच्या भाषणावरून, पाचव्या अंकातील रामाने विदूषकाला केलेला 'सीतापरित्यागाच्या वेळी तू माझा प्रतिषेध का केला नाहीस ?' हा प्रश्न 'शाकुन्तला'च्या सहाव्या अंकातील दुष्यन्ताने विदूषकाला केलेल्या याचसारख्याच प्रश्नावरून आणि 'कुन्दमाले'च्या त्याच अंकातील विदूषकाने रामाच्या सिंहासनासंबंधी साकेतनिवासी लोकांकडून ऐकलेली परंपरागत कथा 'शाकुन्तला'च्या सातव्या अंकातील सर्वदमनाच्या अपराजित औषधीच्या वृत्तावरून सुचलेली दिसते. 'कुन्दमाले'त सीतेच्या व रामाच्या उत्तरीयाची अदलाबदल झालेली दाखविली आहे. रामाच्या सुगंधरहित उत्तरीयावरून त्याच्या उदासीन जीविताविषयी सीतेने केलेले अनुमान 'मृच्छकटिका'च्या दुसऱ्या अंकातील मत्त हत्तीला काबूत आणणाऱ्या कर्णपूरकाकडे चारुदत्ताने फेकलेल्या जाईच्या अत्तराने सुगंधित झालेल्या शेल्यावरून वसंतसेनेने चारुदत्ताच्या 'अनुदासीन यौवना'विषयी केलेल्या अनुमानावरून सुचलेले दिसते. ही झाली प्रसंगानुकरणाची उदाहरणे. कल्पनासाम्याची व शब्दसाम्याची उदाहरणे तर अनेक आहेत. त्यांतील काही घेऊ.

### शब्दसाम्य

(१) कु. मा. ( अ. ४, श्लो. ७३ )

> एतस्मिन्वितताध्वरे प्रतिदिनं सान्निध्ययोगाद्वरे-
> स्तयवत्वा नन्दनचन्दनार्वानरुहानाशानतो प्रापिताः ।

विभ्रत्युच्चनिवेशितेन नयनेनालोकनीया अमी
मर्त्तैरावणकण्ठरज्जुवलयन्यासक्षतिं पादपाः ॥

–यातील ऐरावताच्या गळ्यातील दोरखंडाने नैमिषारण्यातील वृक्षांना उंचावर करकोचे पडले ही कल्पना कालिदासाच्या 'रघुवंशा'तील (सर्ग ४, श्लोक ७६) खालील श्लोकावरुन सुचलेली दिसते—

तस्योत्सृष्टनिवासेषु कण्ठरज्जुक्षतत्वचः ।
गजवर्ष्म किरातेभ्यः शशंसुर्देवदारवः ॥

'कुन्दमाले'तील वरील श्लोकात नंदनवनातील चंदनवृक्षाचा उल्लेख धीरनागाचे अनुकारित्व सिद्ध करण्यास पुरेसा आहे. नंदनवनातील हे चंदनवृक्षाचे अस्तित्व धीरनागाला कालिदासाच्या 'रघुवंश', ४, ४८ या श्लोकावरुन सुचलेले दिसते. इतरत्र ते प्रसिद्ध नाही.

(२) वरील सदर्भातच आलेला आणखी एक श्लोक पहा.

कु. मा. (अ. ४, श्लोक ८)—

सचकितमवधाय कर्णमस्मिन्
सुरपतिकर्षणमन्त्रनिस्वनेषु ।
विरचयति शची सदैव नूनं
स्रजमयत्नं वियोगवेणिबन्धम् ॥

–यातील कल्पना 'रघुवंशा'तील पुढील श्लोकावरुन सुचली असली पाहिजे—

क्रियाप्रबन्धादयमध्वराणामजस्रमाहूतसहस्रनेत्रः ।
शच्याश्चिरं पाण्डुकपोललम्बान्मन्दारशून्यानलकांश्चकार ॥

(३) कु. मा. (अंक १, श्लो. १८) मध्ये रोदन करणाऱ्या परित्यक्त सीतेला पाहून वनातील पशुपक्षीही शोकाकुल झाल्याचे लक्ष्मण सांगतो–

एते रुदन्ति हरिणा हरितं विमुच्य
हंसाश्च शोकविधुराः करुणं रुदन्ति ।
नृत्तं त्यजन्ति शिखिनोऽपि विलोक्य देवीं
तिर्यग्गता वरममी न परं मनुष्याः ॥

याचसारखेच 'शाकुन्तला'तील (अं. ४, श्लो. १२) शकुन्तलागमनाच्या वेळचे वर्णन पाहा–

उद्गलितदर्भकवला मृगाः परित्यक्तनर्तना मयूराः ।
अपसृतपाण्डुपत्रा मुञ्चन्त्यश्रूणीव लताः ।।

दोन्हींतील वर्णन सारखेच आहे.

(४) कु. मा. (अं. ३, श्लो. १९) मधील रामाचे वर्णन पहा–

व्यायामकठिनः प्रांशुः कर्णान्तायतलोचनः ।
व्यूढोरस्को महाबाहुर्य्यवतं दशरथात्मजः ।

हे वर्णन 'रघुवंशा'तील (सर्ग १, श्लोक १३) दिलीपाच्या वर्णनासारखे आहे–

व्यूढोरस्को वृषस्कन्ध. शालप्रांशुर्महाभुजः ।
आत्मकर्मक्षमं देहं क्षात्रो धर्म इवाश्रितः ।।

(५) कु. मा. (अ. ६, श्लोक १९) मध्ये कुशलवांसहित रामाला तिष्य-पुनर्वसूसहित चंद्रमाची उपमा दिली आहे–

स एव रामो नयनाभिराम.
सीतासुताभ्यां समुपास्यमानः ।
यदृच्छया तिष्यपुनर्वसुभ्यां
पार्श्वस्थिताभ्यामिव शीतरश्मिः ।।

तसलीच 'रघुवंशा'तील (रघु. ११, श्लोक ३६) रामलक्ष्मणाना दिलेली पुनर्वसूच्या दोन ताऱ्याची उपमा पहा–

तौ विदेहनगरीनिवासिनां गां गताविव दिवः पुनर्वसू ।
मन्यते स्म पिवता विलोचनैः पक्ष्मपातमपि वञ्चनां मनः ।।

(६) कु. मा. (अं. ५) मध्ये रामाला नमस्कार करण्यासंबंधी सीतेची आज्ञा सागताना लव म्हणतो–

'प्रणाममपि संदेशोपदिष्टवती । न च गुरुनियोगा विचारमर्हन्ति ।'

रघु. (स. १४, श्लोक ४६) मध्ये सीतापरित्यागासंबंधी रामाची आज्ञा लक्ष्मणाने का पाळली हे सागताना कालिदास म्हणतो–

स शुश्रुवान्मातरि भार्गवेण पितुर्नियोगात्प्रहृतं द्विषद्वत् ।
प्रत्यग्रहीदग्रजशासनं तदाज्ञा गुरूणां ह्यविचारणीया ।।

वरील उदाहरणातील साम्य स्पष्ट आहे. त्यावरून धीरनागाने आपल्या नाटकात पूर्वगामी कालिदास व शूद्रक यांचे किती अनुकरण केले आहे हे दिसून येईल.

## दोन्ही ग्रंथकारांच्या अनुकरणांतील तारतम्य

भवभूतीनेही आपल्या नाटकात क्वचित्स्थली कालिदासाच्या नाटकातील प्रसंगाचे व शब्दयोजनेचे अनुकरण केले आहे खरे. उदाहरणार्थ, 'विक्रमोर्वशीया'तील उर्वशी अदृश्य झाल्यामुळे वेडा झालेल्या पुरूरव्याचे भाषण व 'मालतीमाधवा'तील मालती नाहीशी झाल्यावर माधवाचे भाषण यात साम्य आहे. 'शाकुन्तला'तील व 'उत्तररामचरिता'तील लहान मुलाच्या अव्याजमनोहर रूपाचे वर्णन एकाच प्रकारचे आहे. 'शाकुन्तला'च्या सातव्या अंकात विविध प्रमाणांवरून सर्वदमन आपलाच पुत्र आहे अशी दुष्यन्ताची खात्री पटते त्या प्रसंगावरून 'उत्तररामचरिता'-च्या सहाव्या अंकातील कुशलवांच्या प्रत्यभिज्ञानाचा प्रसंग सुचलेला दिसतो. पूर्वगामी ग्रंथकारांच्या अनुकरणाचे काही प्रसंग प्रत्येक नाटककाराच्या कृतींत दाखवता येतील. किंबहुना, राजशेखराने म्हटल्याप्रमाणे 'सर्वोऽपि परेभ्य एव व्युत्पद्यते।' प्रत्येक ग्रंथकार पूर्वजांचे भांडवल घेऊनच व्यापार करतो. कालिदासाने अश्वघोषाचे व भासाचे काही बाबतीत अनुकरण केल्याचे आम्ही आपल्या 'कालिदास' ग्रंथात दाखविले आहे. तथापि अनुकरणाच्या पुराव्यावरून ग्रंथकाराचे पौर्वापर्य ठरवताना त्याचे तारतम्य लक्षात घेतले पाहिजे. त्या दृष्टीने विचार केल्यास पूर्वकालीन नाटककारांच्या ग्रंथांतील प्रसंगांचे व शब्दयोजनेचे अनुकरण करण्याची प्रवृत्ति भवभूतीपेक्षा धीरनागात अधिक प्रमाणात आढळून येते. भवभूति स्वतन्त्रप्रज्ञ व शब्दब्रह्मवेत्ता होता. त्याच्या ग्रंथात अनेक मौलिक प्रसंग व सुंदर कल्पना दृष्टीस पडतात. त्याच्या तुलनेने धीरनागाचे परावलंबित्व व कल्पनादारिद्र्य उठून दिसते. तेव्हा त्यानेच भवभूतीचे अनुकरण केले असावे असा निर्णय काढल्याशिवाय गत्यंतर नाही.

वरील सविस्तर विवेचनावरून खालील निर्णय वाचकांस पटतील अशी आशा आहे.

(१) 'कुन्दमाले'चा कर्ता दिङ्नाग नसून धीरनाग होता.

(२) धीरनागाने 'कुन्दमाले'त भवभूतीच्या 'उत्तररामचरिता'चे अनुकरण केले आहे.

आणि (३) 'कुन्दमाले'चा काल खिस्तोत्तर आठवे आणि अकरावे शतक यामधील आहे.

---

उद्गलितदर्भकवला मृगाः परित्यक्तनर्तना मयूराः ।
अपसृतपाण्डुपत्रा मुञ्चन्त्यश्रूणीव लताः ।।

दोन्हीतील वर्णन सारखेच आहे.

(४) कु. मा. (अं. ३, श्लो. १५) मधील रामाचे वर्णन पाहा–

व्यायामकठिनः प्रांशुः कर्णान्तायतलोचनः ।
व्यूढोरस्को महाबाहुर्व्यक्तं दशरथात्मजः ।

हे वर्णन 'रघुवंशा'तील (सर्ग १, श्लोक १३) दिलीपाच्या वर्णनासारखे आहे–

व्यूढोरस्को वृषस्कन्धः शालप्रांशुर्महाभुजः ।
आत्मकर्मक्षमं देहं क्षात्रो धर्म इवापरः ।।

(५) कु. मा. (अ. ६, श्लोक १५) मध्ये कुशलवासहित रामाला तिष्य-पुनर्वसूसहित चंद्रमाची उपमा दिली आहे–

स एष रामो नयनाभिरामः
सीतासुताभ्यां समुपास्यमानः ।
यदृच्छया तिष्यपुनर्वसुभ्यां
पार्श्वस्थिताभ्यामिव शीतरश्मिः ।।

तसलीच 'रघुवंशा'तील (रघु. ११, श्लोक ३६) रामलक्ष्मणाना दिलेली पुनर्वसूच्या दोन ताऱ्यांची उपमा पहा–

तौ विदेहनगरीनिवासिनां गां गताविव दिवः पुनर्वसू ।
मन्यते स्म पिबतां विलोचनैः पक्ष्मपातमपि वञ्चनां मनः ।।

(६) कु. मा. (अं. ५) मध्ये रामाला नमस्कार करण्यासंबंधी सीतेची आज्ञा सांगताना लव म्हणतो–

'प्रणाममपि संदेशोपदिष्टवती । न च गुरुनियोगा विचारमर्हन्ति ।'

रघु. (स. १४, श्लोक ४६) मध्ये सीतापरित्यागासंबंधी रामाची आज्ञा लक्ष्मणाने का पाळली हे सांगताना कालिदास म्हणतो–

स शुश्रुवान्मातरि भार्गवेण पितुर्नियोगात्प्रहृतं द्विषद्वत् ।
प्रत्यग्रहीदग्रजशासनं तदाज्ञा गुरूणां ह्यविचारणीया ।।

वरील उताऱ्यातील साम्य स्पष्ट आहे. त्यावरून धीरनागाने आपल्या नाटकात पूर्वगामी कालिदास व शूद्रक यांचे किती अनुकरण केले आहे हे दिसून येईल.

## दोन्ही ग्रंथकारांच्या अनुकरणातील तारतम्य

भवभूतीनेही आपल्या नाटकात क्वचित्स्थली कालिदासाच्या नाटकांतील प्रसंगांचे व शब्दयोजनेचे अनुकरण केले आहे खरे. उदाहरणार्थ, 'विक्रमोर्वशीया'तील उर्वशी अदृश्य झाल्यामुळे वेडा झालेल्या पुरूरव्याचे भाषण व 'मालतीमाधवा'तील मालती नाहीशी झाल्यावर माधवाचे भाषण यात साम्य आहे. 'शाकुन्तला'तील व 'उत्तररामचरिता'तील लहान मुलाच्या अव्याजमनोहर रूपाचे वर्णन एकाच प्रकारचे आहे. 'शाकुन्तला'च्या सातव्या अंकात विविध प्रमाणावरून सर्वदमन आपलाच पुत्र आहे अशी दुष्यन्ताची खात्री पटते त्या प्रसंगावरून 'उत्तररामचरिता'-च्या सहाव्या अंकातील कुशलवाच्या प्रत्यभिज्ञानाचा प्रसंग सुचलेला दिसतो. पूर्वगामी ग्रंथकारांच्या अनुकरणाचे काही प्रसंग प्रत्येक नाटककाराच्या कृतीत दाखवता येतील. किंबहुना, राजशेखराने म्हटल्याप्रमाणे 'सर्वोपि परेभ्य एव व्युत्पद्यते।' प्रत्येक ग्रंथकार पूर्वजांचे भांडवल घेऊनच व्यापार करतो. कालिदासाने अश्वघोषाचे व भासाचे काही बाबतीत अनुकरण केल्याचे आम्ही आपल्या 'कालिदास' ग्रंथात दाखविले आहे. तथापि अनुकरणाच्या पुराव्यावरून ग्रंथकाराचे पौर्वापर्य ठरवताना त्यांचे तारतम्य लक्षात घेतले पाहिजे. त्या दृष्टीने विचार केल्यास पूर्वकालीन नाटककाराच्या ग्रंथातील प्रसंगांचे व शब्दयोजनेचे अनुकरण करण्याची प्रवृत्ति भवभूतीपेक्षा धीरनागात अधिक प्रमाणात आढळून येते. भवभूति स्वतंत्रप्रज्ञ व शब्दप्रभुत्वाचा होता. त्याच्या ग्रंथात अनेक मौलिक प्रसंग व सुंदर कल्पना दृष्टीस पडतात. त्याच्या तुलनेने धीरनागाचे परावलंबित्व व कल्पनादारिद्र्य उठून दिसते. तेव्हा त्यानेच भवभूतीचे अनुकरण केले असावे असा निर्णय काढल्याशिवाय गत्यंतर नाही.

वरील सविस्तर विवेचनावरून खालील निर्णय वाचकांस पटतील अशी आशा आहे.

(१) 'कुन्दमाले'चा कर्ता दिङ्नाग नसून धीरनाग होता.

(२) धीरनागाने 'कुन्दमाले'त भवभूतीच्या 'उत्तररामचरिता'चे अनुकरण केले आहे.

आणि (३) 'कुन्दमाले'चा काल खिस्तोत्तर आठवे आणि अकरावे शतक यांमधील आहे.

---

## प्रकरण आठवे

# भवभूतीच्या ग्रंथांचे विशेष

सुबन्धौ भक्तिर्नः क इह रघुकारे न रमते
धृतिर्दाक्षीपुत्रे हरति हरिचन्द्रोऽपि हृदयम् ।
विशुद्धोक्तिः शूरः प्रकृतिमधुरा भारविगिर-
स्तथाप्यन्तर्मोदं कमपि भवभूतिर्वितनुते ॥

—सुभाषित

वरील सुभाषितात कर्त्याने म्हटले आहे की सुबन्धु, कालिदास, पाणिनि, हरिचन्द्र, शूर आणि भारवि याचे ग्रंथ आपापल्या परीने रमणीय असले तरी भवभूतीची नाटके वाचताना आमच्या हृदयाला एक अवर्णनीय आनंद होत असतो. प्रस्तुत प्रकरणात भवभूतीने रसिकावर ही जी मोहिनी घातली आहे तिचे कारण काय याचे विवेचन करावयाचे आहे.

उत्कृष्ट काव्याचे लक्षण अनेक आलंकारिकांनी निरनिराळे दिले आहे. ध्वन्यालोककार आनन्दवर्धन याने ध्वनि किंवा व्यङ्ग्यार्थ याला काव्याचा आत्मा मानला आहे, तर साहित्यदर्पणकार विश्वनाथ 'वाक्यं रसात्मकं काव्यम्' अशी काव्याची व्याख्या करून रसाला ते महत्त्व देतो. काव्यालङ्कारसूत्रवृत्तिकार 'रीतिरात्मा काव्यस्य' असे काव्याचे लक्षण करून रीतीला किंवा विशिष्ट पदरचनेला काव्यागात श्रेष्ठ मानतो. याच्या उलट भामहाप्रमाणे दुसरे काही आलंकारिक अलंकारांना महत्त्व देतात. कुन्तक, मम्मट, जगन्नाथ इत्यादि इतर काही साहित्यशास्त्रकारांनी काव्याच्या

निराळ्याच घटकांना महत्त्व दिले आहे. काव्याचे कोणतेही लक्षण अद्यापि सर्वसंमत झाले नाही. तथापि ध्वनि, रस, रीति आणि अलंकार हे सामान्यतः यातील प्रमुख पक्ष मानण्यास हरकत नाही. आता भवभूतीची नाटके या चार कसोटींवर पारखून त्यांची गुणवत्ता ठरविण्याचा प्रयत्न करू.

**ध्वनि**--संस्कृत साहित्यशास्त्रकारांनी शब्दांचे तीन अर्थ मानले आहेत. शब्दाचा स्वाभाविक होणारा अर्थ तो वाच्यार्थ; तो क्वचित् गैरलागू झाल्यामुळे त्याच्याशी संबद्ध असा अर्थ ध्यानात येतो तो लक्ष्यार्थ; आणि दोन्हींशिवाय संदर्भ-विशेषामुळे एक निराळाच सहृदयाह्लादक अर्थ त्यातून निघतो तो व्यङ्ग्यार्थ. या तिसऱ्या प्रकारच्या अर्थाला ध्वनि अशीही संज्ञा आहे. या ध्वनीच्या योगे काव्याला रमणीयत्व येते असे मत ध्वन्यालोककार आनंदवर्धन याने प्रथम सविस्तर प्रतिपादिले आणि त्याची दीर्घकाल चिकित्सा होऊन नंतर मम्मट, विश्वनाथ, जगन्नाथ या थोरथोर साहित्यशास्त्रज्ञांनी त्याचा पुरस्कार केला. ज्या काव्यात वाच्यार्थापेक्षा व्यङ्ग्यार्थ जास्त रमणीय असेल ते उत्कृष्ट काव्य. ज्यात तो वाच्यार्थाइतकाच किंवा कमी रमणीय असेल ते मध्यम काव्य आणि ज्यात तो मुळीच नसेल किंवा दुर्बोध असेल आणि अलंकारादिकांवरच भर दिला असेल ते अधम काव्य अशी काव्याची वर्गवारीही त्यांनी लावली आहे.

भवभूतीच्या नाटकात काही ठिकाणी उत्तम व्यंग्यार्थ व्यक्त केलेला आढळतो. 'मालतीमाधव'च्या पहिल्या अंकात मदनमहोत्सवाच्या प्रसंगी माधव बकुलपुष्पांची एक सुंदर माला गुंफतो. तितक्यात तेथे मालती आपल्या सख्यांसह येते. त्या दोघांची दृष्टादृष्ट होते आणि ती दोघेही परस्पराकडे आकृष्ट होतात. नंतर मालती निघून गेल्यावर तिची सखी लवङ्गिका फुले वेचण्याच्या निमित्ताने माधवाजवळ येऊन म्हणते–

**महाभाग, सुश्लिष्टगुणतया रमणीय एव वः सुमनसां संनिवेशः। कुतूहलिनी च नो भर्तृदारिका वर्तते। तस्या अभिनवो विचित्रः कुसुमेषुव्यापारः। तद्भवतु कृतार्थता वंशव्ययस्य, फलतु निर्माणरमणीयता विधातुः, समासादयतु सरस एव भर्तृदारिकाया कण्ठावलम्बनमहार्घतामिति।**

या भाषणाचा वरवरचा अर्थ हा आहे– 'महाभाग आपली ही फुलांची रचना दोऱ्यात उत्तम प्रकारे गुंफली असल्यामुळे रमणीय झाली आहे. आमच्या ताई-साहेबांना या विषयी कुतूहल आहे. त्यांना नुकतीच फुलांविषयी विलक्षण आवड उत्पन्न झाली आहे. तेव्हा आपले हे ग्रथनकौशल्य कृतार्थ होवो! आपल्या या मालेचे निर्माणसौंदर्य सफल होवो! आणि ताज्या पुष्पांची ही माला आमच्या ताई-

साहेबाच्या कण्ठाच्या ठिकाणी उत्कृष्ट स्थान प्राप्त करो!' पण या भाषणातून माधवाला तिला सुचवावयाचा आहे, तो अर्थ त्यात मोठ्या कुशलतेने योजलेल्या श्लिष्ट शब्दांनी व्यक्त होत आहे. तो असा– ' महाभाग, सुंदर मनाच्या आपणा दोघांचा हा संयोग परस्परयोग्य अशा गुणामुळे मनोहर झाला आहे. आमच्या ताईसाहेबास त्याविषयी कुतूहल आहे. त्याच्या बाबतीत मदनाचा व्यापार हा अभिनव आणि विचित्र असा झाला आहे. तेव्हा विधात्याचे (ब्रह्मदेवाचे) कौशल्य कृतार्थ होवो! त्याने जी ही सुंदर निर्मिति केली आहे ती सफळ होवो! आणि प्रेमी जे आपण त्यांना आमच्या ताईसाहेबांच्या कंठाच्या ठिकाणी उत्कृष्ट स्थान प्राप्त होवो!')

लवङ्गिकेच्या भाषणातील वर दिलेला वाच्यार्थही विवक्षित आहे. तिला माधवाने गुंफिलेली बकुलमाला मालतीकरिता मागून घ्यावयाची आहे. पण तिच्या भाषणाला रम्यता आली आहे ती यातील व्यंग्यार्थामुळे. श्लिष्ट शब्दांच्या प्रयोगाने तिने माधवाला सुचविले आहे की मालती त्याच्याकरिता झुरत असून त्या दोघांचा विवाह जमून आल्यास विधात्याने त्यांच्या ठिकाणी जे निरुपम सौंदर्य निर्माण केले आहे त्याचे सार्थक होईल. हे भाषण ध्वनिकाव्याचे सुंदर उदाहरण आहे.

ज्यामध्ये व्यंग्यार्थ वाच्यार्थापेक्षा सरस नसतो ते काव्य मध्यम प्रतीचे होते. याचे ' महावीरचरिता 'तील खालील उदाहरण 'काव्यप्रकाशा 'त दिले आहे–

परशुरामाने रावणाला पाठविलेल्या पत्रात दंडकारण्यातील तीर्थांच्या ठिकाणी वसती करणाऱ्या ऋषींना विराधासारख्या राक्षसांनी त्रास देऊ नये असे सांगून खालील श्लोक लिहिला होता–

ब्राह्मणातिक्रमत्यागो भवतामेव भूतये।
जामदग्न्यश्च वो मित्रमन्यथा दुर्मनायते ॥

(म. च., २, १०)

(ब्राह्मणांना पीडा देण्याचे थांबेल तर त्यामुळे तुमचे कल्याण होईल. नाही तर तुमचा स्नेही असलेला हा जामदग्न्य नाखूष होईल.) या ठिकाणी 'मी पूर्वी क्षत्रियांचा क्षणात संहार केला तसा राक्षसांचाही करीन' हा अर्थ व्यंग्य आहे, पण तो वाच्यार्थापेक्षा जास्त रमणीय नसल्यामुळे हा श्लोक मध्यम काव्याचे उदाहरण गणला गेला आहे.[1]

एकंदरीत भवभूतीचा कल विवक्षित अर्थ सूचित करण्यापेक्षा तो शब्दांनी सविस्तर वर्णन करण्याकडे आहे. याच्या उलट कालिदास कोणत्याही रम्य वस्तूचे पाल्हाळीक

१. काव्यप्रकाश, (सं. झळकीकर), पृ. २१०.

वर्णन न करता मोजक्या शब्दांनी तिने रेखाचित्र काढून त्यात रंग भरण्याचे काम वाचकाच्या सहृदयतेवर सोपवून देतो. याची काही उदाहरणे या दोन कवींच्या ग्रंथातून आम्ही ' कालिदास ' ग्रंथात दिली होती.[२] आणखीही काही येथे देऊ–

**(१) कालिदास**—शकुंतला पतिगृही जाताना कण्व ऋषि तिला आशीर्वाद देतात. तेव्हा गौतमी म्हणते, भगवन् वरः खलु एषः, नाशीः । ( हा वर आहे. आशीर्वाद नव्हे. )

**भवभूति**—' उत्तररामचरिता 'च्या पहिल्या अंकात वसिष्ठ सीतेला ' केवलं वीरप्रसवा भूयाः ' असा आशीर्वाद पाठवतात. तेव्हा राम म्हणतो–

लौकिकानां हि साधूनामर्थं वागनुवर्तते ।
ऋषीणां पुनराद्यानां वाचमर्थोऽनु धावति ।। ( उ. च., १, १० )

दोन्ही भाषणात तोच अर्थ अभिप्रेत आहे, पण कालिदासाने तो एका लहान वाक्यात व्यक्त केला आहे तर भवभूतीने त्याकरिता एक सबंध श्लोक खर्ची घातला आहे.

**(२) कालिदास**—' मेघदूता 'त ( श्लो. ७६ ) यक्ष अलकेतील आपल्या गृहाजवळ मोराकरिता उभारलेल्या स्फटिकफलकासहित सोन्याच्या ' वासयष्टी 'चा निर्देश करून म्हणतो–

तालैः शिञ्जद्वलयसुभगैर्नर्तितः कान्तया मे
यामध्यास्ते दिवसविगमे नीलकण्ठः सुहृद्वः ।।

(ज्या वासयष्टीवर संध्याकाळ झाली असता माझ्या पत्नीने कंकणांच्या आवाजाने मनोहर झालेल्या टाळ्यांनी नाचविलेला तुझा मित्र मोर बसत असतो. )

**भवभूति**—पञ्चवटीच्या परिसरात पूर्वी सीता मोराला कसे नाचवीत असे याचे रामाने केलेले सविस्तर वर्णन पाहा–

भ्रमिषु कृतपुटान्तर्मण्डलावृत्ति चक्षुः
प्रचलितचतुरभ्रूताण्डवैर्मण्डयन्त्या ।
करकिसलयतालैर्मुग्धया नर्त्यमानं
सुतमिव मनसा त्वां वत्सलेन स्मरामि ।।

(उ. च., ३, १९ )

कालिदासाचे वर्णन संक्षिप्त पण सूचक आहे, तर भवभूतीने ते सविस्तर केले आहे.

२. कालिदास ( द्वितीयावृत्ति ), पृ. २२०.

**रस**—ध्वनि किंवा व्यंग्यार्थ याने विषयभेदाने वस्तुध्वनि, अलंकारध्वनि आणि रसध्वनि असे तीन प्रकार होतात. त्यात रसध्वनि हा श्रेष्ठ होय. 'साहित्य-दर्पण 'कार विश्वनाथाने रसाला काव्याचा आत्मा मानला आहे. साहित्यशास्त्रात शृंगार, वीर, करुण, हास्य, रौद्र, भयानक, बीभत्स, अद्भुत आणि शान्त असे नऊ रस मानले आहेत. यांपैकी बहुतेकांचा परिपोष भवभूतीच्या नाटकात कोठे ना कोठे तरी झालेला आढळेल. पण त्यातील मुख्य असे जे तीन रस-शृंगार, वीर आणि करुण-त्यांच्या सर्वांगीण परिपोषाकरिता त्याने अनुक्रमे 'मालतीमाधव', 'महावीरचरित' आणि 'उत्तररामचरित' ही नाटके रचली. तेव्हा या तीन रसांची विपुल उदाहरणे त्यात सापडतील. त्यांपैकी काही त्या त्या नाटकाच्या साराशात दिली आहेत. तथापि आणखीही काही देऊ.

शृंगाराचे संभोग आणि विप्रलंभ असे दोन प्रकार होतात. पहिल्याचे 'उत्तरराम-चरिता 'तील सुप्रसिद्ध उदाहरण पाहा—

किमपि किमपि मन्दं मन्दमासत्तियोगा-
अविरलितकपोल जल्पतोरक्रमेण ।
अशिथिलपरिरम्भव्यापृतैकैकदोष्णो-
रविदितगतयामा रात्रिरेव व्यरंसीत् ॥
(उ. च., १, २७)

विप्रलंभ शृंगारात अभिलाष, विरह, ईर्ष्या प्रवास किंवा शाप यायोगे झालेल्या वियोगाचे वर्णन असते. मम्मटाने अभिलाषहेतुक विप्रलंभ शृंगाराचे खालील उदाहरण 'मालतीमाधवा 'तून (१, ३) आपल्या 'काव्यप्रकाशा 'त उद्धृत केले आहे—

प्रेमार्द्राः प्रणयस्पृशः परिचयादुद्गाढरागोदया-
स्तास्ता मुग्धदृशो निसर्गमधुराश्चेष्टा भवेयुर्मयि ।
यास्वन्तःकरणस्य बाह्यकरणव्यापाररोधी क्षणा-
दाशंसापरिकल्पितास्वपि भवत्यानन्दसान्द्रो लयः ॥

या विप्रलंभ शृंगाराचा परिपोष त्याच नाटकाच्या नवव्या अंकातील माधवाच्या अनेक उक्तींत झाला आहे.

'महावीरचरिता 'त प्राधान्याने जामदग्न्याच्या उक्तीत आणि जनक, दशरथ, विश्वामित्र यांच्याही काही भाषणात वीररसाचा परिपोष झालेला आढळेल. उदाहरणार्थ, परशुरामाचा खालील श्लोक पाहा—

सोऽयं त्रिःसप्तवारानविकलविहतक्षत्रतन्त्रप्रमारो
घीरः क्रौञ्चस्य भेदाकृतधरणितलापूर्वहंसावतारः ।
जेता हेरम्बभृङ्गिप्रमुखगणचमूचक्रिणस्तारकारे-
स्त्वां पुच्छञ्जामदग्न्यः स्वगुरुहरधनुर्भङ्गरोषादुपैति ॥
(म. च., २, १७)

'उत्तररामचरिता'च्या तिसऱ्या अंकातील रामाच्या हृदयद्रावक शोकाने झालेल्या करुण रसाची अनेक उदाहरणे मागे दिली आहेत. ती पुन: देण्याची आवश्यकता नाही.

याशिवाय प्रसंगानुरोधाने इतरही रस भवभूतीच्या नाटकात आले आहेत. उदाहरणार्थ, 'मालतीमाधवा'त माधव व अघोरघंट यांच्या खालील समानोक्तीतील रौद्ररस पाहा--

कठोरास्थिग्रन्थिव्यतिकररणत्कारमुखरः
खरस्नायुच्छेदक्षणविहितवेगव्युपरमः ।
निरातङ्कः पङ्केष्विव पिशितपिण्डेषु विलस-
न्नसिर्गात्रं गात्रं सपदि लवशस्ते विकिरतु ॥
(मा. मा., ५, ३४)

यात मुख्य रस रौद्र असून त्याच्या बरोबर बीभत्स रसाची छटा आली आहे. वीर आणि रौद्र रसांमध्ये फरक हा की वीररसाचा स्थायिभाव उत्साह असतो तर रौद्र रसाचा क्रोध असतो.

बीभत्स रसाची अनेक उदाहरणे 'मालतीमाधवा'च्या पाचव्या अंकाच्या श्मशानातील प्रवेशात पाहावी. त्यातील 'उत्कृत्योत्कृत्य कृत्तिं' इत्यादि अत्यंत किळसवाणे वर्णन असलेला श्लोक त्या रसाचे 'मूर्धाभिषिक्त उदाहरण' म्हणून 'काव्यप्रकाशा'सारख्या अनेक साहित्यशास्त्रीय ग्रंथात उद्धृत केला आहे.[१] बीभत्साची इतर उदाहरणे 'महावीरचरिता'तील (१, ३९) रामबाणाने मेलेल्या ताटकेच्या वर्णनात, आणि दनु राक्षसाच्या प्रेताच्या वर्णनात (५, ३३) आढळतील. बीभत्सरसाच्या वर्णनात भवभूतीच्या तोडीचा संस्कृत कवि आढळणार नाही. हास्य रसाचे उदाहरण 'उत्तररामचरिता'त आश्रमवासी लहान मुलांनी केलेल्या घोड्याच्या वर्णनात आणि अद्भुतरसाचे उदाहरण जृंभकास्त्रांच्या (तसेच सौदामिनीच्याही) आविर्भावाचे वर्णन करणाऱ्या 'व्यतिकर इव भीमस्तामसो वैद्युतश्च' इत्यादि श्लोकांत सापडेल.

---

१. काव्यप्रकाश, पृ. १०३

भागीरथी आणि पृथ्वी याच्या गगानदीच्या जलातून झालेल्या आविर्भावाच्या वर्णनातही तोच रस आहे. याप्रमाणे भवभूतीची नाटके रसाच्या प्राचुर्याने प्रयोग (भूम्ना रसाना व्हवः प्रयोगाः) असलेली अशी आहेत.

**रीति**— दण्डीने आपल्या काव्यादर्शात वैदर्भ आणि गौड अशा दोन मार्गाचे (शैलीचे) वर्णन केले होते. नंतर खिस्तोत्तर आठव्या शतकात होऊन गेलेल्या वामनाने आपल्या 'काव्यालङ्कारसूत्रवृत्ती'त वैदर्भी, गौडी आणि पाञ्चाली या तीन रीतींचा निर्देश करून रीतीला काव्याचा आत्मा मानले. पुढे 'ध्वन्यालोक'काराचा ध्वनिवाद रसिकात जास्त मान्य झाल्यामुळे हा रीतिवाद मागे पडला. तथापि भवभूतीच्या काळी रीतीला विशेष महत्त्व होते यात संशय नाही. वैदर्भी रीति ही सर्वश्रेष्ठ, असे दण्डीने म्हटले आहे. कारण तीत सर्व गुणाचा समुच्चय असतो. तीत समास नसतात किंवा असले तरी थोडे असतात. तसेच तीत कठोर वर्ण टाळून कोमल वर्णाचाच उपयोग केला असतो. याच्या उलट गौडी रीतीत दीर्घ समास व कठोर वर्ण याचे प्राचुर्य असते. शृंगार व करुण या रसाच्या वर्णनात वैदर्भी रीतीचा आणि वीर, रौद्र व बीभत्स रसाच्या वर्णनात गौडी रीतीचा अवलंब केला जातो. हे झाले पद्यासंबंधी. गद्यात मात्र ओजोगुणाची अत्यंत आवश्यकता असल्यामुळे त्यात समासप्राचुर्य असावे लागते. ओज. समासभूयस्त्वमेतद्गद्यस्य जीवितम्।[४] असे दण्डीने म्हटले आहे. भवभूतीने आपल्या नाटकात दंडीने घालून दिलेल्या नियमाचे काटेकोरपणे पालन केले आहे. 'महावीरचरिता'त वीररस प्रधान आणि रौद्र व बीभत्स रस अगभूत आहेत. म्हणून त्यातील श्लोक गौडी रीतीत रचले आहेत. याच्या उलट 'मालतीमाधवात'त शृंगार आणि 'उत्तररामचरिता'त करुण हे रस प्रमुख असल्यामुळे त्यातील श्लोकरचना प्रायः वैदर्भी रीतीत केली आहे. भवभूतीचा स्वतःचा कल शब्दाडम्बराकडे असल्याने जेथे रसाचा संबंध येत नाही अशा सृष्टिवर्णन, कालवर्णन इत्यादिकात त्याने गौडी रीतीचाच अवलंब केला आहे.

भवभूतीच्या काली ओजोगुण हा गद्याचा प्राण होय हे मत मान्य झाले असल्यामुळे त्याने गद्यात बहुधा सर्वत्र समासप्रचुर गौडी रीति योजिली आहे. लाब लाब समास असलेले गद्य श्रव्य काव्यात असले तरी फारसे बिघडत नाही. वाचकाला त्याचा सावकाश अर्थ लावून त्यातील रसाचा आस्वाद घेता येतो. पण दृश्य काव्यात किंवा नाटकात, विशेषतः त्यातील प्राकृत भाषणात, समासप्रचुर भाषा अत्यंत अयोग्य आहे. पण भवभूतीने अशा भाषेचा उपयोग वीररसप्रधान

४. काव्यादर्श, १, ८०

'महावीरचरिता'तच नव्हे तर शृंगाररसप्रधान 'मालतीमाधवा'तही केला आहे. उदाहरणार्थ, त्या नाटकाच्या तिसऱ्या अंकातील लवङ्गिकेने केलेले मदनपरवश मालतीचे वर्णन किंवा सातव्या अंकातील मदयन्तिकेने केलेले स्वतःच्या संकल्पनिर्मित प्रियसमागमाचे वर्णन पाहा. ही समासप्रचुर वर्णने कित्येक ठिकाणी अगदी अनुचित वाटतात. उदाहरणार्थ 'मालतीमाधवा'च्या तिसऱ्या अंकातील पिंजऱ्यातून निसटलेल्या वाघाने मांडलेल्या धुमाकुळाचे समासप्रचुर विस्तृत वर्णन अगदी अप्रासंगिक आहे. शूद्रकाच्या 'मृच्छकटिका'त याप्रकारचा प्रसंग आठ दहा सुटसुटीत प्राकृत वाक्यांत वर्णिला आहे तो पाहावा, म्हणजे त्याच्या तुलनेने भवभूतीचे असमीक्ष्यकारित्व सुस्पष्ट होईल.

पण इतर काही ठिकाणी भवभूतीने आपली शैली वर्ण्य विषयाला अनुरूप अशी बदलली आहे. उदाहरणार्थ, 'उत्तररामचरिता'त (अं. ५, २६) चन्द्रकेतूशी युद्ध करण्याच्या वेळी आपली कशी अवस्था झाली तिचे लवाने केलेले खालील वर्णन पाहा—

यथेन्दावानन्दं व्रजति समुपोढे कुमुदिनी
तथैवास्मिन्दृष्टिर्मम कलहकामः पुनरयम् ।
रणत्कारक्रूरक्वणितगुणगुञ्जद्गुरुधनु-
र्धृतप्रेमा बाहुर्विकचविकरालोल्बणरसः ॥ (उ. च., ५, २६)

या श्लोकाच्या प्रथमार्धात लव चन्द्रकेतूला पाहून आपल्या नेत्रांना कसा आनंद झाला याचे वर्णन करीत आहे म्हणून तो भाग वैदर्भी रीतीत आणि द्वितीयार्धात तो आपल्या झुंजार उद्दाम बाहूचे वर्णन करीत आहे म्हणून तो भाग गौडी रीतीत रचला आहे.

'महावीरचरिता'त रामाने भगवान् शंकराच्या धनुष्याचा भंग केल्यामुळे क्रुद्ध होऊन आपण आपला परशु कसा चालविणार याचे वर्णन जामदग्न्य पुढील श्लोकात करीत आहे—

प्रागप्राप्तनिशुम्भशाम्भवधनुर्द्वेधाविधाविर्भव-
त्क्रोधप्रेरितभीमभार्गवभुजस्तम्भापविद्धः क्षणात् ।
सज्वालः परशुर्भवत्वशिथिलस्त्वत्कण्ठपीठातिथि-
र्येनानेन जगत्सु खण्डपरशुर्देवो हरः ख्याप्यते ॥

(म. च., २, ३३)

या श्लोकाच्या पहिल्या तीन चरणात परशुरामाने क्रोधाने फेकलेल्या परशूचे वर्णन असल्याने त्या भागात दीर्घ समास, कठोर वर्ण व द्वित्व व्यंजने यांचा उपयोग

केला आहे, पण चौथ्या चरणात जामदग्न्याच्या शिवभक्तीचा उल्लेख असल्यामुळे त्यात समास टाळून कोमलवर्णात्मक शब्द योजिले आहेत.

काही ठिकाणी ध्वनीवरूनच अर्थाची प्रतीति व्हावी अशी शब्दयोजना भवभूतीने केली आहे. उदाहरणार्थ, 'उत्तररामचरिता'त ( ६,१७ ) कुशाचा आवाज ऐकून आपली कशी अवस्था झाली याचे वर्णन राम खालील श्लोकात करतो ते पाहा—

अथ कोऽप्ययमिन्द्रमणिमेचकच्छवि-
ध्वनिनैव बद्धपुलकं करोति माम् ।
नवनीलनीरधरधीरगर्जित-
क्षणबद्धकुड्मलकदम्बडम्बरम् ।।

यातील द्वितीयार्धात मेघगर्जना झाल्याबरोबर एक क्षणात कदम्बवृक्षाला कळ्या फुटतात त्याचे सुंदर वर्णन आहे. या श्लोकाच्या तृतीय चरणात दीर्घ स्वराची योजना करून मेघगर्जनेचे अनुकरण केले आहे आणि चौथ्या चरणात ह्रस्व स्वर आणि त्यापुढे संयुक्त व्यंजन योजून कदम्बवृक्षाला लागलीच येणाऱ्या कळ्यांचा प्रादुर्भाव सूचित केला आहे.

'मालतीमाधवा'च्या पाचव्या अंकात अघोरघंट व कपालकुण्डला प्रदीर्घ दण्डकवृत्तात कराला देवीच्या ताण्डव नृत्याचे वर्णन करतात त्या वृत्ताची निवड कशी प्रसंगाला साजेशी आहे आणि त्या श्लोकात देवीच्या नृत्यातील पदविन्यासाचे कसे कुशल अनुकरण केले आहे ते मागे दाखविले आहे ( पृष्ठ १६३ ).

इतर वृत्तेही त्याने अशीच कुशलतेने योजिली आहेत. वीर, रौद्र आणि बीभत्स रसाच्या वर्णनास तो स्रग्धरा ( म. च., २, १६–१७; मा. मा. ५,१६ ) व शार्दूलविक्रीडित ( म. च. ७, १९ ) यासारख्या पल्लेदार वृत्तांची योजना करतो; याच्या उलट अनुनयाकरिता तो रथोद्धता वृत्ताचा उपयोग करतो (एष वो नगरदेवता स्थित , इत्यादि, म. च., ३,३३). क्षेमेन्द्राने 'सुवृत्ततिलका'त (३,३३) त्याच्या शिखरिणी वृत्ताची विशेष प्रशंसा केली आहे. ( भवभूतेः शिखरिणी निरर्गलतरङ्गिणी । रुचिरा घनसन्दर्भे या मयूरीव नृत्यति ॥ ) 'उत्तररामचरिता'त शिखरिणी वृत्तातील श्लोक सर्वांत जास्त (३०) आहेत.

अलंकार—काव्यामध्ये ध्वनि किंवा रस या घटकांना प्राधान्य असले तरी सर्वत्र त्यांची अपेक्षा करणे शक्य किंवा इष्टही होणार नाही. फार प्राचीन काळापासून काव्याला शोभा आणण्याचे साधन म्हणून अलंकारांना मान्यता मिळाली आहे.

काव्यादर्शकार दण्डीने म्हटले आहे 'काव्यशोभाकरान् धर्मानलङ्कारान् प्रचक्षते।'[५] भरताच्या 'नाट्यशास्त्रा'त उपमा, रूपक, दीपक आणि यमक अशा फक्त चार अलंकारांचा निर्देश आहे, पण पुढे त्यांनी संख्या भरमसाट गेली.

अलंकाराचे शब्दालंकार, अर्थालंकार आणि शब्दार्थालंकार असे तीन भेद होतात. अर्थालंकारापेक्षा शब्दालंकार कृत्रिम वाटतात. म्हणून थोर कवि त्यांचा क्वचित् उपयोग करतात. जो अलंकार विशिष्ट शब्दांच्या प्रयोगावर अवलंबून असतो आणि तो शब्द बदलला तर नष्ट होतो त्याला शब्दालंकार म्हणतात. भवभूतीनें अनुप्रास, यमक व श्लेष या शब्दालंकाराचा उपयोग केला आहे– 'गन्धद्विपेन्द्र-कलभः करिकुम्भकूटकुट्टाकपाणिकुलिशस्य यथा मृगारेः॥ (म. च., २, ३१) हे अनुप्रासाचे उदाहरण पाहा– यात 'क्' या व्यंजनाची पुनरुक्ति आहे. 'जीव जीवितधमाय जीवितं देहि जीवतु सुहृज्जनस्त्वे ते॥' (मा. मा. १०, १८) यात 'जीव' शब्दाची पुनरुक्ति आहे म्हणून यमकालंकार झाला आहे. श्लेषाचे उदाहरण मागे उद्धृत केलेल्या 'मालतीमाधवा'तील उताऱ्यात दाखविले आहे. 'प्रभवती निजस्य कन्यकाजनस्य महाराजः।' या भूरिवसूच्या चतुर उक्तीत 'निज' पदावर श्लेष आहे; तो माधवाच्या लक्षात आणून कामन्दकीनें त्याचें सान्त्वन केले आहे. काही उपमा श्लेषाधिष्ठित आहेत. त्यांचे विवेचन पुढे करू.

पण इतर महाकवींप्रमाणे भवभूतीचा ओढा शब्दालंकारापेक्षा अर्थालंकाराकडे विशेष आहे. अर्थालंकाराचे स्वभावोक्ति आणि वक्रोक्ति असे प्रथमच दोन भेद पडतात. स्वभावोक्तीत कवीने वस्तूचे हुबेहुब चित्र काढावयाचे असते तर वक्रोक्तीत तिच्या अंगावर आपल्या कल्पनाशक्तीनें निर्मिलेले अलंकार घालून तिला सजवावयाचे असते. या दोन्ही प्रकारात भवभूति सिद्धहस्त आहे. प्रथम स्वभावोक्तीची काही उदाहरणे देऊ–

(१) 'महावीरचरिता'तील (२, २६) जामदग्न्याचे पुढील वर्णन पाहा –

ज्योतिर्ज्वालाप्रचयजटिलो भाति कण्ठे कुठार–
स्तूणीरोऽसौ वपुषि च जटाचापचीराजिनानि।
पाणौ बाणः स्फुरति वलयीभूतलोलाक्षसूत्रे
वेषः शोभां व्यतिकरवतीमुग्रशान्तास्तनोति॥

या श्लोकात जामदग्न्याचा उग्र तसाच शान्तही वेष मोठ्या सुंदर रीतीने वर्णिला

---

५. काव्यादर्श, २, १

आहे. यात कल्पनानिर्मित एकही अलंकार योजिला नाही. हे वर्णन एखाद्या कसलेल्या चित्रकारालाही मार्गदर्शक होईल.

पाचव्या अंकाच्या आरंभी कपालकुंडला आकाशातून मोठ्या वेगाने येते. तिचेही वर्णन 'विध्वग्वृत्तिर्डयना–' इत्यादि श्लोकात हुबेहुब केले आहे (पृ. १९९). त्यात वाऱ्यामुळे सर्व दिशांत पसरणाऱ्या तिच्या जटा, खट्वाङ्गाला बांधलेली वाजणारी घंटा, वाऱ्याने भरून गेल्यामुळे गुंजन करणारी तिच्या अंगावरची नरकपाले आणि एकसारखा रणत्कार करणाऱ्या तिच्या किंकिणी यांचे यथातथ्य शब्दचित्र त्या श्लोकात आले आहे.

आता एका निराळ्या प्रकारचे वर्णन घ्या. माधवीच्या आणि सीतेच्याही बाल-पणाचे पुढील सुंदर शब्दचित्र पाहा–

अनियतरुदितस्मितं विराजत्कतिपयकोमलदन्तकुड्मलाग्रम् ।
वदनकमलकं शिशोः स्मरामि स्खलदसमञ्जसमुग्धजल्पितं ते ॥
(मा. मा., २, उ. च., ४, ४)

या श्लोकात दोन फिरकोळ उपमा आल्या आहेत, पण त्याची रम्यता मुख्यतः त्यातील बालकाच्या निरागस आणि मुग्ध स्वरूपाच्या सुंदर वर्णनामुळे उत्पन्न झाली आहे.

स्वभावोक्तीत कवीचे निरीक्षणकौशल्य आणि यथार्थवर्णनशक्ति दृष्टीस पडते, तर वक्रोक्तिमूलक अलंकारात त्याचा कल्पनाविलास आढळतो. या अलंकारामध्ये उपमा हा अलंकार प्राथमिक आणि रम्य, म्हणून तो प्रथम घेऊ.

**उपमा**—'उपमा कालिदासस्य' असे एका सुभाषितात म्हटले आहे आणि कालिदासाच्या उपमांचे वैपुल्य, वैविध्य आणि रम्यत्व ध्यानात घेता ते यथार्थच आहे यात संशय नाही. पण भवभूतीच्याही काही उपमा त्याच्या तोडीच्या आहेत.

भवभूतीने काही परंपरागत उपमा योजिल्या आहेत—जसा दन्तकुड्मल, वदनकमल इत्यादि. त्यांचा निर्देश करण्याची जरूरी नाही, तर त्याच्या उपमांची वैशिष्ट्ये येथे विचारात घ्यावयाची आहेत.

**औचित्य**—भवभूतीच्या नाटकांतील पात्रांनी योजिलेल्या उपमा त्यांना त्या त्या प्रसंगी मुचवील अशाच आहेत. विश्वामित्र नेहमी यज्ञयागाच्या अनुष्ठानात गुंतलेले. तेव्हा त्यांनी ब्रह्मद्वेष्ट्या राक्षसांचा संहार करणाऱ्या रामाला 'अथर्ववेदा'तील अभिचाराची (जादूटोण्याची) उपमा द्यावी हे साहजिक आहे (म. च. १, ६२). पुढे तपोनिष्ठ पण क्षत्रवधाचे भयंकर कृत्य करणाऱ्या जामदग्न्याला 'अथर्व-

वेदा'ची उपमा दिली आहे, तीही अशीच अनुरूप आहे. कारण 'अथर्ववेदा'च्या मंत्रांनी स्वतःचे कल्याण साधता येते, तसे त्यात वर्णिलेल्या जादूटोण्यांनी शत्रूंचा नि पातही करता येतो. जामदग्न्याला शापाने भस्म करावयास उद्युक्त झालेल्या आणि ब्रह्मतेज अंगी असलेल्या क्रुद्ध शतानन्दाला दशरथाने दिलेली यज्ञाग्नीची उपमा अशीच अनुरूप आहे.

**समर्पकपणा**—भवभूतीच्या अनेक उपमा अत्यंत समर्पक वाटतात. उदाहरणार्थ 'उत्तररामचरिता'त (अ. १, ४०) सीताविषयक प्रवादाला कुत्र्याच्या विषाची उपमा अत्यंत समर्पक आहे. वेडा झालेला कुत्रा ज्याला चावतो तो स्वतः विषारी बनून दुसऱ्याला चावला असता त्याला विषारी बनवतो. त्याप्रमाणेच सीताविषयक प्रवाद लोकांत पसरत आहे हे रामाने सूचित केले आहे. रामाच्या स्वतःच्या दुःखाला औषधींच्या पुटपाकाची उपमा (उ. च., ३, १) अशीच अन्वर्थ आहे. 'छद्मना परिददामि मृत्यवे सौनिको गृहशकुन्तिकामिव' (उ. च., १, ४५), 'मर्मोपघातिभिः प्राणैर्वज्रकीलायितं हृदि।' (पूर्वोक्त, १, ४७), 'पटुधारावाही नव इव चिरेणापि हि न मे, निकृन्तन्मर्माणि क्रकच इव मन्युर्विरमति।' (पूर्वोक्त, ४, ३), 'श्येनावपातचकिता वनवर्तिकेव।' (मा. मा. ८, ८) इत्यादिकांतील उपमाही नवीन आणि अत्यंत समर्पक आहेत.

**आध्यात्मिकता**—सामान्यतः भवभूति सृष्ट पदार्थांतून उपमाने घेऊन आपला विषय सुगम करतो. पण क्वचित् कालिदासाप्रमाणे तो अमूर्त कल्पनांतूनही उपमाने घेताना दिसतो. विश्वामित्राबरोबर असलेल्या राम-लक्ष्मणांना कुशध्वजाने दिलेली धर्माच्या मागून उत्पन्न होणाऱ्या प्रताप आणि विक्रम यांची उपमा या प्रकारची आहे. (प्रतापविक्रमौ धर्मं पुरस्कृत्योद्गताविव। म. च., १, २२). 'उत्तररामचरिता'तील लवाने रामाला उद्देशून योजिलेली उपमा (प्रकृष्टस्येव धर्मस्य प्रसादो मूर्तिसुन्दरः। उ. च., ६, १०) अशाच तऱ्हेची आहे.

**श्लिष्टता**—कालिदासाच्या कालानंतरच्या कवींनी श्लेषयोजनेकडे जास्त जास्त लक्ष गेले. बाणाने आपल्या 'हर्षचरित' व 'कादम्बरी' या ग्रंथात शेकडो श्लेषमूलक उपमा योजिल्या आहेत. त्या मानाने भवभूतीच्या नाटकांत त्या फारच थोड्या आढळतात. पण त्यानेही तशा काही योजिल्या आहेत. उदाहरणार्थ 'मालतीमाधवा'तील (१०, ४) खालील उपमा पाहा—

उज्ज्वलालोकया स्निग्धा त्वया त्यक्ता न राजते।
मलीमसमुखी वर्तिः प्रदीपशिखया यथा॥ (मा. मा., १०, ४)

[ ज्याप्रमाणे उज्ज्वल प्रकाशाच्या दिव्याच्या ज्योतीशिवाय काळ्या टोकाची तैलयुक्त वात शोभत नाही त्याप्रमाणे उजळ चेहऱ्याच्या तुझ्या (मालतीच्या) वियोगामुळे काळवंडलेली ही प्रेमळ ( लवङ्गिका ) चांगली दिसत नाही. ]

लवङ्गिका आणि दिव्याची वात यांत काही स्वाभाविक साम्य नसताही 'उज्ज्वलालोका', 'स्निग्धा' आणि 'मलीमसमुखी' ही श्लिष्ट विशेषणे त्या दोघांनाही लावता येतात एवढ्यावरच ही उपमा आश्रित आहे. अशा श्लेषमूलक उपमा कृत्रिम भासतात; पण त्या जास्त जास्त योजण्याकडे नंतरच्या कवींचा कल दिसतो. त्या पांडित्यपूर्ण असल्या तरी त्यांचे आवाहन हृदयाला नसून बुद्धीला असते. भवभूतीने अशा उपमा क्वचित् योजल्या आहेत. या तऱ्हेची दुसरी एक उपमा मालती-माधवाच्या सहाव्या अंकातील कलहंसाने केलेल्या प्राकृत भाषणात आली आहे. हत्तीवर बसून देवीच्या दर्शनास आलेल्या मालतीचे तो वर्णन करतो—' नक्षत्रमाला-भरणधारिणीं करेणुरजनीमलङ्कुर्वती.. प्रभूता मालती । ' यात नक्षत्रमालांनी ( सत्तावीस मोत्यांच्या माळांनी ) भूषित केलेल्या हत्तिणीवर बसून आलेल्या मालतीला नक्षत्रांच्या मालेने युक्त अशा रात्रीची उपमा दिली आहे. तीही अशीच श्लेषमूलक आहे.[१]

**रम्यता**—भवभूतीच्या काही उपमा अत्यंत रम्य वाटतात. 'उत्तररामचरिता'त (३, ५) मुरलेने केलेले शोकाविष्ट सीतेचे वर्णन पाहा—

किसलयमिव मुग्धं बन्धनाद्विप्रलून
हृदयकुसुमशोषी दारुणो दीर्घशोकः ।
ग्लपयति परिपाण्डु क्षाममस्याः शरीरं
शरदिज इव घर्मः केतकीगर्भपत्रम् ॥

यात दीर्घ शोकामुळे शोचनीय अवस्थेला पोचलेल्या सीतेच्या शरीराला देठ खुडलेल्या सुंदर किसलयाची आणि शरदृतूतील उन्हाने कोमेजलेल्या केतकी पत्राची अशा दोन उपमा दिल्या आहेत त्या अत्यंत रम्य वाटतात. रामाला डोळे भरून पाहणाऱ्या सीतेच्या दृष्टीला दुग्धकुल्यांची ( दुधाच्या काल्याची ) उपमाही अशीच मनोहर आहे. ( उ. च., ३, २३ )

भवभूतीने उपमेप्रमाणे रूपक, उत्प्रेक्षा, विरोध, दृष्टान्त, अर्थान्तरन्यास, निदर्शना, अप्रस्तुतप्रशंसा, भ्रान्तिमान् इत्यादि सादृश्यमूलक अनेक अलंकार योजून आपल्या

---

१. या तऱ्हेची श्लिष्ट उपमा बाणाने 'हर्षचरिता'च्या चौथ्या उच्छ्वासात ग्रहवर्मन् ज्या हत्तिणीवर बसून विवाहसमारंभाकरिता आला होता तिच्या वर्णनात योजिली आहे— नक्षत्रमालामण्डितमुखी करिणी निशाकर इव पौरन्दरी दिशमारूढः .. ग्रहवर्मा ।

कवितांमधून सुचविले आहे. त्या सर्वांची उदाहरणे स्थलाभावास्तव येथे देणे शक्य नाही. पण त्यांपैकी काही प्रमुख अलंकारांची चर्चा करू.

रूपक—'महावीरचरिता'त रामाने ताटकावध केल्यावर विश्वामित्र म्हणतात–
अयं तावदोंकारः सकलराक्षससंहारनिगमाध्ययनस्य। (म. च., अंक २). वेदाध्ययनाच्या पूर्वी ओंकार उच्चारावा लागतो. तेव्हा 'आज रामाने ताटकावध केला. यापुढे राक्षसांच्या संहाराला सुरवात होणार' हे विश्वामित्रांनी येथे सूचित केले आहे.

उत्प्रेक्षा—भवभूतीला कोणताही अर्थ सूचित करण्यापेक्षा त्याचे सविस्तर वर्णन करण्याची हौस असल्यामुळे त्याने त्याकरिता अनेक उत्प्रेक्षांचा जणू काय पाऊस पाडला आहे. कालिदासाचे जसे उपमेत तसे भवभूतीचे उत्प्रेक्षेत निर्विवाद श्रेष्ठत्व आहे. म्हणून 'उत्प्रेक्षा भवभूतेः' असे म्हणण्यास हरकत नाही.

जामदग्न्याचे (तसेच त्याचेही) खालील श्लोकातील वर्णन पाहा–

त्रातुं लोकानिव परिणतः कायवानस्त्रवेदः
क्षात्रो धर्मः श्रित इव तनुं ब्रह्मकोशस्य गुप्त्यै।
सामर्थ्यानामिव समुदयः संचयो वा गुणाना–
माविर्भूय स्थित इव जगत्पुण्यनिर्माणराशिः॥

(म. च., २, ४१)

यात वर्ण्य पुरुषाविषयी विविध प्रकारच्या सुंदर उत्प्रेक्षा केल्या आहेत.

मदनोद्यानात माधवाची भेट झाल्यावर मालती डोळे भरून पाहत असता त्याला कसे वाटले याचे वर्णन कवीने विविध उत्प्रेक्षा योजून केले आहे–

अविरलमिव दाम्ना पौण्डरीकेण नद्धः
स्नपित इव च दुग्धस्रोतसा निर्भरेण।
कवलित इव कृत्स्नश्चक्षुषा स्फारितेन
प्रसभममृतमेघेनेव सान्द्रेण सिक्तः॥

(मा. मा., ३, १६)

विविध मनोवृत्तींचे वर्णन करण्यात भवभूतीचा हातखंडा आहे. प्रतिदिन मालतीचे चिन्तन करणाऱ्या माधवाच्या मनात ती कशी स्थिर झाली होती याचे अनेक सुंदर उत्प्रेक्षा योजून कवीने केलेले वर्णन पाहा–

लीनेव प्रतिबिम्बितेव लिखितेवोत्कीर्णरूपेव च
प्रत्युप्तेव च वज्रलेपघटितेवान्तर्निखातेव च।

सा नश्चेतसि कीलितेव विशिखैश्चेतोभुव. पञ्चभि-
श्चिन्तासन्ततितन्तुजालनिबिडस्यूतेव लग्ना प्रिया ॥
( मा. मा., ५, १० )

आनन्दवर्धनाने सर्वसेनाविषयी म्हटल्याप्रमाणे भवभूति वर्णन करावयास बसला म्हणजे त्याच्या पुढे उत्प्रेक्षा अहमहमिकेने उभ्या राहतात असे वाटते.

**निदर्शना**—उत्प्रेक्षेप्रमाणे निदर्शना हाही भवभूतीचा आवडता अलंकार आहे. दोन वस्तूंचा असंभवनीय संबंध वर्णन करून तद्द्वारा त्याच्यातील साम्य सूचित केले म्हणजे निदर्शना अलंकार होतो. 'मालतीमाधवा'तील ( १, २५ ) मालतीच्या फिकट गालाचे वर्णन पाहा—

कलयति च हिमांशोर्निष्कलङ्कस्य लक्ष्मी-
मभिनवकरिदन्तच्छेदकान्तः कपोलः ॥
( मा. मा., १, २६ )

यात नुकत्याच कापलेल्या हस्तिदंताप्रमाणे असलेल्या मालतीच्या फिकट गालाला कलङ्करहित चन्द्राची शोभा प्राप्त झाल्याचे वर्णन आहे. त्यायोगे मालतीचा गाल आणि तसा चन्द्र यांचे साम्य सूचित केले आहे 'उत्तररामचरिता'तील

द्वेधा समुद्गतमरुत्तरलस्य धत्ते
मेघस्य माघवतचापधरस्य लक्ष्मीम् । ( ५, ११ )

आणि

धत्ते कान्तिमकाण्डताण्डवितयोर्भङ्गेन यत्र भ्रुवो-
श्चन्द्रस्योत्कटलाञ्छनस्य कमलस्योद्भ्रान्तभृङ्गस्य च ॥ -
( ५, १५ )

यातही उत्कृष्ट निदर्शना आल्या आहेत.

**विरोध**— 'उत्तररामचरिता'तील ( २, ६ ) 'त्वां नामशेषामपि दृश्यमानः प्रत्यक्षदृष्टामिव नः करोति ॥' यात विरोध किंवा विरोधाभास हा अलंकार आला आहे. विरोध श्लेषाधिष्ठित असला म्हणजे जास्त मनोहर होतो. 'मालतीमाधवा'-तील ( १, ११ ) कामन्दकीची खालील उक्ति पाहा—

विवृण्वतेव कल्याणमान्तरज्ञेन चक्षुषा ।
स्फुरता वामकेनापि दाक्षिण्यमवलम्ब्यते ॥

मालती आणि माधव यांचा विवाह घडून येईल काय असा विचार कामन्दकीच्या मनात येताच तिचा डावा डोळा लवू लागतो. स्त्रियांचा डावा डोळा लवणे हे शुभ-

सूचक असते. वरील श्लोकात वामक आणि दाक्षिण्य यांवर श्लेष आहेत. वरवरचा अर्थ 'डावा डोळाही उजवा झाला' असा असून त्यात विरोध दिसतो, पण तो आभासात्मक आहे. 'डावा डोळाही अनुकूल झाला' असा विवक्षित अर्थ आहे.

याशिवाय अर्थान्तरन्यास आणि दृष्टान्त यांची सुंदर उदाहरणे भवभूतीच्या ग्रंथांत आली आहेत. विशेष विधानाचे सामान्य विधानाने किंवा सामान्याचे विशेषाने समर्थन केले म्हणजे अर्थान्तरन्यास अलंकार होतो. पुढील उदाहरणे पाहा—

(१) व्यतिषजति पदार्थानान्तरः कोऽपि हेतु-
न खलु बहिरुपाधीन्प्रीतयः संश्रयन्ते ।
विकसति हि पतङ्गस्योदये पुण्डरीकं
द्रवति च हिमरश्मावुद्गते चन्द्रकान्त. ।।
(मा. मा. १, २७; उ. च., ६, १२)

(२) विपाके घोरेऽस्मिन्नथ खलु विमूढा तव सखी
पुरन्ध्रीणां चेतः कुसुमसुकुमारं हि भवति ।।
(उ. च. ४, १२)

दृष्टान्त—विशेष विधानाचे समर्थन अन्य विशेषाने केले म्हणजे दृष्टान्त अलंकार होतो. याचीही काही मनोरम उदाहरणे भवभूतीच्या नाटकांत आली आहेत.

(१) नान्यत्र राघवाद्वंशात्प्रसूतिरनयोः समा ।
दुग्धार्णवावृते जन्म चन्द्रकौस्तुभयोः कुतः ।।
(म. च., १, २३)

(२) कुतो वा महोदधिं वर्जयित्वा पारिजातस्योद्गमः ।
(मा. मा, अंक २)

(३) नैसर्गिकी सुरभिणः कुसुमस्य सिद्धा
मूर्ध्नि स्थितिर्न चरणैरवताडनानि ।। (उ. च., १, १४)

याशिवाय अप्रस्तुतप्रशंसा (अम्बुनि मज्जन्त्यलाबूनि ग्रावाणः प्लवन्ते । म. च., अंक १), भ्रान्तिमान् (सन्दष्टाः कुवलयिनो मुधो विभागाः । उ. च., १, ३१), काव्यलिंग (वपुषि वधाय तत्र तव शस्त्रमुपक्षिपत. पततु शिरस्यकाण्डयमदण्ड इवैष भुजः । मा. मा., ५, ३१), विभावना (त्वमपि स्वभावेनैव तस्मिन्नवसरेऽसंगीतकं नर्तितासि । (मा. मा. अं. २) इत्यादि अनेक अलंकार भवभूतीच्या ग्रंथांत आढळतात. त्यांचे फक्त दिग्दर्शन येथे केले आहे.

आधुनिक टीकाकार रसालंकाराइतकेच नाटकाच्या संविधानकरचना, स्वभावचित्रण इत्यादिकांकडे लक्ष देतात. तेव्हा त्या विशेषांचा आता विचार करू.

**संविधानकरचना**—भवभूतीने आपल्या 'महावीरचरित' आणि 'उत्तररामचरित' या नाटकांची संविधानके वाल्मीकीच्या 'रामायणातून' घेतली असली तरी त्यात विविध हेतूंनी अनेक फरक केले आहेत हे त्या त्या नाटकाच्या संविधानकाचे परीक्षण करताना दाखविले आहे. 'महावीरचरिता'त रामाच्या पूर्वचरित्रातील अनेक प्रसंग आले आहेत. त्यात कार्यैक्य साधण्याकरिता ते माल्यवान् राक्षसाच्या कुटिल कारस्थानामुळे उत्पन्न झाले आहेत असे भवभूतीने दाखविले आहे. असे करताना त्याला मूळ रामायणकथेत अनेक फरक करावे लागले आहेत. त्यातील काही त्याने स्वतःच 'उत्तररामचरिता'त वर्जिले आहेत. उदाहरणार्थ, रामादिकांचा विवाह मिथिलेत होऊन तेथूनच त्यांचे सीतालक्ष्मणासह वनवासात जाणे, इत्यादि. काही फरकांत कैकेयी, राम इत्यादिकांच्या स्वभावाचे उदात्तीकरण हा हेतू आहे. 'उत्तररामचरिता'तही त्याने तसेच अनेक फरक करून कार्यैक्य साधण्याचा प्रयत्न केला आहे. भवभूतीची या दोन्ही नाटकांची संविधानके बरीच साधली आहेत यात संशय नाही, पण अनवधानाने त्याच्या हातून काही गंभीर प्रमादही घडले आहेत हे मागे त्या नाटकांच्या संविधानकांच्या समीक्षेत दाखविले आहे.

तिसऱ्या 'मालतीमाधव' नाटकाच्या संविधानकाकरिता काही कल्पना भवभूतीला 'बृहत्कथे'तून मिळाल्या असल्या तरी एकंदरीत ते नाटक त्याने आपल्या स्वतंत्र-प्रज्ञेने रचले आहे असे म्हणण्यास हरकत नाही. त्यातील काही घटना असंभाव्य वाटल्या किंवा त्यात पाल्हाळासारखे दोष असले तरी एकदरीत ते संविधानक बरेच चांगले झाले आहे यात संशय नाही.

**स्वभावचित्रण**-पण संविधानकापेक्षा स्वभावचित्रणात भवभूति जास्त यशस्वी झाला आहे. त्याच्या नाटकांची कालिदासाच्या नाटकांशी तुलना केली असता सहृदयांनाच त्याच्या नाटकांतील वातावरण अत्यंत उदात्त स्वरूपाचे आहे असे लक्षात येते. कालिदासाच्या तीन्ही नाटकांतील घटना राजेलोकांच्या अंतःपुरातील आहेत. त्यांच्या अनेक राण्या, त्यांचा परस्पर मत्सर, नायकाने आणखी एका स्त्रीवर अनुरक्त होणे, त्यामुळे होणारा अंतःपुरातील कलह इत्यादि गोष्टी कालिदासाच्या नाटकांत आढळतात. भवभूतीने आपली नाटके रचली तेव्हा त्याला राजाश्रय नव्हता. त्याच्या 'महावीरचरित' आणि 'उत्तररामचरित' या नाटकांचा विषय राजचरित असला तरी त्यात अंतःपुरातील कलहाचा संबंध नाही. उलट त्यांतील राजचरित अत्यंत उदात्त आहे. 'महावीरचरिता'त राम दुष्टांचे निर्दालन करून सज्जनांचे रक्षण करण्याच्या

उदात्त हेतूने प्रेरित झाला आहे. 'उत्तररामचरिता'त प्रजेच्या समाधानाकरिता तो स्वतःच्या अत्यंत प्रिय पत्नीचाही त्याग करतो. पुढे अश्वमेधाकरिता पत्नीची आवश्यकता उत्पन्न झाल्यावर तिची सुवर्ण प्रतिमा करून ते काम निभावून नेतो. त्याची पत्नी सीता हिलाही त्याच्या या उदात्त हेतूबद्दल पराकाष्ठेचा आदर वाटतो. तिसऱ्या नाटकाचे संविधानक मध्यम स्थितीतील लोकांच्या जीवनासंबंधी आहे. त्यातही पति-पत्नींच्या विशुद्ध प्रेमाचे चित्र रंगवले आहे.

भवभूतीच्या रामचरितविषयक नाटकांतील अनेक प्रसंग ऋषींच्या आश्रमात किंवा त्यांच्या परिसरात घडले आहेत. 'महावीरचरिता'तील पहिला प्रवेश विश्वामित्राच्या सिद्धाश्रमातील आहे. पुढील तीन अंकांतील स्थान मिथिलेतील राजकुल ( राजवाडा ) असले तरी ते राजकुल याज्ञवल्क्य ऋषींने ज्याला ब्रह्मज्ञान सांगितले त्या कर्मयोगी राजर्षि जनकाचे आहे. 'उत्तररामचरिता'तील अनेक प्रवेश अगस्त्याश्रमाच्या परिसरात पंचवटीजवळ, वाल्मीकीच्या आश्रमात किंवा पवित्र गंगातीरी घातले आहेत. त्यामुळे या दोन्ही नाटकांतले वातावरण अत्यंत पवित्र असे आहे. 'मालतीमाधव' हे सामाजिक नाटक ( social play ) असल्याने त्यातील प्रवेश देवळात, उद्यानात, स्मशानात किंवा गिरिग्रामाच्या परिसरात घातले आहेत. पण त्याचेही वातावरण दूषित नाही.

भवभूतीच्या नाटकात समाजाच्या अनेक थरातील व्यक्तींची चित्रे काढली आहेत. त्यातील पुरुषपात्रांत वसिष्ठ, विश्वामित्र यांसारखे महर्षि, जनकासारखा प्रेमळ राजर्षि, जामदग्न्यासारखा हट्टी आणि कोपिष्ट तपस्वी, शतानन्दासारखा स्वामिनिष्ठ वापट पुरोहित, रामासारखा प्रजाहितदक्ष राजा, माधव व मकरन्द यांसारखे प्रेमी युवक, कुश, लव, चन्द्रकेतु यांसारखे शूर, अभिमानी पण सौजन्यशील क्षत्रियकुमार आणि माल्यवानासारखा कपटी कारस्थानी मन्त्री यांची चित्रे मनोवेधक रीतीने काढली आहेत. तत्कालीन आश्रमातील जीवन रामचरितविषयक नाटकात आणि सामाजिक जीवन 'मालतीमाधवा'त बरेच स्पष्टपणे दिसत आहे.

पण पुरुषपात्रांपेक्षा स्त्रीपात्रांच्या स्वभाववर्णनात भवभूति जास्त यशस्वी झाला आहे. त्याला स्त्रियांविषयी अत्यंत आदर आहे 'गुणाः पूजास्थानं गुणिषु न च लिङ्गं न च वयः ।' अशी त्याची धारणा आहे. त्याने 'उत्तररामचरिता'त वसिष्ठपत्नी अरुन्धती हिचे पात्र अत्यंत आदराने रंगविले आहे. राजर्षि जनक तिला वन्दन करताना म्हणतो त्याप्रमाणे पुराण महर्षि वसिष्ठ यानाही तिच्या सान्निध्याने आपण पवित्र झालो असे वाटते. तिला भागीरथीकडून रहस्यमय गोष्टी माहीत होतात. ती जनक आणि कौसल्या यांची दिलजमाई मोठ्या कौशल्याने घडवून आणते. पृथ्वी

आणि भागीरथी सीतेला तिच्याच स्वाधीन करतात. तिच्याच साक्षीने सीतेचे चारित्र्य पुनः प्रस्थापित होते. अत्यंत पवित्र आणि परोपकारी असे तिचे जीवन आहे.

कामन्दकी ही बौद्ध भिक्षुणी विरक्त होऊन संसाराचा त्याग केलेली. पण आपल्या पूर्वाश्रमीच्या मित्राच्या अपत्याचे कल्याण व्हावे म्हणून कायावाचामने झटणारी, कारस्थानी पण प्रेमळ अशी संन्यासिनी. सीता ही आदर्श पतिव्रता, स्वाभिमानी स्त्री आणि वत्सल माता. तिचे पशुपक्ष्यांवर आणि लतावृक्षांवर अपत्यनिर्विशेष प्रेम होते हे कवीने दाखविले आहे. प्रेमळ वनदेवता वासंती, शालीन मालती, धीट मदयन्तिका, चतुर लवङ्गिका, कुशल भिक्षुणी बुद्धरक्षिता व अवलोकिता यांचीही मनोरम चित्रे भवभूतीने काढली आहेत. कपालकुण्डला व सौदामिनी या दोघीही कापालिक पंथाच्या असे ' मालतीमाधवा 'त म्हटले आहे. पण पहिली आपली सिद्धि दुसऱ्याच्या नाशार्थ तर दुसरी ती परोपकारार्थ उपयोगात आणते. अशा रीतीने भवभूतीच्या नाटकात समाजाच्या विविध थरातील स्त्रियांची चित्रे आली आहेत.

**सृष्टिवर्णन**—कालिदासाप्रमाणे भवभूतीलाही सृष्टिवर्णन करण्याची मोठी आवड होती. पण त्या दोघा कवींच्या सृष्टिवर्णनातील फरक हा, की कालिदासाला सृष्टीचे सौम्य स्वरूपच आवडे तर भवभूतीचे लक्ष तिच्या भव्य व उदात्त स्वरूपाकडेही आकृष्ट होई. त्याच्या जन्मस्थानाजवळची वनश्रीही याला कदाचित् कारणीभूत असेल हे मागील एका प्रकरणात दाखविले आहे. आपल्या जन्मस्थानापासून दूर गोदातीरी दंडकारण्यात तो हिंडला असावा, हे त्याने ' उत्तररामचरिता 'त जे दंडकारण्य, पंचवटी वगैरे स्थलांचे वर्णन केले आहे त्यावरून दिसते. पद्मावतीच्या परिसरातील गिरिकन्दरे पाहताना सौदामिनीला गोदावरीच्या विशाल प्रवाहाने निनादित झालेल्या दक्षिणारण्यातील पर्वतांची आठवण होते, असे भवभूतीने दाखविले आहे ( मा. मा., अं. ९ ). त्यात त्याच्या स्वानुभूतीचे प्रतिबिंब पडले असावे. दंडकारण्यातील विविध प्रदेशांचे पुढील वर्णन पाहा—

स्निग्धश्यामाः क्वचिदपरतो भीषणाभोगरूक्षाः
स्थाने स्थाने मुखरककुभो झाङ्कृतैर्निर्झराणाम् ।
एते तीर्थाश्रमगिरिसरिद्गर्तकान्तारमिश्राः
सन्दृश्यन्ते परिचितभुवो दण्डकारण्यभागाः ॥
( उ. च., २, १४ )

त्या अरण्यात भर उन्हाळ्यात दिसणाऱ्या भीषण दृश्याचे यथातथ्य वर्णन त्याने पुढील श्लोकात केले आहे—

निष्कूजस्तिमिताः क्वचित्क्वचिदपि प्रोच्चण्डसत्त्वस्वनाः
स्वेच्छासुप्तगभीरघोरभुजगश्वासप्रदीप्ताग्नयः ।
सीमानः प्रदरोदरेषु विलसत्स्वल्पाम्भसो यास्वयं
तृष्यद्भिः प्रतिसूर्यकैरजगरस्वेदद्रवः पीयते ॥

(उ. च., २, १६)

पण भवभूतीला केवळ भयंकर दृश्यांचे वर्णन करण्याची आवड होती असे नाही. त्याने दंडकेतील मध्यमारण्याचे वर्णन करताना सृष्टीच्या सौम्य आणि रम्य स्वरूपाचेही शब्दचित्र काढले आहे—

इह समदशकुन्ताक्रान्तवानीरवीरुत्-
प्रसवसुरभिशीतस्वच्छतोया वहन्ति ।
फलभरपरिणामश्यामजम्बूनिकुञ्ज-
स्खलनमुखरभूरिस्रोतसो निर्झरिण्यः ॥

तसेच

दधति कुहरभाजामत्र भल्लूकयूना-
मनुरसितगुरूणि स्त्यानमम्बूकृतानि ।
शिशिरकटुकषायः स्त्यायते सल्लकीना-
मिभदलितविकीर्णग्रन्थिनिष्यन्दगन्धः ॥

(उ. च., २, २०–२१)

'मालतीमाधवा'च्या नवव्या अंकात सौदामिनी पद्मावतीच्या परिसरातील पर्वत, नद्या व वनेवने यांचे वर्णन करते त्यातही सृष्टीचे सौम्य रूपच आढळते. पुढे माधव व मकरन्द मालतीचा शोक करीत पद्मावतीजवळच्या गिरिकंदरी हिंडतात त्या प्रसंगीही अनेक सृष्टिदृश्यांचे सुंदर वर्णन आले आहे, उदाहरणार्थ पुढील श्लोक पाहा—

वानीरप्रसवैर्निकुञ्जसरितामासक्तवास पयः
पर्यन्तेषु च यूथिकासुमनसामुज्जृम्भितं जालकैः ।
उन्मीलत्कुटजप्रहासिषु गिरेरालम्ब्य सानूनितः
प्राग्भारेषु शिखण्डिताण्डवविधौ मेघैर्वितानायते ॥

कालिदासाप्रमाणे भवभूतींचीही श्रद्धा होती की सृष्टीत सर्वत्र चैतन्य भरले आहे. म्हणून त्याने दण्डकारण्यात सीतेची प्रेमळ सखी वनदेवता वासन्ती राहत होती असे वर्णिले आहे. तसेच पृथ्वी, भागीरथी, गोदावरी, तमसा, सरयू आणि मुरला यांच्या अधिदेवतांची पात्रे कल्पिली आहेत आणि त्यापैकी काहींचे प्रवेश ' उत्तररामचरिता 'त घातले आहेत.

सृष्टिवर्णनाप्रमाणे काही सुंदर काव्यवर्णनेही भवभूतीच्या नाटकात आली आहेत. उदाहरणार्थ, ' मालतीमाधवा 'तील संध्याकाळचे (२, १२) आणि मध्यरात्रीचे (७, ५), तसेच ' उत्तररामचरिता 'तील (२, ९) मध्याह्नीचे वर्णन पाहा. ती सर्व मनोरम वठली आहेत.

**विनोद**—सामान्यत सर्व संस्कृत नाटकामध्ये हास्यरसनिर्मितीकरिता विदूषकाचे पात्र घातलेले असते. विदूषक हा नायकाचा मित्र असून त्याच्या प्रेमप्रकरणात साहाय्य करतो किंवा क्वचित् प्रसंगी घोटाळाही निर्माण करतो. कालिदासाच्या तीन्ही नाटकात विदूषक आहे. त्यापूर्वीच्या अश्वघोषाच्या आणि भासाच्याही काही नाटकात तो आढळतो. सामान्यतः रामचरितविषयक नाटकात प्रणयकलह नसल्यामुळे विदूषकाला काही काम नसते.' त्यामुळे तो त्या प्रकारच्या नाटकात आढळत नाही. तेव्हा ' महावीरचरित ' आणि ' उत्तररामचरित ' नाटकात तो दिसला नाही तर त्यात आश्चर्य नाही. पण ' मालतीमाधवा 'सारख्या सामाजिक नाटकातही तो आला नाही हे विशेष आहे. विदूषक हा राजाचा खुषमस्कऱ्या. तेव्हा तो मध्यम स्थितीतल्या लोकांच्या जीवनावर आधारलेल्या नाटकात येणे असंभवनीय आहे हे त्याचे कारण असू शकत नाही. कारण कालिदासपूर्वकालीन अशा तऱ्हेच्या नाटकात तो आढळतो. अश्वघोषाच्या ' सारीपुत्रप्रकरणा 'बरोबर मध्य आशियामध्ये सापडलेल्या एका अपूर्ण संस्कृत सामाजिक नाटकात विदूषकाचे पात्र दिसले आहे. तसेच ते ' मृच्छकटिका 'तही आहे. तेव्हा ' मालतीमाधवा'त विदूषक नसण्याचे कारण दुसरे काही असले पाहिजे. '

भवभूति हा गम्भीर स्वभावाचा नाटककार होता. शिवाय आपल्या जीवनात त्याला अनेक धक्के टोणपे खावे लागले होते. स्वकालीनाची निंदा सहन करावी लागली होती. त्याने जीवनातील अनेक समस्यावर दीर्घकाल विचार केल्यावर दैवाचा सर्वत्र अप्रतिहत प्रभाव चालतो अशी त्याची खात्री झाली होती, व ती त्याने अनेक ठिकाणी व्यक्त केली आहे. प्रो. विल्सन यांनी म्हटल्याप्रमाणे, ज्यांनी दीर्घकाल चिंतन केले आहे ते नेहमी वस्तूच्या सत्यस्वरूपाकडे आपली दृष्टि वळवतात. त्यांना विनोद किंवा थट्टा सुचत नाही.

१. ' कुन्दमाले 'त विदूषक आहे, पण त्याचा स्वभाव जरा निराळा आहे.

याचे दुसरेही कारण असण्याचा संभव आहे. भवभूति हा स्वतः जाडा पंडित आणि श्रौत विद्येचा अभिमानी होता. त्याला विदूषकासारख्या सुग्रामकन्या खादाड ब्राह्मणब्रुवाला रंगभूमीवर आणून ब्राह्मण वर्गाला प्रेक्षकांच्या चेष्टेचा विषय करणे पसंत पडले नसावे. म्हणून त्याने आपल्या सर्व नाटकात विदूषकाचे पात्र कटाक्षाने टाळले आहे.

पण याचा अर्थ असा नव्हे की त्याला विनोदाचे अगदी वावडे होते. त्याच्या नाटकातील काही ठिकाणचा विनोद मार्मिक असून सुबुद्ध प्रेक्षकांना समजणारा आणि रुचणारा असा आहे. उदाहरणार्थ पुढील प्रसंग पाहा. 'उत्तररामचरिता'च्या पहिल्या अंकात लक्ष्मण सीतेला मिथिलेतील विवाहप्रसंगाची चित्रे दाखवीत आहे. सीता व भरतपत्नी माण्डवी यांच्यानंतर त्या ठिकाणी त्याची पत्नी उर्मिला हिचे चित्र काढले होते. पण ते न दाखविता तो तिच्या नंतरच्या शत्रुघ्नभार्या श्रुतकीर्तीच्या चित्राकडे वळतो. तेव्हा सीता हसून म्हणते, वत्स, इयमपरा का ? ' तुम्ही ही मधली स्त्री कोण हे सांगितले नाही. कोण बरे ही ? ' या प्रसंगीचा विनोद विदग्ध प्रेक्षकानाच समजण्यासारखा आणि रुचण्यासारखा आहे.

याच्या उलट त्याच नाटकाच्या चौथ्या अंकाच्या विष्कंभकात वाल्मीकीच्या आश्रमातील दोन विद्यार्थ्यांचा संवाद सर्वांस हसवणारा आहे. त्यातील सौधातकि हा मोठा विनोदी बटु आहे. तो वसिष्ठाला ' जीर्णकूर्च ' (दाढीवाला म्हातारा) म्हणतो. त्याच्या मधुपर्काकरिता आश्रमात कालवड मारली होती म्हणून तो कोणी वाघ किंवा लांडगा असावा असे त्याला वाटते. त्याचा सोबती माण्डायन याला वादात पकडण्याकरिता तो न्यायशास्त्रातल्या ' निग्रहस्थाना 'चा निर्देश करतो. त्याचे सर्व भाषण विनोदपूर्ण आहे. पुढे आश्रमात अश्वमेधाचा घोडा आल्यावर बटूंना तो प्रथमच पाहावयास मिळाला. त्यांनी पशुसमाम्नायात (पशूंच्या यादीत) घोडा या प्राण्याचे नाव वाचले होते. पण ते अरण्यातील आश्रमात राहणार. नागरी संस्कृतीत आवश्यक असलेला घोडा हा पशु त्यांना कसा पाहावयास मिळणार ? म्हणून यज्ञीय अश्व पाहताच ते त्याचे पुढील वर्णन करतात—

> पश्चात्पुच्छं वहति विपुलं तच्च धूनोत्यजस्रं
> दीर्घग्रीवः स भवति खुरास्तस्य चत्वार एव ।
> शष्पाण्यत्ति प्रकिरति शकृत्पिण्डकानाम्रमात्रान्
> किं व्याख्यातैर्व्रजति स पुनर्दूरमेह्येहि यामः ।। (उ. च., ४, २६)

घोड्याचे हे वर्णन अगदी साधे आहे. पण त्यासारखा प्राणी त्यांनी पूर्वी पाहिला नव्हता त्या मुग्ध बटूंनी ते केले आहे म्हणून विनोदोत्पादक झाले आहे.

'उत्तररामचरिता'त आणखीही काही विनोदी प्रसंग आले आहेत. पाचव्या अंकात चन्द्रकेतु लवाला रामचंद्राच्या लोकोत्तर पावन चरित्राची माहिती नसल्याबद्दल आश्चर्य व्यक्त करतो. तेव्हा लव उसळून म्हणतो–

वृद्धास्ते न विचारणीयचरितास्तिष्ठन्तु किं वर्ण्यते
सुन्दस्त्रीमथनेऽप्यकुण्ठयशसो लोके महान्तो हि ते ।।
यानि त्रीण्यपराङ्मुखान्यपि पदान्यासन्खरायोधने ।
यद्वा कौशलमिन्द्रसूनुनिधने तत्राप्यभिज्ञो जनः ।।

(उ. च., ५, ३४)

या प्रसंगी पुत्र प्रत्यक्ष आपल्या पित्याचे दोष अजाणतेपणी दाखवत आहे म्हणून हा उपहास विनोदोत्पादक झाला आहे. पुढे स्वतः रामाचा पुत्र असताही कुश एखाद्या तटस्थाप्रमाणे रामाच्या सीतेविषयी शोक वर्णन करतो ते पाहून प्रेक्षकांना मौज वाटते. विशेषतः लव चित्रकूट पर्वताजवळ वनविहार करीत असता रामाने सीतेला उद्देशून म्हटलेला 'रामायणा'तील पुढील शृंगारिक श्लोक पाठ म्हणून दाखवतो तेव्हा तर चांगलाच विनोद उत्पन्न होतो–

त्वदर्थमिव विन्यस्तः शिलापट्टोऽयमग्रतः ।
यस्यायभितः पुष्पैः प्रवृष्ट इव केसरः ।।

(उ. च., ६–३६)

यातील शृंगारिक अर्थाची लवाला काही कल्पना नव्हे, पण तो ऐकून रामाला लाजल्यासारखे होत. तो म्हणतो, 'अयि हि नाम मुग्ध. शिशुजनः विशेषतस्त्वरण्यचरः ।' (मुले स्वभावतःच साधीभोळी. त्यात हा अरण्यात वाढलेला ! ) येथील विनोद नामी झाला आहे.

'मालतीमाधवा'च्या तिसऱ्या अंकात कामन्दकी फुलेवेचून श्रान्त झालेल्या मालतीचे वर्णन पुढील श्लोकात करते—

स्खलयति वचनं ते संश्रयत्यङ्गमङ्ग
जनयति मुखचन्द्रोद्भासिनः स्वेदबिन्दून् ।
मुकुलयति च नेत्रे सर्वथा सुभ्रु खेद–
स्त्वयि विलसति तुल्यं वल्लभालोकनेन ।।

(मा. मा., ३, ८)

यात 'वल्लभालोकनेन' यावर श्लेष आहे. प्रियकराला पाहिल्याबरोबर जशी अवस्था व्हावी तशी श्रमाने तुझी केली आहे, असा एक अर्थ आहे. त्यावेळी माधव तेथे उपस्थित असून मालतीला पाहत आहे. म्हणून 'प्रियकर पाहत असता' असाही

अर्थ येथे व्यङ्ग्य आहे. म्हणून नर्म विनोद झाला आहे. त्याला उद्देशून माधव म्हणतो, हृदयंगमः परिहासः । ( ही थट्टा मोठी मनोहर झाली आहे. )

' मालतीमाधवा 'त कामन्दकीने सुचविल्याप्रमाणे नगरदेवतेच्या देवालयात मकरन्द स्त्रीवेष धारण करून येतो. तेव्हा त्याला पाहून माधव म्हणतो–भगवति, कृतपुण्य एव नन्दनः । यतः प्रियवयस्यमीदृशं मनसा मुहूर्तमपि कामयिष्यति । ( भगवती, नन्दन मोठा पुण्यवान् ! कारण त्याला अशा माझ्या प्रिय मित्रावर घटकाभर का होईना प्रेम करण्याची संधि मिळेल ! )

परिहासाप्रमाणे उपहासही भवभूतीच्या नाटकात क्वचित् आढळतो. ' मालती-माधवा 'च्या सातव्या अंकात मालतीने आपल्या भावाला झिडकारिले असे समजताच मदयन्तिका मालतीवेषधारी मकरन्द झोपला होता तेथे येते आणि मालतीला तिच्या वर्तनाबद्दल दोष देते. लवङ्गिका आणि बुद्धरक्षिता यांच्या बरोबर ती गुजगोष्टी करीत असता प्रसंगाने मकरन्दाचे नाव निघते. तेव्हा आनंदाने तिच्या अंगावर रोमाञ्च उभे राहतात. ते पाहून लवङ्गिका उपरोधिकपणे म्हणते–

एवं तथा नाम यदास्य किं यदा–
स्मय स्वकरमाद्विकलः कथान्तरे ।
कदम्बगोलाकृतिमाश्रितः कथं
विशुद्धमुग्धः कुलकन्यकाजनः ॥
( मा. मा., ७, १ )

याप्रमाणे भवभूतीच्या नाटकात विनोदाची काही स्थळे आहेत. पण तो विनोद पाचकळपणाचा नाही. त्यातील रस चाखण्यास विदग्धता आणि सहृदयता पाहिजे. असो.

आतापर्यंत आपण भवभूतीच्या नाटकाच्या काही विशेषांचे निरीक्षण केले. केवळ या विशेषांनीही कोणाही कवीस कीर्तिमान् होता आले असते. पण भवभूतीने रसि-कांच्या मनावर जी आश्चर्यकारक मोहिनी आज हजार बाराशे वर्षे घातली आहे तिचे कारण त्याचे दुसरेच गुण आहेत. त्याकडे आता वळू.

**कल्पनेची भव्यता**—इतर कवींच्या ग्रथांशी तुलना केली असता भवभूतीचा जो एक गुण विशेषेकरून नजरेस येतो तो म्हणजे त्याची भव्य कल्पना हा होय. त्याची कल्पना अशा विलक्षण भराऱ्या मारते की त्यायोगे वाचकांचे मन दिपून जाते. रामाशी युद्ध करावयास आलेला वाली म्हणतो—

लोकालोकालवालस्खलनपरिवहत्सप्तमाम्भोधिपूरं
विद्लिष्यत्पर्वकल्पत्रिभुवनमखिलोत्खातपातालमूलम् ।

पर्यस्तादित्यचन्द्रस्तबकमवपतद्भूरिताराप्रसूनं
ब्रह्मस्तम्बं धुनीयामिह तु मम विधावस्ति तीव्रो विषादः ॥
(म. च., ५, ४२)

[ या ब्रह्मांडरूपी वृक्षाला— ज्या वृक्षाचे लोकालोकपर्वतरूपी महान् आळे फुटल्यामुळे सातव्या समुद्राच्या पाण्याचा पूर वाहू लागला आहे; ज्याच्या त्रिभुवनरूपी गाठी सैल झाल्या आहेत; ज्याचे पाताळरूपी मूळ उपटून गेले आहे; ज्याचे सूर्य आणि चन्द्र हे पुष्पगुच्छ दूर फेकले गेले आहेत; ज्याची तारारूपी फुले खाली गळत आहेत— (अशा ब्रह्माण्डरूपी वृक्षाला) मी गदगदा हलवू शकेन. पण रामाबरोबरच्या या युद्धाविषयी मात्र माझ्या मनाला तीव्र विषाद वाटत आहे. ]

काय ही विशाल कल्पना ! अशा उन्हेचेच कराल देवीच्या भीषण ताण्डवाचे वर्णन मागे आले आहे. त्याकरिता कवीने योजिलेले दण्डकवृत्त असेच विशाल आहे. त्याच्या प्रत्येक चरणात ५४ अक्षरे आहेत. इतके विशाल वृत्त दुसऱ्या कोणी नामांकित कवीने योजिलेले माहीत नाही. भवभूति बीभत्सादि रसांचे वर्णन असेच विशाल रूपाने करतो. त्याची प्रतिभा लहानशा क्षेपेने सन्तुष्ट होत नाही. तिला ब्रह्मांडभर भरारी मारावीशी वाटते. सृष्टिवर्णनातही तोच प्रकार. दण्डकारण्यात जमिनीवर पसरलेले अजगर केवढे मोठे ? तर त्याच्या श्वासोच्छ्वासाने दावाग्नि भडकतात ! तेथील उन्हाळा एवढा प्रखर की त्या अजगरा.ा घाम सरडे येऊन पीत असलेले दिसतात ! भवभूतीला संयम असा माहीतच नाही !

**सूक्ष्म निरीक्षणशक्ति**—कल्पनेच्या विशालतेबरोबरच भवभूतीच्या ठिकाणी सूक्ष्म निरीक्षणशक्तीही आहे. कोणत्याही वस्तूचे सर्व बारकाव्यासह यथातथ्य शब्दचित्र काढण्यात त्याचा हातखंडा आहे. मागे दिलेल्या स्वभावोक्तींच्या उदाहरणावरून वाचकास त्याचा प्रत्यय आला असेल. मालतीला पाहिल्यावर तिने संकल्पनिर्मित प्रियसमागमाचा आनंद अनुभविला असला पाहिजे हे कामन्दकीला तिच्या पुढील स्वरूपावरून वाटले—

नीवीबन्धोच्छ्वसनमधरस्पन्दनं दोर्विषादः
स्वेदश्चक्षुर्भ्रमणमधुराकेकरस्निग्धमुग्धम् ।
गात्रस्तम्भः स्तनमुकुलयोरुत्प्रबन्ध प्रकम्पो
गण्डाभोगे पुलकपटल मूर्च्छना चेतना च ॥
(मा. मा., २, ५)

दिसत आहेत; शरीर स्तब्ध आणि स्तन कम्पित होत आहेत. गालांवर रोमांच आले आहेत. वरचेवर मूर्च्छा येऊन नंतर ही सावध होत आहे. )

यातही भवभूतीचे सूक्ष्म निरीक्षण आणि कुशल चित्रण दिसून येईल.

भवभूतीने केलेल्या मध्याह्न, सायंकाळ व मध्यरात्र यांच्या वर्णनातही तेच गुण दिसत येतील. त्यांची उदाहरणे मागे दिली आहेत.

**सूक्ष्म मनोविज्ञान**—भवभूतीला विविध मनोविकारांचे सूक्ष्म वर्णन करण्याची मोठी आवड आहे. मदनव्यथेने माधव आपली काय अवस्था झाली ते खालील श्लोकात वर्णन करतो—

प्रसरति परिमाथी कोऽप्ययं देहदाह–
स्तिरयति करणानां ग्राहकत्व प्रमोहः ।
रणरणकविवृद्धि बिभ्रदावर्तमानं
ज्वलति हृदयमन्तस्तन्मयत्व च धत्ते ॥

( मा. मा. १, ४४ )

बारा वर्षांच्या दीर्घ वियोगानंतर दण्डकारण्यात शोकग्रस्त रामाला पाहिल्यावर सीतेच्या मनात जो भावनाचा कल्लोळ उठला त्याचे सुंदर शब्दचित्र तमसा खालील श्लोकात काढते—

तटस्थं नैराश्यादपि च कलुषं विप्रियवशा–
द्वियोगे दीर्घेऽस्मिन्झटिति घटनोत्स्तम्भितमिव ।
प्रसन्नं सौजन्याद्दयितकरुणैर्गाढकरुणं
द्रवीभूतं प्रेम्णा तव हृदयमस्मिन्क्षण इव ॥

( उ. च. ३, १३ )

**उदात्त विचार**—पण या सर्व गुणांपेक्षा भवभूतीच्या कौटुंबिक उदात्त विचारांनी रसिकांची मने हेलावली आहेत. भवभूतीच्या काळी समाजरचना आणि कौटुम्बिक परिस्थिति आलाबारखीन होती. मुलगी जन्माला आली की बान्धवाना दुःखाचा धक्का बसे. (स्त्रीजन्मलाभे जुगुप्सन्ते बान्धवाः। मा. मा. अं. ७.) वधूपक्षाला वर-पक्षापुढे नमते घ्यावे लागे (कन्यायाः किल पूजयन्ति पितरो जामातुराप्तं जनम्। उ. च. ४, १७). मुलीला सासरी नवऱ्याने नीट वागविले तर ठीक. नाहीतर जन्मभर तिला सासरी राहण्याचा तिटकारा येई. तरीही नवऱ्याचा अधिकार मानून मुकाट्याने राहावे लागे. (युष्माभिरपीदशोऽप्येष सम्यवं यथाचित्तमनुवर्तनीयो येन मर्षेप इति। मा. मा., अं. ७). अशा परिस्थितीत भवभूतीने कौटुंबिक सुखाची गुरुकिल्ली म्हणून स्त्रीपुरुषाच्या प्रेमाचा पुरस्कार केला आहे. युवक–युवतीनी आपल्या पसंतीने जन्माचा जोडीदार

निवडावा. आणि निवड करताना केवळ रूप लक्षात न घेता परस्पराचे गुणही जाणून घ्यावे असा उपदेश अंगिरस् ऋषींचे वचन देऊन केला आहे. ( इतरेतरानुरागो हि विवाहकर्मणि पराध्यं मङ्गलम् । गीतश्चायमर्थोऽङ्गिरसा यस्यां मनश्चक्षुषोर्निबन्धस्तस्यामृद्धि. । ) ( मा. मा., अंक २ )

विवाह झाल्यावर पति पत्नीचे आणि पत्नी पतीचे सर्वस्व आहे याची जाणीव दोघांनीही ठेवून तदनुसार आपले वर्तन ठेवावे असे कामन्दकी मालती-माधवाना सागते—

प्रेयो मित्रं बन्धुता वा समग्रा
सर्वे कामाः शेवधिर्जीवितं वा ।
स्त्रीणां भर्ता धर्मदाराश्च पुंसा—
मित्यन्योऽन्य वत्सयोर्ज्ञातमस्तु ।।
( मा. मा. ६, १८ )

कौटुंबिक जीवनात पतिपत्नींनी एक विचाराने वागावे. दोघांचेही सुख दु.ख एकच आहे, असे मानावे. ज्यामध्ये परस्परांच्या हृदयाना विश्राति मिळते, कालातिक्रमाने ज्यातील रस कमी होत नाही, आरंभीचा आडपडदा दूर झाल्यावर जे विशुद्ध रूपाने अवशिष्ट राहते तेच खरे प्रेम. ते ज्याला प्राप्त होते तो खरा धन्य ! हे खालील श्लोकात सांगितले आहे—

अद्वैतं सुखदु.खयोरनुगुणं सर्वास्ववस्थासु य—
द्विश्रामो हृदयस्य यत्र जरसा यस्मिन्नहार्यो रस. ।
कालेनावरणात्ययात्परिणते यत्स्नेहसारे स्थितं
भद्रं तस्य सुमानुषस्य कथमप्येकं हि तत्प्राप्यते ।।
( उ. च., १, ३९ )

प्रेमाचे मनुष्य जवळ असले म्हणजे झाले. त्याने काही केले नाही तरी त्याचे केवळ सानिध्य दु.ख हलके करते आणि आनद देते. म्हणून प्रेमी मनुष्य हा एक द्रव्यनिधि होय !

न किञ्चिदपि कुर्वाणः सौख्यैर्दु.खान्यपोहति ।
तत्तस्य किमपि द्रव्य यो हि यस्य प्रियो जनः ।।
( उ. च., ६, ५ )

अरत्य ही संसारात पतिपत्नींच्या प्रेमाची परमावधि होय. त्याने दोघांच्या अतःकरणाची आनन्दरूपी गाठ बांधली जाते—

अन्तःकरणतत्त्वस्य दम्पत्योः स्नेहसंश्रयात् ।
आनन्दग्रन्थिरेकोऽयमपत्यमिति बध्यते ।।

(उ. च., ३, १७)

अपत्यप्रेम हा मनुष्याच्या स्वभावातील एक नैसर्गिक मनोविकार आहे. त्यामुळे अज्ञात अशाही अपत्याच्या दर्शनाने मातापित्यांचे वात्सल्य उचंबळून येते, हेही भवभूतीने 'उत्तररामचरिता'तील राम आणि कुश-लव यांच्या भेटीच्या प्रसंगांत दाखविले आहे.

माधव आणि मकरन्द यांच्या संबंधाने भवभूतीने मित्रप्रेमाचे मनोरम चित्र रंगविले आहे. ते दोघेही बरोबर वाढले आणि शिकले. दोघांचेही परस्परांवर निरतिशय प्रेम. त्यामुळे त्यांचे परस्परांच्या सुखदुःखात ऐक्य आहे. ते एकमेकांकरिता प्राण घेचण्यासही तयार होतात. अशा प्रेमळ मित्रांची जोडी क्वचितच संस्कृत वाङ्मयात दृष्टीस पडते. रावणाला मित्र म्हणून मानल्यामुळे वाली सज्जन अशा रामाचाही वध करण्यास तयार होतो असे भवभूतीने 'महावीरचरिता'त (५, ४) दाखविले आहे.

भवभूतीने सज्जनाचे वर्तन कसे असावे हेही खालील श्लोकात सांगितले आहे—

प्रियप्राया वृत्तिर्विनयमधुरो वाचि नियमः
प्रकृत्या कल्याणी मतिरनवगीतः परिचयः ।
पुरो वा पश्चाद्वा तदिदमविपर्यासितरसं
रहस्यं साधूनामनुपधि विशुद्धं विजयते ।।

याप्रमाणे कौटुम्बिक जीवन सुखकर होण्यास आवश्यक अशा सर्व सद्गुणांचे प्रतिपादन करून आणि त्यांची चालती-बोलती पात्रे आपल्या नाटकात घालून भवभूतीने भारतीय संस्कृतीचा उच्च आदर्श आपल्या वाचकांपुढे ठेवला आहे. त्यावरच त्याच्या लोकप्रियतेचे रहस्य साठवले आहे.

**दोष** - प्रत्येक मानवी कृतीत काही ना काही दोष असतात. तसे ते भवभूतीच्या नाटकांतही आढळतात. त्यांपैकी काही प्राचीन साहित्यशास्त्रकारांनीही दाखविले आहेत, आणि इतर काही त्याच्या नाटकांचा सूक्ष्म अभ्यास केल्यावर प्रतीत होणारे असे आहेत. आपण येथे त्यांचा थोडक्यात विचार करू.

**१. कृत्रिमता**—भवभूतीचा सहृदर्शनीच भासणारा ठळक दोष म्हणजे कृत्रिमता हा होय. त्याने काही ठिकाणी लांब भाषणे आणि लांब श्लोक एकापेक्षा अधिक पात्रांच्या तोंडी घातले आहेत. उदाहरणार्थ, 'मालतीमाधवा'च्या पाचव्या

अकात माधव आणि अघोरघण्ट अनुक्रमे घाबरलेल्या मालती आणि कपालकुण्डला याना त्याच शब्दात धीर देतात–

अयि भीरु,

धैर्यं निधेहि हृदये हत एव पापः
किं वा कदाचिदपि केनचिदन्वभावि ।
सारङ्गसङ्गरविधाविभकुम्भकूट–
कुट्टाकपाणिकुलिशस्य हरेः प्रमाद. ।। (मा. मा., ५, ३२)

पुढे त्या अकाच्या शेवटी ते दोघेही एकमेकास त्याच शब्दात आव्हान देतात. या दोन्ही प्रसगी दोघानाही तेच विचार सुचावे आणि ते त्यानी त्याच श्लोकात प्रकट करावे हे असंभवनीय वाटते.

तसेच ' उत्तररामचरिता 'च्या तिसऱ्या अंकाच्या शेवटी तमसा सीतेविषयी आणि वासन्ती रामाविषयी त्याच शब्दात आपली शुभेच्छा प्रकट करतात–

अवनिरमरसिन्धुः सार्धमस्मद्विधाभिः
स च कुलपतिराद्यश्छन्दसां यः प्रयोक्ता ।
स च मुनिरनुयातारुन्धतीको वसिष्ठ–
स्त्वयि वितरतु भद्रं भूयसे मङ्गलाय ।।
(उ. च., ३, ४८)

त्या नाटकाच्या शेवटी सीताशुद्धीच्या प्रसगी या श्लोकात उल्लेखिलेल्या सर्वांनी भाग घेतला आहे खरा, पण त्याना प्रस्तुत प्रसंगी आवाहन करण्याची जरुरी नाही. त्याचा येथे उल्लेख ओढून ताणून आणलेला दिसतो.

कृत्रिमतेचा दुसरा प्रकार ' महावीरचरिता 'च्या दुसऱ्या अकाच्या शेवटी आला आहे. जामदग्न्य धडक मारुन रामाच्या शोधार्थ अन्तःपुरात घुसतो. तेव्हा जनकाचा पुरोहित शतानन्द त्याला अडवून म्हणतो–

त्वं नः पूज्यतमोऽतिथिर्यदि ततः सज्जातियैषा वयं
कन्यान्त.पुरमक्रमात्प्रविशता सन्दूषितान्त.स्थितिः ।

नतर जनक म्हणतो–

पापं वाञ्छसि कर्म राघवशिशावस्मत्सनाथे कथम्

विष्कम्भात कञ्चुकी प्रवेश करुन म्हणतो—

देव्यः कङ्कणमोचनाय मिलिता राजन्वरः प्रेष्यताम् ।।
(मा. च., २, ५०)

एकाच श्लोकाचे निरनिराळे चरण भिन्न भिन्न पात्रांनी म्हणणे यात कृत्रिमता येते. अशा तऱ्हेची काही उदाहरणे भासाच्या काही नाटकांत आढळतात. तीही अशीच आक्षेपार्ह आहेत. कालिदासाने मात्र असा प्रकार आपल्या कोणत्याही नाटकात केला नाही.

कृत्रिमतेचा तिसरा प्रकार तेच वर्णन करणारे श्लोक अनेक नाटकांत घालणे हा होय. कोणतेही वर्णन–मग ते व्यक्तीचे असो किंवा सृष्टीचे असो–एका विशिष्ट प्रसंगाकरिता असते. त्याचे श्लोक मुक्तकासारखे हवे तेथे दडपून देता येण्यासारखे नसावेत, अशी वाचकाची अपेक्षा असते. पण भवभूति तेच श्लोक अनेक नाटकांत घालताना दिसतो. उदाहरणार्थ, 'दधति कुहरभाजामत्र भल्लूकयूनाम्' इत्यादि श्लोक 'महावीरचरिता'त (५, ४१) पम्पासरोवराचे परिसर, 'मालतीमाधवा'त (९, ६) मध्यभारतातील पद्मावतीजवळचा प्रदेश आणि 'उत्तररामचरिता'त (२, २१) दण्डकारण्याचा मध्यम भाग अशा तीन स्थलांच्या वर्णनात आला आहे. त्यात एका विशिष्ट ठिकाणच्या दृश्याचे वर्णन आहे असे मानणे कठीण जाते. तसेच 'चूडाचुम्बितकङ्कपत्रमभितस्तूणीद्वयं पृष्ठतः' इत्यादि क्षत्रिय ब्रह्मचाऱ्याचे वर्णन 'महावीरचरिता'त (१, १८) रामलक्ष्मणाच्या विषयी आणि 'उत्तररामचरिता'त (४, २०) लवाविषयी, म्हणजे जे पित्याविषयी तेच पुत्राविषयी आले आहे. लवाचे वय त्यावेळी बारा वर्षांचे होते, तितकेच विश्वामित्राश्रमात जाताना रामाचे होते काय? रामायणावरून तसे दिसत नाही. राम बारा वर्षांचा आणि सीता आठ दहा वर्षांची वनवासात जाण्याच्या वेळी असती तर चित्रकूट पर्वताजवळच्या वनविहारात 'त्वदर्थमिव विन्यस्तः' इत्यादि श्लोक वाल्मीकीने रामाच्या तोंडी घातला नसता.

भवभूतीच्या एकापेक्षा अधिक नाटकात येणाऱ्या श्लोकांची किंवा श्लोकार्धाची संख्या साठावर जाते हे तोडरमल्ल यांनी 'महावीरचरिता'च्या प्रस्तावनेत संदर्भ देऊन दाखविले आहे. भवभूतीने काही श्लोक रचून तयार ठेवले होते आणि शक्य तेथे तो ते घालत असे, किंवा प्रथम एका नाटकातील विशिष्ट प्रसंगाकरिता त्याने श्लोक रचले आणि मागाहून ते तसेच किंवा थोडा फार फरक करून त्याने दुसऱ्या नाटकात घातले अशा दोन कल्पना येथे संभवतात. यापैकी दुसरीच जास्त समर्थनीय वाटते हे मागे सृष्टिवर्णनाविषयी विवेचन करताना दाखविले आहे.

कालिदासानेही 'रघुवंशा'त (७, ५–११) अज-इन्दुमतींना आणि 'कुमारसंभवा'त (७, ५७–६२) शिवपार्वतींना पुरप्रवेशप्रसंगी पाहण्याकरिता जमलेल्या नगरस्त्रियांचे असेच त्याच श्लोकात वर्णन केले आहे. त्यांचेच अनुकरण भवभूतीने केलेले दिसते.

कृत्रिमतेचा चौथा प्रकार सामान्यतः प्राकृत भाषेत बोलणाऱ्या पात्रांनी मध्येच संस्कृत भाषेचा उपयोग करणे हा होय. 'मालतीमाधवा'तील कामन्दकी आणि सौदामिनी-खेरीज इतर सर्व स्त्रीपात्रे शौरसेनी प्राकृतात बोलतात. सातव्या अंकात सामान्यतः प्राकृतात बोलणारी बुद्धरक्षिता ' कुसुमसधर्माणो हि योषितः सुकुमारोपक्रमाः। तास्वन-धिगतविश्वासैः प्रसभमुपक्रम्यमाणाः सम्प्रयोगविद्वेषिण्यो भवन्ति ' असे कामसूत्रकाराचे म्हणणे संस्कृतात सांगते तेही आक्षेपार्ह नाही. कारण तो एका ग्रंथातील (वात्स्यायना-च्या ' कामसूत्रा 'तील, पृ. १७०) उतारा आहे. पण पुढे जेव्हा मकरन्दाचे नाव ऐकल्याबरोबर मदयन्तिका रोमाञ्चित होते तेव्हा लवङ्गिका पुढील टोमणा संस्कृतात मारते (संस्कृतमाश्रित्य) तो मात्र कृत्रिम वाटतो—

वयं तथा नाम यथात्थ किं वदा-
म्ययं च कस्माद्विकलः कथान्तरे ।
कदम्बगोलाकृतिमाश्रितः कथं
विशुद्धमुग्धः कुलकन्यकाजनः ॥

(मा. मा., ७, १)

लवङ्गिकेला हा टोमणा प्राकृत श्लोकातही मारता आला असता. पण प्राकृतातला टोमणा प्रेक्षकाच्या नीट ध्यानात येणार नाही म्हणून म्हणा किंवा अन्य काही कारणा-मुळे म्हणा भवभूतीने तो संस्कृतातच दिला आहे. ' मालतीमाधवा 'च्या दुसऱ्या अंकात मालतीच्या तोंडी काही संस्कृत श्लोक घातले आहेत ( २, १–२ ). भवभूतीने आपल्या नाटकात कोठेही प्राकृत भाषेत एकही पद्य घातले नाही. ' मालतीमाधवा 'त नगरदेवतेच्या गाभाऱ्यात लवङ्गिकेची म्हणून माधव दोन पद्ये म्हणतो, पण ती शौरसेनी प्राकृताची तशी संस्कृताचीही म्हणता यावी अशी त्यातील शब्दयोजना आहे. संस्कृत नाट्यशास्त्रकारांनी ' कार्यतश्चोत्तमादीनां कार्यो भाषाव्यतिक्रमः । ' ( उत्तम प्रकृति व इतर पात्रांनी विशेष कारणाकरिता नेहमीच्यापेक्षा भिन्न भाषेत बोलावे ) असा नियम घालून दिला आहे खरा, पण तो साधारण्या प्रसंगाकरिता नाही; तर जेव्हा एखादे पात्र भिन्न रूपाने बोलू लागते त्याकरिता आहे. उदाहरणार्थ ' मुद्राराक्षसा 'त विराधगुप्त प्रथम गारुडीरूपाने प्रवेश करतो तेव्हा तो प्राकृतात बोलतो. पण पुढे तो आपल्या धन्यासमोर हेर म्हणून आपले वृत्त सादर करतो तेव्हा संस्कृतात बोलू लागतो. नंतरच्या साहित्यशास्त्रकारांनी अशा कृत्रिमतेकडे दुर्लक्ष करून स्त्रियांना व इतर काहींनी वैदग्ध्य दाखविण्याकरिता मधून मधून संस्कृताचा उपयोग करावा अशी अनुज्ञा दिली. योषित्सखीबालवेश्याकितवाप्सरसां यथा । वैदग्ध्यार्थं प्रदा-तव्यं संस्कृतं चान्तरान्तरा ॥ सा. द., ६, १६९) तेव्हा तर कृत्रिमतेचा कळस झाला.

कृत्रिमतेचा पाचवा प्रकार पात्रांना वरचेवर मूर्छा आलेली दाखविणे हा होय. 'उत्तररामचरिता'तील पात्रे अनेकदा मूर्छित झालेली दाखविली आहेत. यामुळे मूर्छेचे गांभीर्य नष्ट होते.

**२. पाल्हाळ**—भवभूतीचा दुसरा दोष पाल्हाळ हा होय. त्याच्या ठिकाणी संयम मुळीच नाही. कोणतीही गोष्ट थोडक्यात सूचित करण्याचे कालिदासाचे कसब त्याच्या ठिकाणी नाही. म्हणून त्याची पाल्हाळीक वर्णने कंटाळवाणी होतात हे मागे 'मालतीमाधवा'च्या नवव्या अंकाच्या समीक्षेमध्ये दाखविले आहे.

**३. विवेचक शक्तीचा अभाव**—भवभूतीने आपल्या नाटकाच्या रचनेत विवेके कसोशीने लक्ष घालावयास पाहिजे होते तितके घातले होते असे दिसत नाही. रामकृष्णापंत भांडारकरांनी म्हटले आहे की भवभूतीने स्वतःच 'मालतीमाधवा'तील काही पाठ नंतर बदलले असे दिसते. त्याने 'महावीरचरिता'ही तसे केले असावे असे तोडरमल्ल यांचे मत होते. आपल्या नाटकाच्या संविधानकाच्या बाबतीत त्याने स्वतः अशीच समीक्षा केली असती तर त्यातील काही प्रमाद त्याला काढून टाकता आले असते. उदाहरणार्थ 'महावीरचरिता'तील साकेतच्या लोकांनी रामलक्ष्मणाबरोबर वनवासास जाण्यास निघणे, 'मालतीमाधवा'त नगरदेवतेच्या देवळात माधवाने म्हटलेल्या श्लोकावरून त्याचे तेथे असणे मालतीच्या लक्षात न येणे, 'उत्तररामचरिता'तील सीतापरित्याग राज्याभिषेकानंतर लगलीच घडवून आणणे यासारखे प्रमाद थोड्या विचाराअन्ती त्याला सुधारता आले असते. तसेच 'मालतीमाधवा'तील दीर्घ समासयुक्त प्राकृत भाषण त्याने गाळली असती. वाणीची प्रौढि आणि उदारता, तसेच अर्थगौरव एवढेच गुण उत्कृष्ट नाट्यनिर्मितीला पुरेसे नसून त्याच्या बरोबर विवेचकशक्तीही असावी लागते हे त्याच्या ध्यानात आले नाही.

**४. साहित्यिक दोष**—साहित्यशास्त्रकारांनी भवभूतीचे अनेक दोष आपल्या दोषप्रकरणात दाखविले आहेत. त्याची थोडक्यात चर्चा करू.

**रसदोष**—'महावीरचरिता'त राम आणि जामदग्न्य यांचा वाक्कलह शिगेस पोचतो आहे तोच कंचुकी येऊन म्हणतो—

देवः कङ्कणमोचनाय मिलिता राजन्वरः प्रेष्यताम् ।।

(म. च., २, ५०)

यात वीररसाचा अकाण्डच्छेद ( anti-climax ) हा दोष झाला आहे.[१]

---

१. दशरूपक, २, ६६.

पददोष--'महावीरचरिता'च्या दुसऱ्या अंकात (२, २८) जामदग्न्य म्हणतो-

न त्रस्तं यदि नाम भूतकरुणासन्तानशान्तात्मन-
स्तेन व्यारुजता धनुर्भगवतो देवाद्भवानीपतेः ।

या श्लोकात ' भवानीपति ' हा शब्द ' भगवान् शंकर ' या अर्थी योजला आहे. त्या ठिकाणी ' भव ' शब्दाचा प्रयोग करावयास पाहिजे होता. नाहीतर भवाची पत्नी ती भवानी ( पार्वती ); तिचा कोणी दुसरा पति या अर्थी तो घेतला जाण्याची शक्यता आहे. म्हणून येथे मम्मटाने ' विरुद्धमतिकृत् ' ( इष्टार्थाच्या विरुद्ध असा अर्थ दाखवणे ) हा दोष मानला आहे.[१]

वाक्यदोष--'महावीरचरिता'च्या त्याच अंकात ( २, ३१ ) पुढील श्लोक आला आहे-

अप्राकृतस्य चरितातिशयस्य भावै-
रत्यद्भुतैर्मम हृतस्य तथाप्यनास्था ।
कोऽप्येष वीरशिशुकाकृतिरप्रमेय-
सामर्थ्यसारसमुदायमयः पदार्थः ॥

यातील दुसऱ्या चरणात ' तथापि ' हे अव्यय आले आहे. तेव्हा येथे दोन वाक्ये असली पाहिजेत. पण तेथे प्रथमार्धात एकच वाक्य आहे. म्हणून मम्मटाने-' अत्यद्भुतैरपहृतोऽस्मि तथाप्यनास्था ।' असा पाठ सुचविला आहे. त्यायोगे हा दोष नाहीसा होईल.[२]

अर्थदोष—त्याच नाटकाच्या द्वितीयांकात (२, ९) रावणाचा मन्त्री माल्यवान् म्हणतो-

अपित्वे प्रकटीकृतेऽपि न फलप्राप्तिः प्रभोः प्रत्युत
द्रुह्यन्दाशरथिर्विरुद्धचरितो युक्तस्तया कन्यया ।
उत्कर्षं च परस्य मानयशसोर्विस्रंसनं चात्मनः
स्त्रीरत्नं च जगत्पतिर्दशमुखो दृप्तः कथं मृष्यते ॥

या ठिकाणी ' अर्थाचे साकाङ्क्षत्व ' हा दोष मम्मटाने दाखविला आहे. कारण ' स्त्रीरत्नमुपेक्षितुं दशमुखः कथं मृष्यते । ' असा अर्थ विवक्षित आहे. त्याकरिता स्त्रीरत्नं याला ' उपेक्षितुं ' पदाची अपेक्षा आहे. काही टीकाकारांनी ' स्त्रीरत्नं ' याचा ' परस्य '

१. काव्यप्रकाश, पृ. २९४.

२. काव्यप्रकाश, पृ. ३५६.

या तृतीय चरणातील पदाशी संबंध जोडला आहे, पण त्याने दूरान्वय होईल. दुसरे असे की 'परस्य' याचा संबंध 'उत्कर्षम्' याच्याशी असल्याने ते पद रिकामे नाही.'

मम्मटाने 'मालतीमाधवा'तील पुढील श्लोकात (१, ३९) व्याहतार्थत्व असा आणखी एक दोष दाखविला आहे—

जगति जयिनस्ते ते भावा नवेन्दुकलादयः
प्रकृतिमधुराः सन्त्येवान्ये मनो मदयन्ति ये ।
मम तु यदियं याता लोके विलोचनचन्द्रिका
नयनविषयं जन्मन्येकः स एव महोत्सवः ॥

या श्लोकाच्या प्रथमार्धात माधव इतर जनांना मोहक वाटणाऱ्या नूतन इन्दुकलेसारख्या पदार्थांना आपल्या प्रेयसीच्या मुखापुढे तुच्छ गणत आहे. पण पुढे तो त्या मुखाचे त्याच चन्द्राच्या प्रकाशाशी उत्कर्ष दाखविण्याकरिता ऐक्य कल्पीत आहे. म्हणून येथे 'अर्थाने व्याहतत्व' हा दोष झाला आहे.

या वर्गाचाच अनुचित पदप्रयोगाचा दोष आणखी एके ठिकाणी 'मालती-माधवा'त झाला आहे. त्याकडे अद्यापि कोणाचे लक्ष गेलेले दिसत नाही. 'मालती-माधवा'च्या नवव्या अंकात (९, ४०) शोकाविष्ट माधवाच्या मुमूर्षु अवस्थेने खिन्न होऊन मकरन्द म्हणतो—

आजन्मनः सह निवासितया सदैव
मातुः पयोधरपयोऽपि समं निपीय ।
त्वं पुण्डरीकमुख बन्धुतया निरस्त-
मेको निवापसलिलं पिबसीत्ययुक्तम् ॥
(मा. मा., ९-४०)

त्या नाटकात माधवाचे 'दूर्वाश्यामलाङ्ग' (दूर्वेसारख्या सावळ्या देहाचा), (अंक १) 'कुवलयदलश्याम' निळ्या कमळाच्या पाकळ्याप्रमाणे सावळा (५, ५) असे वर्णन आले आहे. तेव्हा त्याच्या मुखाला पुण्डरीकाची किंवा श्वेतकमळाची उपमा देणे योग्य नाही. अनवधानाने कवीच्या हातून ही चूक झाली असावी.

५ अश्लीलत्व—भवभूतीची नाटके सामान्यतः या दोषापासून मुक्त आहेत. 'महावीरचरित' आणि 'उत्तररामचरित' या नाटकांचा वर्ण्य विषय अनुक्रमे वीर आणि करुण रस यांनी युक्त असल्यामुळे त्यात या दोषाला अवकाश नसावा हे

---

१. काव्यप्रकाश, पृ. ३९८.

साहजीकच आहे. ' मालतीमाधवा 'त शृंगाररस असून त्यात काही ठिकाणी संकल्पनिर्मित प्रियसमागमाचे वर्णन आहे. विशेषत: सातव्या अंकात मदयन्तिका मकरन्दाशी झालेल्या आपल्या सकल्पनिर्मित समागमाचे वर्णन करते त्यातील शृंगार उत्तान आहे. त्या प्रसंगी लवङ्गिकेने मदयन्तिकेला अशा समागमसुखानंतरच्या तिच्या अवस्थेविषयी विचारलेला प्रश्न सदभिरुचीला सोडून आहे, असे म्हटले पाहिजे.

याशिवाय भवभूतीच्या नाटकातील काही किरकोळ दोष टीकाकारांनी दाखविले आहेत. उदाहरणार्थ, ' निष्टापस्विद्यदस्मः ' ( मा. मा., ५, १७ ), ' तर्जयन्ति कुमारमायुधीयश्रेणय ' ( उ. च., अंक ४ ) इत्यादिकांतील व्याकरणदुष्ट प्रयोग, ' समरशिरसि चञ्चत्पञ्चचूडश्चमूनामुपरि शरतुषारं कोऽप्ययं वीरपोतः ॥ ( उ. च., ५, २ ) यातील ' तुषार ' याचा ' वृष्टि ' या अर्थी प्रयोग, ' वयमपि न खल्वेवंप्रायाः क्रतुप्रतिवादिनः ' ( उ. च., ५,२८ ) यातील यतिभंग इत्यादि दोष काहींनी दाखविले आहेत.[1] तसे दोष बहुधा सर्व कवींच्या काव्यांत सापडतील. त्यांना फारसे महत्त्व देण्याचे कारण नाही.

हे प्रकरण संपविण्यापूर्वी एका तथाकथित दोषाची चर्चा केली पाहिजे. तो दोष काश्मीरक टीकाकार क्षेमेन्द्र याने आपल्या ' औचित्यविचारचर्चे 'त दाखविला आहे. ' उत्तररामचरिता 'च्या पाचव्या अंकात लव रामाचे दोष ' वृद्धास्ते न विचारणीयचरिताः ' इत्यादि श्लोकात दाखवतो. त्यावर क्षेमेन्द्र म्हणतो—' लव हे या नाटकातील ' गौण 'पात्र आहे. त्याच्या उक्तींनी सबंध नाटकाचा नायक प्रभु रामचंद्र याच्या धीररसाचा विनाश कवीने स्वतःच केला हे अत्यंत अनुचित आहे. ' आम्हांस हा आक्षेप पटत नाही. प्रभु रामचंद्राच्या पराक्रमातील तथाकथित दोष दाखविल्याने येथे सबंध नाटकातील धीररसाचा विनाश झाला असे म्हणता येत नाही. उलट येथे भवभूतीने लवाला न कळत आपल्या पित्याचे तथाकथित दोष दाखवावयास लावून नाटकाच्या रमणीयतेत भर घातली आहे.

---

१. पं. रंगाचार्य रड्डी याचा लेखसंग्रह, पृ. ७३.

## प्रकरण नववे

# भवभूतीचे विचार

स्वादुकाव्यरसोन्मिश्रं शास्त्रमप्युपयुञ्जते ।
प्रथमालीढमधवः पिबन्ति कटु भेषजम् ॥

भामह–काव्यालंकार, ५, ३.

भवभूतीने आपल्या नाटकात मधून मधून धर्म, तत्त्वज्ञान, राजकारण, समाजस्थिति, शिक्षण इत्यादिकांवर आपले विचार व्यक्त केले आहेत. त्यांचा साकल्याने विचार करणे उद्बोधक होईल.

**धर्म**—भवभूतीच्या काळी हिंदुधर्माची स्थिति प्रायः सध्याच्या सारखीच होती. वैदिक यज्ञयाग क्वचित् होत असून त्यांची जागा पौराणिक हिन्दु धर्माने घेतली होती. तत्कालीन कोरीव लेखात राजांनी ब्राह्मणांना दिलेली दाने सामान्यतः पञ्चमहायज्ञांच्या अनुष्ठानाकरिता दिलेली आढळतात. राजे लोक गुप्त कालातल्याप्रमाणे श्रौतयाग करताना दिसत नाहीत. भवभूति मात्र श्रौतविद्येचा प्रखर अभिमानी होता. त्याच्या एका पूर्वजाने वाजपेय याग केला होता, याचा उल्लेख त्याने मोठ्या अभिमानाने आपल्या दोन नाटकात केला आहे. त्याचे पूर्वज आपले धन श्रौत यज्ञयागाच्या अनुष्ठानात आणि वापी, कूप, तडाग, सत्र वगैरे लोकोपयोगी कृत्यात खर्च करीत असत. भवभूतीची वैदिक मंत्रांच्या सामर्थ्यावर दृढ श्रद्धा होती. वेदाध्ययनाने ब्रह्मवर्चस प्राप्त झालेला जनकाचा पुरोहित शतानन्द शापोदकाने जामदग्न्याला भस्म करण्यास तयार होतो, पण वसिष्ठ ऋषि त्याला त्यापासून परावृत्त करतात. ते त्याला जाबालि-

प्रभृति ऋषींच्या साहाय्याने शान्तिहोम करण्याचा उपदेश करतात. तसेच सूक्ते, साम, अनुवाक इत्यादिकांचा जप करून जामदग्न्याचे दमन करावे असे ते सुचवितात. या सर्वांत भवभूतीची वैदिक कर्मावरची श्रद्धा व्यक्त होते. चौथा वेद अथर्ववेद यात सांगितल्याप्रमाणे अभिचार केल्यास तो शत्रूंचे निर्दालन करण्यास समर्थ होतो हेही त्याने एका उपमेत (म. च., १, ६२) सुचविले आहे. तत्कालीन लोकांची तशी समजूत होती हे कल्हणाच्या 'राजतरंगिणी'वरून (४, १२४) स्पष्ट दिसते. भवभूतीचा समकालीन ललितादित्य मुक्तापीड याचा वडील भाऊ तारापीड याने आपला भाऊ चंद्रापीड याचा ब्राह्मणाकडून गुप्त रीतीने अभिचार करवून नाश केला होता असे कल्हणाने वर्णिले आहे.

वेदाध्ययनाने आणि यज्ञानुष्ठानाने ज्या ब्राह्मणांना परज्योतीचा साक्षात्कार होतो त्यांच्या उक्ति सदैव सत्य ठरतात; कारण–

भद्रा ह्येषां वाचि लक्ष्मीर्निषक्ता
नैते वाचं विप्लुतां व्याहरन्ति ॥ (उ. च., ४, १८)

असे भवभूतीने अरुन्धतीमुखाने सांगितले आहे. अशा ऋषींना त्रिकालज्ञान असते. अशा महर्षि वाल्मीकींनी ब्रह्मदेवाच्या आज्ञेने रामचरित गायिले, त्यांच्याच आदेशावरून भूदेवी आणि भागीरथी यांनी सीतेला पातालातून आणून अरुन्धतीच्या स्वाधीन केले, असे त्याने 'उत्तररामचरिता'च्या सातव्या अंकात दाखविले आहे.

भवभूतीच्या काली पौराणिक हिन्दु धर्माचा प्रसार भारतात सर्वत्र झाला होता. भगवान् शंकर, विष्णु, कार्तिकेय, सूर्य इत्यादि देवांची देवालये पूर्वीच्या गुप्त कालातच सर्वत्र निर्माण होऊ लागली होती. त्याचा भवभूतीच्या कालात जास्तच प्रसार झाला. ललितादित्याने, तसेच त्याची राणी, अमात्य, तुर्की अधिकारी, आचार्य यांनी त्या काली पौराणिक देवतांची शेकडो देवालये काश्मीरात बांधल्याचे कल्हणाने वर्णिले आहे. भवभूति राहत होता त्या पद्मावती नगरीत सुवर्णबिन्दु नामक स्वयंभू शिवलिंगाचे देवालय होते. त्याचा उल्लेख 'मालतीमाधवा'त आला आहे. तसेच मदन, कराला देवी, नगरदेवता यांचीही देवालये तेथे होती. विशेष उल्लेखनीय गोष्ट ही की गुप्त कालाच्या अखेरीपर्यंत ज्याची पूजा भारतात प्रचलित झाली नव्हती त्या गजाननाचे महत्त्व त्या कालात पूर्णपणे प्रस्थापित झाले होते. भवभूति हेरम्बाचा (गजाननाचा) भगवान् शंकराच्या प्रमुख गणाधिपतीमध्ये उल्लेख करतो.[1] त्याच्या पूजेने विघ्नांचे निवारण होते ही श्रद्धाही तेव्हा प्रचलित होती. म्हणून त्याने 'मालतीमाधवा'च्या आरंभी गजाननाचे वर्णन केले आहे.

---

१. महावीरचरित, २, १७.

भवभूति स्वतः कोणत्या देवाचा उपासक होता याबद्दल विद्वानात मतभेद आहे. त्याने आपली वाल्मीकिप्रणीत रामचरिताविषयी आवड व्यक्त केली आहे (म. च. १, ७) आणि त्यावर दोन नाटके रचली आहेत. म्हणून तो विष्णूपासक होता असे शारदारंजन रायने म्हटले आहे, तर त्याने 'मालतीमाधवा'च्या एका नान्दीश्लोकात भगवान् शंकराची स्तुति केली आहे म्हणून तो शैव होता असे डॉ. काणे[1] आणि प्रा. करमरकर[2] म्हणतात. पण भवभूतीने सूर्याचीही तशीच स्तुति 'मालतीमाधवा'त केली आहे. वस्तुस्थिति अशी आहे की भवभूति वेदान्ती होता, हे त्याने स्वतःच सांगितले आहे. वेदान्ताप्रमाणे शिव, विष्णु, सूर्य इत्यादि ही अपर (किंवा सगुण) ब्रह्माची रूपे होत. हेच मत भवभूतीचे असावे; म्हणून त्याने 'महावीरचरिता'च्या आरंभी कोणा सगुण देवाची स्तुति न करता चैतन्य ज्योतीला म्हणजे निर्गुण ब्रह्माला नमन केले आहे. वेदान्ती सर्व जगाला निर्गुण ब्रह्माचा आविष्कार मानत असले तरी व्यवहारिक सत्तेत शिव, विष्णु इत्यादि देवांना मानतात आणि त्यांची आराधनाही करतात. तीच वृत्ति भवभूतीचीही असावी.

भवभूतीच्या काली शाक्तपंथाचाही बराच प्रसार झाला होता. खुद्द पद्मावतीस 'सर्वजीवोपहारा' (जिला सर्व प्राण्याचे बळी देत, अशा) करालाा या शक्तिदेवतेचे देवालय श्मशानाशेजारी होते आणि तेथे श्मशानवासी 'रात्रिविहारी' अघोरपंथ मन्त्रसाधनाकरिता येत असे, असे भवभूतीने दाखविले आहे. त्या काळी उत्तरभारतात शाक्तांचे प्रसिद्ध स्थान विंध्यवासिनी देवीचे देवालय हे होते. त्याचे सविस्तर वर्णन वाक्पतिराजाच्या 'गउडवहो' काव्यात आलेले मागे दुसऱ्या प्रकरणात दिले आहे. हे देवालय पद्मावती (पूर्वीच्या ग्वाल्हेर संस्थानातल्या पद्मपवाया) पासून फार दूर नाही. पण काही अज्ञात कारणास्तव भवभूतीने कापालिकाच्या या स्थानाचा उल्लेख न करता कापालिकी कपालकुण्डला व सौदामिनी या दूरच्या आन्ध्र प्रदेशातील शैलपर्वतावरील शाक्त केंद्रातून आल्या होत्या असे दाखविले आहे. भवभूतीला शाक्त पंथाविषयी आदर नसून घृणा होती हे कपालकुण्डलेच्या वेषाचे जे वर्णन 'मालतीमाधवा'त (५, ३ व ४) आले आहे त्यावरून स्पष्ट आहे. पण आश्चर्य हे की सौदामिनीचेही वर्णन 'कापालिक व्रत धारण करणारी' असे पहिल्या अंकात आले आहे. पण तिचा वेश कपालकुंडलेप्रमाणे होता असे कोठेही वर्णन नाही. ती स्वतःला 'योगिनी' असा उल्लेख करते (मा. मा. अंक ९). इतर पात्रे तिला 'योगीश्वरी' असे म्हणतात. तिचे कृत्य कपालकुंडलेच्याप्रमाणे परहिंसक नसून परोपकारक आहे. तिचा

१. उत्तररामचरित, चौथी आवृत्ति, प्रस्तावना, पृ. २१

२. Karmankar—*Bhavabhūti*, p. 6

फक्त एकाच ठिकाणी 'कापालिक व्रत धारण करणारी' असा उल्लेख अवलोकितेच्या भाषणात आला आहे. सौदामिनी प्रथम कामन्दकीची शिष्या होती; पण पुढे तिला तिच्याविषयी काही माहिती नव्हती. अवलोकितेनेही तिजविषयी माहिती कपालकुण्डले-कडूनच मिळविली होती, असे पहिल्या अंकातील कामन्दकीच्या आणि तिच्या संभाषणावरून दिसते. तेव्हा ही पुढीची माहिती कपालकुण्डलेने मुद्दाम दिलेली दिसते.

सौदामिनी आकर्षिणी सिद्धीने माधवाला श्रीपर्वतावर नेऊन जाते आणि नंतर मालतीसह त्याला पद्मावतीस परत आणते. ही आकर्षिणी सिद्धि गुरूची सेवा, व्रत, तन्त्र आणि मन्त्र याच्या योगे प्राप्त झाली होती असे ती स्वतःच सांगते. तेव्हा ती तन्त्रोपासक असावी.

भवभूतीच्या वेळी भारतात आणि तो राहत होता तेथे पद्मावतीसही बौद्ध धर्म प्रचलित होता. काही लोकांचे असे मत आहे की भवभूतीचा बौद्ध धर्माविषयी प्रतिकूल ग्रह होता; कारण त्याने 'महावीरचरिता'त 'योगाचारन्यायेन' हा शब्द 'कपटाने' या अर्थी योजिला आहे. योगाचार हा बुद्धाचा एक शिष्य होता. त्याने स्थापिलेल्या बौद्धतत्त्वज्ञानाच्या शाखेस योगाचारवाद किंवा विज्ञानवाद म्हणतात. या नामसाम्यावर वरील मत आधारित आहे. पण त्यात काही अर्थ नाही. भवभूतीने कोठेही बौद्धमताविषयी अनादर दाखविला नाही. बौद्ध भिक्षुणी कामन्दकी, तिची शिष्या अवलोकिता आणि मंत्रीण बुद्धरक्षिता ह्या मालती व माधव आणि मदयन्तिका व मकरंद यांचा विवाह जमवून आणण्यास सर्व प्रकारे मदत करतात. दहाव्या अंकात सौदामिनीची स्तुति करताना कामन्दकी म्हणते, 'तुझी कृत्ये बोधिसत्त्वाच्याहीपेक्षा श्रेष्ठ आहेत.' भवभूतीच्या काळी उत्तर भारतात महायान बौद्ध पंथ प्रचलित होता त्याचा निदर्शक हा उल्लेख आहे.

पद्मावतीस बौद्धांचे स्तूप आणि विहार होते. तेथे बौद्धभिक्षु राहत असत. या शिवाय कामन्दकी व तिच्या मैत्रिणी आणि शिष्या यांच्याकरिता निराळी विहारिकाहि होती, असा उल्लेख 'मालतीमाधवा'त आला आहे.

**तत्त्वज्ञान**— आता भवभूतीच्या तत्त्वज्ञानविषयक विचारांचे अवलोकन करू. भवभूतीने उपनिषदांचे अध्ययन केले होते. 'महावीरचरित' आणि 'उत्तररामचरित' यांत याज्ञवल्क्य ऋषींने जनकाला ब्रह्मज्ञान सांगितल्याचा उल्लेख अनेकदा आला आहे. तेव्हा ब्रह्मज्ञान प्राप्त करून घेऊन तद्द्वारा मोक्ष मिळवणे हेच मानवाचे अत्युच्च ध्येय होय असे त्याचे मत होते यात संशय नाही. प्राण्याला मृत्यूनंतर खालील तीन गतींपैकी कोणती तरी एक प्राप्त होते—(१) त्याची कर्मे क्षीण झाली नसल्यास त्याला आपल्या कर्मानुसार जन्म मिळतो. भारतात अनेक धर्म उत्पन्न झाले असले तरी त्या

सर्वांनी कर्मवादावर सारखीच श्रद्धा आहे. त्यामुळे 'माल्तीमाधवा'त (अं. १०) जेव्हा लवङ्गिका कामन्दकीला म्हणते, 'भगवति, मी या कड्यावरून उडी टाकून प्राण देणार आहे. पुढील जन्मात तरी माझी माल्तीशी भेट होईल असा मला आशीर्वाद द्या,' तेव्हा कामन्दकी उत्तरते, 'अग, आपल्या कर्माप्रमाणे आपल्याला गति मिळणार आहे. तिची भेट होईल किंवा नाही कोणी सांगावे?' यात या पहिल्या प्रकारच्या गतीचा उल्लेख आहे. (२) दुसरी गति—ज्यांनी पुण्य कृत्ये-यज्ञयाग व लोकोपयोगी कृत्ये-केली असतील त्यांना पितृयाण मार्गाने चंद्रलोकावर जाता येऊन तेथे पुण्य संपेपर्यंत सुखोपभोग घेता येतो. पुण्यक्षय झाल्यावर मात्र पुन पृथ्वीवर जन्म घ्यावा लागतो. (३) तिसरी गति—ज्यांना ब्रह्मज्ञानाने किंवा परमेश्वरप्रसादाने मुक्ति मिळाली असते ते देवयानाने ब्रह्मलोकात जातात आणि शेवटी ब्रह्माशी एक होतात. या गतीचा उल्लेख भवभूतीने 'उत्तररामचरिता'च्या दुसऱ्या अंकात शम्बूक दिव्यरूपाने आला असता त्याला रामाने दिलेल्या खालील आशीर्वादात केला आहे—

यत्रानन्दाश्च मोदाश्च यत्र पुण्याश्च सम्पद. ।
वैराजा नाम ते लोकास्तैजसाः सन्तु ते शिवा. ॥

हे वैराज (विराज् किंवा ब्रह्म यांचे) लोक म्हणजेच ब्रह्मलोक होत. पुढे शम्बूक म्हणतो, 'मी पुराणब्रह्मवादी अगस्त्य ऋषींना वंदन करून शाश्वत पदात प्रवेश करीन.' हीच सर्वात श्रेष्ठ गति होय. स्वतःच्या प्रयत्नाने आत्मज्ञान कसे प्राप्त करून घ्यावे याचाही उल्लेख 'महावीरचरिता'त जामदग्न्याला उद्देशून केलेल्या वसिष्ठाच्या भाषणात आला आहे. ते म्हणतात, 'तू अरण्यात राहतोस. तू मैत्री, करुणा, मुदिता आणि उपेक्षा या चित्ताला प्रसन्न करणाऱ्या भावना अंगी बाणव. त्यानंतर तुझ्या ठिकाणी शोकरहित अशी ज्योतिष्मती नामक चित्तवृत्ति लौकरच उत्पन्न होईल. तिच्या प्रसन्नतेने ऋतंभरा प्रज्ञेचा आविर्भाव होऊन तुला अन्तर्ज्योतीचे दर्शन होईल. त्यायोगे सर्व पापाचा क्षय होऊन तू मृत्यु तरून जाशील.' या भाषणामध्ये योगसूत्रांतल्या-प्रमाणे आत्मज्ञानप्राप्तीचा मार्ग सांगितला आहे.

भवभूतीने तन्त्रशास्त्रावरही एक ग्रंथ लिहिला होता असे अभिनवगुप्ताच्या 'तन्त्रालोका'तील एका उल्लेखावरून दिसते. तो ग्रंथ आता उपलब्ध नाही. पण तो 'परात्रीशिका' ग्रंथावर टीकारूप होता असे अनुमान करता येते. योग्यांना इन्द्रिये आणि अर्थ यांच्या संयोगाशिवाय सूक्ष्म, व्यवहित (दुसरा पदार्थ मध्ये आलेले), दूर अंतरावरचे, भूत आणि भविष्य वस्तूंचे जे ज्ञान होते त्याला प्रातिभज्ञान म्हणतात. 'प्रातिभाद्वा सर्वम्' या प्रातिभ ज्ञानानेच योगी सर्व जाणतो. 'उत्तररामचरित' (अंक २) मध्ये ब्रह्मदेव वाल्मीकि ऋषींना म्हणतात, 'ऋषे,

प्रबुद्धोऽसि वागात्मनि ब्रह्मणि। तद्‍ब्रूहि रामचरितम्। अव्याहतज्योतिरार्षं ते प्रतिभाचक्षु।' हे प्रातिभ ज्ञान तर्क, शास्त्राभ्यास, गुरुचर्या, वादविवाद, अभ्यास इत्यादिकांनीच प्राप्त होते किंवा परमेश्वरकृपेने शिष्याला दीक्षा, अभिषेक, याग इत्यादि बाह्य साधनांशिवाय मिळते, याविषयी मतभेद होता. काहींचे म्हणणे होते की काम्य कर्मांशिवाय इतरत्र मोक्षाच्या बाबतीत हे शक्य असेल. पण काम्य कर्माकरिता प्रातिभज्ञान प्राप्त करून घ्यावयाचे असेल तर त्याकरिता गुरुची आवश्यकता असलीच पाहिजे.

अन्ये त्वाहुरकामस्य प्रातिभो गुरुरीदृशः।
साधप्रोजन्यता काम्ये तेनास्मिन्संस्कृतो गुरुः॥
(तन्त्रालोक, १३, १४७)

पण हे मत परात्रीशिकाग्रंथावर टीका लिहिणाऱ्या सोमानन्द, कल्याण, भवभूति इत्यादि विद्वानांना मान्य नाही असे अभिनवगुप्ताने पुढील श्लोकात सांगितले आहे--

असदेतदिति प्राहुर्गुरवस्तत्त्वदर्शिनः।
श्रीसोमानन्दकल्याणभवभूतिपुरोगमाः॥ (१४९)

तथाहि त्रीशिकाशास्त्रविवृतौ तेऽभ्यधुर्बुधाः।
सांसिद्धिकं यद्विज्ञानं तच्चिन्तारत्नमुच्यते॥ (१५०)

वरील श्लोकात उल्लेखिलेल्यांपैकी सोमानन्द हा अभिनवगुप्ताचा पणजेगुरू होता. दुसरा कल्याण, ह्याच्याविषयी विशेष माहिती नाही.[४] तिसरा भवभूति. हे नाव प्राचीन संस्कृतवाङ्मयात फक्त 'महावीरचरिता'दि नाटककर्त्याचेच म्हणून ज्ञात आहे. काहींचा असा तर्क आहे की ज्याप्रमाणे ललितादित्य मुक्तापीडाने अभिनवगुप्ताच्या अत्रिगुप्त नामक पूर्वजास काश्मीरला आग्रहाने बोलावून घेतले होते तसे त्याने यशोवर्म्याचा पराभव केल्यावर भवभूतीसही आपल्या राजसभेत आणले असावे आणि भवभूतीने काश्मीरात परात्रीशिकेवरील आपली टीका लिहिली असावी. पण हा तर्क पटत नाही. भवभूतीची त्या कालात काश्मीरात अशी ख्याति झाली असती तर त्याच्या नाटकातील कित्येक पद्ये नवव्या शतकाच्या उत्तरार्धातील काश्मीरक साहित्यशास्त्रकार आनन्दवर्धन यांच्या 'ध्वन्यालोका'त उदाहरणरूपाने आढळली असती. पण तसे एकही पद्य त्यात उद्‍धृत केलेले दिसत नाही. दहाव्या शतकाच्या उत्तरार्धात मात्र भवभूतीच्या

---

४. एक कल्याण अभिनवगुप्तानंतर होऊन गेला. त्याचा काळ सुमारे सन १२०० आहे. तो हा 'परात्रीशिकेचा' व्याख्याता नव्हे. K. C. Pandey, *Abhinavagupta*, p. 262.

ग्रंथांचा काश्मीरात प्रवेश झालेला दिसतो. कारण त्या काळी झालेल्या कुन्तकाने 'वक्रोक्तिजीवित'त आणि अभिनवगुप्ताने नाट्यशास्त्रावरील टीकेत भवभूतीच्या नाटकातून काही पद्ये घेतलेली दिसतात.

**समाजस्थिति**—भवभूतीच्या काळी सध्याप्रमाणेच चातुर्वर्ण्यव्यवस्था प्रचलित होती. ती श्रमविभागाच्या तत्त्वावर आधारली असल्याने समाजाच्या स्थैर्यास आवश्यक आहे असे प्राचीन धर्मशास्त्रकारांचे मत होते. ती बिघडू न देणे हे राजाचे प्रमुख कर्तव्य मानले जात असे. याचा उल्लेख अगदी खिस्तीशकाच्या आरंभापासून-च्या कोरीव लेखात येतो. या व्यवस्थेनुसार प्रत्येक वर्णाला त्याची कर्तव्ये धर्मसूत्रात व स्मृतींत सांगितली आहेत. त्यातील नियमाप्रमाणे शूद्राला तपश्चर्या करण्याचा अधिकार नव्हता. शंबूक तपश्चर्या करू लागला तेव्हा त्याचा परिणाम एका बालका-च्या अकाली मृत्यूत झाला. हे कारण आकाशवाणीवरून समजल्यावर राम शम्बूकाच्या शोधार्थ विमानातून फिरू लागला आणि शेवटी त्याने शम्बूकाचा दण्डकारण्यात वध केला असे भवभूतीने 'रामायणा'स अनुसरून दाखविले आहे. भवभूति प्रखर शैवविद्याभिमानी होता. तथापि वरील वर्णन करताना त्या कृत्याच्या अन्यायाची त्याला टोचणी लागली असावी. म्हणून त्याने 'कथञ्चित् प्रहृत्य' (कसा तरी प्रहार करून) अशी रंगसूचना देऊन नंतर 'कृतं रामसदृशं कर्म' (रामाला उचित असे मी हे निष्ठुर कर्म केले) असे खेदाचे उद्गार रामाच्या तोंडी घातले आहेत.

चातुर्वर्ण्यव्यवस्थेत ब्राह्मण आणि क्षत्रिय या दोन वर्णांना महत्त्व आहे. आर्यांच्या संस्कृतीचा भारतात जो प्रसार झाला त्याला क्षत्रियांच्या शौर्याइतकेच ब्राह्मणाचे मन्त्रसामर्थ्यही कारणीभूत झाले अशी समजूत होती. तिचा उल्लेख अनेक वैदिक सूक्तांत आला आहे. 'महावीरचरिता'त विश्वामित्र शतानन्दाला उद्देशून म्हणतात—

> न तस्य राष्ट्रं व्यथते न रिष्यति न जीर्यति ।
> त्वं विद्वान् ब्राह्मणो यस्य राष्ट्रगोपः पुरोहितः ॥
> (म. च., ३, १८)

इतरत्रही त्याने ब्राह्मण आणि क्षत्रिय यांची (म्हणजे विद्वत्ता आणि पराक्रम यांची) एकी झाल्यास ते सर्व जगाला भारी होतात हे सांगितले आहे. माल्यवान् म्हणतो—

> अमोघमस्त्रं क्षत्रस्य ब्राह्मणानामनुग्रहः ।
> दुरासदं च तत्तेजः क्षात्रं च ब्रह्मसंयुतम् ॥ (म. च., २, ५)

भवभूतीच्या नाटकांत विद्वान् आणि तपस्वी ब्राह्मणाविषयी पराकाष्ठेचा आदर दाखविला आहे. विश्वामित्रासारखे ऋषि हे वेदांसारखे. त्यांच्या ठिकाणी दोष संभवत

नाहीत. पुष्पयानाच्या वर्णनात तेच प्रमाणभूत होत, असे राम म्हणतो (म. च. १, ३८). ज्यांना परज्योतीचा (ब्रह्माचा) साक्षात्कार झाला त्यांचे शब्द नेहमी खरे होतात. अर्थ त्यांच्या शब्दामागे धावत येतो, असे भवभूतीने म्हटले आहे. असे महर्षि नेहमी यज्ञयागादींच्या अनुष्ठानात आणि अध्ययनअध्यापनात गढलेले, ते आहिताग्नि असल्यामुळे आपल्या आश्रमाबाहेर फार काळ राहू शकत नव्हते (बाह्येषु न चिरमारण्यकास्तिष्ठन्ति। म. च., अ. २). त्यांचे जीवन सदैव पवित्र आणि परोपकारी असे, असे भवभूतीने दाखविले आहे.

आता आपण भवभूतीच्या विवाहविषयक विचाराचे अवलोकन करू. भवभूतीने 'महावीरचरित' आणि 'उत्तररामचरित' नाटकात सीता व राम यांच्या आणि 'मालतीमाधव' त मालती व माधव आणि मदयन्तिका व मकरंद यांच्या विवाहाचे वर्णन केले आहे. यांपैकी पहिला ब्राह्म विवाह होता. जरी रामाला पाहताच सीतेचे मन त्याच्याकडे आकृष्ट झाले, पुढे त्याने अहल्येला पापमुक्त करताच त्याच्या प्रभावामुळे तिच्या मनात अनुराग उत्पन्न झाला, तसेच रामालाही तिचे दर्शन अमृत-वर्तीसारखे नयनाह्लादक वाटले, तरी त्या विवाहात विश्वामित्रानेच पुढाकार घेतला होता ( यत्र दाता महीदाता न स्वयं कुशिकनन्दनः । ) असे भवभूतीने दाखविले आहे. शिवाय या प्रसंगी सीतेचे वय अगदी लहान–आठ–दहा वर्षांचे होते असे त्याने 'उत्तररामचरिता' त वर्णिले आहे. त्या काळचे सीतेचे वर्णन पाहा–

प्रतनुविरलैः प्रान्तोन्मीलन्मनोहरकुन्तलै–
दशनमुकुलैर्मुग्धालोकं शिशुर्दधती मुखम् ।
ललितललितैर्ज्योत्स्नाप्रायैरकृत्रिमविभ्रमै–
रकृत मधुरैरम्बानां मे कुतूहलमङ्गकैः ।।

प्रेमविवाहाला युवक-युवतींचे परस्परांविषयी दृढ आकर्षण असले पाहिजे. अंगिरस् ऋषींनी म्हटले आहे की ज्या स्त्रीकडे आपले मन आणि डोळे ही दोन्ही आकृष्ट होतात तिच्याच संबंधामुळे समृद्धि प्राप्त होते. तेव्हा केवळ रूपाकडे लक्ष न देता वधूवरांनी परस्परांचे गुणही लक्षात घेतले पाहिजेत तरच ही जन्माची गाठ सुखावह होईल.'

मालती, कामन्दकीने सुचविल्याप्रमाणे, माधवाचा हात धरून निघून जाण्याचे साहस प्रथम करत नाही. उलट ती म्हणते, 'माझे थोर बाबा, माझी निर्मल कुलातील माता आणि माझे निष्कलंक कुल हीच मला प्रिय आहेत. त्यांच्या पुढे माझे प्राण आणि माझा प्रियकर ह्यांची मला मातबरी वाटत नाही ( मम तु दयितं श्लाघ्यस्तातो जनन्यमलान्वया कुलममलिनं न त्वेवायं जनो न च जीवितम्.॥ मा. मा. २, २ ).' यावरून प्रेमविवाह झाला तरी तो वडील मंडळींच्या संमतीनेच केला पाहिजे असे भवभूतीचे मत होते असे काही विद्वानांनी प्रतिपादिले आहे. पण त्यात तथ्य नाही. शेवटी मालतीने साहस केलेच की नाही! मालतीमाधवाचा विवाह व्हावा अशी भूरिवसूची आन्तरिक इच्छा होती, पण ती मालतीस माहीत नव्हती. शिवाय मकरन्दा-बरोबर निघून जाताना मदयन्तिकेने आपल्या भावाला कोठे विचारले होते? तेव्हा वडील मंडळींच्या संमतीविषयी वरीलसारखे अनुमान काढणे योग्य होणार नाही.

भवभूतीचे कौटुंबिक जीवनासंबंधीचे विचार अत्यंत उदार होते हे मागे दाखविले आहे. पति व पत्नी यांचे प्रेम सदैव अखंड राहावे, त्यांनी परस्परास अत्यंत जिवलग मित्र, प्रेमळ नातलग, आपला श्रेष्ठ निधि, किंबहुना जीव की प्राण मानावे, परस्परांच्या सहवासाने मनातील सर्व आडपडदे दूर होऊन त्यांच्यामध्ये निःसीम प्रेमच शिल्लक राहावे, असा अत्यंत उदात्त उपदेश त्याने केला आहे. 'उत्तररामचरिता'त सीते-विषयी शोक करताना रामाने तिला 'प्रियस्तोकवादिनी' असे म्हटले आहे. त्यावरून भवभूतीला स्त्रियांनी मितभाषी असावे असे वाटत असावे. मूल ही मातापित्यांच्या हृदयांना बांधलेली आनंदाची गाठ आहे असे त्याने म्हटले आहे. सुखी कौटुंबिक जीवनाचा उच्च आदर्श त्याने आपल्या नाटकांत घालून दिला आहे.

प्रसंगानुरोधाने त्याने इतरही सामाजिक सद्गुणांचे प्रतिपादन केले आहे. पूज्य गुरुजनांविषयी आदर, मित्रप्रेम, सर्वांशी प्रेमवर्तन, आपल्या नोकरचाकरांविषयी सौजन्य, आपल्या शत्रूंचेही गुणग्रहण, दुसऱ्यांच्या मतांविषयी आदर, परहितनिरतत्व इत्यादि कौटुंबिक आणि सामाजिक जीवन सुखी करण्यास आवश्यक असलेल्या सद्गुणांची मनोहर चित्रे त्याने आपल्या नाटकांत काढली आहेत. भवभूति हा कौटुंबिक सुखाचा उद्गाता आहे.

पुढे खिस्तोत्तर तिसऱ्या–चौथ्या शतकात मुलींचे बालविवाह प्रचारात येऊ लागले. त्या अगोदर 'मनुस्मृती'त योग्य वर न मिळाल्यास ऋतुमती कन्येने जन्मभर पितृगृही राहावे असे म्हटले होते. पण तिसऱ्या–चौथ्या शतकातील याज्ञवल्क्य स्मृतीत कन्येचा रजोदर्शनापूर्वी विवाह करावा; नाही तर तिच्या प्रत्येक रजोदर्शनाच्या वेळी पित्याला भ्रूणहत्येचे पातक लागेल असे म्हटले आहे. (या. स्मृ. १, ६४). या काळात रामायणात प्रक्षेप घालून सीतेचे वय विवाहप्रसंगी ७।८ वर्षांचे होते असे दाखविण्याचा प्रयत्न झाला. विवाहानंतर आणि वनवासापूर्वी सीता अयोध्येत एक वर्ष होती या अर्थाचे पूर्वीचे वचन बदलून ती तेथे बारा वर्षे होती अशा पुढील पाठ घालण्यात आला–

उषित्वा द्वादश समा इक्ष्वाकूणां निवेशने ।
भुञ्जाना मानुषान् भोगान् सर्वकामसमृद्धिनी ॥
(रामायण (निर्णयसागर प्रत), अरण्य, ४७, ४.)

भवभूतीच्या काळी हा पाठ प्रचलित असल्याने त्याने आपल्या दोन्ही रामचरित-विषयक नाटकात सीतेचा बालविवाह झाला होता असे वर्णिले आहे.

'मालतीमाधवा'त मात्र त्याच्यावर असे बंधन नव्हते म्हणून मालती–माधव आणि मकरन्द–मदयन्तिका यांना प्रौढ गांधर्व विवाह त्याने वर्णिला आहे.

भवभूतीच्याही पूर्वी निदान तीन चारशे वर्षांपासून भारतात मदनाची देवालये बांधली जात असत. मदनाचा महोत्सव चैत्र शुक्ल त्रयोदशीस केला जात असे असे वात्स्यायनाच्या 'कामसूत्रा'वरून दिसते. त्याची सर्व व्यवस्था त्या त्या ठिकाणच्या महिलासमाजाकडे असे. अशा देवालयासमोर विस्तीर्ण उद्याने असत. त्यांना मदनो-द्यान असे नाव असे. अशा उत्सवात मदनोत्सवाच्या प्रसंगी युवक–युवतींना परस्परांची दृष्टादृष्ट किंवा भेट होण्याची संधि मिळत असे. अशा एका मदनोत्सवात वसंतसेनेने चारुदत्ताला पाहिले तेव्हा तिचे मन त्याच्यावर बसले. मालतीने माधवाला आपल्या वाड्यासमोरच्या रस्त्याने जातायेताना अनेकवार पाहिले असले तरी त्यांची पहिली दृष्टादृष्ट मदनोत्सवात झाली आणि ती दोघे एकमेकाकडे आकृष्ट झाली. भवभूति म्हणतो, 'अशा आकर्षणाची कारणमीमांसा करता येत नाही; कारण–

व्यतिषजति पदार्थानान्तरः कोऽपि हेतु–
र्न खलु बहिरुपाधीन् प्रीतयः संश्रयन्ते ।
विकसति हि पतङ्गस्योदये पुण्डरीकं
द्रवति च हिमरश्मावुद्गते चन्द्रकान्तः ॥
(मा. मा., १,२७)

प्रेमविवाहाला युवक–युवतींचे परस्पराविषयी दृढ आकर्षण असले पाहिजे. अंगिरस् ऋषींनी म्हटले आहे की ज्या स्त्रीकडे आपले मन आणि डोळे ही दोन्ही आकृष्ट होतात तिच्याच संबंधामुळे समृद्धि प्राप्त होते. तेव्हा केवळ रूपाकडे लक्ष न देता वधूवराली परस्परांचे गुणही लक्षात घेतले पाहिजेत तरच ही जन्माची गाठ सुखावह होईल.'

मालती, कामन्दकीने सुचविल्याप्रमाणे, माधवाचा हात धरून निघून जाण्याचे साहस प्रथम करत नाही. उलट ती म्हणते, 'माझे थोर बाबा, माझी निर्मळ कुलातील माता आणि माझे निष्कलंक कुल हीच मला प्रिय आहेत. त्याच्या पुढे माझे प्राण आणि माझा प्रियकर ह्यांची मला मातब्बरी वाटत नाही ( मम तु दयितः श्लाघ्यस्तातो जनन्यमलान्वया कुलममलिनं न त्वेवायं जनो न च जीवितम् ॥ मा. मा. २, २ ).' यावरून प्रेमविवाह झाला तरी तो वडील मंडळींच्या संमतीनेच केला पाहिजे असे भवभूतीचे मत होते असे काही विद्वानांनी प्रतिपादिले आहे. पण त्यात तथ्य नाही. शेवटी मालतीने साहस केलेच की नाही ? मालतीमाधवाचा विवाह व्हावा अशी भूरिवसूची आन्तरिक इच्छा होती, पण ती मालतीस माहीत नव्हती. शिवाय मकरन्दाबरोबर निघून जाताना मदयन्तिकेने आपल्या भावाला कोठे विचारले होते ? तेव्हा वडील मंडळींच्या संमतीविषयी वरीलसारखे अनुमान काढणे योग्य होणार नाही.

भवभूतीचे कौटुंबिक जीवनासंबंधीचे विचार अत्यंत उदार होते हे मागे दाखविले आहे. पति व पत्नी यांचे प्रेम सदैव अखंड राहावे, त्यांनी परस्परास अत्यंत जिवलग मित्र, प्रेमळ नातलग, आपला श्रेष्ठ निधि, किंबहुना जीव की प्राण मानावे, परस्परांच्या सहवासाने मनातील सर्व आटपटे दूर होऊन त्यांच्यामध्ये निःसीम प्रेमच शिल्लक राहावे, असा अत्यंत उदात्त उपदेश त्याने केला आहे. 'उत्तररामचरिता'त सीतेविषयी शोक करताना रामाने तिला 'प्रियतोकवादिनी' असे म्हटले आहे. त्यावरून भवभूतीला स्त्रियांनी मितभाषी असावे असे वाटत असावे. मूल ही मातापित्यांच्या हृदयांना बांधलेली आनंदाची गाठ आहे असे त्याने म्हटले आहे. सुखी कौटुंबिक जीवनाचा उच्च आदर्श त्याने आपल्या नाटकात घालून दिला आहे.

प्रसंगानुरोधाने त्याने इतरही सामाजिक सद्गुणांचे प्रतिपादन केले आहे. पूज्य गुरुजनांविषयी आदर, मित्रप्रेम, सर्वांशी प्रेमवर्तन, आपल्या नोकरचाकरांविषयी सौजन्य, आपल्या शत्रूंचेही गुणग्रहण, दुसऱ्याच्या मताविषयी आदर, परहितनिरतत्व इत्यादि कौटुंबिक आणि सामाजिक जीवन सुखी करण्यास आवश्यक असलेल्या सद्गुणांची मनोहर चित्रे त्याने आपल्या नाटकांत काढली आहेत. भवभूति हा कौटुंबिक सुखाचा उद्गाता आहे.

**राजकारण**--भवभूतीच्या नाटकाचे विषय राजचरित हे नसल्यामुळे त्याने राजाचे गुण, त्याची कर्तव्ये, त्याने प्रजेकडून घ्यावयाचा करभार, त्याचा राज्यकारभार याविषयी फारसे विचार व्यक्त केले नाहीत. तथापि राज्यकारभाराचे ध्येय काय असावे यावर त्याने आपल्या एका नाटकाची उभारणी केली आहे. फार प्राचीन काळापासून प्रजानुरंजन हे राजाचे मुख्य कर्तव्य मानण्यात आले आहे. कालिदासाने नृपतिवाचक 'राजन्' हा शब्द 'राज् शोभणे' या धातूपासून न व्युत्पादिता 'रञ्ज् अनुरंजन करणे' यापासून काढला आहे. यथा प्रह्लादनाच्चन्द्रः प्रतापात्तपनो यथा। तथैव सोऽभूदन्वर्थो राजा प्रकृतिरञ्जनात् ॥ (रघु. ४, १२) असे त्याने रघुविषयी म्हटले आहे. वसिष्ठ ऋषींनीही 'तू प्रजेला संतुष्ट राखण्यात सदैव व्यापृत राहावे' असा निरोप रामाला ऋष्यशृंगाच्या आश्रमातून पाठविला आहे. या एका कर्तव्याच्या परिपालनाकरिता रामाने आपले प्रेम, दया, सौख्य किंबहुना आपली प्रिय पत्नी सीता हिचाही त्याग केला आणि जगासमोर राजकर्तव्याचा उच्च आदर्श घालून दिला. तेव्हापासून रामराज्य म्हणजे आदर्श राज्य हा अर्थ झाला सर्वसंमत झाला आहे.

या प्रमुख कर्तव्यातून इतर राजकर्तव्ये उत्पन्न होतात. दण्डकारण्यातील राक्षस तेथील तपस्वीजनांना त्रास देत होते म्हणून आलेल्या सन्धीचा फायदा घेऊन रामाने वनवासात जाण्याचे ठरविले, असे 'महावीरचरिता'त दाखविले आहे. अपराध्याला दंड करणे हे राजाचे कर्तव्य आहे खरे, पण ते करताना कोणाला अन्याय होणार नाही याची त्याने काळजी घेतली पाहिजे. अज्ञानाने, चुकीच्या समजुतीने किंवा संशयाने मनुष्याच्या हातून ऐहिक किंवा पारलौकिक हिताविरुद्ध क्वचित् कृत्य झाल्यास ते समजावून देऊन राजाने त्याला योग्य मार्गावर आणले पाहिजे. पण जेथे संशय किंवा मिथ्याज्ञान नसता मुद्दाम कोणी अयोग्य मार्गाने जात असेल तर त्याला त्याने शासन केले पाहिजे. तसे केले नाही तर प्रजेचा नाश ओढवेल हे भवभूतीने पुढील श्लोकात सांगितले आहे--

अज्ञो वा यदि विपर्ययगतो ज्ञानेऽथ सन्देहभुव्
दृष्टादृष्टविरोधि कर्म कुरुते यस्तस्य गोप्ता गुरुः ।
निःसंदेहविपर्यये सति पुनर्ज्ञाने विरुद्धक्रियं
राजा चेत्पुरुषं न शास्ति तदय प्राप्तः प्रजाविप्लवः ॥

(म. च. ३, ३९)

इतरत्र (म. च., ४, २३) त्याने राजाला वैद्याची उपमा दिली आहे. जेव्हा वैद्य एखादा रोग अन्यथा असाध्य आहे असे पाहतो तेव्हा तो शस्त्रक्रिया करण्यास सिद्ध होतो. राजाने सुद्धा इतर उपायांनी शत्रूला नमविता येत नसेल तर शस्त्रदण्डाचा

उपाय योजला पाहिजे. रामाकडून पराजित झाल्यावर परशुराम वसिष्ठ-विश्वामित्रांना आपणास काही प्रायश्चित्त सांगावे म्हणून विनंती करतो. तेव्हा विश्वामित्र म्हणतात- प्रायश्चित्तमिव राजदण्डमप्येनसो निष्क्रयमामनन्ति धर्माचार्याः । ( राजाने केलेल्या दण्ड ह्याच्या योगानेही प्रायश्चित्ताप्रमाणे पापाची निष्कृति होते असे धर्माचार्य म्हणतात. )

नाटके लिहिली तेव्हा भवभूतीला राजाश्रय नव्हता. तथापि व्यवहारात त्याने थोरणी पुरुष कसे वागतात याचे निरीक्षण केले होते. मालतीच्या विवाहाच्या बाबतीत राजाची आपल्यावर गैरमर्जी होईल म्हणून माधव जणू काय आपणास माहीतच नाही असे ढोंग करणाऱ्या भूरिवसूचे वर्णन कामन्दकीने खालील श्लोकात केले आहे-

बहिः सर्वाकारप्रगुणरमणीयं व्यवहरन्-
 परास्पूहस्यानान्यपि तनुतराणि स्थगयति ।
जनं विद्वानेकः सकलमतिसंधाय कपटै-
 स्तटस्थ. स्वानर्थान् घटयति च मौनं च भजते ॥
 ( मा. मा., १, १७ )

( खरा शहाणा मनुष्य बाहेरून सर्व प्रकारे गोड रीतीने वागतो, लोकास तर्काने समजतील अशा आपल्या लहान सहान गोष्टींवरही आवरण घालतो. आणि याप्रमाणे कपटाने सर्वांना ठकवून आणि स्वतः नामानिराळा राहून आपले कार्य साधतो, पण त्याविषयी चर्चा करीत नाही. )

भवभूतीने आपल्या नाटकात मधून मधून स्वानुभवाचे बोल घातले आहेत. उदाहरणार्थ, पुढील उक्ति पाहा -प्रभुरिव पुनः कार्ये कार्ये भवत्यतिकर्कशः । ( म. च., २, ११ ) ( स्वामी हा प्रत्येक कार्य निष्ठुरपणे करून घेतो. )

**शिक्षण** -यानंतर आपण भवभूतीच्या शिक्षणविषयक विचाराकडे वळू. भवभूतीच्या काळी भारतात काही ठिकाणी नामांकित विद्यापीठे निर्माण झाली होती. मगधात नालंदा आणि सौराष्ट्रात वलभी या त्या काळच्या विद्यापीठांचा उल्लेख चिनी यात्रेकरूंच्या प्रवासवर्णनात आला आहे. या प्रकारचेच एक नामांकित विद्यापीठ पद्मावतीस त्या काळी अस्तित्वात आले होते असे दिसते. म्हणून विदर्भासारख्या दूर देशाच्या देवरात नामक अमात्याने *आन्वीक्षिकी (अध्यात्म) विद्येच्या अध्ययना*करिता आपला पुत्र माधव आणि त्याचा बाल्यपणापासूनचा मित्र मकरन्द याला तेथे पाठविले होते. यात कदाचित् भवभूतीच्या स्वतःच्या चरित्राचे प्रतिबिंब पडले असेल. बौद्ध परमहंस ज्ञाननिधि नामक संन्याशाजवळ वेदान्ताचे अध्ययन करण्यास पद्मावतीस आलेला दिसतो. पद्मावतीच्या विद्यापीठात हिंदू त्याप्रमाणेच बौद्ध धर्माचे शिक्षण दिले जात असे आणि तेथे विद्यार्थी आणि विद्यार्थिनी एकत्र शिकत असत. देवरात,

भूरिवसु आणि कामन्दकी ही सर्व जेथे एकत्र शिकत होती ते विद्यापीठ पद्मावतीचेच असावे. कामन्दकीने पुढे बौद्ध धर्म स्वीकारला आणि श्रावकावस्थेमध्ये तिने सौदामिनीला आपली विद्यार्थिनी केले होते. सौदामिनीच्या समक्ष देवरात आणि भूरिवसु यांनी विद्यार्थीदशेत प्रतिज्ञा केली होती की आपणाला पुढे जी मुले होतील त्यांचा यथायोग्य विवाहसंबंध घडवून आणावा. पुढे या विद्यार्थीविद्यार्थिनी पांगल्या. कामन्दकी बौद्ध भिक्षुणी होऊन पद्मावतीसच बौद्ध विहारिकेत राहू लागली. देवरात विदर्भाचा आणि भूरिवसु पद्मावतीचा अमात्य झाला. सौदामिनीने तत्रशास्त्राचा अभ्यास करण्याकरिता दूरच्या श्रीशैलपर्वतावरील शाक्त केंद्राकडे गमन केले आणि गुरुचर्या, तप, तन्त्र, मन्त्र इत्यादिकांच्या योगे आक्षेपिणी सिद्धि प्राप्त करून घेतली. चिनी यात्रेकरू ह्यूएनत्संग याने नालंदा व वलभी या विद्यापीठांविषयी अशीच माहिती लिहून ठेवली आहे. ती विद्यापीठे बौद्ध असली तरी तेथेही वेद, व्याकरण, बौद्धेतर दर्शने यांचेही अध्ययन–अध्यापन होत असे.

या विद्यापीठांत साहित्य, व्याकरण, दर्शने वगैरेंबरोबर कलांचेही शिक्षण दिले जात असावे. माधव चित्रकलेत अत्यंत निपुण असा दाखविला आहे. तो थोड्या वेळात कलहंसाने आणलेल्या फलकावर मालतीचे अगदी हुबेहूब चित्र काढतो. तो आणि त्याचा मित्र मकरन्द शस्त्रविद्येतही निपुण होते. दोघांनी अनेक नगररक्षकांशी आणि सैनिकांशी यशस्वी सामना दिला होता. ही शस्त्रविद्या त्यांनी स्वदेशी विदर्भांत किंवा पद्मावतीस आल्यावर संपादन केली होती याचा उल्लेख 'मालतीमाधवा'त आला नाही.

प्रौढ विद्यार्थी आणि विद्यार्थिनी यांचे शिक्षण एकत्र होत असे हे मागे दाखविले आहे. याशिवाय श्रीमंत लोक आपल्या मुलामुलींचे शिक्षण शिक्षक ठेवून घरी करीत असत. मालतीचे शिक्षण असे घरी झालेले दिसते. 'मालतीमाधवा'च्या दुसऱ्या अंकाच्या आरंभी भूरिवसूच्या वाड्यातील संगीतशाळेचा उल्लेख आहे. तेथे मालतीने कलांचे शिक्षण घेतले असावे. तीही चित्रकलेत चतुर होती असे तिने काढलेल्या माधवाच्या चित्रावरून दिसते.

'उत्तररामचरिता'तील दोन प्रवेशांत वाल्मीकीच्या आश्रमातील शिक्षणाचा उल्लेख आला आहे. त्यांत भवभूतीने काही शिक्षणविषयक तत्त्वे सूचित केली आहेत. अर्थात हे उल्लेख संविधानकाच्या अनुषंगाने आले आहेत तरीही महत्त्वाचे आहेत.

'उत्तररामचरिता'च्या दुसऱ्या अंकातील विष्कम्भकावरून आपणास कळते की आत्रेयी नामक एक प्रौढ विद्यार्थिनी वाल्मीकीच्या आश्रमात कुश लवांबरोबर अध्ययन करीत होती. पण त्यांच्यासारख्या कुशाग्रबुद्धीच्या विद्यार्थ्यांबरोबर विद्याभ्यास करणे तिला जमेना; कारण–

वितरति गुरुः प्राज्ञे विद्यां यथैव तथा जडे
न तु खलु तयोर्ज्ञाने शक्तिं करोत्यपहन्ति वा ।
भवति च पुनर्भूयान्भेदः फलं प्रति तद्यथा
प्रभवति शुचिर्बिम्बोद्ग्राहे मणिर्न मृदां चयः ।।

म्हणून ती दूरच्या गोदातीरच्या अगस्त्याश्रमात वेदान्तविद्येच्या अध्ययनाकरिता आली होती. या घटनेवरून एक महत्त्वाचे शिक्षणतत्त्व लक्षात येते. ते म्हणजे कुशाग्रबुद्धि आणि मन्दबुद्धि विद्यार्थ्यांना एकत्र न शिकविता त्यांचे वेगवेगळे वर्ग करावे. तसे केले नाही आणि मंदबुद्धि विद्यार्थ्यांच्या पातळीवर विषय शिकविला तर कुशाग्रबुद्धि विद्यार्थ्यांच्या वेळेचा अपव्यय होईल. याच्या उलट कुशाग्रबुद्धि विद्यार्थ्यांस पुरेल इतकेच अध्यापन केल्यास मंदबुद्धि विद्यार्थ्यांस विषयाचे आकलन होणार नाही. तेव्हा या दोन प्रकारच्या विद्यार्थ्यांचे वेगवेगळे वर्ग घेणे लागले.

आत्रेयीने वर उल्लेखिलेल्या प्रवेशात वाल्मीकीच्या आश्रमातून दंडकारण्यातील अगस्त्याश्रमात वेदान्तविद्येच्या अध्ययनाकरिता येण्याला कारण झालेल्या दुसऱ्याही एका गोष्टीचा उल्लेख केला आहे. त्यातूनही एक शैक्षणिक तत्त्व सूचित होत आहे. ती म्हणते, 'काही दिवसांपूर्वी वाल्मीकि ऋषि तमसातीरी स्नानास गेले असता एका व्याधाने क्रौञ्च पक्ष्यांच्या जोडप्यातून काममोहित अशा एकाला ठार करताना त्यांनी पाहिले. तेव्हा दुःखाने त्यांच्या तोंडून 'मा निषाद' इत्यादि श्लोक बाहेर पडला. ब्रह्मदेवानी तेथे प्रकट होऊन त्यांना रामचरित वर्णन करण्यास सांगितले. ते लिहिण्यात ते गुंतले असल्यामुळे माझ्या सारख्या विद्यार्थी-विद्यार्थिनींना शिकविण्याकरिता त्यांना वेळ मिळत नाही. म्हणून माझ्या विषयाच्या अध्ययनाकरिता मला इतका दूरचा प्रवास अंगीकारावा लागला.' भवभूतीने हे कारण अर्थात आपल्या नाटकाच्या संविधानकाच्या दृष्टीने दिले आहे. वाल्मीकींना दोष देण्याचा त्याचा हेतु नव्हता. पण त्यातून एक महत्त्वाचे शिक्षणतत्त्व सूचित होत आहे. अलीकडे विद्यापीठातून किंवा महाविद्यालयातून कित्येकदा अशी परिस्थिति दिसते की नामांकित अध्यापकांना दुसरे एखादे व्यवस्थापनासारखे काम सांगण्यात येते. किंवा ते स्वतःच्या प्रेरणेने संशोधनासारख्या अध्यापनव्यतिरिक्त अन्य विषयात व्यापृत होतात. त्यामुळे त्यांचे मुख्य कर्तव्य जे अध्यापन ते नीट होत नाही, आणि त्यांच्या विद्यार्थ्यांचे नुकसान होते. याकरिता प्रत्येक अध्यापकाने आपले प्रधान कर्तव्य कोणते ते ठरवून त्याला बाध न येईल अशा रीतीने आपली इतर कामे केली पाहिजेत. आणि त्यांच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांनीही त्यांना इतर कामे सांगताना त्यामुळे त्यांच्या मुख्य कर्तव्याला बाध येणार नाही अशी काळजी घेतली पाहिजे.

## प्रकरण दहावें

# भवभूति आणि उत्तरकालीन संस्कृत नाटककार

मान्यो जगत्यां भवभूतिरार्यः सारस्वते वर्त्मनि सार्थवाहः ।
वाचं पताकामिव यस्य दृष्ट्वा जनः कवीनामनुपृष्ठमेति ॥

सोड्ढलकृत ‘उदयसुन्दरीकथा’, पृ. १५४.

प्राचीन काळी व्यापाराचे रस्ते सुरक्षित नसत तेव्हा अनेक व्यापारी मिळून एका व्यापारी केंद्राकडून दुसऱ्या केंद्राकडे जात असत. अशा व्यापाऱ्यांच्या ताफ्याला ‘सार्थ’ अशी संज्ञा असे. त्यांच्या पुढाऱ्याला ‘सार्थवाह’ म्हणत. ‘उदयसुंदरी’कर्ता सोड्ढल याने भवभूतीला साहित्यमार्गावरील सार्थवाह किंवा तांडेल म्हटले आहे. सार्थवाहाची मालानें भरलेली गाडी सर्वांत पुढे असे. तिचे एक निशाण असे. त्या निशाणाच्या अनुरोधाने बाकीचे व्यापारी आपल्या गाड्या हाकीत असत. तसेच भवभूतीचे ग्रंथ पाहून तदनुसार त्याच्या नंतरच्या कवींनी आपले ग्रंथ रचले आणि त्यांच्या मागून लोक जाऊ लागले. अर्थातच त्याचे ग्रंथ लोकात प्रसार पावले, असा सोड्ढलाच्या वरील श्लोकाचा आशय आहे. प्रस्तुत प्रकरणात भवभूतीचा उत्तरकालीन ग्रंथकारांवर कसा प्रभाव पडला आहे हे आपणास पाहावयाचे आहे.

### पूर्वकालीन नाटककार

भवभूतीच्या पूर्वीचे संस्कृत नाटककार अश्वघोष, भास व कालिदास हे होत. अश्वघोषाचे ‘सारिपुत्रप्रकरण’ हे बुद्धचरित्रातील एका घटनेविषयी आहे. त्यात बुद्धाने सारिपुत्र ( शारिपुत्र ) आणि मौद्‌गल्यायन यांना बौद्ध धर्माची कशी दीक्षा

भवभूतीने सुसंस्कृत गृहस्थ कसा असावा याचे चित्र खालील श्लोकात काढले आहे–

शास्त्रेषु निष्ठा सहजश्च बोधः
प्रागल्भ्यमभ्यस्तगुणा च वाणी ।
कालानुरोधः प्रतिभानवत्त्व–
मेते गुणाः कामदुघाः क्रियासु ।।

( मा. मा., ३, ११ )

( शास्त्राविषयी निष्ठा, स्वाभाविक आकलनशक्ति, धीटपणा, कमावलेली वाणी, योग्यायोग्य काळाचा विचार आणि समयसूचकता–सुसंस्कृत गृहस्थाच्या या गुणानी त्याला सर्व कृत्यात यश मिळते. )

## प्रकरण दहावें

# भवभूति आणि उत्तरकालीन संस्कृत नाटककार

मान्यो जगत्यां भवभूतिरार्यः सारस्वते वर्त्मनि सार्थवाहः ।
वाचं पताकामिव यस्य दृष्ट्वा जनः कवीनामनुपृष्ठमेति ॥

सोड्ढलकृत ' उदयसुन्दरीकथा ', पृ. १५४.

प्राचीन काळी व्यापाराचे रस्ते सुरक्षित नसत तेव्हा अनेक व्यापारी मिळून एका व्यापारी केंद्राकडून दुसऱ्या केंद्राकडे जात असत. अशा व्यापाऱ्यांच्या तांड्याला ' सार्थ ' अशी संज्ञा असे. त्याच्या पुढाऱ्याला ' सार्थवाह ' म्हणत. ' उदयसुंदरी 'कर्ता सोड्ढल याने भवभूतीला साहित्यमार्गावरील सार्थवाह किंवा वाटेल म्हटले आहे. सार्थवाहाची मालाने भरलेली गाडी सर्वांत पुढे असे. तिचे एक निशाण असे. त्या निशाणाच्या अनुरोधाने वाटेने व्यापारी आपल्या गाड्या हाकीत असत. तसेच भवभूतीचे ग्रंथ पाहून तदनुसार त्याच्या नंतरच्या कवींनी आपले ग्रंथ रचले आणि त्याच्या मागून लोक जाऊ लागले. अर्थातच त्याचे ग्रंथ लोकांत प्रचार पावले, असा सोड्ढलाच्या वरील श्लोकाचा आशय आहे. प्रस्तुत प्रकरणात भवभूतीचा उत्तरकालीन ग्रंथकारांवर कसा प्रभाव पडला आहे हे आपणास पाहावयाचे आहे.

### पूर्वकालीन नाटककार

भवभूतीच्या पूर्वीचे संस्कृत नाटककार अश्वघोष, भास व कालिदास हे होत. अश्वघोषाचे ' शारिपुत्रप्रकरण ' हे बुद्धचरित्रातील एका घटनेविषयी आहे. त्यात बुद्धाने शारिपुत्र ( शारिपुत्र ) आणि मौद्गल्यायन यांना बौद्ध धर्माची कशी दीक्षा

दिली हे संविधानक आहे. या नाटकाच्या हस्तलिखिताच्या तुकड्याबरोबर आणखीही एका प्रकरणाच्या हस्तलिखिताचे तुकडे मध्य आशियात सापडले होते. त्यावरून अश्वघोषाच्या काळी दुसरे एक प्रकरण ( सामाजिक नाटक ) रचले होते असे दिसते. ते ' मृच्छकटिका 'च्या धर्तीचे असून त्यात नायक, वेश्या, विदूषक, दुष्ट इत्यादि पात्रे होती. उपलब्ध झालेल्या तुकड्यावरून त्याच्या संविधानकाविषयी जास्त माहिती मिळत नाही.

अश्वघोषानंतर होऊन गेलेल्या संस्कृत नाटककार भास याने प्रथम रामचरित्रावर नाटके लिहिण्याचा उपक्रम केला. याची ' प्रतिमा ' आणि ' अभिषेक ' अशी दोन नाटके रामचरितविषयक आहेत. पहिल्यात रामाच्या वनवासापासून रावणवधानंतर त्याला अयोध्येला आल्यावर अभिषेक झाला तेथपर्यंत कथाभाग आला आहे. भासाने या अवधीतील काही निवडक घटनाचाच आपल्या नाटकाच्या संविधानकात अंतर्भाव केला आहे. पूर्वरामचरितातील तथाकथित आक्षेपार्ह घटना तीन–(१) कैकेयीने दशरथाकडून आपले दोन वर मागून घेऊन राम, लक्ष्मण व सीता यांना वनात पाठवणे, (२) पंचवटीत सुवर्णमृगरूपी मारीचाच्या मागे लागून राम दूर गेल्यावर त्या मायावी राक्षसाच्या आर्त हाकेने फसून जाऊन सीतेने रामाच्या साहाय्यार्थ न जाणाऱ्या लक्ष्मणाला वाक्ताडन करणे आणि (३) वाली सुग्रीवाबरोबर युद्ध करीत असता ताल वृक्षाच्या आडून रामाने बाण मारून त्याला घायाळ करणे–या होत. रामचरितविषयक नाटके लिहिलेल्या बहुधा प्रत्येक संस्कृत कवीने वाल्मीकीच्या कथेत बदल करून कैकेयी, सीता व राम यांना दोषमुक्त करण्याचा प्रयत्न केला आहे. भासानेही तसा प्रयत्न केला आहे. इतर कवींप्रमाणे त्याने मूळ कथेत फारसे फरक केले नाहीत. पण ' प्रतिमा ' नाटकात कैकेयी व सीता निर्दोष होत्या असे दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. त्या नाटकाच्या सहाव्या अंकात भरताने रामादिकांच्या कुशलाची वार्ता आणण्याकरिता पाठविलेला सुमन्त्र जेव्हा रावणाने सीताहरण केल्याची बातमी सांगतो, तेव्हा भरत कैकेयीची निर्भर्त्सना करतो. त्या प्रसंगी ती म्हणते ' पूर्वी महाराज दशरथांनी एका ऋषिकुमाराला न कळत बाण मारून ठार केले. त्यावेळी त्याच्या पित्याने शाप दिला होता की तुलाही माझ्याप्रमाणेच पुत्रशोकाने मृत्यु येईल. तो शाप अपरिहरणीय असल्यामुळे स्वतःला दोषास्पद करून रामाला वनात पाठविणे मला भाग पडले. ' ' पण, रामाच्याऐवजी मला का पाठविले नाहीस ? ' असे भरताने विचारताच कैकेयी उत्तरते ' मातुलगृही राहून तुला प्रवास अंगवळणी पडला होता. ' त्यावर, ' पण तू चौदा वर्षांची अटक का घातलीस ? ' असे भरताने विचारल्यावर ती म्हणते, ' मी रामाला चौदा दिवस वनात पाठवा असे म्हणणार होते, पण गडबडीत माझ्या तोंडून चौदा वर्षे असे शब्द निघाले. ' कैकेयीची ही उत्तरे ऐकल्यावर भरताचे समाधान झाल्याचे भासाने

दाखविले आहे,[1] पण सुबुद्ध वाचकांना ही कारणे पटतील असे वास्तव नाही. त्याच्या पूर्वीच्या अंकात रावण पंचवटीच्या आश्रमात आला त्यापूर्वीच रामाने लक्ष्मणाला कुलपति (अगस्त्य) यांच्याकडे पाठविल्याचे दाखवून भासाने सीतेलाही दोष मुक्त केले आहे.

भासाच्या 'अभिषेक' नामक दुसऱ्या रामचरितविषयक नाटकात 'रामायणा 'च्या किष्किंधा, सुन्दर आणि युद्ध या कांडातील कथा–सुग्रीवमैत्रीपासून अयोध्येतील रामाच्या अभिषेकापर्यंत– आली आहे. तीत वालिवधाचा प्रसंग आहे. 'मी युद्धात गुंतलो असता तू माझा प्रच्छन्न वध का केलास ?' असे वालीने विचारताच राम म्हणतो, 'तू भ्रातृपत्नीचे अपहरण केलेस म्हणून दण्डय होतास. पशूंना जाळ्यात पकडूनच मारले जाते.'[1] रामाने स्वतःच्या कृत्याचे केलेले हे समर्थन 'वाल्मीकिरामायणा 'स धरून आहे. तेव्हा एकंदरीत भासाने मूळ रामायणकथेत विशेष फरक केले नाहीत हे दिसून येईल.

भासानंतर झालेल्या कालिदासाने रामचरितविषयक नाटके लिहिली नाहीत. त्याच्या तीन्ही नाटकांचे विषय राजाच्या अन्तःपुरातील भानगडी हेच आहेत.

## भवभूतीचा नवीन उपक्रम

यानतर हर्षानेही कालिदासाच्याप्रमाणेच 'रत्नावलि' आणि 'प्रियदर्शिका' ही नाटके लिहिली. पण भवभूतीने नवीन पायंडा पाडला. संस्कृत नाट्यशास्त्रात रूपकाचे ( नाट्यकृतीचे ) दहा प्रकार मानले आहेत हे मागे सांगितले आहे. त्यातील मुख्य प्रकार दोन. नाटक आणि प्रकरण. यातील मुख्य भेद हा की 'नाटका 'चा विषय सर्वजनप्रसिद्ध असे देवचरित किंवा राजचरित असते, तर 'प्रकरणा 'चे संविधानक काल्पनिक असते. भवभूतीची 'महावीरचरित' आणि 'उत्तररामचरित' ही 'नाटके' आहेत, तर 'मालतीमाधव' हे 'प्रकरण' आहे.

संस्कृतातील नाटकचक्राचे मुख्य विषय दोन– (१) रामचरित आणि (२) वत्सराज–उदयन–चरित. या दोन विषयावर संस्कृतात अनेक नाटके लिहिली गेली. त्यापैकी फारच थोडी संख्या उपलब्ध आहेत. इतर अनेकांचे उल्लेख किंवा त्यातील श्लोक उदाहरणरूपाने अलंकारग्रंथात व नाट्यग्रंथात आढळतात. वत्सराज उदयनाचे चरित्र प्रेममय म्हणून कवींना अत्यंत प्रिय झालेले. त्यामुळे त्यावर अनेकांनी आपापल्या नाट्यकृतींची उभारणी केली असल्यास आश्चर्य नाही. तसेच भगवान् राम-

---

१. भासनाटकचक्र (सं. देवधर), पृ. ३०८–३०९.

२. पूर्वोक्त, पृ. ३२६.

चंद्राचे चरित्र अत्यंत उदात्त आणि पावन. म्हणून तेही अनेक नाटकांचा विषय झाले होते. पूर्वी अनेकांनी रामचरितावर लिहिले असता आपणही तोच विषय आपल्या नाटकाकरिता का निवडला हे सांगताना मुरारि म्हणतो—

> यदि क्षुण्णं पूर्वैरिति जहति रामस्य चरितं
> गुणैरेतावद्भिर्जगति पुनरन्यो जयति कः ।
> स्वमात्मानं तत्तद्गुणगरिमगम्भीरमधुर-
> स्फुरद्वाग्ब्रह्माणः कथमुपकरिष्यन्ति कवयः ॥
> (अ. रा., १, ९)

(पूर्वीच्या कवींनी रामचरित वर्णिले असल्यामुळे आपण दुसरा विषय घ्यावा असे म्हटले तर भगवान् रामचंद्रासारखा गुणसंपन्न पुरुष या जगात दुसरा कोण आहे? त्या त्या उदात्त गुणांचे गम्भीर आणि मधुर वर्णन करण्याकरिता ज्याची वाणी स्फुरण पावत आहे अशा कवींनी अन्यथा स्वतःला कीर्तिमान् कसे करावे?)

भवभूतीने सबंध रामचरित्र घेऊन त्यावर आपल्या दोन नाटकांची उभारणी केली आहे. 'महावीरचरिता'त विश्वामित्र ऋषि आपल्या यज्ञाच्या रक्षणार्थ रामलक्ष्मणांना घेऊन आपल्या सिद्धाश्रमात जातात तेथपासून रावणवधानंतर राम लक्ष्मण व सीता यांसह अयोध्येस परत येतो तेथपर्यंतचा भाग येणार होता, पण ते नाटक अपूर्ण राहिले हे आपण मागे पाहिले आहे. 'उत्तररामचरिता'त अभिषेकानंतर केलेल्या सीतापरित्यागापासून बारा वर्षांनंतर झालेल्या दुसऱ्या सीताशुद्धीपर्यंतचा भाग आला आहे. संपूर्ण रामचरित्रावर नाटके लिहिणारा असा भवभूति हा एकटाच संस्कृत कवि होय. इतर कवींनी रामचरिताच्या एखाद्या भागावर आपल्या नाट्यकृतीची उभारणी केली आहे. मुरारि, राजशेखर यांसारख्या काही कवींनी भवभूतीच्या 'महावीरचरिता'तल्याप्रमाणे संपूर्ण पूर्वरामचरित आपल्या नाटकाचा विषय केले आहे, तर इतर अनेकांनी पंचवटीतील रामनिवासापासून राज्याभिषेकापर्यंतचा भाग आपल्या नाट्यकृतीकरिता निवडला आहे. 'कुन्दमाला', 'छलितराम' इत्यादि काही नाटकांत उत्तररामचरितच संविधानकाकरिता घेतले आहे. यांतील प्रमुख नाटककारांविषयी संक्षेपाने माहिती देऊन त्यांच्या कृतींवर भवभूतीच्या रामचरितविषयक नाटकांचा काही प्रभाव दिसतो काय, त्यांच्या तुलनेत ती कशी वाटतात हे पाहणे मनोरंजक होईल. म्हणून तसा प्रयत्न येथे केला आहे.

भवभूतीने आपल्या नाटकाच्या संविधानकाकरिता मूळ रामायणकथेत कसे फरक केले आहेत हे त्या नाटकाविषयीच्या प्रकरणात सविस्तर दाखविले आहे. असे फरक

करणे सर्वच साहित्यशास्त्रज्ञांना संमत नव्हते. सहृदयमूर्धन्य ' ध्वन्यालोक 'कार आनन्दवर्धन याने म्हटले आहे—

सन्ति सिद्धरसप्रख्या ये च रामायणादयः ।
कथाश्रया न तैर्योज्या स्वेच्छा रसविरोधिनी ॥

(ध्वन्यालोक, पृ. ३३९)

रामायणासारखे उत्कट रसामुळे सुप्रसिद्ध झालेले जे प्राचीन ग्रंथ आहेत त्याच्या कथेमध्ये रसोत्कर्षाला जरूर नसतील किंवा त्याला विरुद्ध असतील असे फरक कवींनी केवळ आपल्या इच्छेप्रमाणे करू नयेत आणि असे फरक न करताही उत्कृष्ट नाटकरचना येते, याचे उदाहरण त्याने यशोवर्म्याने ' रामाभ्युदय ' हे दिले आहे. त्याची थोडी माहिती देऊ.

## यशोवर्म्याचे ' रामाभ्युदय '

हा यशोवर्मा भवभूतीचा उत्तर आयुष्यातील आश्रयदाता. हा महाप्रतापी दिग्विजयी राजा होता, पण त्याशिवाय तो कवि होता हे कल्हणाने ' राजतरंगिणी 'त सांगितले आहे—

कविर्वाक्पतिराजश्रीभवभूत्यादिसेवितः ।
जितो ययौ यशोवर्मा तद्गुणस्तुतिवन्दिताम् ॥

(रा. त., ४, १४४)

या सुप्रसिद्ध श्लोकात यशोवर्म्याला कवि असे स्पष्ट म्हटले आहे. त्याने ' रामाभ्युदय ' नामक नाटक रचले होते. दुर्दैवाने ते आता उपलब्ध नाही. पण त्यातील अनेक श्लोक साहित्यशास्त्रीय ग्रंथामध्ये उदाहरणे म्हणून उद्धृत केलेले आढळतात. त्यावरून त्याची उच्च प्रतिभाशक्ति व वर्णनकौशल्य ही प्रत्ययास येतात.

साहित्यशास्त्रीय ग्रंथात ' रामाभ्युदया 'विषयी जे उल्लेख आले आहेत त्यावरून त्या नाटकाविषयी बरीच माहिती संशोधकांनी जमविली आहे.[१] त्याचे सहा अंक होते. त्यात रामाच्या पंचवटीनिवासापासून राज्याभिषेकापर्यंत कथा आली होती. या नाटकाचा विशेष हा की त्यात मूळ रामायणकथेत फरक केले नव्हते. आपल्या नाटकाचे गुण सांगताना कवि सूत्रधारमुखाने म्हणतो[२]—

औचित्यं वचसां प्रकृत्यनुगतं सर्वत्र पात्रोचिता
पुष्टिस्स्वावसरे रसस्य च कथामार्गे न चातिक्रमः ।

१. V. Raghavan, *Some Old Lost Dramas*, pp. 1–26.
२. *Ibid.*, p. 7.

बुद्धिं प्रस्तुतसंविधानकविधौ प्रौढिश्च शब्दार्थयो-
र्विद्वद्भिः परिभाव्यतामवहितैरेतावदेवास्तु नः ।।

यात 'कथामार्गे न चातिक्रमः' या शब्दांनी मूळ कथेत आपण फरक केले नाहीत हे कवीने मुद्दाम सांगितले आहे. आम्हां आश्रित भवभूति याच्या नाटकांतील संविधानकात केलेले रामायणकथेतील अनेक फरक त्याला संमत झाले नसावे.

'रामाभ्युदयनाटका'तून अनेक उत्कृष्ट श्लोक साहित्यग्रंथात घेतले आहेत. वानगीदाखल त्यांतील एक देतो.

सीताहरणानंतर शोकाविष्ट झालेला राम सीतेला उद्देशून म्हणतो-

यत्त्वन्नेत्रसमानकान्तिसलिले मग्नं तदिन्दीवरं
मेघैरन्तरितः प्रिये तव मुखच्छायानुकारी शशी ।
येऽपि त्वद्गमनानुसारिगतयस्ते राजहंसा गता-
स्त्वत्सादृश्यविनोदमात्रमपि मे दैवेन न क्षम्यते ।।

[ तुझ्या नेत्रासारखे ( सुन्दर ) नीलकमल पाण्यात बुडून गेले आहे. तुझ्या मुखाच्या कान्तीचे अनुकरण करणारा चंद्र मेघाआड झाकला गेला आहे. तुझ्या गतीचे अनुसरण करणारे राजहंस आता ( मानस सरोवराकडे ) गेले आहेत. तुझे सादृश्य पाहून मनोविनोदन करावे तर तेही दैवाला सहन होत नाही. ]

यात विशेष अलंकार नसले तरी याची रचना इतकी भावपूर्ण झाली आहे की ते हृदयाला जाऊन भिडते.

## उत्तरकालीन काही नाटके

भवभूतीनंतर लौकरच 'स्वप्नदशानन' आणि 'उदात्तराघव' अशी रामचरितविषयक दोन नाटके लिहिली गेली. या दोन्हींचे कर्ते कलचुरि नामक राजवंशातील होते. पहिल्याविषयी राजशेखर म्हणतो[1]-

कालञ्जरपतिश्चक्रे भीमटः पञ्चनाटकीम् ।
प्राप प्रबन्धराजत्वं तेषु स्वप्नदशाननम् ।।

कलचुरींची पहिली राजधानी मध्यभारतात माहिष्मती (सध्याचे महेश्वर) येथे होती. खिस्तोत्तर आठव्या शतकात त्यांनी उत्तरभारतात आक्रमण करून ती कालञ्जर येथे नेली. तेथील राजापैकी भीमट याने पाच नाटके रचली होती त्यामध्ये 'स्वप्नदशानन' नामक नाटक श्रेष्ठ ठरले होते असे राजशेखर सांगतो. या नाटकातून काहीच उतारे

---

१. सू. मु., पृ. ४६.

पण मायुराजाने त्या प्रसंगाला निराळेच वळण दिले आहे. ‘ उदात्तराघवा ’तील काही उतारे ‘ दशरूपका’त ’त आले आहेत त्यावरून असे दिसते की मायामृगाला मारण्याकरिता लक्ष्मणच प्रथम जातो. तो दूर गेल्यावर ऋषीचे रूप घेतलेला चित्रमाय नामक राक्षस रामाला दुरून ओरडून सांगतो–

> भगवन् कुलपते, रामभद्र, परित्रायताम्, परित्रायताम् ।
> नीयते रक्षसाऽनेन लक्ष्मणो युधि संशयम् ।
> मृगरूपं परित्यज्य विधाय विकटं वपुः ।।

( भगवान् कुलपते, रामभद्रा, रक्षण करा, रक्षण करा. ह्या राक्षसाने मृगाचे रूप टाकून आपले मूळचे विशालरूप धारण केले आहे. त्याच्याबरोबर युद्ध करीत असता लक्ष्मणाचा जीव धोक्यात आला आहे. ) तेव्हा राम स्वतःशी म्हणतो,

> वत्सस्याभयवारिधेः प्रतिभयं मन्ये कथं राक्षसा–
> त्त्रस्तश्चैव मुनिर्विरौति मनसश्चास्तीव मे संभ्रमः ।
> मा हासीर्जनकात्मजामिति मुहुः स्नेहाद्गुरुर्याचते
> न स्थातुं न च गन्तुमाकुलमतेर्मूढस्य मे निश्चयः ।।
>
> ( दशरूपक, पृ. ८७. )

[ लक्ष्मण हा शौर्याचा सागर आहे. त्याला राक्षसापासून भीति कसली ? पण हा ( चित्रमाय ) ऋषि तर घाबरून ओरडत आहे. त्यामुळे माझ्या मनाला संभ्रम उत्पन्न झाला आहे. इकडे हे आमचे गुरुजी तर सीतेला टाकून जाऊ नको म्हणून स्नेहामुळे पुनः पुन विनवीत आहेत. म्हणून कितर्व्यतामूढ व भ्रान्त झालेल्या माझा जाण्याविषयी किंवा राहण्याविषयीही निश्चय होत नाही. ]

भवभूतीने मूळकथेत फरक करण्याची दिशा दाखवून दिल्यामुळे उत्तरकालीन कवींनी आपापल्या प्रतिभेनुसार रामकथेत फरक करून सविधानक रचण्यास आरंभ केला होता असे दिसते.

## शक्तिभद्राचे ‘ आश्चर्यचूडामणि ’

‘ आश्चर्यचूडामणि ’ नाटकाचा कर्ता शक्तिभद्र हा दक्षिणात्याच कवि होता. त्याच्या पूर्वी दक्षिणेत नाटके लिहिली नव्हती, असे प्रस्तावनेवरून कळते. नटी म्हणते– ‘ *आर्य, अत्याहितं खल्वेतत् । आकाशे प्रसूते पुष्पम्, सिकतास्तैलमुत्पादयन्ति, यदि दक्षिणस्या दिशः आगतं नाटकनिबन्धनम्* ’ ( आर्या, दक्षिणेतून हे नाटक आले असेल तर ही विलक्षण गोष्ट झाली. आकाशात फूल उत्पन्न होते आणि वाळूतून तेल उत्पन्न होते असे मानावे लागेल. ) प्रस्तावनेतील हे विधान वाच्यार्थाने घ्यावयाचे

नाही. कारण पुढे दाखविल्याप्रमाणे या कवीने भवभूतीचे अनुकरण केले आहे आणि भवभूति हा दक्षिणापथाच्यान विदर्भातील कवि. तथापि 'आश्चर्यचूडामणि' हे दक्षिणापथातील आरंभीच्या नाटकांपैकी एक असण्याचा बराच संभव आहे. हे नाटक केरळात लोकप्रिय होते. केरळात सापडलेल्या तथाकथित भासाच्या तेरा नाटकांतल्याप्रमाणे याही नाटकात काही उक्ति–उदाहरणार्थ, प्रस्तावनेतील सूत्रधाराची उक्ति 'अये, किन्नु खलु मयि विज्ञापनव्यग्रे शब्द इव श्रूयते' यासारख्या–आढळतात. त्यावरूनही हे नाटक मूळचे दक्षिणभारतातील असणे संभवनीय वाटते.

शक्तिभद्राविषयी काहीच माहिती उपलब्ध नाही. त्याने 'उन्मादवासवदत्त' आणि इतर काही काव्ये रचली होती असे प्रस्तावनेवरून कळते पण ती अद्यापि सापडली नाहीत. त्याचे स्थल व काल हीही निश्चित नाहीत. काही विद्वानांनी अनुमानाने त्याचा काल नववे शतक हा ठरविला आहे. त्याच्या नाटकातील भवभूतीचे अनुकरण आणि त्याची साधी शैली यावरून तो त्याच्याही किंचित अगोदर आठव्या शतकाच्या अखेरीस झाला असणे असंभवनीय वाटत नाही.

'आश्चर्यचूडामणि' नाटकाचे सात अंक आहेत. त्यामध्ये रामचरित पंचवटी-निवासापासून रावणवधानंतर लंकेतील सीताशुद्धीपर्यंत आले आहे. या नाटकाला 'आश्चर्यचूडामणि' हे नाव देण्याचे कारण पंचवटीत ऋषींनी सीतेला एक आश्चर्य-कारक चूडामणि (डोक्यात घालण्याचा अलंकार) दिला होता. त्यायोगे स्पर्श झाल्यावर तिला राक्षस कोण हे समजत असे हे होय. पण कालिदासाच्या अभिज्ञाना-ङ्गुलीयकासारखा त्याचा प्रस्तुत नाटकाच्या संविधानकाशी घनिष्ठ संबंध आलेला दिसत नाही. हे पुढील सारांशावरून आढळून येईल.

पहिल्या अंकात राम व सीता यांच्याकरिता लक्ष्मण गोदावरीतीरी पंचवटीत पर्णशाला तयार करतो तोच शूर्पणखा सुंदर रूप धारण करून तेथे येते आणि त्याला आपला स्वीकार करण्याविषयी विनंती करते. तेव्हा तो रामाने पर्णशालाप्रवेश केल्या-नंतर तिच्या विनंतीचा विचार करण्याचे तिला आश्वासन देतो. नंतर राम व सीता प्रवेश करतात. इतर नाटककर्त्यांनी रामवनवासाच्या बाबतीत कैकयीला निर्दोष दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. पण प्रस्तुत नाटकात शक्तिभद्राने लक्ष्मणाकरवी तिचा धिक्कारच केला आहे. राम मात्र तिचा पक्ष घेऊन ती निरपराधी आहे, असे सांगतो. त्यायोगे त्याच्या मनाचा थोरपणा व्यक्त होतो (अंक १).

दुसऱ्या अंकात शूर्पणखा रामाकडे येऊन त्याला आपल्या स्वीकाराविषयी गळ घालते; पण तो आपण विवाहित असल्याचे सांगून तिला लक्ष्मणाकडे पाठवितो.

तरीही तिला स्वीकारीत नाही. तेव्हा ती आपले नैसर्गिक अक्राळविक्राळ रूप प्रकट करून त्याला घेऊन आकाशात उडूं लागते. पण लक्ष्मण तिचे कान आणि नाक कापून टाकतो. तेव्हा ती खरदूषण राक्षसांना आपली अवस्था दाखविण्यास जाते (अंक २).

तिसऱ्या अंकात रावणाच्या आग्रहावरून मारीच सुवर्णमृगाचे रूप धारण करून पंचवटीत येतो. लक्ष्मणाच्या भाषणावरून आपणास कळते की ऋषींनी लक्ष्मणास कवच दिले आहे आणि सीतेला आश्चर्यकारक चूडामणि आणि रामाला अद्‌भुत अंगुलीयक (अंगठी) ही पाठविली आहेत. त्यांच्यायोगे केवळ स्पर्शाने राक्षसाचे खरे रूप दृष्टीस पडते. राम सीतेच्या केशपाशात चूडामणि आणि स्वतःच्या बोटात अंगठी घालतो. सुवर्णमृगाला पाहून सीता त्याला पकडण्याविषयी रामाला सांगते. राम लक्ष्मणाला सीतेच्या रक्षणाकरिता ठेऊन मृगाचा पाठलाग करतो. तितक्यात रावण, शूर्पणखा व सारथी यासह तेथे येतो. दुरून 'हा! लक्ष्मण!' असे शब्द ऐकू येतात. ते रामाचे आहेत असे वाटून सीता लक्ष्मणाला त्याच्या साहाय्यार्थ जाण्यास सांगते. ही राक्षसाची माया आहे असे लक्ष्मण तिला सांगतो. पण ते न पटल्यामुळे सीता त्याला दुरुत्तरे बोलते. तेव्हा लक्ष्मण तिला आश्रमात सोडून जातो. पुन. साहाय्यासाठी रामाच्या सारखी आर्त हाक ऐकू येते, तेव्हा सीता त्याच्या शोधार्थ पुढे होते. तितक्यात रावण रामाचे रूप घेऊन तेथे येतो. त्याचा सूतही लक्ष्मणाचे रूप घेऊन रथ पुढे आणतो आणि सांगतो की 'अयोध्येवर परचक्र आले आहे असे अन्तर्ज्ञानाने जाणून दशरथानी तुम्हाला अयोध्येला जाण्याकरिता हा रथ निर्माण केला आणि तो मला देऊन ते स्वतः अन्तर्धान पावले. आपण या रथात बसावे.' तेव्हा प्रथम सीता आणि नंतर रामरूपधारी रावण त्यात बसतात. राम मारीचाला बाणाने घायाळ करून परत फिरतो तो शूर्पणखा सीतेचे रूप घेऊन त्याला भेटते. अशा रीतीने रामरूप घेतलेला रावण आणि खरी सीता, तसेच खरा राम आणि सीतेचे रूप घेतलेली शूर्पणखा अशी दोन जोडपी-पहिले आकाशात आणि दुसरे पृथ्वीवर-येणार असलेली दाखविली आहेत. एवढ्यानेच हा घोटाळा संपत नाही. रामाच्या बाणाने घायाळ झालेला मारीच रामाचे रूप घेतो. तितक्यात लक्ष्मण तेथे येतो.

शासन करण्याकरिता खड्ग म्यानातून बाहेर काढतो; पण शूर्पणखा शरण येते. तेव्हा राम तिच्यामार्फत रावणाला खालील निरोप पाठवतो—

त्वरितगतिना सद्यः सीता त्वया न तु वञ्चिता ।
नियतविधवाचारा दाराश्चिरं तव वञ्चिताः ॥

( तू येथून पळून जाऊन सीतेला फसविले नाहीस तर तू स्वतःने विधवा होणाऱ्या स्वतःच्या स्त्रियांची वंचना केली आहेस. )

लक्ष्मणही त्याला तिच्यामार्फत युद्धाचे आव्हान पाठवतो (अंक ३).

भवभूतीने 'महावीरचरिता'त शूर्पणखेने मंथरेचे रूप घेऊन रामाला दशरथाकडून दोन वर घावयास लावले असा प्रसंग घातला आहे. शक्तिभद्राने तद्वीय राक्षसांनी पररूप धारण करण्याची कल्पना आपल्या या नाटकात केली आहे; पण तिचा उपयोग करताना त्याने अतिरेक केला आहे. त्यामुळे तिसऱ्या अंकातील बरील घटना मुतराम् असंभाव्य वाटतात.

तिसऱ्या अंकात सीता, रामरूपधारी रावण आणि लक्ष्मणरूपधारी सूत रथातून प्रवास करताना दिसतात. आपण तपोवन सोडून जात आहोत ह्याचे सीतेला वाईट वाटते. शेवटी रावण रथवेगाने विस्कळीत झालेले सीतेचे केश बांधण्याच्या मिषाने तिला स्पर्श करू लागतो तों सीता आपल्या हाताने त्याचा हात दूर सारते. त्या स्पर्शा-मुळे चूडामणीच्या प्रभावाने रावणाचे खरे रूप प्रकट होते. ते पाहून सीता अत्यंत भयभीत होते. सूतही लक्ष्मणरूप टाकून स्वत चे रूप धारण करतो. तेव्हा सीता भीतीने आक्रोश करते. तो ऐकून जटायू तिच्या साहाय्यार्थ धावून येतो; पण रावण त्याचे पंख कापून त्याला खाली पाडतो (अंक ४).

पाचव्या अंकाच्या प्रवेशकात रावणाची राणी मन्दोदरी आणि तिची चेटी यांच्या संभाषणावरून सीतेला अशोकवनिकेत ठेवल्याचे आपणास कळते. नंतर मन्दोदरी भावी अनर्थाचे सूचक असे आपणास पडलेले स्वप्न वर्णन करते. नंतरच्या मुख्य अंकात रावण व त्याचा अमात्य प्रवेश करतात. रावण सीताविषयक कामविकाराने विह्वल झाला आहे. अमात्य त्याला उपदेशाच्या चार गोष्टी सांगून असन्मार्गापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न करतो; पण रावण त्याचे ऐकत नाही. नंतर तो सीतेला प्रसन्न करण्या-करिता तिच्या पाया पडतो. पण सीता त्याला धिक्कारते (अंक ५).

सहाव्या अंकात हनुमान् अशोकवनिकेत सीतेची गाठ घेऊन तिला रावणाने पंचवटीतून तिचे हरण केल्यानंतर घडलेल्या घटना आणि रामाला तिच्या वियोगामुळे झालेला शोक वर्णन करतो, रामाचे अंगुलीयक खूण म्हणून दाखवतो आणि रामाचा

संदेश तिला निवेदन करतो. नंतर ती त्याला रामाला मूण म्हणून दाखविण्याकरिता आपला चूडामणि देते (अंक ६).

सातव्या अंकाच्या आरंभीच्या विष्कमकातील विद्याधर आणि त्याची प्रिया याच्या संभाषणावरून रामाने रावणाला ठार करून जगात धर्माचे राज्य पुनः प्रस्थापित केल्याचे आपणास कळते. नंतरच्या मुख्य प्रवेशात राम बिभीषणाला लंकेचे राज्य देऊन सीतेला आणण्याकरिता सुग्रीवाला सांगतो. सीता येते ती अनसूयेच्या अनुग्रहाने प्राप्त झालेला अंगराग, पुष्पमाला आणि सुंदर वस्त्र धारण करून. तिला पाहताच राम तिचे उपरोधिकपणे खालील वर्णन करतो–

हरिचन्दनप्रणयिनौ पयोधरौ
कुसुमाचितं सुरभि केशबन्धनम् ।
अरुणप्रभातिशयचोरमम्बरं
विरहव्रताय वहते पतिव्रता ।।

ते पाहून सुग्रीव, लक्ष्मण, हनूमान् सर्वच तिच्यावर उलटतात. सीता काही बोलण्याचा प्रयत्न करते, पण ते न ऐकताच राम तिला वाक्ताडन करतो–

रजनीचरगूढसत्रिभिः कृतसङ्केतनया दिने दिने ।
ऋजुभावजडास्त्वया वयं छलिताः पुंश्चलि दण्डके वने ।।

हे कठोर शब्द ऐकताच सीतेचा अभिमान जागृत होऊन तिने योग्य ते उत्तर द्यावयास पाहिजे होते. पण येथे ती किंचित् स्मित करून 'आर्यपुत्रेणापि परुषवचनं भण्यते।' (आर्यपुत्रही मला कठोर शब्द बोलतात!) एवढेच म्हणते, हे आश्चर्य होय. नंतर सुग्रीव, लक्ष्मण व हनूमान् तिला योग्य ते शासन करावे असे रामाला सुचवितात. तेव्हा सीता म्हणते, "आर्यपुत्राच्या संमतीने मी अग्निप्रवेश करू इच्छिते." राम लक्ष्मणाला त्याची तयार करावयास सांगतो. थोड्याच वेळात तो परत येऊन रामाला सांगतो, "सीता अग्निपुढे उभी राहून म्हणाली की 'भगवन्, मी तुझ्यापुढे सत्याधिष्ठान करते आहे. दंडकारण्यातून नेताना मला राक्षसाच्या भुजाचा आणि लंकेत माझ्या पायाना त्याचा स्पर्श झाला होता. (त्याशिवाय केव्हाही मला त्याचा स्पर्श झाला नाही.)' असे म्हणून ती निःशंकपणे पाण्यात शिरावे त्याप्रमाणे अग्नीत प्रवेश करती झाली. नंतर अग्नि तिला घेऊन बाहेर आला." रामाला ते ऐकून आश्चर्य वाटते. इतक्यात देवर्षि नारद येऊन रामाला इंद्र, रुद्र, अश्विनीकुमार आणि मनुपासून दशरथापर्यंतचे त्याचे स्वर्गस्थ पूर्वज सीतेच्या पातिव्रत्यामुळे तेथे उपस्थित झालेले दाखवतो. '*सर्वच अनसूयेच्या वरामुळे तुझ्या दृष्टिसमोर तिला अलंकारादि प्राप्त होत असतात*' असे सांगून त्याच्या सीताविषयक संशयाचा निरास करतो.

लक्ष्मणादिकांना आपल्या कठोर वाक्ताडनाबद्दल पश्चात्ताप होतो. नतर सीतेला तेथ आणल्यावर राम तिचे स्वागत करतो. तेव्हा नारदाच्या आदेशाप्रमाणे ते सर्व पुष्पक विमानाने अयोध्येला जाण्यास निघतात आणि भरतवाक्याने नाटकाची समाप्ति होते.

शक्तिभद्राने भास, भवभूति, भट्टनारायण आणि माघ यांच्या काही प्रसंगाचे व उक्तींचे अनुकरण केलेले दिसते. भासाचे अनुकरण मागे दाखविले आहे. मंदोदरीच्या स्वप्नात 'वेणीसंहारा'च्या दुसऱ्या अंकातील भानुमतीच्या स्वप्नाचे अनुकरण स्पष्ट दिसते. काही श्लोकातही हे अनुकरण दृष्टीस पडते.[1] साठव्या अंकातील नारदाच्या प्रादुर्भावाच्या वर्णनात माघकृत 'शिशुपालवधा'तील तत्सदृशप्रसंगाची झाक मारते. पण या सर्वांपेक्षा त्याने भवभूतीचे अनुकरण जास्त प्रमाणात केले आहे. त्याने रामचरित्रातील विवाद्य प्रसंग भवभूतीप्रमाणे बदलले नाहीत खरे, पण तिसऱ्या अंकातील रावण, मारीच, गृह व शूर्पणखा यांच्या रूपपरिवर्तनाची कल्पना त्याला भवभूतीच्या 'महावीरचरिता'-तील तत्सदृश कल्पनेवरून सुचलेली स्पष्ट दिसते. शिवाय त्याने अतिरेक केला आहे हे मागे दाखविले आहे. काही ठिकाणची वर्णनेही त्याला भवभूतीच्या नाटकावरून सुचली असावी. उदाहरणार्थ, भवभूतीने 'उत्तररामचरिता'च्या तिसऱ्या अंकात वासंतीच्या तोंडी खालील सुंदर श्लोक घातला आहे–

अस्मिन्नेव लतागृहे त्वमभवस्तन्मार्गदत्तेक्षण.
सा हंसैः कृतकौतुका चिरमभूद्गोदावरीसैकते ।
आयान्त्या परिदुर्मनायितमिव त्वां वीक्ष्य बद्धस्तया
कातर्यादरविन्दकुड्मलनिभो मुग्धः प्रणामाञ्जलिः ।।

---

१. उदाहरणार्थ, खालील श्लोकातील साम्य पाहा–

वेणीसंहार, १, २१–

चञ्चद्भुजभ्रमितचण्डगदाभिघात–
संचूर्णितोरुयुगलस्य सुयोधनस्य ।
स्त्यानावनद्धघनशोणितशोणपाणि–
रुत्तंसयिष्यति कचांस्तव देवि भीमः ।।

आश्चर्यचूडामणि, ६, २१–

रक्षोवधाद्विरतकर्म विसृज्य चापं
गोधाङ्गुलित्रपदवीषु धृतव्रणेन ।
रेखातपत्रकलशाङ्कितलेन रामो
वेणीं करेण तव मोक्ष्यति देवि देवः ।।

यात रामाच्या सीताविषयक औत्सुक्याचे सुंदर वर्णन आहे. याच तऱ्हेचे सीतेच्या रामविषयक औत्सुक्याचे वर्णन रामानें हनूमान्द्वारा सीतेला आठवण म्हणून कळविलेल्या खालील प्रसंगात आढळेल--

आयात मामपरिचितया वेलया मन्दिरं ते
चोरो दण्डचस्त्वमिति मधुरं व्याहरन्त्या भवत्या ।
मन्दे दीपे मधुलवमुचां मालया मल्लिकानां
बद्धं चेतो दृढतरमिदं बाहुबन्धच्छलेन ।।

यापेक्षाही जास्त साम्य खालील दोन उक्तींत आढळेल-

उत्तररामचरित, अ. २—येन सिद्धक्षेत्रेऽस्मिञ्जनस्थाने मादृशामपि जानपदानामकुतोभयः सञ्चारो जातः ।

आश्चर्यचूडामणि (अ ३.)—कुताः खलु मद्विधानामपि स्वैरसञ्चारक्षमा वनभूमयः ।।

शक्तिभद्राने भवभूतीच्या नाटकांतील प्रसंगाचे अनुकरण करताना तारतम्य न ठेवल्यामुळे पुष्कळच घोटाळा झाल्याचे मागे दाखविले आहे. शेवटल्या अंकातील रामादिकांचे सीताविषयक वर्तन अविवेकीपणाचे आहे यात संशय नाही.

## मुरारीचे ' अनर्घराघव '

यानंतरचे पूर्वरामचरितविषयक नाटक मुरारि कवीचे 'अनर्घराघव' हे होय. भवभूति आणि मुरारि यांच्या नाटकांची तुलना करून काही सुभाषितात मुरारीचे श्रेष्ठत्व दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. उदाहरणार्थ, पुढील श्लोक पाहा--

मुरारिपदचिन्तायां भवभूतेस्तु का कथा ।
भवभूतिं परित्यज्य मुरारिमुररीकुरु ।।

यात अनेक पदांवर श्लेष आहेत. त्यामुळे याचे दोन अर्थ होतात–मुरारि कवीच्या नाटकाचे अध्ययन केले तर त्यापुढे भवभूतीच्या नाटकाची मातब्बरी काय ? भवभूतीचे नाटक दूर करून मुरारीचे अनर्घराघव अध्ययनाकरिता घे. ( २ ) भगवान् विष्णूच्या पदाचे चिन्तन केले असता भगवान् शंकराच्या भस्माचा काय उपयोग ? ते भस्म टाकून देऊन भगवान् विष्णूला शरण जा.

या श्लोकात म्हटल्याप्रमाणे प्राचीन परंपरेच्या काही पंडितांना भवभूतीपेक्षा मुरारि कवि श्रेष्ठ वाटत होता असे दिसते. त्याचे मुख्य कारण हे असावे की त्याचे नाटक 'महावीरचरित'पेक्षा जास्त क्लिष्ट आहे आणि त्यामुळे ते समजण्याकरिता बुद्धीचा

जास्त उपयोग करावा लागतो. म्हणून ते पण्डितवर्गात जास्त प्रिय झाले. वास्तविक पाहता मुरारि भवभूतीपेक्षा नाट्यगुण, प्रतिभा, भाषा इत्यादिकात कमी प्रतीचा असून त्याने आपले नाटक भवभूतीचे अनुकरण करूनच रचले आहे.'

मुरारीचा काल निश्चित नाही. तथापि त्याने कल्चुरींचा ( कल्चुरि नृपतींचा ) दोन ठिकाणी उल्लेख केला आहे. आणि माहिष्मती ही त्यांची राजधानी म्हणून वर्णिली आहे, त्यावरून त्याच्या कालाविषयी अनुमान करता येते. आद्य कल्चुरि माहिष्मती येथून सुमारे सातव्या शतकाच्या अखेरपर्यंत राज्य करीत होते. पुढे आठव्या शतकात प्रथम कालञ्जर आणि नंतर त्रिपुरी येथे त्यांनी राजधानी नेली. मुरारि माहिष्मतीचे ' इयं च कल्चुरिकुलनरेन्द्रसाधारणाग्रमहिषी माहिष्मती नाम चेदिमण्डलमुण्डमाला नगरी'[२] (कल्चुरिवंशी अनेक नृपतींची राजधानी) असे वर्णन करतो, तेव्हा तो कल्चुरि वंशाच्या अनेक शाखा होऊन निरनिराळ्या ठिकाणांहून राज्य करू लागल्या तेव्हा आठव्या शतकाच्या अखेरीस होऊन गेला असावा. मंख कवीच्या 'श्रीकण्ठचरिता 'त मुरारि राजशेखराच्या ( ख्रिस्तोत्तर दहावे शतक ) अगोदर होऊन गेला असे सुचविले आहे, त्याच्याशी हा काळ जुळतो.

मुरारि मौद्गल्यगोत्री ब्राह्मण होता. त्याच्या पित्याचे नाव वर्धमान आणि मातेचे तन्तुमती असे होते. तो स्वतःला ' बालवाल्मीकि ' समजतो. आपणापूर्वी झालेल्या एका नटाने रौद्र, बीभत्स, भयानक आणि अद्‌भुत रसांनी भरलेले नाटक दाखवून लोकांना उद्विग्न केले आहे[३] म्हणून आपण वीर आणि अद्‌भुत रसांनी युक्त असे नाटक करून लोकांना आनंदित करणार आहो असे तो सूत्रधारमुखाने प्रस्तावनेत सांगतो.

' अनर्घराघवा 'चे सात अंक असून त्यात विश्वामित्राने रामलक्ष्मणांना सिद्धाश्रमात नेल्यापासून रावणवधानंतरच्या रामाच्या राज्याभिषेकापर्यंतचा कथाभाग आला

---

१. कदाचित् या श्लोककर्त्याचा मुख्य उद्देश- शंकरापेक्षा विष्णूचे श्रेष्ठत्व दाखविण्याचा असेल. श्लेषयोजनेमुळे त्यात भवभूति व मुरारि यांची तुलना आली असावी.

२. अनर्घराघव, पृ. २०६.

३. पूर्वोक्त, पृ. ६, काही विद्वानांच्या मते हे विधान भवभूतीच्या ' महावीरचरिता 'ला उद्देशून केले आहे. पण त्याला आधार नाही. मुरारीच्या स्वतःच्या नाटकात बीभत्स रसवर्णनपर श्लोक आले आहेत. ( अनर्घराघव, २, ५४ पाहा. )

आहे. या संविधानकात बहुतेक ठिकाणी मुरारीने भवभूतीचे अनुकरण केले आहे, पण काही ठिकाणी त्याने किरकोळ फरकही केले आहेत. उदाहरणार्थ, ताटकावध आणि अहल्योद्धार विश्वामित्राच्या आश्रमातच घडले असे त्याने वर्णिले आहे. पण रावणाचा पुरोहित त्याच्याकरिता सीतेला मागणी घालण्यासाठी सिद्धाश्रमात न येता मिथिलेस येतो, हा फरकहि केला आहे. 'महावीरचरिता'त रावणाकरिता खटपट करणारा माल्यवान् हा एकटाच पाताळयंत्री मुत्सद्दी आहे, तर 'अनर्घराघवा'त सुग्रीवाकरिता रामाला दण्डकारण्यात आणण्यासाठी प्रयत्न करणारा जाम्बवान् हा दुसरा तसलाच मुत्सद्दी आहे. तो हनूमान् आणि श्रमणा यांना मिथिलेला पाठवतो. श्रमणा ('महावीरचरिता'तल्या प्रमाणे शूर्पणखा नव्हे) मंथरेच्या अंगात संचार करते आणि मिथिलेत दशरथाकडे कैकयीचे म्हणून दोन वर मागते. ते काम होईपर्यंत हनूमान् तिच्या देहाचे रक्षण करीत असतो असे मुरारीने दाखविले आहे.[1] शतानन्द आणि परशुराम यांची 'महावीरचरिता'तल्या प्रमाणे वाचाबाची आहेच; पण त्याशिवाय तशीच शतानन्द आणि रावणाचा पुरोहित शौष्कल यांचीही झाल्याचे दाखविले आहे. पंचवटीत सीतेने लक्ष्मणाला वाक्ताडन केल्याचा प्रसंग 'महावीरचरिता'तल्या प्रमाणे टाळला आहे. जटायु दुरून पाहून वर्णन करतो—

नीतो दूरं कनकहरिणच्छद्मना रामभद्रः
पश्चादेनं द्रुतमनुसरत्येव वत्सः कनिष्ठः ।
बिभ्यद्बिभ्यत्प्रविशति ततः पर्णशालां च भिक्षु-
श्छित्त्वा कष्टं भोः प्रथयति निजामाकृतिं रावणोऽयम् ॥
(अ. रा., ५, ७)

'महावीरचरिता'तील वर्णन असेच आहे (म. च. ५, १६ पाहा.). पुढे वालीने रामावर घात तालवृक्ष फेकल्यावर रामाने त्याचा वध केल्याचे दाखविले आहे (अ. रा., ५, ५२).

'अनर्घराघवा'त संविधानकाचा बराचसा भाग रंगभूमीवर प्रवेशरूपाने न दाखविता पात्रांच्या संभाषणात वर्णिला आहे. सहाव्या अंकात लंकेच्या युद्धातील विविध घटना हेमाङ्गद आणि रत्नचूड या दोन विद्याधरांच्या संभाषणावरून प्रेक्षकास कळतात. मुरारीला पाल्हाळाची फार हौस होती. प्रत्येक नाटकात मधून मधून प्रात कालादिकांचे वर्णन असते. त्याला कालिदास, भवभूति यांसारखे कवि एखादा श्लोक देतात. पण मुरारि त्याचे अनेक श्लोकांत वर्णन करतो. उदाहरणार्थ, दुसऱ्या

---

१. अनर्घराघव, पृ. १५५.

अंकाच्या आरंभी प्रभातवर्णनास त्याने सहा श्लोक दिले आहेत. हा अंक चालू असताना मध्याह्न आणि सायंकाळही होते त्यांचीही वर्णने याच अंकात आली आहेत. पुढे चन्द्रोदय होतो त्याच्या वर्णनास तेरा श्लोक घातले आहेत. एकंदर नाटकात सुमारे ५४० श्लोक आहेत. म्हणजे 'अनर्घराघवा'तील ही श्लोक संख्या भवभूतीच्या 'मालतीमाधव' (श्लो. २३४) आणि 'उत्तररामचरित' (श्लो. २५५) या दोन नाटकातील श्लोकसंख्यांच्या बेरजेपेक्षा जास्त आहे! मुरारीने नाटक न लिहिता श्रव्यकाव्य लिहिले असते तर बरे झाले असते, असे वाटल्याशिवाय राहत नाही.

सातव्या अंकात राम, लक्ष्मण, सीता इत्यादिकांचा लंकेतून अयोध्येपर्यंतचा प्रवास समापणरूपाने वर्णिला आहे. कालिदासाने रघुवंशात असेच वर्णन घातले आहे, पण त्यात भौगोलिकक्रम कोठेही बिघडविला नाही. याच्या उलट मुरारीने त्यामध्ये हिमालय, मेरु, कैलास, चन्द्रलोक इत्यादिकांचे वर्णन केले आहे. शिवाय भारतातील विविध दिशांतील अनेक प्रसिद्ध स्थलांचे– उदाहरणार्थ, कुंडिननगर, भीमेश्वर, कान्ची, उज्जयिनी, माहिष्मती, वाराणसी, चम्पा, प्रयाग इत्यादिकांचे वर्णन, भौगोलिक क्रम धाब्यावर बसवून, घातले आहे. मुरारीमध्ये विवेचकशक्तीचा पूर्णपणे अभाव होता असे वाटल्याविना राहत नाही.

मुरारीने संविधानकरचनेप्रमाणे शब्दयोजनेतही काही ठिकाणी भवभूतीचे अनुकरण केले आहे. खालील उदाहरणे पाहा—

(१) उत्तररामचरित (अं. २)—स भगवान् प्राचेतसः शब्दब्रह्मणस्तादृशं विवर्तमितिहासं रामायणं प्रणिनाय ।

अनर्घराघव (अं. २)–विशेषेण पुनरिदानीं कौशिकेन ब्रह्मज्योतिषस्तादृशं विवर्तमाश्चर्यं विद्यास्त्रमन्त्रपारायणमध्यापितः ।

(२) उत्तररामचरित (१, १०)—ऋषीणां पुनराद्यानां वाचमर्थोऽनुधावति ॥

अनर्घराघव (२, ५८)–वाचमेवामृषीणां हि शास्त्रमेवानुवर्तते ॥

(३) महावीरचरित (अं. २)–जनपदेषु न चिरमारण्यकास्तिष्ठन्ति ।

अनर्घराघव (अं. ४)–अप्रशस्तः खल्वारण्यकानां जनपदेषु चिरप्रचारः ।

मुरारीचे संस्कृतभाषेवर चांगले प्रभुत्व होते. भवभूतीचे काही विशिष्ट शब्द (उ. खुरली, गर्भरूप) त्याच्या नाटकात येतात. पण त्याच्या रचनेत भवभूतीच्याप्रमाणे प्रसादगुण नाही. कल्पनाही अनेक ठिकाणी ओढून ताणून आणलेल्या दिसतात. उदाहरणार्थ, विष्णूचे 'रदयं देवो लक्ष्मीस्तनकलशधारी गजपतिः ॥' (१, ५२) हे

वर्णन पाहा. यात विष्णूचे ' लक्ष्मीच्या कलशासारख्या स्तनांनी बांधलेला हत्ती ' असे वर्णन केले आहे, त्यात क्लिष्टता आहे.

अशा निकृष्ट कवीला प्राचीन परंपरेच्या पंडितांनी भवभूतीपेक्षा श्रेष्ठ मानावे हा दैवदुर्विलास होय !

## राजशेखराचे ' बालरामायण '

यानंतर पूर्वरामचरितावर नाटक लिहिणारा कवि राजशेखर होय. त्याच्या ' बालरामायणा 'त विश्वामित्राने यज्ञरक्षणार्थ रामलक्ष्मणांना आपल्या आश्रमात नेल्यापासून रामाच्या राज्याभिषेकापर्यंतची कथा आली आहे.

राजशेखर हा यायावर कुळात जन्मला होता. तो आपल्या ग्रंथात स्वतःचे ' महाराष्ट्रकुलचूडामणि ' असे वर्णन करतो. तेव्हा तो मूळचा महाराष्ट्रीय होता यात संशय नाही. आपल्या ' काव्यमीमांसा ' नामक ग्रंथात राजशेखराने विदर्भातील वत्सगुल्म हे नगर भगवान् मदनाचे क्रीडास्थान आहे आणि तेथे काव्यपुरुषाचा साहित्यविद्यावधूशी विवाह झाला होता, असे आलंकारिक वर्णन केले आहे.[1] राजशेखर आपल्या ' कर्पूरमञ्जरी ' नामक नाटकात वैदर्भी रीतीचे ' वच्छोमी ' असे दुसरे नाव देतो. ते ' वत्सगुल्मी ' या शब्दाचे प्राकृत रूप आहे. या उल्लेखावरून राजशेखराचे वत्सगुल्मावरचे प्रेम व्यक्त होते. वत्सगुल्म म्हणजे विदर्भाच्या अकोला जिल्ह्यातील वाशीम. हे वाकाटकांच्या एका शाखेच्या राजधानीचे शहर असल्याने ते ख्रिस्तोत्तर चौथ्या–पाचव्या शतकात भरभराटीत होते. पण त्यानंतरच्या राजवटीत तेथून राजधानी हलविल्यामुळे त्याचे महत्त्व पुष्कळच कमी झाले असावे. असे असताही वाकाटकांच्या काळानंतर चारशे वर्षांनी झालेला राजशेखर त्या नगराचा इतक्या गौरवाने निर्देश करतो, त्यावरून तो तेथील मूळचा रहिवासी असावा असे अनुमान करण्यास हरकत नाही.

राजशेखराचे पूर्वज अकालजलद, सुरानंद, तरल आणि कविराज हे त्रिपुरीच्या कलचुरि नृपतींच्या आश्रयास होते. राजशेखराच्या पित्याचे नाव दुर्दुक (किंवा दुहिक) आणि मातेचे शीलवती होते. तो स्वतः यायावर या ब्राह्मण कुळात जन्मला असला तरी त्याने चाहुआण किंवा चव्हाण या क्षत्रिय कुळातील अवन्तिसुन्दरी या स्त्रीशी विवाह केला होता. ही मोठी विदुषी होती. तिची काही अलंकारविषयक मते राजशेखराने आपल्या ' काव्यमीमांसे 'त उल्लेखिली आहेत.

---

१. काव्यमीमांसा, पृ. १०.

राजशेखर लहानपणापासून कवित्वाबद्दल प्रसिद्ध होता. त्यामुळे त्याला 'बाल-कवि' अशी सार्थ पदवी मिळाली होती. त्यावेळी कनोजच्या प्रतीहाराचे राज्य भरभराटीत होते म्हणून तो राजाश्रयाकरिता तेथे गेला होता. 'बालरामायणा'त त्याने प्रतीहारसम्राट् महेन्द्रपाल याचा आदराने निर्देश केला आहे.[1] महेन्द्रपाल आणि त्याचा मुलगा महीपाल यांच्या आश्रयास असताना राजशेखराने 'बालरामायण' आणि 'बालभारत' ही संस्कृत नाटके आणि 'कर्पूरमंजरी' हे सट्टक ( प्राकृत नाटक ) ही लिहिली. नंतर तो त्रिपुरीच्या प्रथम युवराजदेव या कलचुरि नृपतीच्या आश्रयास आला. तेथे असताना त्याने 'विद्धशालभंजिका' ही नाटिका आणि 'काव्यमीमांसा' हा साहित्यशास्त्रावरील अपूर्ण ग्रंथ लिहिला. राजशेखर दहाव्या शतकाच्या प्रथमार्धात होऊन गेला.[2]

राजशेखराचे 'बालरामायण' हे नाटक अत्यंत विशाल आहे. त्याचे दहा अंक असून त्यात एकूण ७८१ श्लोक आहेत. म्हणजे त्याचा विस्तार 'मालतीमाधव' आणि 'उत्तररामचरित' यांच्या प्रत्येकी तिपटीपेक्षा अधिक आणि 'अनर्घराघवा'च्या जवळ जवळ दीडपटीइतका आहे. राजशेखरालाही या विस्ताराची जाणीव होती. तो प्रस्तावनेत म्हणतो–

ब्रूते यः कोऽपि दोषं महदिति सुमतिर्बालरामायणेऽस्मिन्
प्रष्टव्योऽसौ पटीयानिह भणितिगुणो विद्यते वा न वेति ।
यद्यस्ति स्वस्ति तुभ्यं भव पठनरुचिर्विद्धि नः षट् प्रबन्धान्
नैवं चेद्दीर्घमास्तां नटबटुवदने जर्जरा काव्यकन्था ।।

( बा. रा., १,१२ )

( जर कोणी या 'बालरामायणा'वर असा आक्षेप घेईल की हे फार विशाल आहे तर त्या शहाण्याला विचारावे की यात काही वाणीचा गुण दिसतो किंवा नाही ! दिसत असेल तर याचे तसेच आमच्या सहा प्रबन्धांचे पठण कर. नसेल तर ही काव्य-रूपी जुनी गोधडी नट आणि बटु यांच्यात तोंडी दीर्घकाल राहो ! )

तेव्हा राजशेखराच्या मते ज्यात उत्कृष्ट भाषा असेल ते उत्तम नाटक होय. मग त्यात आकर्षक संविधानक, खटकेबाज संवाद, उत्कृष्ट रसपरिपोष आणि मनोरम स्वभाव-रेखन नसले तरी हरकत नाही. इतरत्रही त्याने 'उत्तिविसेसो कव्वम्' (उक्तिविशेषः

---

१. 'भो भो भुजस्तम्भालानितलक्ष्मीकरेणुना रघुकुलैकतिलकेन महेन्द्रपाल-देवेनाधिकृताः सभासदः...। बा. रा. , पृ. ४.

२. मिराशी, कलचुरि नृपति आणि त्याचा काल, पृ. ९६ इ.

काव्यम् ) असे काव्याचे लक्षण केले आहे.[1] नाटक आणि काव्य यातील मूलभूत भेद त्याने लक्षात घेतलेला दिसत नाही. त्यामुळे त्याची नाटके रंगभूमीवर प्रयोग करण्यासाठी नसून अभ्यासिकेत वाचण्यासाठी लिहिलेली दिसतात.

राजशेखर स्वतःला भवभूतीचा अवतार म्हणवितो. 'बालरामायणा'च्या प्रस्तावनेत सूत्रधार म्हणतो–

बभूव वल्मीकभवः कविः पुरा
ततः प्रपेदे भुवि भर्तृमेण्ठताम् ।
स्थितः पुनर्यो भवभूतिरेखया
स वर्तते संप्रति राजशेखरः ।। (बा. रा., १, १६)

आपण पूर्वजन्मी वाल्मीकि, भर्तृमेंठ आणि भवभूति होतो असे राजशेखर या श्लोकात सांगतो. वाल्मीकि आणि भवभूति यांचे रामचरितविषयक ग्रंथ प्रसिद्ध आहेत. भर्तृमेंठाचा मात्र तसा ग्रंथ माहीत नाही. त्याने 'हयग्रीववध' नामक सुंदर काव्य लिहिले होते असे 'राजतरंगिणी'वरून कळते. ते सध्या उपलब्ध नाही. पण त्यातील काही श्लोक अलंकारग्रंथात उद्धृत केले आहेत. हे काव्य इतके रसभरित होते की ते वाचले जात असताना त्याचा रस गळून जाऊ नये म्हणून तत्कालीन काश्मीरचा राजा मातृगुप्त याने त्या ग्रंथाच्या खाली सोन्याची थाळी ठेवली होती अशी आख्यायिका 'राजतरंगिणी'त दिली आहे.[2]

भवभूतीच्या दोन्ही नाटकांचा प्रभाव राजशेखराच्या 'बालरामायणा'वर पडला असून त्याने त्यातून अनेक प्रवेश, घटना, वाक्प्रचार घेतले आहेत असे दाखविता येते. त्याने 'अनर्घराघवा'तूनही काही सूचना घेतल्या आहेत.

'बालरामायणा'च्या पहिल्या अंकात जनकाने ज्या शिवधनुष्याचा पण केला होता ते पाहून त्याला दोरी लावून सीता मिळविण्याकरिता रावण मिथिलेला येतो. जनक आणि शतानन्द त्याला सीता आणि शिवधनुष्य ही दोन्ही दाखवितात. पण 'का श्लाघा गुणजर्जरेण धनुषा कुब्जेन भग्नेन वा ।' (बा. रा. १, ५१) असे म्हणून रावण धनुष्याला तिरस्काराने फेकून देतो. त्यामुळे क्रोध येऊन जनक त्याला चापाने किंवा शापाने शासन करण्यास उद्युक्त होतो; पण विश्वामित्राचा धर्मपुत्र शुनःशेप त्याला त्यापासून निवृत्त करतो. तेव्हा जो कोणी या धनुष्याला दोरी लावून सीतेचे पाणिग्रहण करील त्याचा मी आपल्या चन्द्रहास खड्गाने कण्ठच्छेद करीन अशी प्रतिज्ञा रावण करतो ( अं. १ ).

---

१. उत्तिविसेसो कव्वं भासा जा होइ सा होउ ॥ कर्पूरमञ्जरी, १, ८.

२. राजतरंगिणी, ३, २६१.

दुसऱ्या अंकात रावणाने शिवधनुष्याचा अपमान केला असे समजताच जामदग्न्य (परशुराम) मिथिलेला येतो. तेथे त्याचा आणि रावणाचा वाक्कलह होऊन ते युद्ध करू लागतात. पण तितक्यात शंकराचा गण भृंगिरिटि भगवान् शंकराचा संदेश सांगून त्यांना शांत करतो (अं. २).

तिसऱ्या अंकाच्या आरंभीच्या विष्कंभकातून विश्वामित्राच्या आश्रमातील वाटकावध, रामलक्ष्मणांना जृंभकास्त्रप्राप्ति, त्यांचे विश्वामित्रासह मिथिलेस जाणे, शिवधनुर्भंग इत्यादि घटना माहीत होतात. मुख्य प्रवेशात ' उत्तररामचरिता 'तल्याप्रमाणे एका गर्भांकाचा प्रयोग घातला आहे. रावण सीतेच्या विरहाने त्रस्त असल्यामुळे त्याच्या मनोविनोदनार्थ भरताचार्यांनी लिहिलेले ' सीतास्वयंवर ' नामक नाटक त्यांचे धाकटे पुत्र (नट) आणि अप्सरा लंकेत येऊन करून दाखवतात. या गर्भनाटकातील स्वयंवराकरिता अनेक राजे जमलेले दाखविले आहेत. त्यामध्ये नरकासुर, पाण्ड्य नृपति, माहिष्मतीपति, त्रिपुरी येथे राज्य करणारा चेदिदेशाधिपति, सिंहलेश्वर (!), मिथिलापति, अवन्तिपति, कथकैशिकाधिपति (मरहट्टवरिष्ठ), काञ्चीपति, लाटेश्वर (तुरुक्य), मगधाधिपति, काम्बोजनृपति, शकनृपति, नैपालपाल, अन्ध्रेश्वर इत्यादि पौराणिक व ऐतिहासिक राजांची, कालविपर्यासाला (anachronism ला) न जुमानता, सरमिसळ केली आहे. त्यांच्या वर्णनास साठावर श्लोक घातले आहेत. शेवटी शिवधनुष्याचा भंग करून राम सीता मिळवितो, हे पाहून रावण चवताळतो. पण त्याचा सेनापति प्रहस्त हे सर्व नाटक आहे असे सांगून त्याला शांत करतो. तेव्हा रावण पुनः आपल्या प्रतिज्ञेचा उच्चार करतो (अं. ३).

चौथ्या अंकाच्या आरंभी एक उपाध्याय आणि भवभूति नामक बटु यांचा विष्कंभक घातला आहे. तो ' उत्तररामचरिता 'च्या दुसऱ्या अंकातील वासंती व वनदेवता यांच्या विष्कंभकासारखा आहे. हा भवभूति बटु परशुरामाचा शिष्य होता. पण परशुराम शिवधनुर्भंगाची वार्ता ऐकल्यावर युद्धमदाने पछाडला गेल्यामुळे आपल्या शिष्याला अनेक प्रकारच्या बाणांचे मारे न्यायचाला लावू लागला. त्यामुळे तो भवभूति शिष्य म्हणतो, ' मी पूर्वी गजाननासारखा स्थूल, तुंदिलतनु होतो, पण आता भृंगिरिटीसारखा अस्थिपंजर झालो आहे. म्हणून त्या गुरुला सोडून आपणाकडे विद्याध्ययनाकरिता आलो आहे. ' पुढील प्रवेशात दशरथ स्वर्गात इन्द्राला मदत करण्यास गेला होता तो त्याच्या रथातून मिथिलेत परशुराम येणार असे समजल्यावर इन्द्राच्या सांगण्यावरून येत असलेला दाखविला आहे. त्या रथात मत्तवारणीफलकावर परशुरामाचे भगवान् शंकराजवळ शिक्षण, त्याने युद्धात केलेला गजानन व कार्तिकेय यांचा पराभव, नंतर त्याला शंकराने दिलेला परशूचा तुकडा, त्याने आपल्या रेणुका

मातेचा केलेला वध, सहस्रार्जुनाने त्याच्या पित्याला ठार मारल्यावर त्याने त्याचा व सर्व क्षत्रियांचा केलेला संहार इत्यादिकांची चित्रे काढली होती तो मातलि दाखवून त्याचे वर्णन करतो. हे वर्णन ' उत्तररामचरिता 'तल्या पहिल्या अंकातील चित्रवर्णनासारखे आहे, पण ते येथे असंभवनीय व अनुचित दिसते. नतर परशुराम आणि राम यांचे वाग्युद्ध होते. तेव्हा परशुराम रामाला आपले वैष्णव धनुष्य सज्य करण्यास देतो. लक्ष्मण ते घेऊन त्याला दोरी लावतो. तेव्हा परशुराम रामाला युद्धाचे आह्वान देतो आणि ते दोघे मिथिलेजवळच्या समरभूमीकडे जातात ( अं. ४ ).

पाचव्या अंकाच्या आरंभी मिथिलेहून एका हेराने माल्यवानाला पाठविलेल्या पत्रावरून आपणास कळते की रामाने परशुरामाचा पराभव केला आहे. माल्यवानाने रावणाच्या मनोविनोदनार्थ मयासुराच्या विशारद नामक पट्टशिष्याकडून लाकडाच्या दोन मोठ्या बाहुल्या–एक सीतेची व दुसरी तिच्या सिन्दूरिकानामक धात्रेयिकेची अशा–तयार करविल्या आहेत. त्यांच्या तोंडात मैना बसविल्या असून त्या सूत्रधाराकडून हव्या तशा हलविल्या जातात. नंतरच्या प्रवेशात रावण सिन्दूरिकेला सीतेविषयी प्रश्न करतो आणि तीही लाजणाऱ्या लाकडी सीतेला विचारून तिची उत्तरे देते. आपल्यावर तिचे प्रेम आहे असे समजतात रावणाला अत्यानंद होतो आणि तो तिला कवटाळतो तो ती लाकडाची आहे असे त्याला कळते. नतर तो ज्या ठिकाणी सहाही ऋतु नेहमी असतात अशा लीलोद्यानात विरहशमनार्थ जातो आणि तेथे प्रत्येक ऋतूचे दोन दोन श्लोकात वर्णन करतो. वारुणी, लक्ष्मी, सरस्वती त्याच्या मनोविनोदनार्थ येतात; पण तो त्या सर्वांना हाकलून देतो. पुढे तो विरहाने व्याकुळ होऊन चन्द्राविकाना जानकी-विषयी प्रार्थना करतो. तिरस्यात नाक कापलेली शूर्पणखा प्रवेश करून त्याला म्हणते, ' मी तुमच्याकरिता सीतेचे हरण करीत असता रामलक्ष्मणांनी मला कापालिकव्रताला योग्य असे केले आहे पाहा. ' तेव्हा रावण तिला सूड घेण्याचे आश्वासन देतो ( अंक ५ ).

सातव्या अंकाच्या आरंभीच्या विष्कंभकात वालिवध, सुग्रीवाभिषेक इत्यादिकांची माहिती कर्पूरचण्ड आणि चन्दनचण्ड या दोन वैतालिकांच्या संवादरूपाने दिली आहे. नंतर सेतुबन्धाची घटना वर्णिली आहे. इतक्यात रावण सीतेने मायाशिर कापून रामापुढे फेकतो. राम ते पाहून शोक करतो. तितक्यात त्या शिरातील सारिका रामाला वस्तुस्थिति निवेदन करते, तेव्हा सर्वांना आनंद होतो ( अं. ७ ).

नंतरच्या आठव्या अंकात सुमुख, दुर्मुख, रावण, इत्यादिकांच्या संभाषणात लंकेच्या युद्धातील कुंभकर्ण, इंद्रजित् इत्यादिकांच्या युद्धाचे आणि नंतर समरांगणावरील मृत्यूचेही वर्णन आले आहे. नवव्या अंकात कवीने इंद्र, दशरथ, चारण व चारणी यांच्या संभाषणात रामरावणयुद्धाचे सविस्तर वर्णन केले आहे. शेवटच्या दहाव्या अंकात लंका आणि अलका या दोन नगरदेवतांच्या भाषणातून आपणास सीताशुद्धीची माहिती मिळते.[1] नंतरच्या मुख्य प्रवेशात राम, लक्ष्मण, सीता, त्रिजटा, सुग्रीव व बिभीषण यांचा लंकेपासून अयोध्येपर्यंतचा प्रवास वर्णिला आहे. या प्रवेशात राजशेखराने मुरारि कवीचे अनुकरण करून हिमालय, कैलास, मानससरोवर, इन्द्राची अमरावती, चन्द्रलोक, ब्रह्मलोक इत्यादि वरची आणि परलोकातील स्थले, तसेच ताम्रपर्णी, गोदावरी, भीमेश्वर, आन्ध्रदेश, कावेरी, महाराष्ट्र, विदर्भ, कुन्तल, लाट, अवन्ति, यमुना, पाञ्चालदेश, कान्यकुब्ज, वाराणसी, मिथिला इत्यादि भूलोकातील देश, नद्या व नगरे यांचे, भौगोलिकक्रम धाब्यावर बसवून, वर्णन केले आहे. मनुष्याहातल विदर्भाचे वर्णन पाहा—

> यत् क्षेमं त्रिदिवाय वर्त्म निगमस्याङ्गं च यत्सप्तमं
> स्वादिष्ठं च यदिक्षवादपि रसाच्चक्षुश्च यद्वाङ्मयम् ।
> तदस्मिन् मधुरं प्रसादि रसवत् कान्तं च काव्यामृतं
> सोऽयं सुभ्रु पुरो विदर्भविषयः सारस्वती जन्मभूः ॥
> ( बा. रा., १०, ७४ )

( हे सुन्दरी, ज्यामध्ये स्वर्गाला जाण्याचे अमोघ साधन, वेदाचे जणु काय सातवे अंग, इक्षुरसापेक्षाही गोड, ( जगताला ) पाहण्याचे वाङ्‌रूपी साधन, मधुर, प्रसाद-गुणयुक्त, रसवाही आणि रमणीय असे काव्यामृत उत्पन्न होते अशा सरस्वतीची जन्मभूमि असलेला विदर्भ देश पुढे दिसतो आहे, पाहा. )

विदर्भाच्या प्राचीन वाङ्मयाचे इतके सुंदर शब्दचित्र दुसऱ्या कोणा कवीने काढले नसेल.

---

१. अशाच तऱ्हेचा लंका आणि अलका यांचा प्रवेश विनायकाने रचलेल्या ' महावीरचरिता 'च्या सातव्या अंकात घातला आहे म. न., पृ. २१८–२२१.

मातेचा केलेला वध, सहस्रार्जुनाने त्याच्या पित्याला ठार मारल्यावर त्याने त्याचा व सर्व क्षत्रियांचा केलेला संहार इत्यादिकांची चित्रे काढली होती ती मातलि दाखवून त्यांचे वर्णन करतो. हे वर्णन ' उत्तररामचरिता 'तल्या पहिल्या अंकातील चित्रवर्णनासारखे आहे, पण ते येथे असंभवनीय व अनुचित दिसते. नंतर परशुराम आणि राम यांचे वाग्युद्ध होते. तेव्हा परशुराम रामाला आपले वैष्णव धनुष्य सज्य करण्यास देतो. लक्ष्मण ते घेऊन त्याला दोरी लावतो. तेव्हा परशुराम रामाला युद्धाचे आह्वान देतो आणि ते दोघे मिथिलेजवळच्या समरभूमीकडे जातात ( अं. ४ ).

पाचव्या अंकाच्या आरंभी मिथिलेतून एका हेराने माल्यवानाला पाठविलेल्या पत्रावरुन आपणास कळते की रामाने परशुरामाचा पराभव केला आहे. माल्यवानाने रावणाच्या मनोविनोदनार्थ मयासुराच्या विशाद नामक पट्टशिष्याकडून लाकडाच्या दोन मोठ्या बाहुल्या–एक सीतेची व दुसरी तिच्या सिन्दूरिकानामक धात्रेयिकेची अशा–तयार करविल्या आहेत. त्यांच्या तोंडात मैना बसविल्या असून त्या सूत्रधाराकडून हव्या तशा हलविल्या जातात. नंतरच्या प्रवेशात रावण सिन्दूरिकेला सीतेविषयी प्रश्न करतो आणि तीही लाजणाऱ्या लाकडी सीतेला विचारून तिची उत्तरे देते. आपल्यावर तिचे प्रेम आहे असे समजताच रावणाला अत्यानंद होतो आणि तो तिला कवटाळतो तो ती लाकडाची आहे असे त्याला कळते. नंतर तो ज्या ठिकाणी सहाही ऋतु नेहमी असतात अशा लीलोद्यानात विरहशमनार्थ जातो आणि तेथे प्रत्येक ऋतूचे दोन दोन श्लोकात वर्णन करतो. वारुणी, लक्ष्मी, सरस्वती त्याच्या मनोविनोदनार्थ येतात; पण तो त्या सर्वांना हाकलून देतो. पुढे तो विरहाने व्याकुळ होऊन चन्द्रादिकांना जानकी-विषयी प्रार्थना करतो. तितक्यात नाक कापलेली शूर्पणखा प्रवेश करून त्याला म्हणते, ' मी तुमच्याकरिता सीतेचे हरण करीत असता रामलक्ष्मणांनी मला कापालिकव्रताला योग्य असे केले आहे पाहा. ' तेव्हा रावण तिला सूड घेण्याचे आश्वासन देतो ( अंक ५ ).

सहाव्या अंकाच्या विष्कम्भकावरून आपणास असे कळते की मायामय राक्षस आणि शूर्पणखा यांनी अनुक्रमे दशरथ आणि कैकयी यांची रूपे घेऊन रामाला फसवून वनवासात पाठविले आहे. वामदेवादिकांनी ही राक्षसांची माया आहे असे सांगितले तरीही राम आपल्या निश्चयापासून ढळला नाही. नंतर स्वर्गातून मातलिसह रथाने दशरथ व कैकयी येतात. त्यांना ही वार्ता ऐकून मोठा शोक होतो नंतर रामादिकांबरोबर गेलेला सुमन्त्र त्यांच्या अगस्त्याश्रमापर्यंतच्या प्रवासाची आणि नंतर जटायूचा दूत रत्नशिखण्ड नामक गृध्र रावणाने सीतेचे हरण केल्याची वार्ता सांगतो. तीव सीतेने लक्ष्मणाला वाक्ताडन केल्याचे गाळले आहे ( अं. ६ ).

सातव्या अंकाच्या आरंभीच्या विष्कंभकात वालिवध, सुग्रीवाभिषेक इत्यादिकांची माहिती कर्पूरचण्ड आणि चन्दनचण्ड या दोन वैतालिकांच्या संवादरूपाने दिली आहे. नंतर सेतुबन्धाची घटना वर्णिली आहे. इतक्यात रावण सीतेचे मायाशिर कापून रामापुढे फेकतो. राम ते पाहून शोक करतो. तितक्यात त्या शिरातील सारिका रामाला वस्तुस्थिति निवेदन करते, तेव्हा सर्वांना आनंद होतो ( अं. ७ ).

नंतरच्या आठव्या अंकात सुमुख, दुर्मुख, रावण, इत्यादिकांच्या संभाषणात लंकेच्या युद्धातील कुंभकर्ण, इंद्रजित् इत्यादिकांच्या युद्धाचे आणि नंतर समरांगणावरील मृत्यूचेही वर्णन आले आहे. नवव्या अंकात कवीने इंद्र, दशरथ, चारण व चारणी यांच्या संभाषणात रामरावणयुद्धाचे सविस्तर वर्णन केले आहे. शेवटच्या दहाव्या अंकात लंका आणि अलका या दोन नगरदेवतांच्या भाषणातून आपणांस सीताशुद्धीची माहिती मिळते.[1] नंतरच्या मुख्य प्रवेशात राम, लक्ष्मण, सीता, त्रिजटा, सुग्रीव व बिभीषण यांचा लंकेपासून अयोध्येपर्यंतचा प्रवास वर्णिला आहे. या प्रवेशात राजशेखराने मुरारि कवीचे अनुकरण करून हिमालय, कैलास, मानससरोवर, इन्द्राची अमरावती, चन्द्रलोक, ब्रह्मलोक इत्यादि दूरची आणि परलोकातील स्थले, तसेच ताम्रपर्णी, गोदावरी, भीमेश्वर, आन्ध्रदेश, कावेरी, महाराष्ट्र, विदर्भ, कुन्तल, लाट, अवन्ति, यमुना, पाञ्चालदेश, कान्यकुब्ज, वाराणसी, मिथिला इत्यादि भूलोकातील देश, नद्या व नगरे यांचे, भौगोलिकक्रम ध्यानयावर ठेवून, वर्णन केले आहे. नमुन्यादाखल विदर्भाचे वर्णन पाहा—

> यत् क्षेमं त्रिदिवाय वर्त्म निगमस्याङ्गं च यत्तत्त्वतं
> स्वादिष्ठं च यदिक्षवादपि रसाच्चक्षुश्च यद्वाङ्मयम् ।
> तद्यस्मिन् मधुर प्रसादि रसवत् कान्त च काव्यामृतं
> सोऽयं सुभ्रु पुरो विदर्भविषयः सारस्वती जन्मभूः ।।
> ( बा. रा., १०, ७४ )

( हे सुन्दरी, ज्यामध्ये स्वर्गाला जाण्याचे अमोघ साधन, वेदाचे जणु काय खातेचे अंग, इक्षुरसापेक्षाही गोड, ( जगताला ) पाहण्याचे वाङ्रूपी साधन, मधुर, प्रसादगुणयुक्त, रसवाही आणि रमणीय असे काव्यामृत उत्पन्न होते असा सरस्वतीची जन्मभूमि असलेला विदर्भ देश पुढे दिसतो आहे, पाहा. )

विदर्भाच्या प्राचीन वाङ्मयाचे इतके सुंदर शब्दचित्र दुसऱ्या कोणा कवीने काढले नसेल.

१. असाच तऱ्हेचा लंका आणि अलका यांचा प्रवेश विनायकाने रचलेल्या ' महावीरचरिता 'च्या सातव्या अंकात घातला आहे म. च., पृ. २१८–२२१.

नंतर रामादिक वसिष्ठ, भरत, शत्रुघ्न, इत्यादिकांना भेटतात. आणि भरत-वाक्याने नाटकाची समाप्ति होते.

'बालरामायणा'च्या संविधानकाचा जरा विस्तृत सारांश येथे दिला आहे. कारण हे नाटक सहसा लोकांच्या वाचनात येत नाही. संस्कृत वाङ्मयाच्या आधुनिक इतिहासकारांनीही ते काळजीपूर्वक वाचलेले दिसत नाही. वर दिलेल्या सारांशावरून राजशेखराने भवभूतीच्या नाटकातील अनेक प्रसंगांचे अनुकरण केलेले दिसते. चित्रदर्शन, बटु आणि उपाध्याय यांचा प्रवेश, गर्भाङ्क, मायामय व शूर्पणखा यांनी अनुक्रमे दशरथ व कैकेयींचे रूप घेऊन रामाला फसविणे इत्यादि प्रसंग राजशेखराला भवभूतीच्या नाटकावरूनच सुचलेले दिसतात. किंबहुना त्याने त्या बटुचे नाव भवभूति असेच ठेवले आहे.

राजशेखराने मुरारीचेही अनुकरण केल्याचे आम्ही मागे दाखविले आहे. त्याने स्वतःही काही नवीन प्रसंग–उदाहरणार्थ सीतास्वयंवर, तोंडात सारिका असलेल्या लाकडी बाहुल्याचे रावणाशी संभाषण इत्यादि–कल्पिले आहेत, पण त्याने त्याच्या संभवनीयतेचा विचार केला नाही. स्वयंवरवर्णनात तसेच शेवटच्या अंकातील स्थलवर्णनात कालविपर्यासाचा मोठा दोष झाला आहे. राजशेखराच्या अंगी विवेचक शक्ति मुळीच नव्हती. नाहीतर शतानन्दाने सीतेला केलेल्या खालील उपदेशात सपत्नींचा उल्लेख आला नसता–

निर्व्याजा दयिते ननान्दृषु नता श्वश्रूषु भक्ता भव
स्निग्धा बन्धुषु वत्सला परिजने स्मेरा सपत्नीष्वपि ।
पत्युर्मित्रजने सनर्मवचना खिन्ना च तद्द्वेषिषु
स्त्रीणां संवननं नतभ्रु तदिदं कान्तौषधं भर्तृषु ॥
(बा. रा., ४. ४४)

यातील कल्पना कण्वांनी शकुन्तलेला केलेल्या उपदेशातून घेतल्या आहेत हे उघड आहे. दुष्यन्ताला अगोदरच अनेक राण्या असल्यामुळे कण्वांनी शकुन्तलेला त्यांच्याशी सखीप्रमाणे वागण्याविषयी केलेला उपदेश योग्य आहे, पण सीतेच्या बाबतीत तो अगदीच अस्थानी आहे यात संशय नाही.

राजशेखराचे संस्कृत भाषेवर असामान्य प्रभुत्व होते. त्याच्या काव्यात माधुर्य आणि प्रसाद गुण आहेत. काही ठिकाणच्या कल्पनाही सुन्दर आहेत. उदाहरणार्थ, प्रेम हे उभयपक्षी असले पाहिजे हे खालील श्लोकात वर्णिलेले तत्त्व पाहा–

प्रेम रम्यमुभयोः समं दिशो-
कामिनां यदिह चापपिच्छवत् ।

एकतरस्तु न चकास्ति साध्वपि
श्यामपृष्ठमिव बर्हिणश्छदम् ॥

(बा. रा., ५, १३)

(दोन्ही प्रेमिकांचे परस्परावर प्रेम असले तर ते दोन्ही बाजूंनी सुंदर दिसणाऱ्या चाप पक्ष्याच्या पिसाप्रमाणे रम्य भासते. याच्या उलट त्यांपैकी एकाचेच प्रेम दुसऱ्यावर असले, तर जरी ते उत्कट असले तरी काळ्या पृष्ठभागाच्या मोराच्या पिसाप्रमाणे शोभत नाही.)

राजशेखराने भवभूतीच्या नाटकांतून केवळ काही प्रसंगच नाही तर अनेक शब्दप्रयोग, उदाहरणार्थ, पुत्रभाण्ड, पिशाचिका यासारखे व कल्पनाही घेतल्या आहेत. खालील उदाहरणे पाहा–

(१) भवभूति—उ. च. (२, ४)

वितरति गुरुः प्राज्ञे विद्यां यथैव तथा जडे

इत्यादि श्लोकातील कल्पना राजशेखराच्या 'बालरामायणा'त (४, १९) खालील प्रमाणे आली आहे–

उपदिशति समानं कर्म कृत्स्नं पिनाकी
समममपि च यतन्ते कर्तुमभ्यासमेते ।
तदपि भृगुकुलेन्दुः काममुत्कृष्यतेऽसौ
ननु भवति विनीतं द्रव्यमेव क्रियाभिः ॥

(२) भवभूति—(उ. च., १, २८)

'अपि ग्रावा रोदित्यपि दलति वज्रस्य हृदयम्'

इत्यादि कल्पना 'बालरामायणा'त (अं. ६) पुढील प्रमाणे आली आहे–मायामयेन तथा करुणं रोदितुं प्रवृत्तं यथा यदि नाम तरवः पर न रोदिता. ग्रावप्रन्थीनां परं यदि न दलति हृदयम् ।

तेव्हा राजशेखर स्वतःला भवभूतीचा अवतार समजत असला तर आश्चर्य नाही.

## जयदेवाचे 'प्रसन्नराघव'

राजशेखरानंतर पूर्वरामचरितावर नाटक लिहिणारा संस्कृत कवि जयदेव हा होय. हा सुमारे ख्रिस्तोत्तर तेराव्या शतकात होऊन गेला. हा कौण्डिन्यगोत्री ब्राह्मण महादेव आणि सुमित्रा यांचा पुत्र होता. याचे 'प्रसन्नराघव' नाटक सात अंकांचे असून त्यात ३९२ श्लोक आहेत.

जयदेवाने रामायणकथेत फारसे फरक केले नाहीत. त्याने राजशेखराप्रमाणे सीतास्वयंवराचा उल्लेख केला आहे. त्यात फक्त बाण आणि रावण यांचाच शिवधनुष्याला दोरी लावण्याचा प्रयत्न वर्णिला आहे.

जयदेवाने काही प्रवेशात भवभूतीचे अनुकरण केले आहे. त्याने कैकेयीला दोषमुक्त करण्याचा प्रयत्न केला नाही. सीतेचे लक्ष्मणाला वाक्ताडन आणि कपटाने वालीचा वध हे प्रसंग गाळले आहेत. पण शिवधनुर्भंगाच्या अगोदर राम आणि सीता यांची चंडिकेच्या देवालयाजवळ दृष्टादृष्ट झाली असा प्रवेश घातला आहे, तो ' मालतीमाधवा '-तील मदनोत्सवाच्या प्रसंगी झालेल्या मालतीमाधवाच्या भेटीवरून सुचलेला दिसतो.

जयदेवाने आणखीही दोन प्रवेशाच्या सूचना भवभूतीकडून घेतल्या आहेत. नद्यांच्या द्वारे त्यांच्या काठच्या प्रदेशातील घटनांची माहिती देण्याची कल्पना प्रथम भवभूतीने आपल्या ' उत्तररामचरिता 'त योजिली. त्याने अगस्त्याश्रमातील घटना मुरला नदीकडून आणि वाल्मीकीच्या आश्रमातील घटना तमसेकडून वदविल्या आहेत. जयदेवाने या कल्पनेच्या साहाय्याने अयोध्या, चित्रकूट, पंचवटी व किष्किंधा या ठिकाणी घडलेल्या घटनांची माहिती शरयू, यमुना, गंगा, गोदावरी, तुंगभद्रा आणि सागर यांच्या संवादातून दिली आहे. गोदावरी एके ठिकाणी तर काही माहिती आपणास वनदेवतेकडून मिळाल्याचे सांगते तेव्हा ' उत्तररामचरिता 'तील वनदेवता वासंतीची आठवण होते.

जयदेवाने भवभूतीकडून घेतलेली दुसरी कल्पना प्रेक्षणकाची किंवा गर्भनाटकाची. सीताहरणानंतर शोक करत असलेल्या रामाचे मनोविनोदन कसे करावे या विचारात लक्ष्मण असताना तेथे चम्पकापीड आणि रत्नशेखर नामक दोन विद्याधर येतात. रत्नशेखर लंकेत काही काल वास्तव्य करून चित्ररूप नामक राक्षसाकडून इन्द्रजालविद्या शिकून आला आहे. तो त्या विद्येच्या साहाय्याने लंकेत घडलेल्या अनेक घटना—अशोकवनिकेत सीतेचा शोक, त्रिजटेने केलेले तिचे सान्त्वन, रावणाने केलेला सीतेचा अनुनय, सीतेकडून त्याचे प्रत्याख्यान, रावण तिचा चंद्रहास खड्गाने शिरच्छेद करण्यास प्रवृत्त झाला असता त्याच्या हातात त्याच्या अक्षकुमार नामक पुत्राच्या शिराचे पतन, हनुमानाचे आगमन, मुद्रिकार्पण, सीतेकडून त्याला आपल्या चूडारत्नाचे समर्पण, लंकादहन इत्यादि अनेक घटना दाखवितो.[1] ' उत्तररामचरिता 'तल्या गर्भांकासारखेच हे प्रेक्षणक आहे. आणि याची कल्पना जयदेवाला भवभूतीच्या त्या नाटकावरूनच सुचली असावी हे उघड आहे.

---

१. प्रसन्नराघव, पृ. १४२–१६५.

आणखीही काही किरकोळ प्रसंग जयदेवाला भवभूतीच्या नाटकावरून सुचलेले दिसतात. उदाहरणार्थ सीता वनवासाला जात असता यमुना पार करताना तिला म्हणते—अयि देवि दिनकरनन्दिनि, पुनरपि निजकुटुम्बस्य दर्शनप्रसादं कुरुष्व। (प्र. रा., पृ. १०८). रावणवधानंतर परत अयोध्येला येताना सीतेला आपल्या पूर्वीच्या प्रार्थनेची आठवण होते. आणि यमुना नदीजवळ येताच ती म्हणते— 'अयि कलिन्दनन्दिनि सत्यप्रसादासि।' (पृ. २०३). हा प्रसंग भवभूतीच्या 'उत्तररामचरिता'च्या पहिल्या अंकातील रामाच्या 'सा त्वमम्ब स्नुषायामरुन्धतीव सीतायां शिवानुध्याना भव' या गंगेला केलेल्या प्रार्थनेवरून सुचला आहे यात संशय नाही. 'उत्तररामचरिता'तील हा प्रसंग भवभूतीने सहेतुक घातला आहे हे आम्ही मागे दाखविले आहे. जयदेवाने घातलेल्या या उक्तींत मात्र साभिप्रायता नाही.

'प्रसन्नराघवा'तील भाषा सामान्यतः प्रसादयुक्त आहे. पण त्यात कार्यैक्य, संविधानक रचनेचे कौशल्य, स्वभावरेखन इत्यादि गुण फारसे दिसत नाहीत. त्यामुळे ते भवभूतीच्या नाटकापेक्षा कमी दर्जाचे झाले आहे.

याशिवाय पूर्वरामचरितविषयक अनेक नाटके उदाहरणार्थ, 'कृत्यारावण', 'जानकीराघव', 'राघवाभ्युदय', 'रामानन्द', 'मायापुष्पक', 'अभिनयराघव' आणि 'मारीचवञ्चित' प्राचीन कवींनी लिहिलेली साहित्यशास्त्रीय ग्रंथातील उल्लेखावरून आणि त्यातून उद्धृत केलेल्या श्लोकांवरून ज्ञात झाली आहेत.[१] पण ती पूर्णरूपाने उपलब्ध झाली नसल्यामुळे त्यावर भवभूतीच्या नाट्यकृतींचा किती प्रभाव पडला होता हे समजण्यास साधन नाही.

भवभूतीने पूर्वरामचरिताप्रमाणे उत्तररामचरितावरही तन्नामक नाटक लिहिले आहे त्याचा प्रभाव तदुत्तरकालीन नाटकावर किती दिसतो याचा आता विचार करू.

## धीरनागाची 'कुन्दमाला'

यापैकी पहिले नाटक 'कुन्दमाला' हे होय. ते धीरनाग नामक कवीने खिस्तोत्तर आठव्या वे दहाव्या शतकात लिहिले असावे हे मागे परिशिष्ट ४ मध्ये सविस्तर दाखविले आहे. या नाटकाचे संविधानक उत्तररामचरितविषयक आहे. त्यात भवभूतीच्या नाटकातून अनेक प्रसंग व शब्दप्रयोग घेतल्याचे आम्ही मागे दाखविले आहे. त्याची पुनरुक्ति येथे करीत नाही. काही अधिक विशेषांचा मात्र निर्देश करीत आहो.

---

१. V. Raghavan, *Some Old Lost Rāma Plays*, pp. 27 f.

'कुन्दमाला' नाटकात कुन्दमालेला विशेष महत्त्व आहे. म्हणून कवीने तिचेच नाव आपल्या नाटकाला दिले आहे. धीरनागाला तिची कल्पना भवभूतीच्या 'मालती-माधवा'तील बकुलमालेवरून सुचली असावी. त्या नाटकात बकुलमालेला असेच महत्त्व आहे. तिचा उल्लेख त्याच्या बहुतेक अंकात आलेला आहे. दुसरा प्रसंग सीतेच्या छायेचा. हाही भवभूतीच्या 'उत्तररामचरिता'तील तिसऱ्या अंकावरून सुचला असावा. भवभूतीने त्या अंकाला 'छायाङ्क' असे नाव दिले आहे. त्यात 'छाया' याचा अर्थ आभास आहे हे आम्ही पूर्वोक्त परिशिष्टात दाखविले आहे. धीरनागाने छाया याचा अर्थ सावली असा घेऊन 'कुन्दमाले'च्या चौथ्या अंकातील प्रवेश, ज्यामध्ये रामाला सीतेची सावली दिसते, पण सीता दिसत नाही तो, रचला आहे. त्या प्रवेशात राम सीतेचे उत्तरीय ओढून घेतो. ते पूर्वी वनवासात चित्रकूटाजवळ राहणाऱ्या मायावती नामक वनदेवतेने सीतेला स्मरणवस्तु म्हणून दिले होते. त्याच्यावरून तेथे सीता असल्याबद्दल रामाने अनुमान केले अशी कल्पना त्या प्रवेशात आहे. ही कल्पनाही धीरनागाला भवभूतीच्या नाटकावरूनच सुचली असावी. 'उत्तर-रामचरिता'तील वनदेवता वासंती सुप्रसिद्ध आहे. सीतेच्या उत्तरीयाचा उल्लेख 'महा-वीरचरिता'च्या पाचव्या अंकात रावण नेत असलेल्या सीतेने ते ऋष्यमूक पर्वतावर टाकले ( यत्तया दुरात्मनापह्रियमाणयाः स्वस्तमनसूयानामाङ्कमुत्तरीयम्) असा आला आहे. सीतेने आपले उत्तरीय ऋष्यमूक पर्वतावरील वानरांना पाहून टाकले हे वर्णन 'रामायणात'ही आले आहे. पण त्यावर अनसूयेचे नाव लिहिले होते ही कल्पना भव-भूतीची. या उत्तरीयावरून धीरनागाला मायावतीने सीतेला दिलेल्या उत्तरीयाची कल्पना सुचलेली दिसते.

याशिवाय इतरही काही गोष्टी धीरनागाला 'उत्तररामचरिता'वरून सुचलेल्या दिसतात. 'कुन्दमाले'त सीता रामाचा 'निरनुक्रोश' असा उल्लेख करते. ती कुशलवांना 'निरनुक्रोशाचे पुत्र' असे म्हणते. या 'निरनुक्रोश'पदाचा उपयोग 'उत्तरराम-चरिता'च्या तिसऱ्या अंकात सीतेच्या भाषणात आला आहे. (किमिति ..मामेव मन्दभागिनीमुद्दिश्य वत्सलस्यैवंवादिन आर्यपुत्रस्योपरि निरनुक्रोशा भविष्यामि। पृ. ५९) याप्रमाणे धीरनागाने 'कुन्दमाले'त अनेक ठिकाणी भवभूतीच्या नाटकांतून सूचना घेतलेल्या दिसतात.

**'छलितराम'**

याशिवाय उत्तररामचरितविषयक आणखी एक 'छलितराम' नामक नाटक होते. ते आता उपलब्ध नाही. आणि त्याच्या कर्त्याचे नावही माहीत नाही. तथापि त्यातील काही उतारे धनिकाच्या 'दशरूपकावलोका'त (दहावे शतक) आणि इतर

काही साहित्यशास्त्रीय ग्रंथात घेतले आहेत. त्यावरून त्याविषयी काही माहिती संशोधकानी जमविली आहे.[1] त्यातील काही श्लोक 'दशरूपावलोका'त आले असल्यामुळे ते नाटक खिस्तोत्तर दहाव्या शतकापूर्वीचे आहे यात संशय नाही.

या नाटकात लंकेतील रावणवधानंतर राम अयोध्येस परत येतो तेथपासून पुनः सीताप्राप्तीपर्यंतची कथा आली आहे. याचे सहा अंक होते. त्यापैकी एकाला 'पुंसवनाङ्क' असे नाव होते. गर्भवती स्त्रियाना पुत्र व्हावा या उद्देशाने हा संस्कार बहुधा गर्भारपणाच्या तिसऱ्या महिन्यात केला जात असे.[2] याच अंकात लवणासुराच्या चित्रमुख आणि मुमाय नामक हेरांनी कैकयी आणि मन्थरा यांची रूपे घेऊन रामाला सीतेविषयी तथाकथित अनपवाद सांगून फसविल्याचा प्रसंग आला आहे. त्यावरून या नाटकाला छलितराम (फसविलेला राम) असे नाव दिले आहे. 'उत्तररामचरिता'सारख्या नाटकात लवणासुराने ऋषींना त्रास दिल्यामुळे राम शत्रुघ्नाला त्याला शासन करण्याकरिता पाठवतो असा प्रसंग घातला आहे, पण त्याचा त्या नाटकाच्या संविधानकाशी घनिष्ट संबंध नाही. 'छलितरामा'त मात्र तसा संबंध दाखविला आहे त्यावरून त्या नाटकात कार्यैक्य (unity of action) साधलेले दिसते.

दुसरी गोष्ट ही घटना सीतेच्या गरोदरपणाच्या तिसऱ्या महिन्यात पुंसवन संस्कारानंतर घडली असे दाखविल्यामुळे भवभूतीच्या 'उत्तररामचरिता'च्या संविधानकात पूर्वी उल्लेखिलेला जो भयंकर प्रमाद झालेला दिसतो तसा या नाटकात दिसत नाही.

'कुन्दमाले'त रामाच्या अश्वमेधाचा घोडा लवाने पकडला असल्याचा आणि त्यामुळे वाल्मीकीच्या आश्रमात युद्ध झाल्याचा प्रसंग नाही. वाल्मीकीच्या 'रामायणा'तही तसा प्रसंग नाही हे मागे दाखविले आहे. पण 'छलितरामा'त तसा प्रसंग आला आहे. तो अर्थातच 'उत्तररामचरिता'तून घेतलेला दिसतो. या युद्धात लव पकडला जाऊन त्याला अयोध्येला नेण्यात येते. तेथे तो सीतेची सुवर्ण प्रतिमा पाहून 'येथे माझी माता कशी ?' असे विचारतो. त्यावरून तो सीतेचा पुत्र आहे असे लक्ष्मणादिकांच्या लक्षात येते असा प्रसंग घातला आहे. पुढे सीताशुद्धीचा प्रसंग कसा वर्णिला होता हे समजण्यास साधन नाही.

---

१. V. Raghavan, *Some Old Lost Rāma Plays*. pp. 50 f

२. तृतीये मासि कर्तव्यं गृष्टेरन्यत्र शोभनम् । R. B. Pandey, *Hindu Samskaras*, p. 102, n. 18.

युद्धात लव पकडला जाण्याची ही घटना 'पद्मपुराणा'तही वर्णिली आहे हे मागे सातव्या प्रकरणात 'उत्तररामचरिता'च्या संविधानकाची चर्चा करताना दाखविले आहे. पुढे कुशाने त्याची सुटका केल्याचे त्या पुराणात दाखविले आहे. 'छलितराम' नाटक पूर्णपणे उपलब्ध झाले नसल्यामुळे त्याच्या संविधानकात कुशाने कोणता भाग घेतला होता हे समजण्यास साधन नाही.

वरील विवेचनावरून 'छलितराम' नाटकाच्या कर्त्याने भवभूतीच्या 'उत्तर-रामचरिता'तून काही प्रसंग घेतले असले तरी त्यात आपल्या प्रतिभेने नवे प्रसंग करून भवभूतीच्या त्या नाटकातील काही दोषही टाळले होते हे दिसून येईल.

पूर्वरामचरिताच्या मानाने उत्तररामचरितावर फारच थोड्या संस्कृत कवींनी नाट्यरचना केली आहे. आता आपण भवभूतीच्या तिसऱ्या—मालतीमाधव—नाटकाचा उत्तरकालीन नाट्यकृतींवर काही प्रभाव पडला होता काय हे पाहू.

## उत्तरकालीन प्रकरणे

मागे सांगितल्याप्रमाणे 'मालतीमाधव' हे एक 'प्रकरण' नामक रूपक आहे. या प्रकारच्या रूपकात संविधानक काल्पनिक असते. त्याचे दोन प्रकार असतात–(१) एकात नायिका वेश्या असते. याचे प्रसिद्ध उदाहरण शूद्रकाचे 'मृच्छकटिक' होय. (२) दुसऱ्यात नायिका कुलस्त्री असते. याचे उदाहरण भवभूतीचे 'मालतीमाधव'. पहिल्या प्रकारची काही अल्प प्रकरणे साहित्यशास्त्रीय ग्रंथांतील उल्लेखांवरून ज्ञात झाली आहेत. उदाहरणार्थ, 'तरङ्गदत्त', 'रङ्गवृत्त', 'कामदत्त', 'अनङ्गसेना' 'हरिनन्दि' इत्यादि.[१] ही प्रकरणे अद्यापि उपलब्ध झाली नाहीत. शिवाय तीत वेश्या नायिका असल्यामुळे त्यांची चर्चा येथे कर्तव्य नाही.

ज्यांत कुलस्त्री नायिका आहे अशी काही प्रकरणे किंवा सामाजिक नाटके ज्ञात आहेत. उदाहरणार्थ रामचंद्राचे 'कौमुदीमित्रानन्द' तर्कालंकाराचे 'कौमुदीसुधाकर-प्रकरण', रामभद्र मुनीचे 'प्रबुद्धरौहिणेय', यशश्चन्द्राचे 'मुद्रितकुमुदचन्द्र' इत्यादि. पण त्यांतील संविधानके 'मालतीमाधवा'च्या धर्तीची नाहीत. त्यांतील काही जैन मुनींनी आपल्या धर्माच्या प्रसारार्थ लिहिली होती.

## उद्दंडीचे 'मल्लिकामारुत'

भवभूतीच्या 'मालतीमाधवा'चे अनुकरण करून मध्यम स्थितीतील लोकांच्या जीवनाविषयी जी उत्तरकालीन प्रकरणे लिहिली गेली त्यामध्ये 'मल्लिकामारुता'ची

१. V Raghavan, *The Social Play in Sanskrit*, pp. 19 f.

गणना प्रामुख्याने केली पाहिजे. या प्रकरणाचा कर्ता उद्दंडी किंवा दंडी हा मूळचा काञ्ची प्रदेशातील लाटपुर नामक अग्रहाराचा रहिवासी. याच्या कुलाचे नाव वाधुल असे होते. भवभूतीप्रमाणे ह्याही आपल्या पूर्वीच्या चार पिढ्यांची माहिती देतो. हा त्या नाटकाच्या प्रस्तावनेत सांगतो की, आपण आंध्र, कर्णाट, कलिंग, चोल व केरल देशात हिंडत हिंडत कुक्कुटक्रोड नगरात ( कालिकत येथे ) विक्रमराजाच्या दरबारी आलो आणि तेथे राजाच्या आज्ञेप्रमाणे ' मल्लिकामारुत ' नाटकाचा प्रयोग करविला. हा विक्रम म्हणजे पंधराव्या ( काहींच्या मते सतराव्या ) शतकाच्या आरंभी होऊन गेलेला कालिकतचा झामोरिन मानविक्रम होय.

' मल्लिकामारुत ' प्रकरणाचे दहा अंक आहेत. नाटकाचे कथानक मगधाची राजधानी कुसुमपुर ( पाटलिपुत्र ) येथे घडते. त्या नगराच्या जवळच्या आश्रमात मन्दाकिनी नामक महायोगेश्वरी सन्यासिनी राहत असे. तिने पूर्वी हिमालयात विद्याधरामात्य विश्वावसु याच्याबरोबर योगविद्येचे अध्ययन केले होते. विश्वावसूची कन्या मल्लिका हिला एका ऋषीचा शाप झाल्यामुळे कुसुमपुरात जन्म घ्यावा लागला. ती त्या नगराच्या विश्वावसु नावाच्याच अमात्याला भगवती गौरी देवीच्या स्वप्नात झालेल्या दृष्टांताप्रमाणे उद्यानात मल्लिकेजवळ सापडली म्हणून तिचे नाव मल्लिका ठेवण्यात आलं होते. मन्दाकिनीचे तिच्यावर विशेष प्रेम होते. ती यौवनात आली त्यावेळी कुन्तलेश्वराच्या ब्रह्मदत्त नामक अमात्याने आपल्या चौदा विद्यात पारंगत झालेल्या आणि शस्त्रनिपुण अशा मारुत नामक पुत्राला आपला मित्र कुसुमपुरचा राजा चन्द्रवर्मा याच्या मैत्रीकरिता पाठविले होते. मन्दाकिनीची इच्छा मल्लिका आणि मारुत याचे परस्परावर प्रेम बसून त्यांचा विवाह घडून यावा अशी असते. त्या दोघांची आश्रमात गाठ पडून ती परस्पराकडे आकृष्ट होतात. त्यामुळे मन्दाकिनीला साहजिकच आनंद होतो. पण आरट्टेश्वर ( पंजाबाधिपति ) सिंहवर्म्याचा अमात्य शंबरक हा राजाच्या मार्फत मल्लिकेला मागणी घालतो. एकदा मल्लिकेचा पिता विश्वावसु गौरी देवीच्या देवालयात मल्लिका कोणास द्यावी हे विचारण्यास गेला असता शंबरक जवळच्या तमालवृक्षाच्या पल्लवामध्ये अदृश्य राहून ' शंबरक हाच मल्लिकेचा वर ' असे गौरीचे म्हणून शब्द उच्चारतो. मल्लिकेच्या पित्याला ती आकाशवाणी वाटून तो तिला शंबरकास देण्याचे ठरवतो.

इकडे मल्लिका आणि मारुत याचे परस्परावरचे प्रेम वृद्धिंगत होते. मल्लिका आपली दिव्य पुष्पांची माला मारुताला भेट म्हणून पाठवते. तोही तिला आपला मौक्तिक हार परतभेट म्हणून देतो. दिवसेंदिवस प्रेमपरवशतेमुळे त्यांची स्थिति व्याकुळ होते. मारुताचा मित्र कलकण्ठ याचेही रमयन्तिका नामक युवतीवर प्रेम बसते. एकदा मारुत आणि मल्लिका याची उद्यानात भेट झाली असता शंबरकाच्या चिथावणीवरून

मारुत एक मदोन्मत्त हत्ती त्याच्यावर सोडतो, पण मारुत त्याला काबूत आणतो. कलकण्ठही एका सरोवरात स्नान करण्यास गेलेल्या आपल्या रमयतिका प्रेयसीला दुसऱ्या मत्त हत्तीच्या तावडीतून सोडवतो.

अमात्याने मल्लिकेला देवीच्या आदेशाप्रमाणे शम्बरकाला देण्याचे ठरविले आहे असे समजल्यावर निराश होऊन मारुत रात्री भगवती गौरीच्या देवळात जाऊन तिला प्रसन्न करण्याकरिता आपल्या मानेवर शस्त्र ठेवतो तोंच आकाशात राक्षसाच्या तावडीत सापडलेल्या मल्लिकेची आर्त हाक त्याला ऐकू येते. तितक्यात ती राक्षसाच्या हातून खाली पडते. तिला तो झेलतो आणि त्या राक्षसाला ठार करतो, तो त्यातून एक दिव्यपुरुष उत्पन्न होतो. तो मारुताचा मित्र होतो.

मन्दाकिनी मल्लिका आणि मारुत यांचे पाणिग्रहण एका लतामण्डपात घडवून आणते. त्या दम्पतींना आशीर्वाद देते आणि वधूला 'शाकुन्तलात'ल्या सारखा उपदेश करते. नंतर ती त्यांना आश्रमाजवळच्या उद्यानात पाठवते.

मारुताने ठार केलेल्या राक्षसातून उत्पन्न झालेला माकन्द नामक दिव्य पुरुष मल्लिकेचा वेष धारण करुन शंबरकाशरोबर विवाह करण्याकरिता जातो. त्याच्या बरोबर जाण्यापूर्वी मारुताचा मित्र कलकण्ठ कापायवस्त्रे धारण करुन भगवती मन्दाकिनी बनतो. इकडे शम्बरकाचा शिष्य कलपिङ्गक रमयन्तिकेशी विवाह करण्याचा प्रयत्न करतो. त्याला फसविण्याकरिता मारुताचा सेवक भ्रमरक रमयन्तिकेचा वेष धारण करतो. माकन्द आणि भ्रमरक अनुक्रमे शंबरक आणि कलपिङ्गक यांना एकान्तात घुकलतात. माकन्द शंबरकाला एका तमालवृक्षावर खाली तोंड केलेल्या अशा बांधून ठेवतो.

मल्लिका आणि मारुत तसेच कलहंस आणि रमयन्तिका यांचे मीलन होते. पण तितक्यात मल्लिका मूर्छित होते. तेव्हा मन्दाकिनी तिला शुद्धिवर आणण्यासाठी अवश्य असणाऱ्या सीमन्तमण्याकरिता[१] तिला आपल्या योगप्रभावाने उचलून घेऊन काशीला नेते. इतरांना हे माहीत नसल्याने मारुत, कलकण्ठ, रमयन्तिका, त्यांचे सेवक व सख्या शोकमग्न होतात. मारुत तर शोकाने वेडा होऊन अरण्यातील पशुपक्ष्यांना व लता-वृक्षादिकांना मल्लिकेची वार्ता पुसत सैरावैरा हिंडू लागतो. शेवटी मन्दाकिनीने मल्लिकेला काशीहून आकाशमार्गाने परत आणल्यावर ते सर्व आनन्दित होतात. मन्दाकिनीने सांगितल्यावरुन शंबरकाला वधमुक्त केल्यावर तो पळून जातो.

---

१. उद्दण्डीला याची कल्पना शक्तिभद्राच्या 'आश्चर्यचूडामणि'वरुन सुचली असावी.

शेवटच्या ( दहाव्या ) अंकात मंदाकिनी मल्लिका आणि मारुत याच्या पूर्वजन्माची कथा सांगते. एकदा मलय पर्वतावर एका नागकन्येला वायुदेवापासून गर्भ राहून लागलीच पुत्रही झाला. पित्याच्या भीतीने त्याला लतापल्लवावर टाकून ती निघून गेली. नंतर जवळच्या आश्रमातील अगस्त्य मुनींच्या लोपामुद्रा पत्नीने त्याला वाढविले. तो यौवनात आल्यावर स्वप्नात एका सुंदर कन्येला पाहता झाला. तिच्या गळ्यात मध्ये इन्द्रनीलमणि असलेला मौक्तिकहार होता. एकदा तसला हार उत्तर दिशेहून येणाऱ्या हंसांनी कमलदंड समजून चोंचीतून आणलेला त्या पर्वतावर पडला. तेव्हा तो धारण करणाऱ्या आपल्या प्रेयसीच्या शोधाकरिता तो वायुपुत्र आपल्या दोन मित्रासह आकाशमार्गाने उत्तर दिशेस निघाला. पुढे तो स्वर्गगंगेच्या तीरी पोचल्यावर नन्दनवनदेवतेने त्याच्या मदनसदृश रूपाने मोहित होऊन त्याच्या गळ्यात अम्लान अशी दिव्य पुष्पांची माला घातली. तेथे त्याला एक संन्यासिनी भेटली. तिने त्याला तेथील विश्वावसु नामक विद्याधरामात्याच्या अत्यंत सुंदर अशा कन्येविषयी माहिती दिली आणि तिचाच मौक्तिकहार तुझ्या गळ्यात आहे असे सांगितले. पुढे त्यांची दृष्टादृष्ट होऊन परस्परावर प्रेम बसले. मदनबाधेने ती दोघे झुरू लागली. शेवटी निराश होऊन ती विद्याधरकन्या एका रात्री क्रीडापर्वतावर लतापाशाने प्राणत्याग करण्याचा प्रयत्न करीत असता त्या वायुकुमाराने तिचे करुणोद्गार ऐकताच तेथे येऊन तिचा लतापाश तोडून टाकला. या गडबडीत त्या वायुकुमाराच्या हातातील चित्रफलक निसटून काकतालीयन्यायाने त्या क्रीडाशैलजवळ आलेल्या एका कोपिष्ठ ऋषीच्या डोक्यावर पडला. तेव्हा त्याने त्या दोघाना तुम्ही मानुषयोनीत जन्म घ्याल असा शाप दिला. त्या वायुपुत्राच्या मित्राने त्या ऋषीची कोपिष्ठत्वाबद्दल निर्भर्त्सना करताच त्याने त्यालाही तू राक्षस होईल असा शाप दिला. मन्दाकिनी पुढे सांगते की तो वायुपुत्र म्हणजे कुन्तलदेशचा हा अमात्यकुमार मारुत आणि ती विद्याधर कन्या म्हणजे मल्लिका होय. वायुपुत्राच्या मित्राला राक्षसजन्म प्राप्त झाला होता, पण मारुताने त्याला ठार करताच त्याला दिव्य रूप प्राप्त होऊन त्याने त्याला मागे सांगितल्याप्रमाणे मल्लिकचा वेश घेऊन त्याच्या इष्टसिद्ध्यर्थ मदत केली.

मन्दाकिनीची कथा संपताच विश्वावसु विद्याधर तेथे येऊन वधूवराचे अभिनन्दन करतो. तितक्यात कुसुमपुरच्या राजाचा अनुमतिपर सन्देश येऊन आनंदीआनंद होतो आणि भरतवाक्याने प्रस्तुत प्रकरणाची समाप्ति होते.

'मल्लिकामारुत' हे नाटक सुमारे शंभर वर्षांपूर्वी ( सन १८७८ मध्ये ) जीवानंद विद्यासागरांनी कलकत्त्यात प्रकाशित केले होते. ते आता अत्यंत दुर्मिळ झाल्यामुळे त्याच्या संविधानकाचा थोडा विस्तृत सारांश येथे दिला आहे. त्यावरून

त्याच्या कर्त्याने कालिदास, बाण व भवभूति यांच्या ग्रंथांतून अनेक कल्पना घेतल्या असल्याचे दिसून येईल. त्यामध्ये भवभूतीचे ऋण विशेष आहे. त्या नाटकांतील अनेक पात्रे आणि घटना भवभूतीच्या 'मालतीमाधवा'तून घेतल्या आहेत. मन्दाकिनी संन्यासिनी ही बौद्ध भिक्षुणी कामन्दकीची प्रतिकृति आहे. उद्दंडीच्या काळी बौद्धधर्म भारतातून नष्ट झाल्यामुळे ती विहारात राहत नसून आश्रमात राहत होती असे दाखविले आहे. मल्लिका–मारुत आणि रमयन्तिका–कलकण्ठ ही प्रेमी युगले 'मालती-माधवा'तील तशाच दोन युगलांवरून सुचली आहेत यात संशय नाही. दोन्ही नाटकांत अनेक घटना समान आहेत. उदाहरणार्थ, प्रियकरांनी प्रेयसींना हिंस्रपशूंच्या तावडीतून सोडवणे, नायकाच्या मित्रानी स्त्रीवेष धारण करून प्रतिनायकाची वंचना करणे, नायिका अदृश्य झाल्यामुळे नायकाने व त्याच्या मित्रादिकांनी शोक करणे, नायिकेला योगप्रभावाने दूरदेशी नेऊन आकाशमार्गाने परत आणणे इत्यादि घटना दोन्ही नाटकांत आढळतात. नायकनायिकांचा पूर्वजन्मवृत्तांत देण्यात उद्दंडीने बाणाच्या कादम्बरीचे अनुकरण केले असले तरी इतर अनेक बाबतींत त्याने भवभूतीचेच अंधानुकरण केले आहे. भवभूतीची प्रतिभा त्याच्या अंगी नसल्यामुळे त्याला त्यात फारसे यश मिळाले नाही ही गोष्ट निराळी.

## भवभूतीचे संस्कृत वाङ्मयातील स्थान

भवभूति आणि कालिदास समकालीन असून त्यांच्यामध्ये श्रेष्ठत्वाबद्दल वाद चालत असे अशा आख्यायिका प्राचीन परंपरेच्या पंडितवर्गात प्रचलित आहेत. त्या काही आख्यायिकांचा संग्रह बल्लाळाने आपल्या 'भोजप्रबन्धा'त केला आहे. त्यांत काहीच ऐतिहासिक तथ्य नाही हे आम्ही मागे चौथ्या प्रकरणात दाखविले आहे. आधुनिक विद्वानांतही अशा प्रश्नाची कित्येकदा चर्चा होते. पण या दोन कवींच्या ग्रंथांची निःपक्षपातीपणे तुलना केल्यास कालिदास निःसंशयपणे श्रेष्ठ ठरेल. तो जास्त कुशल असा कलाकार आहे. शब्द आणि अर्थ यांचा योग्य उपयोग करून वाचकाच्या भावना उद्दीपित करण्याचे सामर्थ्य त्याच्या अंगी आहे. त्याच्या ठिकाणी संयम आणि औचित्याची जाणीव आहे. संविधानकरचना, रसपरिपोष, स्वभावरेखन या बाबतींत त्याच्या नाट्यकृति बहुधा निर्दोष आहेत. म्हणून त्याला 'कविकुलगुरु' ही प्राचीनांनी दिलेली अनन्यसाधारण पदवी सर्वसंमत झाली आहे.[१] भवभूतीही

---

१. खालील सुभाषितातही हीच कल्पना आहे–

> पुरा कवीनां गणनाप्रसङ्गे कनिष्ठिकाधिष्ठितकालिदासा ।
> अद्यापि तत्तुल्यकवेरभावादनामिका सार्थवती बभूव ॥

आपल्या परीने उत्कृष्ट कवि आहे. त्याच्या संविधानक रचनेत काही प्रमाद आणि संभाषणात (विशेषतः प्राकृत भाषेतील संवादात) दीर्घ समास, पाल्हाळ, कृत्रिमता वगैरे दोष दिसत असले तरी त्याचे वाक्प्रभुत्व, विविध रसाच्या वर्णनात सारखेच कौशल्य, पात्राच्या स्वभावरेखनातील आणि मनोविश्लेषणातील चातुरी इत्यादि गुण असामान्य आहेत. 'कारुण्यं भवभूतिरेव तनुते' या सारख्या उक्तींनी त्याचे करुण-रसवर्णनातील श्रेष्ठत्व प्रस्थापित झाले आहे. विशेषतः त्याच्या नाटकातील उच्च कौटुंबिक आदर्शांनी त्याचे नाव संस्कृत वाङ्मयात अजरामर केले आहे. तेव्हा 'निबंध-माला'कार चिपळूणकर यांचे खालील उद्गार सर्वसमत होतील असेच आहेत–

"कालिदास आणि भवभूति याच्या जोडीस सर्वप्रकारे बसविण्यासारखा दुसरा कोणताही कवि नाही. वास्तव संस्कृतातील अत्युच्च कविवृंदात हे दोघेच काय ते मोडतात. दोघांसही कवित्वाची उत्कृष्ट स्फूर्ति स्वभावसिद्ध असून भाषाही तशीच दोघांची अंकित होती. दोघांच्याही कल्पनेत व पदरचनेत अगदी साधेपणा असून प्रौढता, रसिकता इत्यादि जे महाकवींचे गुण ते अगदी पूर्णत्वाने दृष्टीस पडतात."[१]

स्वकालीनांच्या अनादराने उद्विग्न झालेल्या भवभूतीचे आत्मविश्वासाचे खालील उद्गार कालाने असे यथार्थ केले आहेत–

उत्पत्स्यतेऽस्ति मम कोऽपि समानधर्मा ।
कालो ह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी ।।

---

१. वि. कृ. चिपळूणकर, 'संस्कृत कविपंचक', पृ. १२०. शास्त्रीबुवांनी भव-भूतीच्या पदरचनेतील साधेपणाविषयी आपल्या विधानाला तळटीपेत किंचित् मुरड दिली आहे.

## परिशिष्ट पाचवे

# भवभूतींचे स्फुट श्लोक

(१) सुभाषितरत्नकोश—

१८९ उत्फुल्ला नवमल्लिका मदयति घ्राणेन्द्रियाह्लादिनी
जातं धूसरमेव किंशुकतरोराश्यामलं जालकम् ।
आचिन्वन्ति कदम्बकानि मधुनः पाण्डूनि मत्तालयः
स्त्रीणां पीनघनस्तनेषु कणवान् स्वेदः करोत्यास्पदम् ॥

२०० मुधा घर्मारम्भ पवनचलितं तापहृतये
पटच्छत्राकारं वहति गगनं धूलिपटलम् ।
अमी मन्दाराणां दवदहनसंदेहितधियो
न ढौकन्ते पातुं झटिति मकरन्दं मधुलिहः ॥

१५६३ मद्व्याभिर्जगाहे पृथुशकुलकुलास्फालनत्रासहास-
व्यस्तोऽस्तम्भिकाभिर्विदिशि दिशि सरितां दिग्जयप्रक्रमेषु ।
अम्भो गम्भीरनाभीकुहरकवलनोन्मुक्तपर्यस्तलोल-
त्कल्लोलावद्धमुग्धध्वनिचकितकपत्कङ्ककुम्भं कामिनीभिः ॥

१५६४ मज्जत्यामज्जमज्जन्मणिनसुणफणाचक्रवाले फणीन्द्रे
यत्सेनोद्दामहेलाभरचलितमहाशैलकीलां बभार ।
कृच्छ्रात्पातालमूलाविलबहुलनिरालम्बजम्बालनिष्ठः
पृष्ठाष्ठीलप्रतिष्ठामवनिमवनमत्कर्परः कूर्मराजः ॥

१५६५ यस्योद्योगे बलानां सकृदपि चलतामुज्जिहानै रजोभि-
र्जम्बालिन्यम्बरस्य स्रववमरसरित्तोयपूरेण मार्गे ।
निर्मज्जच्चक्रशल्याकुलतरणिकरोत्ताडिताश्वीयवत्त-
द्वियायस्कन्दमन्दः कथमपि चलति स्यन्दनो भानवीयः ॥

६१६ उपसि गुरुसमक्षं लज्जमाना मृगाक्षी
रतिरुतमनुकर्तुं राजकीरे प्रवृत्ते।
तिरयति शिशुलीलानर्तनच्छद्मताल-
प्रचलवलयमालास्फालकोलाहलेन ॥

( २ ) सदुक्तिकर्णामृत—

१.२२.४ कां तपस्वी गतोऽवस्थामिति स्मेराविव स्तनौ ।
वन्दे गौरीघनाश्लेषभवभूतिसिताननौ ।

१.१३.२ गाढग्रन्थिप्रफुल्लद्गलविफलफणापीठनिर्यद्विषाग्नि-
ज्वालानिष्टप्तचन्द्रद्रवदमृतरसप्रोषितप्रेतभावाः ।
उज्जृम्भा बभ्रुनेत्रद्युतिमसकृदसृक्तृष्णयालोकयन्त्यः
पान्तु त्वां नागनालग्रथितशबशिर श्रेणयो भैरवस्य ॥

१ १२.२ चूडापीडानिबद्धवासुकिफणाफूत्कारनिर्यद्विष-
ज्वालाजृम्भितमत्स्यकच्छपवधूलीढेन्दुलेखामृतम् ।
अव्याद्वः स्मरसूदनस्य मदनक्रीडाकचाकर्पण-
श्च्योतन्नाकसरित्सरोपगिरिजावृष्टं जटामण्डलम् ॥

१ ८० ३ निःससार करघातविदीर्णध्वान्तदन्तरुधिरारुणमूर्ति ।
केसरीव कटकादुदयाद्रेरङ्कलीनहरिणो हरिणाङ्कः ॥

२.१२.३.१ लघुनि तृणकुटीरे क्षेत्रकोणे यवाना
नवकमलपलालस्रस्तरे सोपधाने ।
परिहरति सुषुप्तं हालिकद्वन्द्वमारात्
स्तनकलशमहोष्मावद्धरेखस्तुषारः ॥

१.१८.३ वैकुण्ठस्य करङ्कमङ्कनिहितं स्रष्टुः कपालं करे
प्रत्यङ्गं च विभूषणं विरचितं नाकौकसां कीकसैः ।
भस्म स्थावरजङ्गमस्य जगतः शुभ्रं तनौ बिभ्रतः
कल्पान्तेषु कपालिनो विजयते रौद्रं कपालव्रतम् ॥

१.४५.३ शौर्यं शत्रुकुलक्षयावधि यशो ब्रह्माण्डखण्डावधि
त्यागः सप्तसमुद्रमुद्रितमहीनिर्व्याजदानावधिः ।
वीर्यं यत्तु गिरां न तत्पथि ननु व्यक्तं हि तत्कर्मभिः
सत्यं ब्रह्मतपोनिधेर्भगवतः किं किं न लोकोत्तरम् ॥

(३) शार्ङ्गधरपद्धति—

७९१ अलिपटलैरनुयातां सहृदयहृदयज्वरं विलुम्पन्तीम् ।
मृगमदपरिमललहरीं समीर पामरपुरे किरसि ।।

७४९ दैवाद्यद्यपि तुल्योऽभूद् भूतेशस्य परिग्रहः ।
तथापि किं कपालानि तुलां यान्ति कलानिधेः ।।

१४६ निरवद्यानि पद्यानि यद्यनाद्यस्य का क्षतिः ।
भिक्षुकक्षाविनिक्षिप्तः किमिक्षुर्नीरसो भवेत् ।।

(४) रसिकजीवन—

३९५ किं चन्द्रमाः प्रत्युपकारलिप्सया
करोति गोभि. कुमुदावबोधनम् ।
स्वभाव एवोन्नतचेतसां सतां
परोपकारव्यसनं हि जीवितम् ।।

## भवभूतिस्तुतिकुसुमाञ्जलिः ।

(१) भवभूइजलहिनिग्गयकव्वामयरसकणा इव फुरन्ति ।
जस्स विसेसा अज्जवि वियडेसु कहाणिवेसेसु ।।
(वाक्पतिराजस्य)

(२) बभूव वल्मीकभवः कविः पुरा
ततः प्रपेदे भुवि भर्तृमेण्ठताम् ।
स्थित. पुनर्यो भवभूतिरेखया
स वर्तते संप्रति राजशेखरः ।। (राजशेखरस्य)

(३) मान्यो जगत्यां भवभूतिरार्यः
सारस्वते वर्त्मनि सार्थवाहः ।
वाचं पताकामिव यस्य दृष्ट्वा
जनः कवीनामनुपृष्ठमेति ।। (सोड्ढलस्य)

(४) स्पष्टभावरसा चित्रैः पदन्यासैः प्रवर्तिता ।
नाटकेषु नटस्त्रीव भारती भवभूतिना ।। (धनपालस्य)

(५) सुबन्धौ भक्तिर्नः क इह रघुकारे न रमते
धृतिर्दाक्षीपुत्रे हरति हरिचन्द्रोऽपि हृदयम् ।
विशुद्धोक्तिः शूरः प्रकृतिमधुरा भारविगिर-
स्तथाप्यन्तर्मोदं कमपि भवभूतिर्वितनुते ।। (सदुक्तिकर्णामृते)

(६) भवभूतेः शिखरिणी निरर्गलतरङ्गिणी ।
रुचिरा घनसन्दर्भे या मयूरीव नृत्यति ।। (क्षेमेन्द्रस्य)

(७) रत्नावलीपूर्वकमन्यदास्ता-
मसीमभोगस्य वचोमयस्य ।
पयोधरस्येव हिमाद्रिजायाः
परं विभूषा भवभूतिरेव ।। (सुभाषितम्)

(८) भवभूतेः सम्बन्धाद्भूधरभूरेव भारती भाति ।
एतत्कृतकारुण्ये किमन्यथा रोदिति ग्रावा ।। (गोवर्धनस्य)

(९) सुकविद्वितयं मन्ये निखिलेऽपि महीतले ।
भवभूतिः शुकश्चायं वाल्मीकिस्तु तृतीयकः ।। (बल्लालस्य)

(१०) भव्यां यदि विभूतिं त्वं तात कामयसे तदा ।
भवभूतिपदे चित्तमविलम्बं निवेशय ।। (सुभाषितम्)

(११) प्राचेतसेन यानीता पालिता भवभूतिना ।
सर्वतश्चर्व्यते वाणी संवाद्य कविमानिभिः ।। (सुभाषितम्)

(१२) नाटके भवभूतिर्वा वयं वा वयमेव वा ।
उत्तरे रामचरिते भवभूतिर्विशिष्यते ।। (सुभाषितम्)

---

# काही संदर्भग्रंथ व लेख


**भवभूतीचे ग्रंथ**

( अ ) (१) महावीरचरित—स. तोडरमल्ल ( ऑक्स्फर्ड युनिव्हर्सिटी प्रेस )
(२) मालतीमाधव—सं. रा. गो. भांडारकर ( बॉबे संस्कृत सीरीज )
(३) उत्तररामचरित—( १ ) श्री. कृ. बेल्वलकर
( २ ) पा. वा. काणे

( आ ) मराठी भाषांतरे
(१) मालतीमाधव नाटक—कृष्णशास्त्री राजवाडे
(२) उत्तररामचरित नाटक—परशुराम बल्लाळ गोडबोले
(३) भवभूतिप्रणीत उत्तररामचरित-मराठी भाषांतर—श्री. कृ. बेल्वलकर

( इ ) मराठी चर्चात्मक ग्रंथ
(१) महावीरचरित–सार व विचार—मा. त्र्यं. लेले.
(२) मालतीमाधव–सार व विचार—मा. त्र्यं. लेले.
(३) उत्तररामचरित–सार व विचार—मा. त्र्यं. लेले.
(४) संस्कृत कविपंचक - विष्णु कृष्णशास्त्री चिपळूणकर.

( ई ) चर्चात्मक लेख—
कविप्रवर भवभूति व तत्कृत उत्तररामचरित—प. रंगाचार्य रड्डी
( रड्डीशास्त्री यांचा लेखसंग्रह ).

**संस्कृत-प्राकृत ग्रंथ**

(१) गउडवहो—वाक्पतिराज ( सं. शं. पां. पंडित, बॉबे संस्कृत सीरीज ).
(२) राजतरंगिणी—कल्हण ( विश्वेश्वरानंद वैदिक संशोधन मंडळ ).
(३) प्रबन्धकोश—राजशेखर.
(४) काव्यालङ्कारसूत्रवृत्ति—वामन.
(५) बालरामायण—राजशेखर.

(६) यशस्तिलकचम्पू—सोमदेव.
(७) उदयसुन्दरी कथा—सोड्ढल.
(८) दशरूपावलोक—धनिक.
(९) वक्रोक्तिजीवित—कुन्तक.
(१०) सुभाषितरत्नकोश—विद्याकर.
(११) सदुक्तिकर्णामृत—श्रीधरदास.
(१२) सरस्वतीकण्ठाभरण—भोज.
(१३) ध्वन्यालोक—आनन्दवर्धन ( काशी संस्कृत सीरीज ).
(१४) कामसूत्र—वात्स्यायन.
(१५) भोजप्रबन्ध—बल्लाळ.
(१६) श्रीमच्छंकरदिग्विजय—विद्यारण्य.
(१७) भावनाविवेक—मंडनमिश्र.
(१८) श्लोकवार्त्तिक—कुमारिल.
(१९) तत्त्वसंग्रह—शान्तरक्षित.
(२०) स्याद्वादरत्नाकर—श्रीदेव.
(२१) तत्त्वप्रदीपिका—चित्सुखाचार्य.
(२२) तन्त्रालोक—अभिनवगुप्त.
(२३) वाल्मीकिरामायण—(चिकित्सक आवृत्ति, बडोदे).
(२४) कुन्दमाला—दिङ्नाग (स. कालीकुमार दत्त).
(२५) काव्यप्रकाश—मम्मट (स. झळकीकर).
(२६) काव्यादर्श—दण्डी.
(२७) भासनाटकचक्र—(सं. देवधर).
(२८) आश्चर्यचूडामणि—शक्तिभद्र.
(२९) अनर्घराघव—मुरारि.
(३०) प्रसन्नराघव—जयदेव.
(३१) कर्पूरमंजरी—राजशेखर.
(३२) मल्लिकामारुत—उद्दंडी.
(३३) कौमुदीमित्रानन्द—रामचन्द्र.

(ऊ) इतर संदर्भ ग्रंथ—

( १ ) **History of Sanskrit Literature.— S. K De.**
( २ ) **Sanskrit Drama— A. B. Keith.**

( ३ ) Bhavabhūti— R. D Karmarkar.
( ४ ) महाकवि भवभूति—गंगासागर राय.
( ५ ) प्राकृत भाषा और साहित्य का आलोचनात्मक इतिहास—
नेमिचन्द्र शास्त्री.
( ६ ) Some Lost Rāma Plays— V. Raghavan.
( ७ ) संशोधनमुक्तावलि, सर १ ते ५— वा. वि. मिराशी.
( ८ ) वाकाटक नृपति आणि त्यांचा काल— वा. वि. मिराशी.
( ९ ) कलचुरि नृपति आणि त्यांचा काल— वा. वि. मिराशी.
(१०) History of Kanauj— R. S. Tripathi.
(११) Padmâvati— M. B. Garde.
(१२) The Coins of Nāga Kings— H. V. Trivedi.
(१३) Studies in the Upapurānas—R C Hazra.
(१४) Abhinavagupta— K. C. Pandey.
(१५) Studies in Indology—V. V. Mirashi.

# सूची

छ



ज



ड



त



द



ध



न

म

श



ष



स

# भारतीय साहित्यशास्त्र

ग. त्र्यं. देशपांडे

---

जवळ जवळ दोन हजार वर्षांपूर्वीच्या कालावधीत विकसित पावलेल्या भारतीय साहित्यशास्त्राचा संस्कृत साहित्याशी फार घनिष्ट संबंध आहे. संस्कृत साहित्य-शास्त्रातील विविध कल्पनांचा उदय व विकास अन् त्याबरोबरच भारतीय साहित्य-शास्त्रातील अनेक शब्दप्रयोगाच्या अर्थनिश्चितीसाठी शब्दप्रयोगातून व्यक्त होणाऱ्या कल्पनाची झालेली उत्क्रांति–ह्या उत्क्रांतीच्या सर्व महत्त्वपूर्ण टप्प्याच्या अभ्यासाची उणीव सामान्यतः सर्वच आस्थेवाईक अभ्यासकाना भासते. ही उणीव भरून काढण्याचा यत्न सदर ग्रंथात केला आहे ह्या अंगाव्यतिरिक्त इतर अनेक सलग्न अंगाचा एकाच वेळी विचार करून प्रा. ग. त्र्यं देशपांडे यानी आपल्या साहित्य-शास्त्राचा विकासक्रम लक्षात घेण्याचा प्रयत्न केलेला असल्यामुळे त्यांच्या या विवेचनात एक प्रकारे पूर्णत्व आले आहे.

ह्या ग्रंथाचे दोन भाग पडतात. पहिल्या विभागात दोन हजार वर्षांच्या कालावधीत उदयास आलेल्या संस्कृत साहित्यशास्त्रीय कल्पनांच्या उत्क्रांतीचा सुस्पष्ट आलेख असून दुसऱ्या भागात त्यातील प्रत्येक कल्पनेशी संलग्न असणाऱ्या सर्व प्रमुख विचाराची सोपपत्तिक मांडणी आहे. त्यामुळे एकाच वेळी ह्या साहित्यविषयक प्रश्नाचा विचार करताना आजहि निरपवाद जाणवणारे त्याचे मूल्य ह्याची सुस्पष्ट कल्पना वाचकाना येईल भारतीय साहित्यशास्त्राचा हा केवळ इतिहास नव्हे. इति-हासाबरोबर त्याच्या मंथनातून प्रा. देशपांडे ह्यांच्या हाती आलेल्या साहित्याच्या चिरंतन मूल्याचा लाभहि त्यातून वाचकाना झाल्याशिवाय राहणार नाही.

## कालिदासाची नाटके

र. पं. कंगले

---

कालिदासाचे चरित्र, त्याचा काल व संस्कृतनाट्य या विषयांतील अद्ययावत् संशोधनाचा परिपाक येथे पूर्वरंगादाखल केला आहे. त्याच्या नाटकांचे मर्मग्राही समालोचन हा मुख्य विषय. ही मते चावून विकृत झालेली नव्हेत; त्यात ताजेपणाचा बहर आहे. अधिक खोलवर शोधाची ओढ लागावी असा उत्तेजक वास त्यात आहे. कालिदासासारख्या प्राचीन श्रेष्ठाकडे आपले बहुतेक विद्वान 'पौराणिक' दृष्टीने पहातात. 'ऐतिहासिक' दृष्टीने नव्हे. या पूर्वपूजेतून गुणांची अतिशयोक्ति होते; दोष नाहीतच असा भाबडा आग्रह मांडतो; माणसाची विभूति बनविली जाते. प्रा. कंगल्यांनी हे दुरभिमान टाळून कालिदासाच्या नाट्य-सृष्टीची सूक्ष्म चिकित्सा केली आहे. त्याच्या नाट्यदोषांच्या विवेचनाबरोबरच त्याच्या थोर गुणांचा मुक्त गौरवहि केला आहे.

'कालिदास-काल आणि चरित्र' ह्या प्रकरणात सर्व पूर्वेतिहासाचा संदर्भपूर्वक अभ्यास करून 'संस्कृत नाटकाचे स्वरूप', ह्या दुसऱ्या प्रकरणात संस्कृत नाट्यशास्त्राचा परामर्श घेतला आहे. ही पार्श्वभूमि तयार केल्यामुळे नाटकाचे रसग्रहण सोपे जाते. बहुधा अशा प्रकारच्या ग्रंथात ही पार्श्वभूमि कोणीहि स्पष्ट करीत नाही. ती लेखकाने आवर्जून केली आहे. यानंतरच्या पुढील तीन प्रकरणांतील 'मालविकाग्निमित्रम्', 'विक्रमोर्वशीयम्' व 'अभिज्ञानशाकुन्तलम्' या नाटकांचे रसग्रहण सर्वसामान्य वाचकालाहि रस वाटावा इतके कसदार झाले आहे.

## भरतमुनीचे नाट्यशास्त्र, दुसरी आवृत्ती
### गोदावरी वासुदेव केतकर

---

नाट्यशास्त्रावरील आदिग्रंथ 'भरतमुनिकृत नाट्यशास्त्र' याचा ह्या ग्रंथात सांगोपांग विचार करण्यात आला आहे. एकोणिसशे चोवीस साली गोदावरी केतकर ह्यांनी वयाच्या अवघ्या २१ व्या वर्षी महिला विद्यापीठाच्या प्रवेशागमा परीक्षेसाठी सतत चार वर्षे परिश्रम करून भारतीय नाट्यशास्त्रावर प्रस्तुत प्रबंध लिहिला. त्याचे परीक्षक सर्वश्री वि. का. राजवाडे, पां. वा. काणे व व्ही. एम्. सुखटणकर हे होते. त्या सर्वांनी ह्या प्रबंधाचा गौरवच केला.— 'निबंध उत्तम झाला आहे' (राजवाडे), 'मूल्यमापनाची शक्ति प्रबंधात बरीच जाणवते' (काणे), 'पूर्णपणे समर्थ, मौलिक आणि भूषणावह अशी कृति' (सुखटणकर).

प्रस्तुत प्रबंध एकूण अकरा प्रकरणात विभागला गेला आहे. नाट्यकला व नाट्यशास्त्र, भारतीय नाट्यगृह (नव्या संशोधनासह), नृत्त, रस, अभिनय, नाट्यकाव्य, नाट्यवस्तु, नाट्यपात्रे, दशरूपे (निरनिराळे नाट्यप्रकार) ह्यांचा सांगोपांग विचार करण्यात आला आहे. शिवाय प्रत्याहार, अवतरण, आरंभ, आश्रावणा, वक्त्रपाणि, परिघट्टना, संस्फोटना व आसारित ह्या आज अनावश्यक मानल्या गेलेल्या अंगांचा पुस्तीत आवर्जून विचार करण्यात आला आहे. प्राचीन संस्कृत नाट्यशास्त्रावर लिहिलेला हा ग्रंथ नाट्यसंशोधकास, नाट्यकलेच्या अभ्यासकास व रसिकास तद्वत् संस्कृत-मराठी आणि इतरहि भाषांतील साहित्यशास्त्राच्या अभ्यासकास खचितच मार्गदर्शक ठरावा.

# Drama in Sanskrit Literature

By Adya Rangacharya

---

Drama is perhaps the richest part of Sanskrit Kavya Shri Adya Rangacharya, who is not only a Sanskrit scholar but also a playwright and producer, has a new approach to the subject and has many interesting things to say His elucidation of the four vrittis deserve consideration. The roles of the Sutradhara, Vidushaka and Vishakambhaka are usefully analysed. Helpful, lucidly argued and neatly organised.

In this second, revised and expanded edition three chapters on Sanskrit stage and production and one on the comparison of Rasa theory with western theory of Drama have been added. For the convenience of general Indian readers the verses quoted in the text in roman script are printed at the end of the book in Devanagari script. A must for all students of Sanskrit literature.